# वाचकांस—

—:०:—

भगवान् श्रीकृष्णाच्या कृपेनें 'महाभारतार्थी'चा द्वितीय खंड आज प्रकाशित होत आहे. प्रस्तुत खंड पहिल्या खंडाप्रमाणेंच शक्य तितका अंतर्बाह्य सुशोभित करण्याचा प्रयत्न केला आहे व तो पहिल्या खंडाप्रमाणेंच आमच्या वाचकांस आवडेल अशी आशा आहे.

महाभारत हा ग्रंथ कथोपकथांचें आगरच आहे. पहिल्या खंडामध्यें आदिपर्व म्हणजे कथानकास सुरवात असल्यामुळें कित्येकांचा गैरसमज होण्याचा संभव आहे. अशांनीं हा द्वितीय खंड वाचल्यास त्यांचा गैरसमज दूर होऊन त्यांना या ग्रंथाची गोडी लागेल व मग ते सर्व महाभारत वाचल्याशिवाय रहाणार नाहींत. तरी अशा लोकांनीं हा खंड जरूर वाचून पहावा अशी आमची त्यांस आग्रहाची विनंति आहे.

शेवटीं ज्यांच्या सक्रिय सहानुभूतीनें आम्हांला हा दुसरा खंड प्रसिद्ध करतां आला, त्या आमच्या आश्रयदात्यांचे आभार मानून व आम्हांला ते उत्तरोत्तर जास्त मदत करीत जातील अशी आशा व्यक्त करून तूर्त रजा घेतों.

आपला,

मं. ना. कुळकर्णी.

# विषयानुक्रमणिका



## १ आदिपर्व ( पुढें चालू )

## चैत्ररथपर्व ११. पृ. १–४७

तपःस्वाध्यायनिरत असलेल्या ब्राह्मणाचें हें गोधन मी बलात्कारानें हरण करीन' अशी क्षत्रिय विश्वामित्रानें त्याला दाखविलेली भीति २७; तसें करण्यास वसिष्ठाची अनुज्ञा, नंदिनीला बलात्कारानें नेण्याचा विश्वामित्राचा प्रयत्न, क्लेश पावणाऱ्या नंदिनीचा वसिष्ठाशीं संवाद २८; शेवटीं 'तूं स्वसामर्थ्यानें येथें खुशाल रहा' अशी वसिष्ठाची अनुज्ञा मिळतांच नंदिनीनें आपल्या भिन्न भिन्न अंगांपासून उत्पन्न केलेले यवनवीर, त्यांनीं केलेला विश्वामित्राच्या सैन्याचा पराभव २९; तें पाहून 'तपच श्रेष्ठ बल आहे' असा विश्वामित्राचा निश्चय, त्याला तपश्चर्येनें ब्राह्मणत्वाची प्राप्ति ३०.

**अध्याय १७६ वा**—इक्ष्वाकु-कुलोत्पन्न कल्माषपाद-राजाची मृगया ३०; मार्गासाठीं वसिष्ठपुत्र शक्तीशीं त्याचा कलह, राजानें ऋषीला केलेलें ताडन, त्यास 'तूं नरभक्षक राक्षस हो' असा ऋषीचा शाप, राजाच्या शरीरांत विश्वामित्रानें करविलेला राक्षसप्रवेश ३१; वनांत फिरणाऱ्या राजापाशीं क्षुधित ब्राह्मणानें केलेली मांसयुक्त भोजनाची याचना, तें देण्याचें राजाचें अभिवचन, प्रमादशील राजानें इतर मांसाच्या अभावीं त्यास नरमांस देण्याविषयीं केलेली आज्ञा, नरमांस पाहून ब्राह्मणानें 'तूं नरभक्षक होशील' असा राजास दिलेला शाप ३२; कल्माषपादानें केलेला वसिष्ठाच्या सर्व पुत्रांचा संहार, शोकाकुल झालेल्या वसिष्ठानें केलेला आत्महत्येचा प्रयत्न ३३.

**अध्याय १७७ वा**—वसिष्ठाच्या आत्महत्याप्रसंगानें विपाशा व शतद्रु या नद्यांची प्रसिद्धि ३४; वसिष्ठाचें स्वाश्रमीं पुनरागमन, वेड्याप्रमाणें फिरणाऱ्या वसिष्ठाच्या मागोमाग शक्तिपत्नी अदृश्यंतीचें अनुसरण, गर्भस्थ शक्तिपुत्राच्या वेदाध्ययनध्वनीचें श्रवण, अदृश्यंतीचें त्याविषयीं तत्त्वकथन, त्यामुळें वसिष्ठाचें समाधान, नरभक्षक कल्माषपादाच्या दर्शनानें अदृश्यंतीला वाटलेलें भय, वसिष्ठाच्या अनुग्रहानें त्याची शापनिवृत्ति ३५; वसिष्ठापासून कल्माषपादाला पुत्रप्राप्ति ३६.

**अध्याय १७८ वा**—शक्तिपुत्र पराशराचा जन्म, तो वसिष्ठालाच आपला पिता मानीत आहे, असें पाहून अदृश्यंतीनें त्याला तत्त्वार्थ सांगून त्याचें केलेलें निवारण ३७; पितृमरणाच्या वार्तेनें दुःखी झालेल्या पराशरानें केलेला सर्वलोकविनाशाचा निश्चय, त्याचें निवारण करण्यासाठीं वसिष्ठानें सांगितलेला भृगूंच्या नाशाचा पूर्वेतिहास ३८; और्वाची उत्पत्ति व त्याच्या तेजानें क्षत्रियांचें अंधत्व ३९.

---

## स्वयंवरपर्व १२. पृ. ४७–६६.

---

## वैवाहिकपर्व १३. पृ. ६६–८३.

---

## विदुरागमन-राज्यलंभपर्व १४. पृ. ८३–१११.

---

## अर्जुनवनवासपर्व १५. पृ. १११-१२३.



---

## सुभद्राहरणपर्व १६. पृष्ठ १२३–१२७.



---

## हरणहारिकापर्व १७. पृ. १२७–१३३.



---

## खांडवदाहपर्व १८. पृ. १३४–१५०.

---

## मयदर्शनपर्व १९. पृ. १५०–१६७.



---

# २ सभापर्व.



## सभाक्रियापर्व १. पृ. १७१–१८०.



---

## लोकपालसभाख्यानपर्व २. पृ. १८०–२११.



---

## राजसूयारंभपर्व ३. पृ. २१२–२३३.



---

## जरासंधवधपर्व ४. पृ. २३३–२५०.

## दिग्विजयपर्व ५. पृ. २५१–२६४.



## राजसूयपर्व ६. पृ. २६४–२७१.

---

## अर्घाभिहरणपर्व ७. पृ. २७१–२८४



---

## शिशुपालवधपर्व ८. पृ. २८४–३०२

---

## द्यूतपर्व ९. पृ. ३०२–३८३.

---

## अनुद्यूतपर्व १०. पृ. ३८४–[illegible]

---

# ३ वनपर्व.

## आरण्यकपर्व १. पृ. ४०९–४८०.

---

## किर्मीरवधपर्व २. पृ. ४४५–४५०



---

## अर्जुनाभिगमनपर्व ३. पृ. ४५०–४८०



---

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )

### द्वितीय भाग.

## आदिपर्व—( पुढें चालू )

## चैत्ररथपर्व ११.

### अध्याय १६५ वा.

[ १ पांडवांचा अतिथिब्राह्मणास द्रौपदीच्या जन्माविषयीं प्रश्न. ]

( १ ) जनमेजय—हे श्रेष्ठ ब्राह्मणा, त्या बकराक्षसाचा वध केल्यावर पुढें त्या नरव्याघ्र पांडवांनीं काय केलें ?

वैशंपायन—हे राजन्, बकासुराला मारून ते पांडव त्या ब्राह्मणाच्याच घरीं वेदाचें अध्ययन करीत राहिले. अशा रीतीनें कांहीं काल लोटला असतां त्या ब्राह्मणाच्या घरीं कोणी एक तीक्ष्ण व्रतें आचरणारा ब्राह्मण वस्तीला आला. तेव्हां त्या सर्व अतिथींचा सत्कार करणाऱ्या ब्राह्मणानें आलेल्या श्रेष्ठ अतिथीचें योग्य प्रकारें पूजन करून त्यास रहावयास जागा दिली. तो ब्राह्मण अनेक श्रवणीय कथा सांगत असतां ते सर्व पराक्रमी पांडव कुंतीसह त्याच्या समीप जाऊन बसले. त्या ब्राह्मणानें अनेक पवित्र तीर्थें, नद्या, विविध राजे, आश्चर्यकारक देश व शहरें यांचें मनोरंजक वर्णन केलें.

जनमेजया, त्याचप्रमाणें त्या ब्राह्मणानें 'पांचाल देशांत लवकरच याज्ञसेनीचा अद्भुत स्वयंवर होणार आहे' हेंहि वृत्त सांगितलें. धृष्टद्युम्नाची व शिखंडीची उत्पत्ति, द्रुपदाच्या यज्ञापासून जन्मलेल्या द्रौपदीचें अयोनिजत्व इत्यादि अलौकिक गोष्टीहि त्यांस निवेदन केल्या. तेव्हां त्या महात्म्या ब्राह्मणाच्या मुखानें त्या सर्व अद्भुत कथा ऐकून श्रेष्ठ पांडवांनीं त्याला तो सर्व वृत्तांत सविस्तर सांगण्याची विनंति केली.

ते म्हणाले—हे विप्रश्रेष्ठा, द्रुपदाचा पुत्र धृष्टद्युम्न अग्नीपासून व द्रौपदी यज्ञवेदींतून कशी उत्पन्न झाली ? धृष्टद्युम्न महाधनुर्धर द्रोणापासून सर्व शस्त्रें कसा शिकला ? हे ब्रह्मन्, द्रुपदराजा व द्रोणाचार्य या दोघांची इतकी दृढ मैत्री असतां पुढें त्यांच्यामध्यें कोणत्या कारणानें वैर उत्पन्न झालें ?

राजा जनमेजया, याप्रमाणें त्या पराक्रमी पांडवांनीं विचारलें असतां तो वक्त्यांतील श्रेष्ठ ब्राह्मण द्रौपदीची जन्मकथा सांगूं लागला. १. ११. १६५.

---

## अध्याय १६६ वा.

[ १ द्रोणाच्या उत्पत्तीपासून द्रुपदाच्या पराभवापर्यंत संक्षिप्त वृत्तान्त. ]

( १ ) वैशंपायन—परिक्षित्पुत्रा, त्या ब्राह्मणानें पुढील कथा सांगण्यास आरंभ केला. तो म्हणाला—"हे तपोनिष्ठहो, पूर्वीं गंगाद्वारीं 'भरद्वाज'-नांवाचा एक मोठा ऋषि होता. तो एकदा गंगेवर स्नान करावयास गेला. तेथें घृताचि-अप्सरा त्याच्या अगोदरच येऊन स्नान करीत होती. तिला पाहून हा बालब्रह्मचारी ऋषि कामासक्त झाला. त्यामुळें त्याचें अमोघ वीर्य स्खलन पावलें. तें त्यानें द्रोणकलशांत धारण केलें. त्यापासून द्रोणाची उत्पत्ति झाली. त्यानें सर्व वेद व वेदांगें यांचें अध्ययन केलें.

भरद्वाजाचा 'पृषत' या नांवाचा राजा मित्र होता. त्याला द्रुपद हा पुत्र झाला. तो प्रत्यहीं भरद्वाजाश्रमास जाऊन द्रोणाबरोबर अध्ययन व क्रीडा करीत असे. कांहीं दिवसांनीं 'पृषत'-राजा मरण पावला व द्रुपद राज्यावर बसला. इतक्यांत 'परशुराम आपलें सर्व धन ब्राह्मणांना देऊन टाकीत आहे' असें द्रोणाला कळलें. लागलाच तो परशुरामाकडे गेला. तेवढ्या अवधींत

---

१ या अध्यायांतील सर्व कथानक संभवपर्व अ. १३० पृ. ३६७ यांत सविस्तर आलेलें आहे. यास्तव येथें तें संक्षेपानें दिलें आहे.

परशुरामानें पृथ्वीसह आपलें सर्व धन ब्राह्मणांना देऊन टाकिलें होतें. त्यामुळें 'मी धनाच्या इच्छेनें आपल्याकडे आलों आहें' हें द्रोणाचें वचन ऐकून 'ब्राह्मणा, माझ्यापाशीं माझें शरीर आणि अस्त्रें एवढेंच काय तें आतां राहिलें आहे, त्यांतील काय हवें असेल तें मागून घे' असें परशुराम म्हणाला. तेव्हां द्रोणानें त्याच्यापासून प्रयोग व संहार यांच्या मंत्रांसह सर्व अस्त्रें मागून घेतलीं व त्यामुळें तो कृतकृत्य झाला. भार्गवरामापासून ब्रह्मास्त्र मिळाल्यामुळें तर तो सर्व अस्त्रवेत्त्यांत श्रेष्ठ झाला.

त्यानंतर द्रोण द्रुपदाकडे जाऊन 'मी तुझा बालमित्र आहें, तूं मला ओळखिलेंस का ?' इत्यादि त्याला विचारूं लागला. तेव्हां 'विद्वान् अविद्वानाचा, रथी अरथ्याचा व राजा अराजाचा मित्र कधींहि होत नसतो, तेव्हां तूं दरिद्री ब्राह्मण असतांना मला आपला मित्र कसें म्हणवितोस ?' असें द्रुपदानें उद्दामपणानें कर्णकटु भाषण केलें.

तें ऐकतांच द्रुपदाचा हा दर्प घालविण्याचा निश्चय करून तो मानी द्रोण कुरुश्रेष्ठांच्या हस्तिनापुरास गेला. भीष्मानें त्याचा मोठा सत्कार करून व विपुल धनादि देऊन आपले पौत्र—कौरव व पांडव—यांस अस्त्रविद्या शिकण्यासाठीं त्याच्या स्वाधीन केलें. तेव्हां त्या शिष्यांना एकत्र जमवून 'मला अत्यंत इष्ट असलेली गुरुदक्षिणा तुम्ही द्याल ना ?' असा त्यानें प्रश्न केला. त्या वेळीं अर्जुनादि शिष्यांनीं 'हो हो, आपल्याला अभीष्ट असलेली दक्षिणा आम्ही अवश्य देऊं' असें सांगितलें.

त्यानंतर सर्व पांडव कृतास्त्र व कृतनिश्चय झाले. तेव्हां द्रोण आपल्या गुरुदक्षिणेसाठीं त्यांस म्हणाला—"अहिच्छत्रामध्यें द्रुपदराजा राज्य करीत आहे. त्याचें राज्य हरण करून तुम्ही मला सत्वर द्या." गुरूच्या या आज्ञेप्रमाणें पांच पांडवांनीं द्रुपदाला युद्धांत जिंकून व त्याच्या सचिवांसह त्याला बांधून द्रोणाचार्यापाशीं आणिलें.

द्रुपदाला पाहून द्रोण म्हणाला—हे राजा, मी तुझ्या मैत्रीची पुनः इच्छा करितों. पूर्वीप्रमाणेंच आपलें सख्य असावें अशी माझी इच्छा आहे. 'अराजा राजाचा मित्र होऊं शकत नाहीं,' असें तूं मला सांगितलेंस, म्हणून मी हा राज्यासाठीं यत्न केला. हे यज्ञसेना, आतां यापुढें तूं भागीरथीच्या दक्षिण तीरावरील राजा हो व मी उत्तर तीराचा अधिपति होतों.

---

## स्वयंवरपर्व १२. पृ. ४७–६६.

---

## वैवाहिकपर्व १३. पृ. ६६–८३.

---

## विदुरागमन-राज्यलंभपर्व १४. पृ. ८३-१११.

---

## अर्जुनवनवासपर्व १५. पृ. १११–१२३.



---

## सुभद्राहरणपर्व १६. पृष्ठ १२३–१२७.



---

## हरणहारिकापर्व १७. पृ. १२७–१३३.



---

## खांडवदाहपर्व १८. पृ. १३४–१५०.

---

## मयदर्शनपर्व १९. पृ. १५०–१६७.



---

# २ सभापर्व.



## सभाक्रियापर्व १. पृ. १७१–१८०.



---

## लोकपालसभाख्यानपर्व २. पृ. १८०–२११.



---

## राजसूयारंभपर्व ३. पृ. २१२–२३३.



---

## जरासंधवधपर्व ४. पृ. २३३–२५०.

**अध्याय २० वा**—कृष्णाचा भीमार्जुनांसह जरासंधवधार्थ मगधदेशीं जाण्याचा संकेत २३३; युधिष्ठिराची त्यांस मोठ्या खेदानें अनुज्ञा २३४; भीमार्जुन व कृष्ण यांचें स्नातक ब्राह्मणवेषानें मगधदेशीं गमन, गोरथपर्वतावरून त्या मगधदेशाचें निरीक्षण २३५.

**अध्याय २१ वा**—पर्वतावरून कृष्ण व भीमार्जुन यांचें गिरिव्रजावलोकन, याच प्रसंगाचें सुंदर चित्र २३६; गिरिव्रजाचें वर्णन, द्वारपालांची उपेक्षा करून त्या वीरांनीं चैत्यप्राकाराचा केलेला विध्वंस २३७; त्या वीरांचा अमार्गानें नगरप्रवेश, पुष्पमालाधारण, जरासंधाचा शोध करीत त्यांचें राजमंदिरांत आगमन, जरासंधाच्या स्वागताचा स्वीकार न करितां त्याच्या यज्ञशालेंत वास २३८; मध्यरात्रीनंतर त्या वीरांना भेटून त्यांच्या ब्राह्मण्याविषयीं जरासंधानें केलेलें शंकाप्रदर्शन २३९; श्रीकृष्णाचें त्यास उत्तर २४०.

**अध्याय २२ वा**—'तुमच्याशीं वैर केल्याचें किंवा अधर्माचरण केल्याचें मला आठवत नाहीं' इत्यादि जरासंधाचें भाषण २४०; तूं रुद्राला क्षत्रिय-राजांचा बलि देण्यास प्रवृत्त झाला आहेस, यास्तव तूं क्षत्रियांना वध्य आहेस, मी कृष्ण व हे दोघे भीमार्जुन तुझा वध करण्यासाठीं येथें आलों आहों, असें श्रीकृष्णाचें कथन २४१; जरासंधाचें स्वसमर्थन, त्यानें केलेला सहदेव-पुत्रास राज्याभिषेक, युद्धार्थ सज्ज होणें २४२.

**अध्याय २३ वा**—'तूं आम्हांतील कोणाशीं युद्ध करणार' असा श्रीकृष्णाचा प्रश्न, 'वृकोदराशीं' असें जरासंधाचें उत्तर २४३; भीम व जरासंध यांचें आबालवृद्ध-स्त्रीपुरुषांच्या समूहांत तेरा अहोरात्र मल्लयुद्ध, जरासंधाचा थकवा २४४.

**अध्याय २४ वा**—जरासंधाच्या वधाविषयीं साशंक झालेल्या भीमाला कृष्णाचें प्रोत्साहन, जरासंधाला मधोमध चिरून भीमानें केलेला त्याचा वध २४६; बंदींतील राजांची मुक्तता, जरासंधाच्या रथावर आरूढ होऊन कृष्णादिकांचें गिरिव्रजांतून प्रयाण २४७; त्या दिव्य रथाचें वर्णन, नगराबाहेर स्थिर केलेल्या रथापाशीं ब्राह्मण व बंधमुक्त केलेले नृपाल यांचें आगमन, त्यांनीं केलेली कृष्णस्तुति २४८; कृष्णानें केलेलें भूपालांचें समाधान, धर्मराजाच्या राजसूय-यज्ञास साह्य करण्याविषयीं कृष्णानें प्रदर्शित केलेली इच्छा; राजांपासून अनिच्छेनें रत्नस्वीकार, जरासंधपुत्र सहदेवास अभयदान, भीमार्जुनांसह इंद्रप्रस्थास प्रत्या-

---

## दिग्विजयपर्व ५. पृ. २५१–२६४.



---

## राजसूयपर्व ६. पृ. २६४–२७१.

---

## अर्घाभिहरणपर्व ७. पृ. २७१–२८४



---

## शिशुपालवधपर्व ८. पृ. २८४–३०२

---

## द्यूतपर्व ९. पृ. ३०२–३८३.

---

## अनुद्यूतपर्व १०. पृ. ३८४–४[illegible]

---

# ३ वनपर्व.

## आरण्यकपर्व १. पृ. ४०९–४८०.

---

## किर्मीरवधपर्व २. पृ. ४४५–४५०



---

## अर्जुनाभिगमनपर्व ३. पृ. ४५०–४८०



---

# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )

## द्वितीय भाग.

## आदिपर्व—( पुढें चालू )

## चैत्ररथपर्व ११.

### अध्याय १६५ वा.

[ १ पांडवांचा अतिथिब्राह्मणास द्रौपदीच्या जन्माविषयीं प्रश्न. ]

( १ ) जनमेजय—हे श्रेष्ठ ब्राह्मणा, त्या बकराक्षसाचा वध केल्यावर पुढें त्या नरव्याघ्र पांडवांनीं काय केलें ?

वैशंपायन—हे राजन्, बकासुराला मारून ते पांडव त्या ब्राह्मणाच्याच घरीं वेदाचें अध्ययन करीत राहिले. अशा रीतीनें कांहीं काल लोटला असतां त्या ब्राह्मणाच्या घरीं कोणी एक तीक्ष्ण व्रतें आचरणारा ब्राह्मण वस्तीला आला. तेव्हां त्या सर्व अतिथींचा सत्कार करणाऱ्या ब्राह्मणानें आलेल्या श्रेष्ठ अतिथीचें योग्य प्रकारें पूजन करून त्यास रहावयास जागा दिली. तो ब्राह्मण अनेक श्रवणीय कथा सांगत असतां ते सर्व पराक्रमी पांडव कुंतीसह त्याच्या समीप जाऊन बसले. त्या ब्राह्मणानें अनेक पवित्र तीर्थें, नद्या, विविध राजे, आश्चर्यकारक देश व शहरें यांचें मनोरंजक वर्णन केलें.

हे श्रेष्ठांनो, द्रोणाचें हें वचन द्रुपदानें मान्य केलें व 'आपलें पूर्वीप्रमाणेंच सख्य असो' असें म्हटलें. याप्रमाणें त्या दोघांनीं परस्परांशीं सख्य केलें व ते दोघेहि स्व-स्वस्थानीं निघून गेले. पण क्षत्रिय स्वभावतःच दीर्घद्रोही असल्यामुळें द्रुपदाला तो क्षणिक अपमानहि सहन झाला नाहीं. तो अतिशय खिन्न व त्यामुळें कृश झाला. १. ११. १६६.

---

## अध्याय १६७ वा.

[ १ धृष्टद्युम्न व द्रौपदी यांची उत्पत्ति. ]

(१) **ब्राह्मण** म्हणाला—हे महात्म्यांनो, पुढें कर्मसिद्ध ब्राह्मणाचा शोध करणारा तो असहिष्णु द्रुपदराजा अनेक ब्राह्मणांच्या वसतिस्थानांतून हिंडला. शोकानें विवेकहीन झालेला तो राजा द्रोणाचार्यांचा सूड घेणाऱ्या पुत्राची इच्छा करूं लागला. 'द्रोणाचा प्रतिकार करण्यास समर्थ असें पराक्रमी अपत्य मला नाहीं' असें म्हणून तो नित्य चिंता करूं लागला. आपल्या विद्यमान असलेल्या पुत्रांना उद्देशून 'या सर्व बंधूंना धिक्कार असो,' असें तो म्हणूं लागला. द्रोणाचा पराभव करण्याच्या इच्छेनें तो वारंवार निराशेनें दुःखाचे सुस्कारे टाकीत असे. द्रोणाचा प्रभाव, विनय, शिक्षण, क्षात्रतेज व आचरण यांचा विचार करणाऱ्या द्रुपदास त्याचा सूड घेण्याचा कांहीं उपाय सुचेना.

हे भारता, एकदा द्रोणाच्या प्रतिकाराचा यत्न करणारा तो नृपश्रेष्ठ द्रुपद यमुना व गंगा यांच्या तीरावर फिरत असतां ब्राह्मणांच्या पवित्र निवासस्थानीं आला. हे राजा, त्या ठिकाणीं स्नातक नसलेला व व्रतें न करणारा असा एकहि ब्राह्मण नव्हता. तेथें त्यानें वेदाध्ययन करणारे व तीव्र व्रतें आचरणारे याज व उपयाज या नांवाचे दोन श्रेष्ठ ब्राह्मण पाहिले. ते ब्रह्मर्षि शांत व परब्रह्मनिष्ठ होते. संहितेच्या अध्ययनांत तत्पर असलेल्या त्या दोघांचें गोत्र काश्यप होतें.

राजा, द्रुपदानें त्या कुमारीप्रभव, सूर्यभक्त, सुस्वरूप, ब्रह्मवेत्त्या ऋषिश्रेष्ठ ब्राह्मणांचें अतुल सामर्थ्य जाणून त्यांस त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण करण्याचें अभिवचन दिलें व त्यांतील कनिष्ठ भ्राता जो उपयाज त्याला तो एकान्तांत शरण गेला. त्याच्या शुश्रूषेमध्यें तत्पर झाला. प्रिय भाषण व सर्व मनोरथ पूर्ण करण्याचें अभिवचन, यांच्या योगानें त्याला अनुकूल करून घेण्यासाठीं त्याची यथाविधि पूजा करून तो त्यास म्हणाला—" हे ब्राह्मणा, ज्या कर्माच्या योगानें

परशुरामानें पृथ्वीसह आपलें सर्व धन ब्राह्मणांना देऊन टाकिलें होतें. त्यामुळें 'मी धनाच्या इच्छेनें आपल्याकडे आलों आहें' हें द्रोणाचें वचन ऐकून 'ब्राह्मणा, माझ्यापाशीं माझें शरीर आणि अस्त्रें एवढेंच काय तें आतां राहिलें आहे, त्यांतील काय हवें असेल तें मागून घे' असें परशुराम म्हणाला. तेव्हां द्रोणानें त्याच्यापासून प्रयोग व संहार यांच्या मंत्रांसह सर्व अस्त्रें मागून घेतलीं व त्यामुळें तो कृतकृत्य झाला. भार्गवरामापासून ब्रह्मास्त्र मिळाल्यामुळें तर तो सर्व अस्त्रवेत्त्यांत श्रेष्ठ झाला.

त्यानंतर द्रोण द्रुपदाकडे जाऊन 'मी तुझा बालमित्र आहें, तूं मला ओळखिलेंस का ?' इत्यादि त्याला विचारूं लागला. तेव्हां 'विद्वान् अविद्वानाचा, रथी अरथ्याचा व राजा अराजाचा मित्र कधींहि होत नसतो, तेव्हां तूं दरिद्री ब्राह्मण असतांना मला आपला मित्र कसें म्हणवितोस ?' असें द्रुपदानें उद्दामपणानें कर्णकटु भाषण केलें.

तें ऐकतांच द्रुपदाचा हा दर्प घालविण्याचा निश्चय करून तो मानी द्रोण कुरुश्रेष्ठांच्या हस्तिनापुरास गेला. भीष्मानें त्याचा मोठा सत्कार करून व विपुल धनादि देऊन आपले पौत्र—कौरव व पांडव—यांस अस्त्रविद्या शिकण्यासाठीं त्याच्या स्वाधीन केलें. तेव्हां त्या शिष्यांना एकत्र जमवून 'मला अत्यंत इष्ट असलेली गुरुदक्षिणा तुम्ही द्याल ना ?' असा त्यानें प्रश्न केला. त्या वेळीं अर्जुनादि शिष्यांनीं 'हो हो, आपल्याला अभीष्ट असलेली दक्षिणा आम्ही अवश्य देऊं' असें सांगितलें.

त्यानंतर सर्व पांडव कृतास्त्र व कृतनिश्चय झाले. तेव्हां द्रोण आपल्या गुरुदक्षिणेसाठीं त्यांस म्हणाला—"अहिच्छत्रामध्यें द्रुपदराजा राज्य करीत आहे. त्याचें राज्य हरण करून तुम्ही मला सत्वर द्या." गुरूच्या या आज्ञेप्रमाणें पांच पांडवांनीं द्रुपदाला युद्धांत जिंकून व त्याच्या सचिवांसह त्याला बांधून द्रोणाचार्यांपाशीं आणिलें.

द्रुपदाला पाहून द्रोण म्हणाला—हे राजा, मी तुझ्या मैत्रीची पुनः इच्छा करितों. पूर्वीप्रमाणेंच आपलें सख्य असावें अशी माझी इच्छा आहे. 'अराजा राजाचा मित्र होऊं शकत नाहीं,' असें तूं मला सांगितलेंस, म्हणून मी हा राज्यासाठीं यत्न केला. हे यज्ञसेना, आतां यापुढें तूं भागीरथीच्या दक्षिण तीरावरील राजा हो व मी उत्तर तीराचा अधिपति होतों.

हे श्रेष्ठांनो, द्रोणाचें हें वचन द्रुपदानें मान्य केलें व 'आपलें पूर्वीप्रमाणेंच सख्य असो' असें म्हटलें. याप्रमाणें त्या दोघांनीं परस्परांशीं सख्य केलें व ते दोघेहि स्व-स्वस्थानीं निघून गेले. पण क्षत्रिय स्वभावतःच दीर्घद्रोही असल्या-मुळें द्रुपदाला तो क्षणिक अपमानहि सहन झाला नाहीं. तो अतिशय खिन्न व त्यामुळें कृश झाला. १. ११. १६६.

---

## अध्याय १६७ वा.

[ १ धृष्टद्युम्न व द्रौपदी यांची उत्पत्ति. ]

(१) **ब्राह्मण** म्हणाला—हे महात्म्यांनो, पुढें कर्मसिद्ध ब्राह्मणाचा शोध करणारा तो असहिष्णु द्रुपदराजा अनेक ब्राह्मणांच्या वसतिस्थानांतून हिंडला. शोकानें विवेकहीन झालेला तो राजा द्रोणाचार्याचा सूड घेणाऱ्या पुत्राची इच्छा करूं लागला. 'द्रोणाचा प्रतिकार करण्यास समर्थ असें पराक्रमी अपत्य मला नाहीं' असें म्हणून तो नित्य चिंता करूं लागला. आपल्या विद्यमान असलेल्या पुत्रांना उद्देशून 'या सर्व बंधूंना धिक्कार असो,' असें तो म्हणूं लागला. द्रोणाचा पराभव करण्याच्या इच्छेनें तो वारंवार निराशेनें दुःखाचे सुस्कारे टाकीत असे. द्रोणाचा प्रभाव, विनय, शिक्षण, क्षात्रतेज व आचरण यांचा विचार करणाऱ्या द्रुपदास त्याचा सूड घेण्याचा कांहीं उपाय सुचेना.

हे भारता, एकदा द्रोणाच्या प्रतिकाराचा यत्न करणारा तो नृपश्रेष्ठ द्रुपद यमुना व गंगा यांच्या तीरावर फिरत असतां ब्राह्मणांच्या पवित्र निवासस्थानीं आला. हे राजा, त्या ठिकाणीं स्नातक नसलेला व व्रतें न करणारा असा एकहि ब्राह्मण नव्हता. तेथें त्यानें वेदाध्ययन करणारे व तीव्र व्रतें आचरणारे याज व उपयाज या नांवाचे दोन श्रेष्ठ ब्राह्मण पाहिले. ते ब्रह्मर्षि शांत व परब्रह्मनिष्ठ होते. संहितेच्या अध्ययनांत तत्पर असलेल्या त्या दोघांचें गोत्र काश्यप होतें.

राजा, द्रुपदानें त्या कुमारीप्रभव, सूर्यभक्त, सुस्वरूप, ब्रह्मवेत्त्या ऋषिश्रेष्ठ ब्राह्मणांचें अतुल सामर्थ्य जाणून त्यांस त्यांचे सर्व मनोरथ पूर्ण करण्याचें अभिवचन दिलें व त्यांतील कनिष्ठ भ्राता जो उपयाज त्याला तो एकान्तांत शरण गेला. त्याच्या शुश्रूषेमध्यें तत्पर झाला. प्रिय भाषण व सर्व मनोरथ पूर्ण करण्याचें अभिवचन, यांच्या योगानें त्याला अनुकूल करून घेण्यासाठीं त्याची यथाविधि पूजा करून तो त्यास म्हणाला—" हे ब्राह्मणा, ज्या कर्माच्या योगानें

द्रोणाच्या मरणाला कारण होणारा पुत्र मला प्राप्त होईल असें कर्म तूं कर; म्हणजे मी तुला दहा कोटि गायी देईन, किंवा तुला दुसरें जें कांहीं प्रिय असेल तेंहि अर्पण करीन. याविषयीं मुळींच शंका बाळगूं नको."

द्रुपदाचें हें भाषण ऐकून ऋषि त्यास म्हणाला—'मी हें तुझें कार्य करणार नाहीं. तूं तें दुसऱ्या कोणाकडून तरी करून घे.' याप्रमाणें त्या ऋषीनें स्पष्ट उत्तर देऊन द्रुपदराजाला निरुत्साह केलें, तथापि तो त्याचीच आराधना करीत तेथें राहिला. एक वर्षभर त्यानें त्या ऋषीची तशीच परिचर्या केली. तेव्हां तो ब्राह्मणश्रेष्ठ उपयाज द्रुपदाला मधुर वाणीनें बोलला—

"राजा, माझा ज्येष्ठ भ्राता याज पूर्वीं एकदा गहन वनांत फिरत असतांना त्यानें भूमीवर पडलेलं एक फळ उचललें. पण ती भूमि शुद्ध आहे किंवा नाहीं हें कळण्यास कांहीं मार्ग नव्हता. त्याच्या मागोमाग जात असलेल्या मीं माझ्या भ्रात्याचें तें अयुक्त कर्म पाहिलें. त्यावरून मला असें वाटतें कीं, हा माझा भ्राता सदोष वस्तूंचें ग्रहण करतेवेळीं कांहीं विचार करणार नाहीं. कारण चांगलें फल दृष्टीं पडतांच त्यानें पापमूलक दोष पाहिले नाहींत. जो पदार्थांची शुद्धि व अशुद्धि यांचा विचार करीत नाहीं, तो धनादिकांचा स्वीकार करतांना तरी यांचा विचार कसा करील? पूर्वीं गुरुकुलांत संहितेचें अध्ययन करीत असतांना इतरांचें उष्टें अन्नहि तो खात असे. त्याला त्याबद्दल कांहीं लाज वाटत नसे. उलट तो त्या अन्नाची वारंवार प्रशंसाच करीत असे. त्यावरून तो माझा भ्राता फलार्थी आहे, असा माझा तर्क होतो. राजा, तूं त्याच्याकडे जा. तो तुझ्याकडून तुला इष्ट असलेला यज्ञ करवील."

उपयाजाचें हें वचन ऐकून मनानें याजाच्या या आचरणाची निंदा करीत द्रुपद आपल्या कार्याकडे दृष्टि देऊन याजाच्या आश्रमांत गेला व पूजार्ह याजाची पूजा करून त्यास म्हणाला—"हे महर्षे, मी तुला ऐंशीं हजार गायी देतों. तूं द्रोणाच्या वैरानें अभिसंतप्त झालेल्या मला आह्लादित कर. रिक्त[1] हस्तानें राजा, देवता व गुरु यांचें दर्शन घेऊं नये, असें शास्त्रवचन असल्यामुळें या ऐंशीं हजार गायी हें केवळ उपायन आहे.

हे ब्राह्मणा, माझा वैरी द्रोण ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ आहे. ब्रह्मास्त्रवेत्त्यांतहि त्याच्याहून वरिष्ठ कोणी नाहीं. त्यामुळें मित्रकलहांत त्यानें माझा पराभव केला. त्या

१ रिक्तहस्तस्तु नोपेयाद्राजानं देवतां गुरुम् ।

बुद्धिमान् कौरवाचार्याहून श्रेष्ठ असा एकहि क्षत्रिय आज भूलोकीं नाहीं. द्रोणाचे बाण सर्व प्राण्यांच्या देहाचें हरण करणारे आहेत. त्याचें धनुष्य सहा हात लांब व फार मोठें आहे. तो ब्राह्मण वेषानें क्षात्रवेगाला निःसंशय कुंठित करीत असतो. तो महाधनुर्धर मानी भरद्वाजपुत्र जणुंकाय क्षत्रियांचा उच्छेद करण्यासाठींच उत्पन्न झाला आहे. त्यामुळें जमदग्निपुत्र रामासारखाच तो भासतो. त्याचें अस्त्र-बल घोर आहे. या भूलोकांतील मनुष्यांना तें सहन करितां येत नाहीं.

हे पूज्य विप्रवर्या, ज्याच्यामध्यें घृतादिकांच्या आहुति दिल्या आहेत, अशा अग्नीप्रमाणें तो ब्राह्मतेज धारण करितो आणि क्षात्रधर्माचा स्वीकार केलेला तो वीर त्या ब्राह्मतेजानें युक्त होऊन समरांगणांत शत्रूंना जाळीत असतो. द्रोणाचार्यामध्यें ब्राह्मतेजासह क्षात्रतेज जरी असलें, तरी तुझें ब्राह्मतेज क्षत्रियाच्या बलापेक्षां श्रेष्ठ आहे. मी केवल क्षात्रबलानें युक्त असून ब्रह्मबलानें हीन आहें, म्हणून तुझ्या ब्राह्मतेजाचा आश्रय केला आहे. द्रोणाहून विशिष्ट असलेल्या तुज ब्रह्मवेत्त्याला प्राप्त झाल्यामुळें मला युद्धामध्यें दुर्जय असलेला व द्रोणाचा नाश करणारा पुत्र ज्या कर्मानें प्राप्त होईल, तें कर्म तूं कर. मी तुला दक्षिणा म्हणून दहा कोटि गायी देईन."

द्रुपदराजाची ही प्रार्थना ऐकून याजमहर्षीनें 'ठीक आहे' असें म्हटलें व द्रुपदाला इष्ट असलेला पुत्र ज्या कर्मानें प्राप्त होईल, त्या कर्माचा प्रयोग त्यानें आपल्या मनांत आठविला. द्रोणाचा वध करण्यास समर्थ असलेला पुत्र उत्पन्न करणें, हें फार मोठें कार्य आहे, असें जाणून त्यानें निष्काम उपयाजालाहि त्या प्रयोगाचें चिंतन करावयास सांगितलें व याजानें जो प्रयोग तयार केला होता, तो उपयाजाच्या प्रयोगाशीं जुळल्यावर याजाच्या मनाची खात्री झाली व त्यानें द्रोणाच्या विनाशाची प्रतिज्ञा केली. त्यानंतर महातपस्वी उपयाजानें द्रुपद-राजाला पुत्रफलासाठीं श्रौताग्निसाध्य कर्म करावयास सांगितलें. तो म्हणाला—"हे राजा, तुला जशा प्रकारचा पुत्र इष्ट आहे, तशाच प्रकारचा महाबलवान्, तेजस्वी व वीर्यवान् पुत्र या कर्माच्या योगानें होईल."

राजा जनमेजया, आपल्याला युद्धांत द्रोणाचा नाश करणारा पुत्र होईल, या आशेनें द्रुपदानें कर्मसिद्धीसाठीं सर्व सामग्री तयार केली व याजाच्या आज्ञेप्रमाणें सर्व कर्म संपादन केलें. हवनाच्या शेवटीं याज द्रुपदाच्या पत्नीला म्हणाला—"हे पृषतस्नुषे राज्ञि, ये; तुझ्यासाठीं हें अपत्यांचें जुळें उत्पन्न झालें आहे."

तेव्हां द्रुपदपत्नी त्यास म्हणाली—हे ब्राह्मणा, मीं अद्यापि मुखमार्जन केलें नाहीं. काल लावलेली गंधाची उटी अद्यापि तशीच आहे. मीं अजुन स्नानहि केलें नाहीं. त्यामुळें पुत्रासाठीं मी तुला स्पर्श करण्यास योग्य नाहीं. यास्तव हे श्रेष्ठा, मला प्रिय असलेलें पुत्ररूप फल प्राप्त व्हावें, म्हणून मी शुचिर्भूत होई-पर्यंत धीर कर. माझ्या शुद्धिकालाची प्रतीक्षा कर.

तें ऐकून याज म्हणाला—या याजानें शिजविलेलें व उपयाजानें उपमंत्रित केलेलें हें हव्य क्षेत्र व रेतःसेक यांवांचूनच इष्ट फल उत्पन्न करील ! त्याला कालक्षेप सहन होणार नाहीं. आम्हां दोघां भ्रात्यांच्या सामर्थ्यानें तें हव्य स्त्री-पुत्ररूप अपत्याला उत्पन्न करीलच ! तूं हवी तर येथून निघून जा किंवा उभी रहा, पण आमचा प्रयोगविधि थांबणार नाहीं.

हे द्विजहो, याजानें द्रुपदपत्नीला असें सांगून, तो सुसंस्कृत केलेला हवि अग्नीमध्यें अर्पिला असतां त्या अग्नींतून एक देवासारखा कुमार उत्पन्न झाला. त्याचा वर्ण अग्नीच्या ज्वालेसारखा पिंगट होता. त्याचें स्वरूप उग्र होतें. त्यानें उत्तम कवच व किरीट यांस धारण केलें होतें. खड्ग व सशर धनुष्य यांनीं युक्त असलेला तो वारंवार सिंहनाद करीतच बाहेर पडला. तो एका श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन जाऊं लागला. तेव्हां सर्व पांचाल अतिशय हृष्ट होऊन 'धन्य, धन्य, फार चांगलें झालें' अशी गर्जना करूं लागले. त्या वेळीं त्यांना इतका हर्ष झाला होता कीं त्याचें वर्णन करितां येत नाहीं. अयोनिसंभव धृष्टद्युम्नाचें तेज अतिशय दुःसह असल्यामुळें पृथ्वीला तें सहन झालें नाहीं. इतक्यांत 'हा पांचालांचें यश वाढविणारा, त्यांच्या भयाची निवृत्ति करणारा व राजाचा शोक घालविणारा राजपुत्र द्रोणाच्या वधासाठीं उत्पन्न झाला आहे,' असें आकाशांत संचार करणारें एक महद्भूत बोललें.

इतक्यांत धृष्टद्युम्नाप्रमाणेंच वेदीच्या मध्यभागांतून कुमारी पांचाली उत्पन्न झाली. ती अति सुस्वरूप असून तिचीं सर्व अंगें दर्शनीय होतीं. तिचे नेत्र काळे व आकर्ण दीर्घ होते. अंगकांति श्यामवर्ण व केंस कुरळे होते. नखें लाल व उंच, भुंवया रेखीव आणि वक्षःस्थल विशाल होतें. त्यामुळें दुष्टांचा वध करावयास उद्युक्त झालेली ही जणुंकाय दुर्गाच किंवा एखादी देवकुमारीच मनुष्यशरीर धारण करून प्रकट झाली आहे, असा भास झाला. तिच्या अंगाचा नील कमला-सारखा सुगंध एक कोसभर पसरत होता. तिच्या रूपाला या भूलोकीं उपमाच

नव्हती. ती देवरूपिणी कन्या देव, दानव व यक्ष यांतील प्रत्येकाला अभीष्ट वाटली.

अहो ब्राह्मणहो, ती सुंदरी उत्पन्न झाली असतां अशी आकाशवाणी झाली— ' ही सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेली कृष्णा भूलोकांतील क्षत्रियांचा क्षय करण्याची इच्छा करीत आहे. ही कृशोदरी योग्य समयीं देवकार्य करील. हिच्यामुळें कौरवांवर फार मोठें संकट ओढवेल. ' हें ऐकून सर्व पांचाल सिंहाप्रमाणें घोष करूं लागले. हर्षयुक्त झालेल्या त्यांना पृथ्वी सहन करूं शकली नाहीं.

त्या दोन अपत्यांना पाहून अपत्यांची इच्छा करणारी द्रुपदपत्नी ' याज '-महर्षीला शरण आली व त्यास म्हणाली—" हे भगवन्, हीं दोन अपत्यें मजवांचून दुसऱ्या कोणाला आपली जननी समजणार नाहींत, असा वर मला द्या. " तें ऐकून राजाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें याजानें तिला ' तथास्तु ' असें म्हटलें.

त्यानंतर ज्यांचे मनोरथ पूर्ण झाले आहेत अशा ब्राह्मणांनीं त्यांचीं नांवें ठेविलीं. " हा पुत्र अति प्रगल्भ, शत्रूंचा उत्कर्ष सहन न करणारा व राजांचें वित्त जें बल, त्यानें युक्त किंवा कवच-कुंडलांसह उत्पन्न झाला आहे. यास्तव हा द्रुपदाचा कुमार धृष्टद्युम्न होवो " असें म्हटलें व कुमारी श्यामवर्ण असल्यामुळें तिला त्यांनीं ' कृष्णा ' असें म्हटलें. याप्रमाणें त्या महायज्ञांत द्रुपदाला दोन अपत्यें प्राप्त झालीं.

त्यानंतर त्या पांचालराजपुत्र धृष्टद्युम्नाला आपल्या गृहीं आणून महाप्रतापी द्रोणाचार्यांनीं त्यास अस्त्रदानानें[1] उपकृत केलें. महाबुद्धिमान् द्रोणानें भावी दैव अनुलंघनीय आहे असें जाणून आपल्या कीर्तीच्या संरक्षणासाठीं त्याला अस्त्रविद्या शिकविली. १. ११. १६७.

---

१ त्याचें अर्धें राज्य पूर्वीच घेतलेलें असल्यामुळें त्याच्यापासून कांहीं एक न घेतां त्यास धनुर्वेद शिकविला.

## अध्याय १६८ वा.

[ १ पांडवांचें पांचालदेशास प्रयाण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, त्या ब्राह्मणाच्या मुखानें हा वृत्तान्त ऐकून ते पराक्रमी पांडव हृदयांत शल्य टोंचल्याप्रमाणें दुःखी झाले. त्या सर्व महाबलाढ्य कुंतीपुत्रांचें मन अस्वस्थ झालें. तेव्हां आपल्या सर्व पुत्रांचें चित्त द्रौपदीच्या स्वयंवराकडे लागलेलें पाहून ती सत्यवादिनी कुंती युधिष्ठिराला म्हणाली—

"वत्सा, आपण या ब्राह्मणाच्या घरांत पुष्कळ दिवस राहिलों. या नगरींत तुम्हांला भिक्षा चांगली मिळत गेल्यामुळें इतके दिवस आपलें मन येथें रमलें होतें. या प्रदेशांतील सर्व रम्य वनें व उपवनेंहि आपण पुनः पुनः पाहिलीं. आतां पुनः तींच तीं वनें पाहून मनाला फारसा संतोष होत नाहीं. येथें पूर्वीसारखी भिक्षाहि मिळत नाहीं. यास्तव तुझी जर इच्छा असेल तर आपण संपन्न पांचाल देशास जाऊं. तो प्रदेश आपण यापूर्वीं कधीं पाहिलेला नाहीं. तो रमणीय आहे, असेंहि हा ब्राह्मण म्हणत आहे. पांचाल देशामध्यें विपुल अन्न आहे, अशी त्याची प्रसिद्धि आहे. राजा यज्ञसेन मोठा ब्राह्मणभक्त आहे. एकाच ठिकाणीं दीर्घकाल रहाणें मलाहि आवडत नाहीं. यास्तव हे पुत्रा, तुझी जर इच्छा असेल तर आपण पांचाल देशास जाऊं या."

आपल्या पुत्रवत्सल जननीचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला—हे माते, तुला जें करावेंसें वाटतें तें आम्हांला अत्यंत हितावहच असतें. पण माझे भ्राते तेथें येतील कीं नाहीं, तें मला माहीत नाहीं. यास्तव त्यांची इच्छा काय आहे तें तूं पहा.

राजा, युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून कुंतीनें भीमसेनादि चारी पुत्रांना पृथक् पृथक् जवळ बोलावून विचारलें. तेव्हां त्या सर्वांनीं पांचाल देशास जाण्याची आपली इच्छा प्रदर्शित केली असतां कुंती त्या ब्राह्मणाचा निरोप घेऊन पुत्रांसह महात्म्या द्रुपदाच्या रम्य नगरीस जावयास निघाली. १. ११. १६८.

---

## अध्याय १६९ वा.

[१ पांडवांच्या प्रस्थानापूर्वी व्यासदर्शन व त्यानें केलेलें द्रौपदीचें जन्मांतरकथन.]

( १ ) **वैशंपायन**—हे राजेंद्रा, याप्रमाणें महात्मे पांडव एकचक्रा-नगरींत गुप्तपणें रहात असतां त्यांना द्रौपदीच्या स्वयंवराचा वृत्तांत कळला व त्यांनीं तेथें जाण्याचा निश्चय केला. ते तेथून निघण्याच्या पूर्वीं भगवान् व्यास त्यांस

भेटावयास आला. आपला पूज्य पितामह व्यास आला आहे, असें पाहून ते वीर भ्राते मोठ्या आदरानें त्यास सामोरे गेले आणि प्रणिपात व अभिवादन करून त्याच्यापुढें हात जोडून उभे राहिले.

तेव्हां त्या सर्वांना बसावयास सांगून त्यांच्याकडून पूजा केला गेलेला मुनि भूमीवर बसलेल्या त्यांस प्रीतिपूर्वक असें गुप्त वचन बोलला—"हे वीरांनो, तुम्ही धर्मानें व शास्त्रविधीप्रमाणें वागतां ना? पूजार्ह ब्राह्मणांचा तुम्ही योग्य सत्कार करितां ना? त्यांत कधींहि आळस करीत नाहीं ना?"

राजा, असे धर्म-अर्थयुक्त प्रश्न करून व विविध विचित्र कथा सांगून भगवान् व्यास त्यांस पुनः म्हणाला—एका तपोवनांत एका महात्म्या ऋषीची एक अति सुंदर व सर्वगुणसंपन्न कन्या होती. ती स्वकर्मानींच अतिशय अभागी निपजली. त्यामुळें ती रूपवती असूनहि तिला पतीचा लाभ झाला नाहीं. म्हणून ती अतिशय खिन्न झाली व तप करूं लागली. उग्र तपश्चर्येनें तिनें शंकराला प्रसन्न करून घेतलें. तेव्हां संतुष्ट झालेला भगवान् 'हे भामिनि, मी शंकर आहें, तुझें कल्याण असो; हे भद्रे, तुला इष्ट असेल तो वर मागून घे,' असें म्हणाला. तें ऐकून 'भगवान् जर मजवर प्रसन्न झाला असेल तर मी सर्वगुणसंपन्न पतीची इच्छा करितें' असें ती त्या ईश्वरास पुनः पुनः बोलली.

तें ऐकून वक्त्यांतील श्रेष्ठ ईश्वर 'तुला भरतकुलांतील पांच पति प्राप्त होतील,' असें म्हणाला. तें ऐकतांच ती कन्या "हे भगवन्, तुझ्या प्रसादानें 'मला एकच पति प्राप्त व्हावा,' असा वर मीं तुजपाशीं मागितला होता, असें असतांना तूं मला हा भलताच वर कां देतोस?" असें त्या वरद ईश्वराला विचारूं लागली. तेव्हां महादेवानें तिला म्हटलें—"हे शुभे, 'मला पति दे' असें तूं पांच वेळां बोललीस. त्याला अनुसरून मीं तुला हा योग्यच वर दिला आहे. तुला या वराची प्राप्ति या जन्मांत न होतां तूं दुसरा जन्म घेतल्यावर तुला पांच पति प्राप्त होतील."

हे कुंतीपुत्रहो, तीच देवरूपिणी कन्या आतां द्रुपदाच्या घरीं उत्पन्न झाली आहे. ती अनिंद्य पृषतराजपौत्री कृष्णा तुमची पत्नी होणार आहे. यास्तव हे महाबल पांडवांनो, तुम्ही आतां पांचाल नगरांत जाऊन रहा. तेथें तुम्हांला तिची प्राप्ति होईल व तुम्ही सुखी व्हाल, यांत कांहीं संशय नाहीं. युधिष्ठिरादिकांना असें सांगून व त्यांचा व कुंतीचा निरोप घेऊन तो मुनि तेथून निघून गेला. १. ११. १६९.

---

## अध्याय १७० वा.

[ १ पांडवांचें प्रस्थान व गंगातीरीं आगमन. २ अंगारपर्ण-गंधर्वाचा पराजय व त्याच्याशीं सख्य. ]

(१) वैशंपायन—भगवान् व्यास निघून गेले असतां पुरुषश्रेष्ठ पांडव आपल्या पूज्य जननीसह एकचक्रा-नगरींतून निघाले. घरांतून प्रस्थान करण्यापूर्वीं त्यांनीं आपल्याला निवासस्थान देऊन मोठे उपकार करणाऱ्या ब्राह्मणाला वंदन केलें व त्याचें अनुमोदन घेऊन 'येतों' असें म्हटलें आणि उत्तराभिमुख सममार्गांनीं ते आपल्या उद्दिष्ट स्थानीं जावयास निघाले. ते पुरुषश्रेष्ठ पांडुनंदन अहोरात्र प्रवास करून गंगातीरावरील '१सोमाश्रयायण'-नांवाच्या तीर्थास प्राप्त झाले. मार्गानें जात असतां प्रकाशासाठीं व रक्षणासाठीं महारथ अर्जुन हातांत पेटलेली चूड घेऊन सर्वांच्या पुढें चालला होता. त्या तीर्थावरील एका निर्जन-प्रदेशीं क्रोधी गंधर्वराज आपल्या स्त्रियांसह गंगेच्या जलांत क्रीडा करीत होता. तेथेंच ते पांडव येऊन पोंचले. नदीसमीप येत असलेल्या त्यांचा शब्द ऐकून बलाढ्य गंधर्व क्रुद्ध झाला व मातेसह त्या परंतप पांच पांडवांना पाहून त्यानें आपलें धनुष्य आकर्ण ओढलें, त्याचा भयंकर टणत्कार केला व तो म्हणाला—

"अरे मानवा, रात्रीचा आरंभ होण्यापूर्वीं पश्चिम दिशेमध्यें सूर्याचें अर्धें मंडल अस्त पावलें म्हणजे जी संध्या रक्तवर्ण होते, त्या संध्याकालीं ऐशीं निमेषांनंतर तुमचा प्रवास वर्ज्य मानिलेला आहे व तोच मुहूर्त यक्ष, गंधर्व व राक्षस यांच्या कामचाराला विहित आहे. तेवढा काल सोडून बाकीचा सर्व काल मनुष्यांच्या कर्माचरणासाठीं सांगितला आहे. म्हणजे संध्याकालांतील ऐशीं लव-कालानंतर सर्व रात्र हा यक्षादिकांचाच संचारकाल असून बाकीचा सर्व दिवस मनुष्यांच्या संचारासाठीं आहे. जे मानव त्या वेळीं लोभानें संचार करितात, त्या मूढांचा राक्षसांसह आम्ही निग्रह करितों. म्हणून ब्रह्मवेत्ते रात्रीं जलासमीप येणाऱ्या मनुष्यांची किंबहुना बलाढ्य राजांचीहि निंदा करितात.

यास्तव तुम्ही दूर उभे रहा. माझ्या समीप येऊं नका. मी या भागीरथीच्या जलामध्यें क्रीडा करावयास आलों आहें, हें तुम्हांला कसें कळत नाहीं? आपल्या बलाचा आश्रय करून रहाणारा मी 'अंगारपर्ण'-नांवाचा गंधर्व आहें. मी

१ सोमाश्रय म्हणजे चंद्रधर रुद्र, त्याचें हें स्थान असल्यामुळें या तीर्थाला 'सोमाश्रयायण' असें नांव पडलें.

मोठा मानी, ईर्ष्यावान् व कुबेराचा प्रिय मित्र आहें. अंगारपर्ण याच नांवाचें हें माझें वन आहे. गंगेच्या तीरावर असलेल्या या रम्य वनांत मी विविध विषयांचा उपभोग घेत रममाण होतों.

हे वीरांनो, तुम्ही रम्याकृति दिसतां, त्यावरून तुम्ही विकराल राक्षस नाहीं. तुमच्या पाशीं शृंग, कपाल इत्यादि चिह्नें नाहींत. त्यावरून रात्रीं जलप्रवेश करण्यास योग्य असलेले कापालिकहि तुम्ही नव्हे. तुम्ही हातांत चूड घेऊन येत अहां, त्यावरून दिव्यदृष्टि देवहि तुम्ही नव्हे. आकाशादिकांतून गमन करण्याचें सामर्थ्य देणाऱ्या माळाहि तुमच्यापाशीं नाहींत. त्यावरून तुम्ही गंधर्व किंवा यक्षादिकहि नव्हे, हें उघड आहे. अर्थात् तुम्ही मनुष्यच अहां. मग असे मोठमोठ्यानें बोलत माझ्यासमीप कां येतां ? ''

अर्जुन म्हणाला—हे दुर्मते, समुद्र, हिमालयाचा पार्श्वभाग व ही नदी यांवर रात्रीं, दिवसां किंवा संध्याकाळीं कोणा एखाद्याचें स्वामित्व नियत केलें आहे कीं काय ? कोणाचेंहि नाहीं. हे प्रदेश सर्वसाधारण आहेत. हे आकाशचरा, सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या या गंगेला प्राप्त होऊन भुक्त किंवा अभुक्त, रात्रीं किंवा दिवसां असा कांहीं कालनियम नाहीं. आम्हीं समर्थ आहों. म्हणूनच अकालीं तुजपाशीं येत आहों.

हे क्रूरा, जे मानव रणामध्यें तुमच्याशीं युद्ध करूं शकत नाहींत, तेच तुमची पूजा करितात. पूर्वीं हिमालय पर्वताच्या सुवर्णशृंगापासून निघालेली ही गंगा वस्वौकसारा, नलिनी, पावनी, सीता, चक्षु, सिंधु व अलकनंदा या सात नद्यांच्या रूपांनीं समुद्राला जाऊन मिळाली आहे आणि जे कोणी गंगा, यमुना, प्लक्षद्वीपांत उगम पावलेली सरस्वती, रथस्था, सरयू, गोमती व गंडकी या सात नद्यांचें जल प्राशन करितात, ते निष्पाप होतात.

ही पवित्र गंगा आकाशरूप एकाच तटानें युक्त होऊन अंतरिक्षांतून वहाते व हे गंधर्वा, देवांमध्यें ही ' अलकनंदा ' या नांवानें प्रसिद्ध आहे. पितृलोकांत हीच ' वैतरणी ' या नांवानें प्रसिद्ध असून पाप्यांना दुस्तर आहे, असें कृष्ण-द्वैपायनानें आम्हांला सांगितलें आहे. या पवित्र देवनदीला इतर नद्यांप्रमाणें वर्षाकालीं एक क्षणभर सुद्धां अस्पृश्यत्व येत नाहीं. ही शुभ नदी स्वर्ग संपादन करून देणारी आहे, असें असतांना तूं आम्हांला प्रतिबंध करण्याची इच्छा कां करितोस ? हा सनातन धर्म नाहीं. ज्याचें कोणालाहि निवारण करितां येत

नाहीं व ज्याला कोणत्याहि प्रकारचा दोष नाहीं अशा या भागीरथीच्या पवित्र जलाला, केवळ तुझ्या सांगण्यावरून आम्हीं स्पर्श कां करूं नये ? आमच्या इच्छेप्रमाणें आम्ही स्पर्श करणारच.

( २ ) राजा जनमेजया, तुझ्या प्रपितामहाचें हें भाषण ऐकून गंधर्वराज अंगारपर्ण अतिशय क्रुद्ध झाला व आपल्या धनुष्यावर गुण चढवून विषारी सर्पासारखे तीक्ष्ण बाण सोडूं लागला. तेव्हां या पांडुपुत्रानेंहि हातांतील चूड व ढाल सभोंवार गरगर फिरविली व गंधर्वाच्या सर्व बाणांचें निवारण केलें आणि तो वीर त्यास म्हणाला—

" हे गंधर्वा, असल्या बुजगावण्याला अस्त्रज्ञ भीत नसतात, त्यांना दाखविलेली भीति जलावरील फेंसाप्रमाणें निष्फल होते. सर्व गंधर्व मनुष्यांपेक्षां अधिक बलवान् असतात, हें मला माहित आहे. यास्तव मी तुझ्याशीं दिव्य अस्त्रानें युद्ध करीन. तुझ्याशीं मी कपटानें युद्ध करणार नाहीं. मी आतां तुझ्यावर जें आग्नेयास्त्र सोडणार आहें, तें इंद्राच्या मान्य बृहस्पति-गुरूनें भरद्वाजाला दिलें. भरद्वाजापासून अग्निवेश्याला व अग्निवेश्यापासून द्रोणाचार्याला प्राप्त झालें. शेवटीं त्या माझ्या गुरूनें तें मला दिलें आहे. "

वैशंपायन म्हणाला—हे राजन्, असें बोलून क्रुद्ध झालेल्या अर्जुनानें तें अस्त्र गंधर्वावर सोडलें. त्याबरोबर प्रदीप्त झालेल्या त्या आग्नेयास्त्रानें गंधर्वराजाचा रथ जाळला. तेव्हां रथापासून च्युत होऊन खालीं अधोमुख पडत असलेल्या व अस्त्रतेजानें मूर्छित झालेल्या त्या गंधर्वाला अर्जुनानें एखाद्या पुष्पाप्रमाणें केशप्रदेशीं धरलें आणि अस्त्रप्रहारानें चेतनाशून्य झालेल्या त्या गंधर्ववीराला त्याचे केंस धरून ओढीत आपल्या बंधूपाशीं आणिलें.

तेव्हां पतीच्या प्राणरक्षणाची इच्छा करणारी 'कुंभीनसी'-नांवाची गंधर्वपत्नी युधिष्ठिराला शरण आली व मोठ्या नम्रपणें त्या पांडवश्रेष्ठास म्हणाली—" हे महाभाग, माझ्या या पतीचें तूं रक्षण कर व याला सोडून दे. हे प्रभो, ही कुंभीनसी-गंधर्वी तुला शरण आली आहे. "

तिचें तें करुण भाषण ऐकून युधिष्ठिराला दया आली व तो अर्जुनास म्हणाला—" हे रिपुसूदना, याला सोडून दे. वत्सा, युद्धामध्यें पराभूत, यशोहीन, पराक्रमशून्य व स्त्री ज्याचें रक्षण करीत आहे अशा शत्रूला कोण मारील ?"

आपल्या ज्येष्ठ भ्रात्याचें हें उत्कृष्ट भाषण ऐकून अर्जुन गंधर्वास म्हणाला—हे गंधर्वा, तुला मी अभय देतों. तूं शोक करूं नको. आपला जीव घेऊन येथून जा. आज हा कुरुराज युधिष्ठिर तुला अभय देत आहे.

तें ऐकून गंधर्व अर्जुनास म्हणाला—हे वीरा, मी तुझ्या हातून पराभूत झालों आहें. यास्तव मी आपलें पूर्वीचें अंगारपर्ण हें नांव सोडून देतों. अंगार म्हणजे धगधगित निखारा, त्याचप्रमाणें ज्याचें पर्ण म्हणजे वाहन-रथ दुःस्पर्श आहे, तो अंगारपर्ण; पण ती माझी अंगारपर्णता आज मी सोडून देतों. यापुढें मी जनसमूहामध्यें आपल्या सामर्थ्याची व नांवाची प्रशंसा करणार नाहीं. मला आज हा फारच मोठा लाभ झाला आहे. मी दिव्य अस्त्र धारण करणाऱ्या तुज अर्जुनाला गंधर्वांच्या मायेनें युक्त करण्याची इच्छा करितों. तुझ्या अस्त्राग्नीनें माझा हा विचित्र उत्तम रथ दग्ध झाला. मी पूर्वी जो चित्ररथ होतों, तो आतां दग्धरथ झालों आहें.

मीं पूर्वी ही गांधर्वी माया मोठ्या तपानें संपादन केली आहे. यास्तव मला प्राणदान देणाऱ्या तुज महात्म्याला मी ती समर्पण करितों. आपल्या वेगानें पूर्णपणें कुंठित करून जिंकलेल्या व शरण आलेल्या शत्रूला जो प्राणदान करितो, तो कोणत्या कल्याणाला पात्र होत नाहीं ? मी आतां जी विद्या देणार आहें, तिचें नांव 'चाक्षुषी' असें आहे. ती मनूनें सोमाला, सोमानें विश्वावसूला व विश्वावसूनें मला दिली आहे. गुरूनें दिलेली ही विद्या हीन पुरुषाला प्राप्त झाली असतां नाश पावते. या विद्येचा पूर्वक्रम मीं तुला सांगितला. आतां तिचें सामर्थ्य ऐक.

पुरुष तिन्ही लोकांतील जें कांहीं जशा प्रकारें प्रत्यक्ष नेत्रानें पहाण्याची इच्छा करील, तें तशा प्रकारें पाहण्यास तो या विद्येमुळें समर्थ होईल. सहा महिने एका पायावर उभें राहिल्यानें ही विद्या प्राप्त होते. तूं हें व्रत केलेंस, म्हणजे मग मी तुला ही विद्या देईन. हे राजा, या विद्येमुळेंच आम्ही मनुष्यांहून श्रेष्ठ व देवांसारखे प्रभावशाली झालों आहों. देवाप्रमाणेंच आम्ही आकाशांतून गमन करितों व अदृश्यादि पदार्थांना साक्षात् पाहूं शकतों. हे पुरुषश्रेष्ठा, मी तुझ्या भ्रात्यांना व तुला गंधर्वलोकांतील शंभर शंभर अश्व देईन. ते देव व गंधर्व यांस वाहतात. त्यांचा वर्ण दिव्य व वेग मनासारखा आहे. ते कधीं वृद्ध व तरुण होत नाहींत. त्यांचा वेग कधींहि कमी होत नाहीं. हे अश्व कसे उत्पन्न झाले, तेंहि मी तुला सांगतों.

पूर्वी वृत्राचा नाश करणारें इंद्राचें वज्र दधीचि ऋषीच्या अस्थींपासून उत्पन्न केलें. तें वृत्रासुराच्या मस्तकावर आपटून दशधा व शतधा विदीर्ण झालें. त्यामुळें त्याचे जे अनेक तुकडे झाले, त्यांतील एकेका वज्रभागाची देव उपासना करूं लागले. या लोकामध्यें जें उत्कृष्ट व स्पृहणीय यशोधन आहे, तें वज्राचेंच स्वरूप आहे.

ब्राह्मणाचा हात हविष्प्रद असल्यामुळें तो वज्रभागच आहे, म्हणून देव त्याची उपासना करितात. रथ हें क्षत्रियांचें वज्र आहे. कारण देव व ब्राह्मण यांच्या शत्रुनाशाला रथ कारण होत असतो, म्हणून देव त्या क्षत्ररूपी रथाची उपासना करीत असतात. दान हें वैश्यांचें वज्र असून, कर्म हें शूद्रांचें वज्र आहे. कारण दान व कर्म हीं दोन्ही ब्राह्मण व क्षत्रिय यांचें प्रिय करितात. यास्तव वज्रवान् ब्राह्मणादि चार वर्णांवर देव उपजीविका करितात.

अश्व क्षत्रवज्राचे म्हणजे रथाचे अंश असल्यामुळें ते त्याचे अवधिभूत मानले आहेत. ते अतिशय वेगवान् असतात. त्यामुळें अश्वांचा उत्कर्षच रथांच्या वज्रत्वाचें मुख्य कारण आहे. घोडी अश्वरूप रथांगाला प्रसवते व शूर पुरुषहि रथाचें अंग आहेत. त्यामुळें अश्वाची योग्यता रथी वीराइतकीच आहे. माझे गंधर्वलोकांतील अश्व, इच्छेस येईल तो वर्ण व वेग धारण करणारे आहेत. ते इच्छा करतांच जवळ येऊन उभे रहातात. त्यामुळें हे वीरा, ते तुझी इच्छा पूर्ण करतील.

गंधर्वाचें हें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला—हे गंधर्वा, प्रसन्न झालेल्या तूं दिलेली विद्या, धन किंवा शास्त्र यांतील एकहि वस्तु उलट कांहीं दिल्यावांचून आपण घ्यावी, हें मला योग्य वाटत नाहीं. कारण देणें व घेणें, गुह्य सांगणें व विचारणें, स्वतः भोजन करणें व भोजन देणें, असें सहा प्रकारचें प्रीतिलक्षण आहे. यास्तव तुला कांहीं परत दिल्यावांचून तुजपासून चाक्षुषी विद्या घेतल्यास मी तुझा ऋणी होईन. किंवा तुझें जीवित क्षीण होण्याचा प्रसंग आला असतां तें मीं वांचविलें म्हणून तूं जरी ही विद्या मला देत असलास तरी मी ती घेणार नाहीं. कारण त्यामुळें माझ्या यशाची हानि होईल.

गंधर्व—महात्म्यांचा संयोग परस्परांची प्रीति उत्पन्न करितो, असें दिसतें. जीवितप्रदानानें संतुष्ट होऊन मी तुला ही विद्या देत आहें. मी तुझ्यापासूनहि उत्तम आग्नेय-अस्त्राचें ग्रहण करीन व हे अर्जुना, उभयतांनीं असा परस्पर उपकार करणेंच योग्य आहे. त्यामुळें आपला स्नेह चिरकाल टिकेल.

अर्जुन—गंधर्वा, मी तुला आग्नेयास्त्र देऊन तुजपासून अश्व घेतों. आम्हां उभयतांचा स्नेह शाश्वत राहो. हे मित्रा, तुमच्यापासून भय उत्पन्न होण्याचें कारण काय आहे, तें मला सांग. हे गंधर्वा, आम्ही सर्व वेदवेत्ते, सदाचारसंपन्न व शत्रूंचा नाश करणारे असतांना 'रात्रीं प्रवास करितों' एवढ्याच कारणानें तूं आम्हांला भय कां दाखविलेंस ? त्याचें कारण काय ?

गंधर्व—हे पांडुपुत्रांनो, तुम्ही अविवाहित असल्यामुळें अनग्नि अहां, तुम्हीं अग्नीचें आधान केलेलें नाहीं. तुमचें समावर्तन झालेलें असल्यामुळें तुम्ही सायंप्रातःसमिद्धोमहि करीत नाहीं. कारण ब्रह्मचाऱ्यालाच तो विहित आहे. तुम्ही पुरोहिताचाहि स्वीकार केलेला नाहीं. त्यामुळें रात्रीं गमन करणाऱ्या तुमचें मीं धर्षण केलें आहे. अनाश्रमी द्विज धर्षणास योग्य होतो. यक्ष, राक्षस, गंधर्व, पिशाच, उरग, दानव इत्यादि सर्व बुद्धिमान् कुरुवंशाचा विस्तार सांगतात. हे वीरा, तुझ्या बुद्धिमान् पूर्वजांचे गुण गात असलेल्या नारदादि महर्षींच्या मुखानें मीं ते ऐकले आहेत. या समुद्रवलयांकित सर्व पृथ्वीवर संचार करणाऱ्या स्वतः मींहि तुझ्या उत्तम कुलाचा प्रभाव प्रत्यक्ष पाहिला आहे.

अर्जुना, तीन्ही लोकांमध्यें प्रसिद्ध असलेला जो यशस्वी भारद्वाज द्रोण, म्हणजे तुझा वेद व धनुर्विद्या यांचा आचार्य, त्यालाहि मी जाणतों. धर्म, वायु, इंद्र, अश्विनिकुमार व पांडु या कुरुकुलाची वृद्धि करणाऱ्या तुमच्या सहा पित्यांनाहि मी चांगलें ओळखितों. धर्मादि पांच देव सर्व देवांमध्यें श्रेष्ठ आहेत व पांडु सर्व मनुष्यांमध्यें श्रेष्ठ होता. तुम्ही पांचहि भ्राते शूर, सदाचारसंपन्न, सर्व शस्त्रधारण करणारांमध्यें श्रेष्ठ, महात्मे व दिव्यस्वरूपी अहां. तुम्हां सर्वांचें चित्त अति शुद्ध असून तुमचा संकल्प व निश्चय उत्तम आहे.

हे पार्था, हें सर्व मला माहीत असूनहि मीं तुम्हांला येथें येण्यास प्रतिबंध केला. कारण हे वीरा, स्त्रीच्या समक्ष एखाद्या बाहुबलानें युक्त असलेल्या वीराचा जर कोणीं अपमान केला, तर तो त्याला सहन होत नाहीं. रात्रीं आमचें बल अधिकच वाढत असतें, त्यामुळें हे कौंतेया, भार्येसह जलक्रीडा करीत असलेल्या मला अतिशय क्रोध आला.

हे तापत्यनंदना, ज्या विधीनें मी या संग्रामांत तुझ्या हातून पराभूत झालों, तो विधि मी तुला सांगतों, ऐक. ब्रह्मचर्य श्रेष्ठ धर्म आहे व तो तुझ्या ठिकाणीं नियत आहे. त्यामुळें तुझ्या हातून मी पराभव पावलों. हे शत्रुनाशका, जो

क्षत्रिय कामवृत्त म्हणजे विवाहित असतो व रात्रीं युद्ध करितो, तो आमच्यासारख्या वीरांशीं युद्ध करीत असतांना केव्हांहि जिवंत रहात नाहीं. पण हे पार्था, जो क्षत्रिय कामवृत्त असूनहि ब्रह्मपुरस्कृत असतो, तो पुरोहिताकडून सुरक्षित असलेला वीर सर्व नक्तंचरांना जिंकतो. यास्तव हे तापत्या, मनुष्यांना जें कांहीं श्रेय इष्ट असेल, त्यासाठीं त्यांनीं सर्व कर्मांमध्यें जितेंद्रिय पुरोहितांची योजना करावी. राजाचे वेद व षडंगें यांमध्यें अत्यंत निरत, पवित्र, सत्यवादी, धर्मात्मे व सुसंस्कृत पुरोहित असावे.

अर्जुना, ज्या राजाचा धर्मज्ञ, वक्ता, शीलवान् व शुचि पुरोहित असतो, त्या राजाचा इहलोकीं विजय व परलोकीं स्वर्ग निश्चित असतो. राजानें धन मिळावें, त्याचें रक्षण व्हावें व शत्रूंच्या धनादिकांची हानि व्हावी म्हणून सर्वगुणसंपन्न पुरोहित करावा. ज्याला आपला उत्कर्ष व्हावा असें वाटत असेल त्या राजानें समुद्रवलयांकित सर्व पृथ्वीची प्राप्ति होण्यासाठीं पुरोहिताच्या आज्ञेंत रहावें. हे तापत्या, केवल शौर्य व उत्तम कुल यांच्याच योगानें कोणीहि अब्राह्मण राजा केव्हांहि सर्व पृथ्वीला जिंकूं शकत नाहीं. यास्तव कुरूंच्या वंशाची वृद्धि करणाऱ्या अर्जुना, ज्यामध्यें ब्राह्मण प्रमुख आहे असेंच राज्य चिरकाल पालन करणें शक्य आहे, हें तूं निश्चयानें जाण. १. ११. १७०.

---

## अध्याय १७१ वा.

[ १ तपतीचा वृत्तान्त. ]

वैशंपायन—हे राजश्रेष्ठा, गंधर्वाचें हें भाषण ऐकून अर्जुन त्यास म्हणाला—"हे मित्रा, तूं माझ्याशीं बोलतांना दोन तीन वेळां मला 'तापत्य' असें संबोधिलेंस, पण त्या 'तापत्य'-शब्दाचा निश्चित अर्थ काय आहे, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. जिच्यामुळें आम्ही 'तापत्य' या नांवास प्राप्त झालों, ती तपती कोण होती ? कारण हे साधो, आम्ही तर कौंतेय आहोंत. यास्तव तुझ्या या संबोधनांतील तत्त्व जाणण्याची माझी इच्छा आहे.

( १ ) राजा, अर्जुनाचा हा प्रश्न ऐकून गंधर्व त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेली कथा धनंजयाला सांगूं लागला—" अर्जुना, मी तुला ती प्राचीन मनोरम कथा सांगतों. हे बुद्धिमानांतील श्रेष्ठा, तूं ती आरंभापासून ऐक. मीं तुला तापत्य कां म्हटलें तेंच आतां सांगतों. माझ्या भाषणाकडे अवधान ठेव. द्युलोकामध्यें हा जो भगवान् सूर्य आपल्या तेजानें सर्व नभोमंडळाला सतत व्यापितो,

त्याची तपती या नांवाची त्याच्याचसारखी तेजस्वी कन्या होती. ती भगवान् विवस्वान् देवाची कन्या सावित्रीची कनिष्ठ भगिनी होय. तपानें युक्त असलेली ती सूर्यकन्या तिन्ही लोकांत तपती या नांवानें प्रख्यात झाली. तिच्यासारखी रूपवती कोणी देवी, आसुरी, यक्षी, राक्षसी, अप्सरा व गंधर्वीहि नव्हती. ती सर्वांगसुंदर असून तिचे नेत्र मनोहर होते. ती मोठी साध्वी व आचारसंपन्न होती. तिचा वेषहि मोठा प्रशंसनीय असे. तिचें रूप, शील, गुण व विद्या यांना अनुरूप असा भर्ता सूर्याला त्रिभुवनांत कोठें आढळेना. ‘तपती तरुण झाली, आतां तिचा विवाह केला पाहिजे, पण तिला अनुरूप वर मिळत नाहीं, काय करावें ?’ अशा चिंतेनें सूर्य व्याकुळ झाला. त्याच्या चित्ताला स्वास्थ्य मिळेना.

हे अर्जुना, इतक्यांत कुरुकुलांतील श्रेष्ठ व बलाढ्य ऋक्षपुत्र संवरणराजा पवित्र व नियत होऊन अर्घ्य, माल्य, उपहार, गंध, नियम, उपवास व विविध तपश्चर्या यांच्या योगानें सूर्याची आराधना करूं लागला. तो पौरवनंदन पूज्यांची शुश्रूषा करणारा निरभिमान व शुचि होता. तो भक्तिमान् राजा उदय पावलेल्या सूर्याची नित्य पूजा करीत असे. त्यामुळें हा संवरणराजा कृतज्ञ, धर्मज्ञ व अप्रतिम रूपवान् असून तपतीला अनुरूप वर आहे, असें आदित्याला वाटलें आणि आपली ही कन्या त्या संवरणराजाला द्यावी असा त्यानें निश्चय केला.

हे कुरुनंदना, तो भूपति भूलोकांतील सर्व राजांमध्यें श्रेष्ठ असून त्याचें कुलहि प्रसिद्ध होतें. ज्याप्रमाणें द्युलोकांत उष्णांशु सविता आपल्या तेजानें सर्वांना प्रकाशित करितो, त्याचप्रमाणें हा संवरणराजा भूलोकीं आपल्या तेजानें सर्वांना प्रकाशित करीत असे. वेदवेत्ते द्विज उदय पावलेल्या आदित्याची जशी पूजा करितात, तशीच क्षत्रियादि सर्व प्रजा संवरणराजाची पूजा करीत असे. तो चंद्राहूनहि अधिक आल्हादकारक व सूर्याहूनहि अति तेजस्वी असलेला राजा मित्र व शत्रु यांमध्यें अतिशय शोभत होता. तो मित्रांना आल्हाद देत असे व शत्रूंना ताप देत असे. अशा गुणांनीं व आचरणांनीं युक्त असलेल्या त्या राजाला आपली ‘ तपती ’ कन्या द्यावी, असा त्यानें दृढ संकल्प केला.

अर्जुना, इकडे एकदा तो अमित पराक्रमी श्रीमान् राजा पर्वतोपवनांत मृगया करीत फिरूं लागला. तो अहोरात्र मृगांचा पाठलाग करीत फिरत असल्यामुळें त्याचा अप्रतिम अश्व त्या पर्वतामध्यें क्षुधा व तृषा यांनीं व्याकुळ होऊन मृत्युमुखीं पडला.

तेव्हां तो नृपति त्या पर्वतावरून पायांनींच फिरूं लागला असतां त्याला या लोकीं अप्रतिम असलेली एक कन्या दिसली. त्यावेळीं शत्रुबलाचा नाश करणारा तो राजा एकटाच होता व ती कन्याहि तेथें एकटीच होती. राजा त्या सुंदरीकडे निश्चल दृष्टीनें पाहूं लागला. तिच्या असामान्य रूपावरून त्याला ती साक्षात् श्रीच असावी असें वाटलें. 'ही कोण बरें असावी ?' असा तो तर्क करीत असतां त्याला एकदा ही सूर्यापासून भ्रंश पावलेली त्याची प्रभाच आहे, असें वाटलें. कांहीं वेळानें तिच्या शरीरकांतीवरून ही अग्नीची ज्वालाच असावी, असा त्यानें तर्क केला. पण तिची कांति अति प्रसन्न असल्यामुळें ही शुद्ध चंद्रलेखाच आहे, असाहि त्याला भास झाला.

ती कमलनयना तपती ज्या पर्वतपृष्ठावर उभी होती, तेथून ती सुवर्णाची पुतळीच असल्याप्रमाणें शोभत होती. तिचें रूप व विशेषेंकरून वेष, यांच्या योगानें वृक्ष, वेली व झुडपें यांसह तो पर्वत जणुंकाय सुवर्णमयच झाला. तिला पाहून सर्व लोकांतील स्त्रिया हिच्यापुढें तुच्छ आहेत अशी राजाची खात्री झाली. आज आपल्या या विशाल नेत्रांचें सार्थक्य झालें, असें त्याला वाटलें. संवरणराजा तपतीला पाहून जेथल्या तेथें स्तब्ध उभा राहिला. तो एक पाऊलभरहि इकडचा तिकडे झाला नाहीं. तो देहभान विसरला. तिच्या रूपसंपत्तीनें चकित झालेल्या राजानें 'खरोखर विधात्यानें देव, असुर व मानुष या तीन्ही लोकांचें मंथन करून या कमलनयनेचें हें रूप निर्माण केलें असावें, असा तर्क केला.

शेवटीं श्रेष्ठ कुलामध्यें उत्पन्न झालेल्या त्या वीरानें तिला पाहतांच कामबाणांनीं पीडित व तीव्र मदनाग्नीनें संतप्त होऊन मनांत पुष्कळ विचार केला व स्वभावतःच प्रगल्भ असलेल्या त्या वीरानें निसर्गतःच अप्रगल्भ असलेल्या त्या सूर्यकन्येला म्हटलें—"हे सुंदरि, तूं कोणाची कोण आहेस व येथें कशासाठीं उभी राहिली आहेस ? हे कल्याणि, तूं एकटीच या निर्जन अरण्यांत कां फिरत आहेस ? तूं सर्वांगसुंदर असून सर्व आभरणांनीं भूषित झाली आहेस. या सर्व भूषणांचें तूं जणुंकाय अत्यंत अभीष्ट असें भूषणच आहेस. तारुण्यानें अतिशय शोभणारी तूं कोणी देवी, आसुरी, यक्षी, राक्षसी, उरगी, गंधर्वी किंवा मानुषी असशील असें मला वाटत नाहीं. मी आजपर्यंत ज्या असंख्य श्रेष्ठ स्त्रिया पाहिल्या आहेत, किंवा ज्यांचें वर्णन ऐकिलें आहे, त्या सर्वांहून तूं अगदीं विलक्षण आहेस. हे सुमुखि, तुझें हें चंद्राहूनहि अतिशय आल्हादकारक

असलेलें मुख पाहून कामदेव मला व्याकुल करून सोडीत आहे. तुझे कमल-पत्रासारखे नेत्र पाहून मी मोहित झालों आहें."

पण हे राजपुत्रा, असें भाषण करणाऱ्या त्या कामार्त राजाशीं ती सूर्यकन्या एक अक्षरहि बोलली नाहीं. ही आपल्याशीं कांहींच बोलत नाहीं, असें पाहून तो कामासक्त राजा तिची अधिकच मनधरणी करूं लागला. तेव्हां ती श्रेष्ठ कन्या अभ्रांतील विद्युल्लतेप्रमाणें तेथेंच अंतर्धान पावली. ती भामिनी कोठें दिसत नाहीं, असें पाहून संवरणराजा तिला शोधण्यासाठीं सर्व अरण्यांत उन्मत्ताप्रमाणें भ्रमण करूं लागला. शेवटीं ती कोठें दिसत नाहीं, असें पाहून त्यानें पुष्कळ विलाप केला व कांहीं वेळ तो निश्चेष्ट पडला. १. ११. १७१.

---

## अध्याय १७२ वा.

[ १ संवरणराजाचा काममोह व तपतीचें आश्वासन.]

(१) गंधर्व म्हणाला—पार्था, ती तपती अदृश्य झाली असतां शत्रुसंघाचा नाश करणारा संवरणराजा काममोहित होऊन भूतलावर पडला. त्याची ती दीन स्थिति पाहून सुहास्य करणारी सूर्यकन्या प्रकट होऊन त्याला मधुर शब्दांनीं म्हणाली—"हे वीरा, ऊठ, ऊठ. तुजसारख्या कुरुकुलोत्पन्न राजाला असें काममोहित होणें उचित नाहीं. भूलोकीं प्रख्यात असलेल्यां तुला हा मोह शोभत नाहीं. हे धीरा, तुझें कल्याण असो. सावध हो."

तपतीनें हंसत असें मधुर भाषण केलें असतां तिच्या त्या कोमल शब्दांनींच तो देहभानावर आला. तों समीपच स्थित असलेली ती सूर्यकन्या त्याला दिसली. त्याबरोबर अतिशय संतुष्ट झालेला तो राजा मदनाग्नीनें संतप्त झाल्या-मुळें स्पष्ट शब्दांनीं तिला म्हणाला—"हे सुंदरि, कामातुर होऊन तुझ्या ठिकाणीं आसक्त झालेल्या माझा तूं स्वीकार कर. हे तरुणि, माझे प्राण व्याकुळ होऊन ते मला सोडून जात आहेत. हे विशालनयने, हा निर्दय काम आपल्या तीक्ष्ण शरांनीं तुझ्यासाठीं मला एकसारखा वेध करीत आहे. तो कांहीं केल्या शांत होत नाहीं. कामरूपी महासर्पानें मला दंश केला आहे. या वेळीं माझें रक्षण करणारा दुसरा कोणीहि दिसत नाहीं. हे कृशोदरि, तूं माझा स्वीकार कर.

हे किन्नरकंठि, माझे प्राण तुझ्या अधीन आहेत. हे भीरु, तुजवांचून मी जिवंत रहाण्यास समर्थ नाहीं. काम प्रतिक्षणीं माझ्या हृदयावर प्रहार करीत आहे. यास्तव हे भामिनि, मजवर दया कर. मज भक्ताचा परित्याग करूं नको. प्रीतिदानानें तूं माझ्या जीविताचें रक्षण कर. माझें मन तुला पहातांच तुजवर आसक्त होऊन अतिशय अस्वस्थ झालें आहे. तुला पाहिल्यावर मला आतां दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीला पहावेंसें वाटत नाहीं. हे कल्याणि, प्रसन्न हो. मी सर्वथा तुझ्या अधीन आहें. मज भक्ताचा अंगीकार कर.

तूं माझ्या दृष्टीं पडतांच हा निर्दय कामदेव माझ्या हृदयांत प्रवेश करून आपल्या दुःसह शरांनीं मला व्याकुळ करीत आहे. हे शुभे, तूं मला आत्मसमर्पण करून माझी कामव्यथा शांत कर. हे श्रेष्ठ अंगने, गांधर्व विधीनें तूं माझा स्वीकार कर. हे रंभोरु, सर्व विवाहांत गांधर्व विधि श्रेष्ठ आहे. कामाग्नीनें उत्पन्न केलेला दाह तूं प्रीतिदानरूपजलानें शांत कर. याप्रमाणें तूं मजवर अनुग्रह केल्यावांचून हा दुर्धर पुष्पधन्वा मला जिवंत राहूं देणार नाहीं."

हे अर्जुना, तुझ्या पूर्वजाचें हें भाषण ऐकून सूर्यकन्या तपती त्यास म्हणाली— हे नृपते, मी स्वतंत्र नाहीं. पितृमती कन्या आहें. मजवर तुझी प्रीति असेल, तर तूं माझ्या पित्याची आराधना कर. हे नरेश्वरा, ज्याप्रमाणें तूं आपले प्राण मोठ्या कष्टानें धारण करीत आहेस, त्याप्रमाणें मीहि तुझें दर्शन घडल्यापासून तुझ्यापेक्षांहि अधिक व्याकुळ झालें आहे. तूं माझे पंचप्राण हरण केले आहेस. तथापि मजवर माझी सत्ता नाहीं. यास्तव मी तुझ्या समीप येण्यास समर्थ नाहीं.

हे नृपश्रेष्ठा, स्त्रिया स्वतंत्र नसतात. तुझ्यासारखा त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेला श्रेष्ठ भक्तवत्सल भर्ता प्राप्त व्हावा अशी इच्छा कोणती कन्या करणार नाहीं ! यास्तव माझ्या आदित्यपित्याला तूं साष्टांग प्रणाम, तप व नियम यांच्या योगानें प्रसन्न करून माझी याचना कर. हे वरणीय वीरा, तुला माझें समर्पण करण्याची जर त्याला इच्छा झाली तर मी आजच तुझ्या अधीन होईन व सतत तुझ्या आज्ञेंत वागेन, हे क्षत्रियश्रेष्ठा, मी या लोकप्रकाशक सवित्याची कन्या असून सावित्रीची कनिष्ठ भगिनी आहें. १. ११. १७२.

---

## अध्याय १७३ वा.

[१ वसिष्ठाच्या अनुग्रहानें संवरणाचा तपतीशीं विवाह. २ त्याच्या कामासक्तीमुळें राष्ट्रावरील संकट व त्याची निवृत्ति. ]

( १ ) गंधर्व—हे कुंतीपुत्रा, सूर्यकन्या तपती राजाला असें सांगून सत्वर अंतरिक्षांत निघून गेली व तो संवरणराजा पुनरपि तेथील भूमीवर पडला. कांहीं वेळानें त्या महावनांत नृपोत्तमाचा शोध करणारा अमात्य चतुरंग सैन्यासह तेथें आला व त्यानें योग्य काळीं उंच शक्रध्वजाप्रमाणें भूमीवर पडलेल्या त्याला पाहिलें. तपतीनें त्याग केल्यामुळें भूमीवर पडलेल्या त्या महाधनुर्धराला पाहून त्याचा सचिव अग्नीचा स्पर्श झाल्याप्रमाणें संतप्त झाला. त्याला अतिशय भीति वाटली व स्नेहानें सत्वर त्याच्याजवळ येऊन पिता जसा पुत्राला उठवितो, तसें त्यानें त्या कामविह्वल राजाला उठविलें. बुद्धीनें, वयानें, कीर्तीनें व नीतीनें वृद्ध असलेला तो राजामात्य आपल्या प्रभूला वर उठवून थोडासा भयरहित झाला व कल्याणकर मधुर वाणीनें त्यास म्हणाला—" हे नरेंद्रा, भीऊं नको. तुझें कल्याण असो. "

आपला हा प्रभु क्षुधा व तृषा यांनीं व्याकुळ झाला असावा असें त्याला वाटलें. कारण रणांगणांत शत्रूंचा संहार करणारा आपला महाराजा दुसऱ्या कांहीं कारणानें भूमीवर असा व्याकुळ होऊन पडेल, असें त्याच्या मनांतहि आलें नाहीं. म्हणून त्यानें राजाच्या मस्तकावर शीतल जलाचा सेक केला व कमलयुक्त सुगंधी वाळ्याचा मुकुट तयार करून, दाह शांत होण्यासाठीं, त्याच्या मस्तकावर स्थापिला; पण तो तत्काल सुकून गेला. त्यानंतर देहभानावर आलेल्या त्या बलवान् राजानें एका सचिवावांचून सर्व सैन्याला परत जावयास सांगितलें. तेव्हां राजाज्ञेनें तें महा सैन्य आपल्या राजधानीकडे परत जावयास निघालें.

हे वीरा, राजा त्याच पर्वतशिखरावर पुनः बसला व तपतीच्या प्राप्तीविषयींच विचार करूं लागला. तेव्हां त्याला 'सूर्याची आराधना केल्यावांचून तपती प्राप्त होणें शक्य नाहीं,' असें दिसून आलें. त्यानें भगवान् आदित्याची आराधना करण्याचा निश्चय केला. तो स्नान-आचमनादि करून शुचिर्भूत झाला, हात जोडून त्या श्रेष्ठ पर्वतावर ऊर्ध्वमुख होऊन उभा राहिला व सूर्याची आराधना करूं लागला. त्या वेळीं त्या शत्रुनाशक संवरणराजानें मनांत आपल्या ऋषिश्रेष्ठ वसिष्ठ पुरोहिताचें स्मरण केलें. तो प्रजेश्वर याप्रमाणें अहोरात्र उभा राहून सूर्याचें व ऋषीचें चिंतन करीत असतां अकरा दिवस निघून गेले.

बाराव्या दिवशीं वसिष्ठ ऋषि त्याच्याजवळ आला व त्यानें या राजाचें मन तपतीनें हरण केलें आहे व तिच्या प्राप्तीसाठीं हा राजा अशी उग्र तपश्चर्या करीत आहे, असें दिव्य दृष्टीनें जाणलें आणि त्याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें तो धर्मात्मा त्यास म्हणाला—"हे राजा, चिंता करूं नकोस, मी सूर्याकडे जाऊन तुझा मनोरथ पूर्ण करण्याचा यत्न करितों." इतकें बोलून तो भगवान् ऋषि राजाच्या समक्ष भास्कराला भेटण्यासाठीं आकाशमार्गानें निघून गेला. त्या वेळीं त्या महर्षींची कांति भास्करासारखीच दिसत होती. योगसिद्धीच्या सामर्थ्यानें तो ब्राह्मण सूर्यमंडळास जाऊन पोंचला व हात जोडून सूर्यापाशीं उभा राहिला. 'मी वसिष्ठ आहें,' असें बोलून त्यानें मोठ्या प्रीतीनें आत्मनिवेदन केलें असतां अति तेजस्वी सूर्य त्या महर्षीस म्हणाला—"हे मुनिश्रेष्ठा, तुझें स्वागत असो, तूं आज कोणत्या कार्यासाठीं आला आहेस? हे महाभागा, तुझी जी इच्छा असेल ती मी पूर्ण करीन. तुझें कार्य कितीहि दुष्कर असलें तरी मी तें करीन."

भगवान् आदित्याचें हें वचन ऐकून संतुष्ट झालेला वसिष्ठ म्हणाला—हे विवस्वन्, सावित्रीची कनिष्ठ भगिनी 'तपती'-नांवाची जी तुझी कन्या आहे, तिची संवरणराजासाठीं मागणी करावयास मी आलों आहें. तो राजा मोठा कीर्तिमान्, धर्म व अर्थ यांस जाणणारा व उदार बुद्धि असल्यामुळें तुझ्या कन्येला अनुरूप वर आहे.

वसिष्ठाचें हें भाषण ऐकतांच सूर्यानें त्याचें अभिनंदन केलें व पूर्वींच निश्चय केलेल्या त्या भगवानानें 'ठीक आहे, मी आपली कन्या त्या राजाला देतों' असें म्हटलें. "हे मुने, पूरुकुलोत्पन्न संवरण भूलोकांतील सर्व राजांमध्यें श्रेष्ठ आहे, तूं सर्व ऋषींमध्यें वरिष्ठ आहेस व माझी कन्या तपती त्रिभुवनांतील सर्व स्त्रीरत्नांत उत्कृष्ट आहे. तेव्हां आतां तिचें दान करण्यापेक्षां अधिक श्रेष्ठ कार्य तें कोणतें!"

इतकें बोलून स्वतः सूर्यानें आपली सर्वांगसुंदर तपती-कन्या संवरण-राजासाठीं महात्म्या वसिष्ठाच्या स्वाधीन केली. त्या महर्षीनेंहि तिचा मोठ्या संतोषानें स्वीकार केला व आदित्याची अनुज्ञा घेऊन मदनानें व्याकुळ झालेला महाकीर्तिमान् कुरुश्रेष्ठ संवरणराजा जेथें तिचेंच ध्यान करीत उभा राहिला होता तेथें आला.

वसिष्ठासह अंतरिक्षांतून खालीं येत असलेल्या त्या सुहास्यवदन देवकन्येला पाहून राजा अतिशय संतुष्ट झाला. नभस्थलांतून पृथ्वीवर येणारी ती सुंदरी

सर्व दिशांना आपल्या तेजानें प्रकाशित करीत भूमीवर पडणाऱ्या विद्युल्लते-प्रमाणें अतिशय शोभली. राजाचा तो बारा दिवसांनीं साध्य होणारा नियम मोठ्या क्लेशानें समाप्त झाला असतां भगवान् वसिष्ठ ऋषी तपतीला घेऊन तेथें आला. अर्जुना, याप्रमाणें त्या वरद सूर्यदेवाची तपानें आराधना करून वसिष्ठाच्या तेजानेंच संवरणाला ती भार्या प्राप्त झाली.

(२) त्यानंतर देव व गंधर्व यांनीं सेवन केलेल्या त्या श्रेष्ठ पर्वतावर त्या नरेंद्रानें तपतीचें यथाविधि पाणिग्रहण केलें. वसिष्ठाची आज्ञा घेऊन त्या राजर्षीनें त्याच पर्वतावर भार्येसह विहार करण्याचा निश्चय केला व त्या भूपालानें आपलें नगर, राष्ट्र, वनें व उपवनें यांतील सर्व राजकार्य पहाण्याचा अधिकार त्याच वृद्ध सचिवास दिला. वसिष्ठ-पुरोहितहि राजाची अनुज्ञा घेऊन तेथून निघून गेला.

हे प्रभो, संवरणराजा त्याच पर्वतावर देवाप्रमाणें विहार करूं लागला. त्यानें आपल्या नववधूसह त्या पर्वतावरील अनेक वनें व उपवनें यांमध्यें बारा वर्षें यथेच्छ विषयसुख भोगलें. पण हे वीरा, संवरणराजा असा बारा वर्षें सतत कामासक्त होऊन राहिल्यामुळें त्याच्या नगरांतील ज्योतिष्टोमादि सर्व वार्षिक क्रिया लुप्त झाल्या. त्यामुळें इंद्रानें त्याच्या राष्ट्रांत जलवृष्टि केली नाहीं. राजाच्या या दोषामुळें दीर्घ अनावृष्टि प्रवृत्त झाली असतां संवरण-राजाच्या राष्ट्रांतील सर्व स्थावर-जंगम प्रजा क्षय पावली.

अर्जुना, तुला काय सांगूं ! त्या राष्ट्रांत तसला तो घोर काल प्रवृत्त झाला असतां पृथ्वीवर दंवाचे थेंबहि पडले नाहींत, मग वृष्टि तर दूरच राहिली. त्यामुळें भूमींतून कोणत्याहि जातीच्या तृणाचा अंकुरहि उगवेनासा झाला. त्यामुळें सर्व लोक भ्रांतचित्त झाले, ते क्षुधा व भय यांनीं अत्यंत पीडित झाले व गृहत्याग करून दशदिशांत भ्रमण करूं लागले. त्या वेळीं त्या राष्ट्रांत व नगरांत क्षुधेनें आर्त झालेले व स्त्री-पुत्रादि परिवार सोडलेले लोक मर्यादेचें उल्लंघन करून परस्परांचा वध करूं लागले.

हे तापत्या, क्षुधापीडित, दुःखी व त्यामुळें प्रेताप्रमाणें दिसणाऱ्या त्या प्रजाजनांच्या योगानें तें नगर मृत जीवांनीं व्यापलेल्या यमपुरीसारखें दिसूं लागलें. तेथील तो प्रकार पाहून मुनींतील श्रेष्ठ धर्मात्म्या भगवान् वसिष्ठमहर्षीचें मन द्रवलें व त्यानें त्या नरव्याघ्र ‘ संवरण ’-नृपतीला तपतीसह बारा वर्षांनंतर आपल्या नगरींत आणिलें.

त्या नृपश्रेष्ठानें नगरींत पुनः प्रवेश करितांच सहस्राक्ष इंद्रानें त्याच्या राष्ट्रांत पूर्ववत् पर्जन्यवृष्टि केली व हे धनंजया, त्या प्रभूनें पुनः धान्य व तृण उत्पन्न केलें. त्या शुद्धचित्त भूपतीकडून अनुग्रहीत झालेलें तें नगर प्रजाजनांसह आनंदित झालें. त्यानंतर शचीसह जसा इंद्र त्याप्रमाणें तपतीसह त्या नरेंद्रानें बारा वर्षे पुनः यज्ञ केले. हे पार्था, याप्रमाणें ती वैवस्वती, महाभागा तपती तुझी पूर्वजा होती. त्या नृपश्रेष्ठ संवरणापासून तपतीला 'कुरु' हा पुत्र झाला. तुम्ही त्याचे वंशज असल्यामुळें मीं तुला 'तापत्य' असें म्हटलें. १. ११.१७३.

---

## अध्याय १७४ वा.

[ १ वसिष्ठाचा संक्षिप्त वृत्तान्त व पांडवांस पुरोहित करण्याविषयीं उपदेश. ]

(१) वैशंपायन—हे जनमेजय-नृपेंद्रा, गंधर्वाचें तें वचन परम भक्तीनें ऐकून अर्जुन पूर्णचंद्राप्रमाणें शोभला. त्याला वसिष्ठ-महर्षीच्या तपःसामर्थ्याचें अतिशय कौतुक वाटलें व तो कुरुश्रेष्ठ धनुर्धर पार्थ गंधर्वाला म्हणाला—" हे गंधर्वराज, तूं ज्या 'वसिष्ठ'-नांवाच्या ऋषीचा उल्लेख केलास, त्या श्रेष्ठ ऋषीचा वृत्तान्त ऐकण्याची माझी इच्छा आहे. तो मला सविस्तर सांग. आमच्या पूर्वजांचा पुरोहित असलेला हा ऋषिश्रेष्ठ कोणाचा कोण, हें मला कथन कर."

राजा, महापराक्रमी पार्थाचा हा प्रश्न ऐकून तो गंधर्वपति म्हणाला—" हे कौंतेया, वसिष्ठमहर्षि ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असून देवी अरुंधतीचा पति आहे. देवांनाहि अजिंक्य असलेले जे काम व क्रोध यांना त्यानें आपल्या तपोबलानें निःशेष जिंकलें आहे. त्यामुळें ते दोघेहि या महर्षीच्या चरणांचें नित्य संवाहन करीत असतात. याप्रमाणें इंद्रियांना वश करणारा म्हणून त्यास 'वासिष्ठ' असें म्हणतात. विश्वामित्रानें घोर अपराध केला असतांहि त्या उदारबुद्धि महर्षीनें क्रोधाचें निवारण केलें व कुशिकवंशाचा उच्छेद केला नाहीं. शंभर पुत्रांच्या नाशामुळें संतप्त झालेला वसिष्ठ समर्थ असूनहि एखाद्या दुर्बलाप्रमाणें शांत राहिला.

विश्वामित्रानें आपला पुत्रशतवधरूप अपराध केला असूनहि त्यानें त्याच्या नाशासाठीं दारुण कर्म आचरिलें नाहीं. महासागर आपल्या मर्यादेचें जसें उल्लंघन करीत नाहीं, त्याप्रमाणें आपल्या मृत पुत्रांना यमलोकांतून परत आणण्यास समर्थ असूनहि, त्यानें कृतान्ताची मर्यादा उल्लंघिली नाहीं. या जितेंद्रिय महा-

त्याला पुरोहित करून इक्ष्वाकुकुलांतील राजे या सर्व पृथ्वीचे अतिपति झाले व त्यांनीं अनेक यज्ञ केले. त्या श्रेष्ठ ऋषीनेंहि त्या सर्व नृपतिश्रेष्ठांकडून मोठमोठे याग करविले. देवपुरोहित बृहस्पति देवांकडून जशीं अनेक धर्मकार्यें करवितो, त्याचप्रमाणें या ब्रह्मर्षीनें सूर्यवंशीय भूपालांकडून मोठमोठीं धर्मकार्यें करविलीं व त्यामुळें त्या वंशाचें परम कल्याण झालें. यास्तव हे पांडवश्रेष्ठा, तूंहि धर्मपरायण, वेदधर्मज्ञ, गुणवान् व धर्मकार्यांत अत्यंत निष्णात, असा कोणी ब्राह्मण आपला पुरोहित कर.

हे पार्था, पृथ्वीला जिंकण्याची इच्छा करणाऱ्या कुलीन क्षत्रियानें राज्याच्या अभिवृद्धीसाठीं प्रथम उत्तम पुरोहित करावा, असें धर्मज्ञांचें मत आहे. पृथ्वीला जिंकण्याची इच्छा करणाऱ्या राजानें ब्राह्मणाला आपला अग्रेसर करावें. यास्तव हे वीरांनो, तुम्ही विद्वान्, गुणवान्, जितेंद्रिय आणि धर्म, काम व अर्थ या तिन्ही पुरुषार्थांचें तत्त्व जाणणारा असा एखादा पुरोहित करा." १. ११. १७४.

---

## अध्याय १७५ वा.

[ १ वसिष्ठ व विश्वामित्र यांच्या विरोधाचें कारण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पारिक्षिता, गंधर्वाचें तें भाषण ऐकून बुद्धिमान् पार्थानें पुनः प्रश्न केला—" हे गंधर्वा, पवित्र आश्रमांत रहाणारा वसिष्ठ व विश्वामित्र या दोघां मुनींमध्यें कोणत्या कारणानें वैर उत्पन्न झालें, तो सर्व वृत्तान्त मला सांग."

गंधर्व म्हणाला—हे पार्था, हें वसिष्ठाचें पुरातन आख्यान सर्व लोकांमध्यें प्रसिद्ध आहे, तेंच मी तुला सविस्तर सांगतों. हे भरतश्रेष्ठा, कान्यकुब्ज देशांत कुशिकराजर्षीचा गाधी या नांवाचा एक पुत्र प्रसिद्ध राजा होता. त्या धर्मात्म्याचा बल व वाहनें यांनीं समृद्ध असा विश्वामित्र-नांवाचा रिपुनाशक पुत्र होऊन गेला. एकदा तो गहन वनांत अमात्यांसह मृगयेस गेला. तो अनेक हरिणें व वराह यांस वेध करीत अल्प जलानें युक्त असलेल्या 'मरु'-संज्ञक प्रदेशांत फिरत असतां श्रान्त होऊन अतिशय तृषा लागल्यामुळें वसिष्ठ मुनीच्या आश्रमास आला.

आपल्या आश्रमांत आलेल्या त्या नृपतीला पाहून पूज्यांची पूजा करणाऱ्या वसिष्ठानें नरश्रेष्ठ विश्वामित्राचा पाद्य, अर्घ्य व स्वागत यांच्या योगानें सत्कार केला. विश्वामित्रानेंहि वन्य हवीनें केलेल्या त्याच्या सत्काराचा स्वीकार केला.

त्या महात्म्या वसिष्ठाची सर्व कामना पूर्ण करणारी एक कामधेनु होती. ती इच्छेप्रमाणें सर्व कामांचें दोहन करीत असल्यामुळें वसिष्ठानें तिला 'या राजाची सर्व कामना पूर्ण कर, याला व याच्या अमात्यादि सर्व परिवाराला जें जें इष्ट असेल तें तें दे,' असें सांगितलें.

तेव्हां त्या धेनूनें ग्रामांतील व अरण्यांतील औषधि, दुग्ध, अमृतासारखें षड्रस अन्न, उत्तम रसायन, भक्ष्य, भोज्य, पेय, लेह्य व चोष्य असें विविध अन्न, उंची रत्नें, नाना प्रकारचीं वस्त्रें व इतर सर्व इष्ट पदार्थ त्यांस अर्पण केले. त्यामुळें तो राजा अमात्य व सैन्य यांसह अतिशय संतुष्ट झाला. त्या अरण्यांतहि राजाचे सर्व मनोरथ पूर्ण झाले.

ती कामधेनु नंदिनी मस्तक, मान, कटिप्रदेश, गळयाखालची पोळी, पृष्ठभाग व नासिका या सहा प्रदेशीं उन्नत होती. तिच्या कुशी व मांड्या पुष्ट होत्या. तिचें ललाट, दोन कान व दोन नेत्र दीर्घ होते. तिचे नेत्र मंडूकाच्या नेत्रांप्रमाणें बटबटीत व ओटी अतिशय पुष्ट होती. तिच्या पुच्छाचा गोंडा सुंदर असून कान शंकूसारखे अणकुचीदार, शृंगें रमणीय आणि मान व मस्तक पुष्ट व दीर्घ होतीं. अशा सर्व शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या त्या धेनूला पाहून गाधिपुत्र विश्वामित्राला अतिशय संतोष झाला.

असली सुलक्षणी गाय आपल्यापाशीं असावी, असें त्याला वाटलें व तो वसिष्ठ महर्षीपाशीं येऊन म्हणाला—" हे ब्रह्मन्, ही तुझी नंदिनी धेनु मला दे. हिच्या स्थानीं मी तुला दहा कोटि गायी, किंवा तुझी इच्छा असेल तर सर्व राज्यहि अर्पण करितों. हे महामुने, तूं मला एक नंदिनी गाय देऊन माझ्या सर्व राज्याचा उपभोग घे."

अर्जुना, त्या लुब्ध राजाचें हें भाषण ऐकून वसिष्ठ त्यास म्हणाला—"हे निष्पाप राजा, देवता, अतिथि व पितर यांचीं कार्यें व माझ्या यजमानांचें याजन यांच्या उपयोगी असलेली ही नंदिनी, मला तुझें राज्य घेऊनहि देतां येण्यासारखी नाहीं. तूं तिचा लोभ धरूं नको."

महर्षीचें हें वचन ऐकून क्रुद्ध झालेला विश्वामित्र त्यास म्हणाला—मी क्षत्रिय आहें आणि तूं तप व स्वाध्याय या साधनांनीं युक्त असलेला ब्राह्मण आहेस. तुझ्यासारख्या अति शांत व संतुष्ट चित्त ब्राह्मणामध्यें वीर्य कोठचें असणार? दहा कोटि गायी घेऊनहि जर तूं मला इष्ट असलेली ही गाय न देशील तर मी आपला स्वधर्म सोडणार नाहीं. बलात्कारानें या गायीला घेऊन जाईन.

तें ऐकून वसिष्ठमुनि शांत चित्तानें त्यास म्हणाला—तूं स्वसामर्थ्यामध्यें स्थित असलेला राजा व बाहूमध्यें ज्याचें वीर्य असतें, असा क्षत्रिय आहेस. यास्तव तुझी जशी इच्छा असेल तसें सत्वर कर. त्याविषयीं मनांत मुळींच शंका धरूं नकोस.

पार्था, वसिष्ठाचें हें भाषण ऐकून विश्वामित्रानें हंस व चंद्र यांप्रमाणें शुभ्र वर्ण असलेल्या त्या नंदिनी धेनूला बलात्कारानें हरण करण्याचा यत्न चालविला. प्रतोद व दंड यांचे निर्दयपणें प्रहार करून राजसेवक तिला आश्रमांतून नेऊं लागले. तेव्हां वसिष्ठाच्या त्या कल्याणी नंदिनीनें हंबरडा फोडला आणि त्या क्रूर राजसेवकांच्या हातून निसटून ती वसिष्ठऋषीच्या समीप येऊन त्याच्याकडे पहात उभी राहिली. ते दुष्ट राजसेवक तिला अतिशय ताडन करीत असतांहि ती आश्रमांतून बाहेर गेली नाहीं.

आपल्या प्रिय नंदिनीचे ते क्लेश पाहून मनांत दुःखानें कळवळलेला ऋषि आपल्याकडे दीन दृष्टीनें पहात असलेल्या त्या धेनूला म्हणाला—"हे भद्रे, हंबरणाऱ्या तुझा ध्वनि माझ्या श्रोत्रेंद्रियाला विदीर्ण करीत आहे. हे पूज्य नंदिनि, विश्वामित्र तुला बलात्कारानें नेत आहे त्याला मी काय करूं? मी क्षमावान् ब्राह्मण आहें."[1]

अर्जुना, ऋषीचें हें भाषण ऐकून विश्वामित्राच्या व सैन्याच्या भीतीनें उद्विग्न झालेली ती नंदिनी वसिष्ठमुनीच्या समीप जाऊन म्हणाली—"हे भगवन्, विश्वामित्राच्या घोर सैनिकांनीं मला चाबकाच्या वाद्या व दंड यांनीं अतिशय ताडन केल्यामुळें अनाथाप्रमाणें आक्रोश करणाऱ्या माझी तूं उपेक्षा कां बरें करीत आहेस?"

हे पार्था, याप्रमाणें नंदिनी हंबरडा फोडीत असतांहि तो महामुनि क्षुब्ध झाला नाहीं. तो व्रतस्थ मुनि धैर्यापासून ढळला नाहीं. उलट नंदिनीला म्हणाला—"हे माते, क्षत्रियांचें तेज हें बल आहे व ब्राह्मणांचें क्षमा हें बल आहे.[2] या राजानें एवढा घोर अपराध केला असतांहि क्षमेचा त्याग करावा, असें मला वाटत नाहीं. यास्तव तुझी इच्छा असेल तर जा."

वसिष्ठाचें हें संदिग्ध वचन ऐकून त्याचा आशय स्पष्ट समजून घेण्यासाठीं, ती पुनः म्हणाली—"हे पूज्य महर्षे, तूं असें बोलत आहेस, त्यावरून तूं माझा

---

१ क्षमावान् ब्राह्मणो ह्यहम्। २ क्षत्रियाणां बलं तेजो ब्राह्मणानां क्षमा बलम्॥

त्याग केलास, असें मी समजूं कीं काय? कारण तूं जर माझा त्याग केला नसशील तर हे क्षमाशील ब्राह्मणा, हा दुष्ट राजा मला बलात्कारानें केव्हांहि नेऊं शकणार नाहीं. हें मी तुला सत्य सांगतें."

तेव्हां वसिष्ठ मोठ्या आदरानें म्हणाला—"हे पूज्य जननि, नाहीं; मीं तुझा त्याग केलेला नाहीं. तुला जर शक्य असेल तर तूं येथें खुशाल रहा. हे सैनिक तुझ्या या वत्साला दृढ दाव्यानें बांधून ओढून नेत आहेत. पहा."

हे कौंतेया, वसिष्ठाच्या तोंडून 'तूं खुशाल रहा' हे शब्द निघतांच ती समर्थ पयस्विनी अतिशय क्रुद्ध झाली. तिचें सर्वांग रोमांचित झालें. ती उग्र दिसूं लागली. नेत्र लाल करून तिनें भयंकर हंबरडा फोडला. तिचें तें उग्र स्वरूप व मेघगर्जनेसारखा भयंकर ध्वनि ऐकून विश्वामित्राचें सैन्य चोहोंकडे पळूं लागलें.

याप्रमाणें त्या समर्थ कामधेनूनें त्याच्या सैन्यास जरी पळविलें, तरी कांहीं शूर सैनिक तिला चाबकाच्या वाद्या व दंड यांच्या प्रहारांनीं आश्रमाच्या बाहेर नेण्याचा प्रयत्न करूं लागले. तेव्हां ती अधिकच चवताळली. क्रोधानें तिचें शरीर ग्रीष्म ऋतूंतील मध्याह्नकालीन सूर्याप्रमाणें प्रदीप्त झालें. ती आपल्या पुच्छाग्रापासून रखरखीत निखाऱ्यांचा भयंकर वर्षाव करूं लागली.

तिनें आपल्या पुच्छापासून पल्हव, ओटीपासून द्राविड व शक, योनीपासून यवन, गोमयापासून अनेक शबर, गोमूत्रापासून विशिष्ट जातीचे भिल्ल, दोन्ही कुशींपासून पौण्ड्र, किरात, यवन, बर्बर, सिंहल, खस, हनुवटीपासून पुलिंद, चीन, केरलांसह हूण आणि फेंसापासून अनेक जातीचे म्लेच्छ उत्पन्न केले. त्या अद्भुत नंदिनीनें आपल्या निरनिराळ्या अंगांपासून उत्पन्न केलेल्या या म्लेच्छ सैन्यानें विश्वामित्राच्या सैन्यावर त्याच्या समक्ष चाल केली आणि विचित्र चिलखतांनीं आच्छादित झालेल्या व अनेक आयुधें धारण करणाऱ्या त्या म्लेच्छ वीरांनीं अतिशय क्षुब्ध होऊन आयुधांचा वर्षाव केला.

विश्वामित्राच्या एकेका योद्ध्याला पांच पांच किंवा सात सात योद्ध्यांनीं वेढलें. त्यांच्या भयंकर अस्त्रवृष्टीनें छिन्न-भिन्न होणारें विश्वामित्राचें सैन्य त्याच्या समक्ष भयभीत होऊन सर्वतः पराभूत झालें. पण वसिष्ठाच्या या क्रुद्ध झालेल्या म्लेच्छ वीरांनीं विश्वामित्राच्या एकाहि सैनिकाचा वध केला नाहीं. केवळ त्या सर्वांना भिववून पळावयास लाविलें.

धनंजया, याप्रमाणें त्या धेनूनें आपल्या अचिन्त्य सामर्थ्यानें विश्वामित्राच्या सैन्याला वसिष्ठाच्या तपोवनापासून तीन योजनें दूर पिटाळून लाविलें असतां भयानें उद्विग्न झालेलें तें राजसैन्य भयंकर आक्रोश करूं लागलें. पण त्या वेळीं त्याचें रक्षण करण्यास कोणीहि समर्थ झालें नाहीं.

ब्रह्मतेजापासून उत्पन्न झालेलें हें महदाश्चर्य पाहून विश्वामित्र आपल्या क्षत्रियत्वाला कंटाळला. तो म्हणाला—"क्षत्रियांच्या या तुच्छ बलाला धिक्कार[1] असो. ब्रह्मतेज हेंच खरें बल आहे." याप्रमाणें बलाबलाचा विचार करून 'तप हेंच श्रेष्ठ बल आहे' असा त्याचा निश्चय झाला. त्याबरोबर आपलें तें विस्तीर्ण राज्य व ती दिप्त राजश्री यांचा त्याग करून व सर्व विषयोपभोगांना दूर सारून त्यानें आपलें मन तपामध्यें स्थिर केलें. तो निश्चयी राजा दीर्घकालानें तपः-सिद्धीला प्राप्त झाला. आपल्या तेजानें सर्व लोकांना व्यापून त्या अति ओजस्वी विश्वामित्रानें सर्वांना संतप्त केलें व तो महात्मा ब्राह्मणत्वास प्राप्त झाला आणि त्या कुशीकनंदनानें इंद्रासह सोमपान केलें. १. ११. १७५.

---

## अध्याय १७६ वा.

[१ कल्माषपादाचा वृत्तांत. २ त्याला शक्तीचा शाप. ३ ब्राह्मणाचा शाप. ४ वसिष्ठपुत्रांचा नाश.]

( १ ) वैशंपायन—हे भरतसत्तमा, त्या गंधर्वानें याप्रमाणें वसिष्ठ-विश्वामित्रांची कथा सांगितल्यावर कल्माषपादाचें आख्यान सांगण्यास आरंभ केला. तो म्हणाला—"हे रणधुरंधर पार्था, पूर्वी इक्ष्वाकुवंशांत 'कल्माषपाद्'-नांवाचा एक राजा होऊन गेला. या भूलोकीं त्या नृपतीसारखा तेजस्वी दुसरा कोणीहि राजा नव्हता.

एकदा तो राजा आपल्या नगरींतून मृगयेसाठीं एका वनांत गेला. त्या महा घोर वनांत अनेक हरिणें व वराह यांना वेध करीत फिरत असतांना त्यानें असंख्य गेंड्यांचा वध केला. शेवटीं दीर्घकाल मृगया करून श्रांत झालेला तो राजा तेथून परत फिरला. या भूपालाकडून आपण यज्ञ करवावा अशी प्रतापी विश्वामित्राची मनीषा होती. तो क्षुधा व तृषा यांनीं व्याकुळ झालेला राजा परत

---

१ धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलं बलम् । बलाबले विनिश्चित्य तप एव परं बलम् ॥

चालला असतां एकच मनुष्य जाऊं शकेल अशा एका अतिशय अरुंद मार्गांत आला. तों त्यानें महात्म्या वसिष्ठपुत्राला समोरून येतांना पाहिलें. तो वसिष्ठाच्या शंभर पुत्रांपैकीं 'शक्ति'-नांवाचा सर्वांत ज्येष्ठ पुत्र होता. तो महातपस्वी होता.

त्याला पाहून कल्माषपाद राजा म्हणाला—हे ब्राह्मणा, मला मार्ग दे. माझ्या मार्गांतून दूर हो. तेव्हां ऋषीनें मधुर वाणीनें त्याचें सांत्वन करीत म्हटलें—"हे महाराज, हा माझा मार्ग आहे, कारण जोंवर ब्राह्मण पुढें आला नाहीं तोंवरच राजानें एखाद्या मार्गानें जावें व ब्राह्मण पुढें आला असतां राजानें त्याला वाट देऊन त्याच्या मागून आपण जावें, हा सनातन धर्म आहे. यास्तव तूंच बाजूला हो."

याप्रमाणें ते दोघेहि परस्परांस 'दूर हो, दूर हो,' असें बोलूं लागले. परंतु धर्ममार्गांत स्थित असलेला तो ऋषि आपल्या जागेवरून हलला नाहीं.

(२) राजन्, तेव्हां कल्माषपाद मार्ग न सोडणाऱ्या त्या ऋषीपाशीं आला व क्रोधानें मोहित झालेल्या त्या बलाढ्य राजानें ऋषीला चाबकानें एखाद्या राक्षसाप्रमाणें ताडन केलें. त्यामुळें क्रोधानें देहभान विसरलेल्या वसिष्ठपुत्रानेंहि त्या पृथ्वीपतीला शाप दिला—"हे दुष्टा, ज्याअर्थी तूं मज तापसावर राक्षसासारखा प्रहार करीत आहेस, त्याअर्थी तूं नरभक्षक राक्षस होशील व हे अधम राजा, आजपासून तूं नरमांसाच्या आसक्तीनें या पृथ्वीतलावर भ्रमण करशील; जा आतां." असें त्या महा सामर्थ्यवान् शक्तिमुनीनें त्याला म्हटलें. याप्रमाणें विश्वामित्रानें आपल्या विद्याबलानें वसिष्ठपुत्र शक्ति आणि कल्माषपादराजा यांच्यामध्यें वैर उत्पन्न केलें व त्या राजर्षीनें यज्ञ करणाऱ्या राजाचा जेव्हां अंगीकार केला तेव्हां वसिष्ठ व विश्वामित्र यांमध्येंहि वैर उत्पन्न झालें.

अर्जुना, वर सांगितल्याप्रमाणें ते दोघे आपसांत वाद करीत असतांना उग्र तपस्वी प्रतापवान् विश्वामित्र ऋषि तेथें आला व त्याच्या तोंडून त्या श्रेष्ठ राजानें 'वसिष्ठाप्रमाणेंच तेजस्वी असलेला हा मुनि त्याचाच पुत्र आहे' असें ऐकिलें. तेव्हां त्याच्यापाशीं आलेला विश्वामित्र राजर्षि तेथेंच गुप्त राहिला व आपलें प्रिय करण्याची इच्छा करणाऱ्या त्यानें त्या दोघांचेंहि अतिक्रमण केलें. शक्तीनें शाप दिला असतां त्याला प्रसन्न करण्यासाठीं कल्माषपाद त्याला सत्कारपूर्वक शरण जात आहे, असें पाहून विश्वामित्रानें त्या राजाच्या शरीरांत एका राक्षसाचा प्रवेश करविला.

विप्रर्षीच्या शापानें व विश्वामित्राच्या आज्ञेनें 'किंकर' या नांवाचा राक्षस राजाच्या शरीरांत शिरला. याच्या शरीरांत राक्षसानें प्रवेश केला आहे, असें पाहून विश्वामित्र तेथून निघून गेला. अंगांत शिरलेल्या राक्षसानें अत्यंत पीडा दिल्यामुळें त्या इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजालाहि कर्तव्याकर्तव्याचें भान राहिलें नाहीं.

(३) अर्जुना, एकदा वनांतून फिरत असलेल्या त्या राजाला क्षुधेनें व्याकुळ झालेल्या एका ब्राह्मणानें पाहिलें व त्याच्यापाशीं मांसयुक्त भोजनाची याचना केली. तेव्हां मित्रावर उपकार करणारा तो राजर्षि त्या ब्राह्मणास म्हणाला—"हे विप्रा, तूं कांहीं वेळ येथेंच माझी वाट पहात बैस. मी परत आलों, म्हणजे तुला इष्ट भोजन देईन."

इतकें बोलून राजा पुढें निघून गेला व तो ब्राह्मणश्रेष्ठ तेथेंच त्याची वाट पहात राहिला. त्यानंतर बराच वेळ वनांत यथेच्छ संचार करून तो उदार राजा आपल्या अंतःपुरांत परत आला. मध्यरात्रीच्या सुमारास 'एका ब्राह्मणाला मी आज मांसयुक्त भोजन देण्याचें अभिवचन दिलें आहे' हें त्यास आठवलें. तेव्हां त्यानें आपल्या बल्लवाला सत्वर बोलावून आणलें व त्यास म्हटलें—"हे सूदा, या वनांत एक अन्नार्थी ब्राह्मण माझी वाट पहात बसला आहे, त्याला मांसयुक्त अन्न सत्वर नेऊन दे. जा, उशीर लावूं नको."

पार्था, राजाची अशी आज्ञा होतांच तो स्वयंपाकी अन्न सिद्ध करण्याकरितां गेला. परंतु त्या वेळीं त्याला मांस कोठेंहि मिळेना. तेव्हां त्यानें खिन्न होऊन राजाला तसें निवेदन केलें. पण राजाच्या शरीरांत राक्षसानें प्रवेश केलेला असल्यामुळें त्याला त्याबद्दल कांहींच खेद वाटला नाहीं. उलट तो त्या सूदाला म्हणाला—"हरकत नाहीं, इतर मांस मिळत नसलें तर नरमांस घेऊन ये आणि त्या ब्राह्मणाला जेऊं घाल."

तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून तो मनुष्यवध करणाऱ्या लोकांकडे गेला व त्यांच्यापासून नरमांस घेऊन आला. त्या मांसाचे विविध पदार्थ बनवून त्यानें तें अन्न त्या क्षुधार्त तपस्वी ब्राह्मणाला नेऊन दिलें.

त्या ब्राह्मणानें आपल्या दिव्य दृष्टीनें तें अन्न पाहिलें व हें आपल्याला अभोज्य आहे, असें जाणून तो श्रेष्ठ ब्राह्मण संतप्त झाला आणि नेत्र लाल करून म्हणाला—"ज्याअर्थीं तो अधम राजा मला हें अभोज्य अन्न देत आहे, त्याअर्थीं तोच नरमांसावर आसक्त होईल आणि पूर्वीं शक्तिमुनीनें म्हटल्याप्रमाणें तो या पृथ्वीतलावर सर्व प्राण्यांना भयप्रद होऊन भ्रमण करीत राहील."

( ४ ) धनंजया, याप्रमाणें शक्ति व ब्राह्मण या दोघांनीं राजाला एकसारखाच शाप दिल्यामुळें त्या शापाचें सामर्थ्य वाढलें व त्या भूपालाच्या अंगांत राक्षसाच्या बलाचा संचार होऊन तो मूर्च्छित होऊन पडला. त्यानंतर कांहीं कालानें राक्षसानें ज्याचीं इंद्रियें आपल्या स्वाधीन करून घेतलीं आहेत अशा त्या राजाला शक्तिमुनि भेटला असतां त्यानें त्याला म्हटलें—"हे मुने, ज्याअर्थी तूं मला असा अयुक्त शाप दिला आहेस, त्याअर्थीं मी तुझ्यापासूनच मनुष्यभक्षणाला आरंभ करितों."

अर्जुना, असें बोलून त्यानें तत्काल शक्तिमुनीचा वध केला व व्याघ्र जसा पशूला फाडून खातो, तसें त्यानें त्या ऋषीला भक्षण केलें. शक्ति मृत झालेला पहातांच विश्वामित्रानें वसिष्ठाचेच पुत्र खाण्याविषयीं त्या राक्षसाला पुनः पुनः उपदेश केला. तेव्हां क्रुद्ध झालेला सिंह जसा दीन हरिणांना खातो, त्याप्रमाणें त्या राक्षसानें शक्तीच्या सर्व कनिष्ठ भ्रात्यांना भक्षण केलें.

हे कौंतेया, विश्वामित्रानें आपल्या सर्व पुत्रांचा नाश करविल्याचें ऐकून, मेरुपर्वत पृथ्वीला जसा धारण करतो, त्याप्रमाणें वसिष्ठ-महर्षीनें तो असह्य पुत्रशोक सहन केला. शेवटीं त्या श्रेष्ठ मुनीनें आत्महत्या करण्याचें योजिलें. परंतु त्या बुद्धिमानांतील श्रेष्ठ व क्षमाशील महात्म्यानें विश्वामित्राचा उच्छेद करण्याचें मनांतहि आणलें नाहीं.

त्या भगवान् ऋषीनें मेरुपर्वताच्या शिखरावरून स्वतःचा देह खालीं सोडून दिला. परंतु हे पांडुनंदना, त्या भृगुपातानेंहि तो मरण पावला नाहीं. कापसाच्या राशीवर जसें पडावें, त्याप्रमाणें तो त्या पर्वताच्या शिळेवर पडला. त्यानंतर भगवान् वसिष्ठानें त्या महावनांतील प्रदीप्त अग्नींत प्रवेश केला. परंतु हे पार्था, त्या प्रदीप्त अग्नीनेंहि त्याला दग्ध केलें नाहीं. उलट तो देदीप्यमान अग्निहि शीतल झाला. तेव्हां त्या शोकाकुल महामुनीनें आपल्या कंठांत एक मोठी शिला बांधून समुद्रांत उडी घेतली. पण समुद्राच्या लाटांच्या वेगानें तो महर्षि तीरावर येऊन पडला. तेव्हां अनेक उपायांनींहि आपल्याला मरण येत नाहीं, असें पाहून तीव्र व्रत धारण करणारा मुनि खिन्न होऊन आपल्या आश्रमाकडे परत निघून गेला. १. ११. १७६.

---

## अध्याय १७७ वा.

[ १ वसिष्ठाच्या अनुग्रहानें कल्माषपादाच्या शापाची निवृत्ति व अपत्यप्राप्ति. ]

(१) गंधर्व म्हणाला—हे पृथापुत्रा, वसिष्ठ आपल्या आश्रमास परत आला खरा, पण आपलें आश्रमस्थान पुत्ररहित आहे, असें पाहून त्याला अतिशय दुःख झालें व तो मुनि पुनः तेथून निघाला. त्या वेळीं वर्षाकाल होता, त्यामुळें त्याला नूतन जलानें तुडुंब भरलेली एक नदी लागली. ती आपल्या ओघानें तीरावरील अनेक वृक्ष समूळ उपटून त्यांना वाहून नेत होती. दुःखानें व्याकुळ झालेला तो मुनि आपण या अगाध जलांत देहत्याग करावा असा विचार करूं लागला.

पूर्वीप्रमाणेंच आपण पुनः तीरावर येऊन पडूं नये, म्हणून त्यानें आपले हात, पाय इत्यादि सर्व अवयव पाशांनीं बांधून टाकले व त्या महानदीच्या प्रवाहांत उडी घेतली. पण हे जिष्णो, काय चमत्कार सांगावा! त्या नदीनें त्याचे पाश तोडून मुनीला तीरावर आणून सोडिलें. तें पाहून वसिष्ठ मुनीनें आपल्याला पाशरहित करून परतीरावर आणून स्थिर करणाऱ्या त्या नदीला विपाशा म्हणजे पाशमुक्त करणारी असें नांव दिलें.

याप्रमाणें प्राणनाशाचे सर्व प्रयत्न व्यर्थ झाल्यामुळें तो महामुनि अत्यंत शोकाकुल झाला आणि एकाच ठिकाणीं न रहातां पर्वत, नद्या व सरोवरें इत्यादि प्रदेशांतून संचार करीत फिरूं लागला. तेथें त्या ऋषीला हिमालयांतून वेगानें वहाणारी भीमानदी लागली. भयंकर मकरांनीं व्याप्त असलेल्या त्या नदीचें विस्तृत पात्र पाहून त्या महर्षीनें त्यांत उडी घेतली. तेव्हां ती नदी हा ऋषि साक्षात् अग्नीसारखाच आहे, असें समजून आपला शतधा विभाग करून वाहूं लागली. तेव्हांपासून ती 'शतद्रु' म्हणजे शंभर मार्गांनें जाणारी, या नांवानें प्रसिद्ध झाली.

वसिष्ठ मुनीनें स्वतःला भूमीवरच असलेलें जेव्हां पाहिलें तेव्हां आपल्याला मरण येणें शक्य नाहीं, असें मानून तो आपल्या आश्रमाकडे परतला व पुनः अनेक पर्वत व विविध देश पहात फिरूं लागला. तो वेड्याप्रमाणें फिरत आहे असें पाहून 'अदृश्यंती'–नांवाची त्याची सून त्याच्या मागोमाग निघाली.

त्यावेळीं वसिष्ठ-मुनीनें आपल्या मागून येत असलेला षडंगयुक्त व अर्थपूर्ण वेदाध्ययनाचा ध्वनि ऐकिला. तेव्हां 'माझ्या मागून हें कोण येत आहे' असा

त्यानें प्रश्न केला. त्यावर 'हे भगवन्, मी अदृश्यंती आहें' असें ती महातपस्वीनी शक्तिमुनीची भार्या बोलली. आपल्या स्नुषेचें तें उत्तर ऐकून वसिष्ठ म्हणाला—"वत्से, हा सांग वेदाध्ययनाचा ध्वनि कोणाचा असावा बरें! पूर्वी माझ्या शक्तीचा अशाप्रकारचा सांग वेदाध्ययनाचा ध्वनि मीं ऐकला होता."

अदृश्यंती म्हणाली—हे महाभागा, शक्तीपासून मीं गर्भ धारण केला आहे, तो आज माझ्या उदरांतच बारा वर्षें वेदांचा अभ्यास करीत आहे.

धनंजया, आपल्या ज्येष्ठ स्नुषेचें हें भाषण ऐकतांच तो श्रेष्ठ वसिष्ठ-ऋषि परम संतुष्ट झाला. 'आपली कुलवृद्धि करणारें संतान आहे' असें बोलून तो आत्मघातापासून निवृत्त झाला. नंतर मृत्यूचा प्रयत्न सोडून शांत झालेला तो महर्षि आपल्या स्नुषेसह चालला असतां त्याला घोर वनांत बसलेला कल्माषपाद दिसला. हे कुंतीपुत्रा, तो राजा या मुनीला पहातांच क्रुद्ध होऊन उठला व राक्षसाचा ज्यामध्यें आवेश झाला आहे, असा तो राजा मुनीला खावयास धांवला.

तेव्हां त्या क्रूर कर्में करणाऱ्या राक्षसाला पुढें पाहून अदृश्यंती भयभीत झाली व सद्गदित वाणीनें बोलली—"हे भगवन्, हातांत दंड घेतलेल्या साक्षात् मृत्यूप्रमाणेंच हा भयंकर राक्षस हातांत काठी घेऊन येत आहे. त्याचें निवारण करण्यास तुझ्यावांचून या लोकीं दुसरा कोणीहि समर्थ नाहीं. हे वेदवेत्त्यांतील श्रेष्ठा, या भयंकर पाप्यापासून माझें रक्षण कर. खरोखर हा राक्षस आम्हांला खाण्याची इच्छा करीत आहे."

तें ऐकून क्षमावान् वसिष्ठ तिला धीर देत म्हणाला—वत्से, भिऊं नको. या राक्षसापासून आपल्याला मुळींच भय नाहीं. कारण तूं ज्याला आपल्या पुढें पहात आहेस, तो खरा राक्षस नसून पृथ्वीवर प्रसिद्ध असलेला वीर्यवान् राजा कल्माषपाद आहे. तो या वनांत अति भीषण राक्षस होऊन राहिला आहे.

हे पांडवा, इतक्यांत तो राक्षस आपल्या अंगावर चाल करून येत आहे असें पाहून त्या तपस्वी वसिष्ठ महर्षीनें नुसत्या हुंकारानेंच त्याचें निवारण केलें आणि मंत्रानें पवित्र केलेल्या जलाचें सिंचन करून आपल्या योगसामर्थ्यानें त्या नृपश्रेष्ठाला शापापासून मुक्त केलें.

पार्था, पर्वकालीं राहु जसा सूर्याला ग्रासतो, त्याप्रमाणें वसिष्ठपुत्र शक्तीच्या तेजानें तो बारा वर्षें ग्रस्त होऊन राहिला होता. पण वसिष्ठाच्या तपःसामर्थ्यामुळें राक्षस त्याच्या शरीरांतून जेव्हां निघून गेला तेव्हां सूर्य संध्याकालीन अभ्राला

जसा रंजित करितो, त्याप्रमाणें त्या कल्माषपादराजानें त्या महद्वनाला आपल्या तेजानें शोभविलें.

तो नृपति देहभानावर आला आणि वसिष्ठ ऋषीला वंदन करून, हात जोडून म्हणाला—हे महाभागा, मी सुदासराजाचा पुत्र कल्माषपाद आहें. तुझा याज्य आहें. यावेळीं मी तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग.

तें ऐकून मुनिश्रेष्ठ वसिष्ठ म्हणाला—हे भूपाला, तुझ्या शरीरांत राक्षसानें प्रवेश केल्यामुळें तूंच माझ्या शंभर पुत्रांना भक्षण केलेंस. पण त्याविषयीं मी तुला दोष देत नाहीं. ज्या कालीं जें भवितव्य होतें तें होऊन गेलें. पण यापुढें मात्र माझ्या आज्ञेप्रमाणें तूं वर्तन कर. आतां तूं अयोध्येस जाऊन आपल्या राज्याचें पूर्वीप्रमाणें शासन कर व हे राजेंद्रा, ब्राह्मणांचा अवमान कधींहि करूं नकोस.

वसिष्ठाची ही आज्ञा शिरसा मान्य करून तो म्हणाला—"हे मुने, मी यापुढें ब्राह्मणश्रेष्ठांचा कधींहि अवमान करणार नाहीं. तुझ्या आज्ञेमध्यें स्थित होऊन मी त्यांची उत्तम पूजाच करीन. हे द्विजश्रेष्ठा, ज्याच्या योगानें मी इक्ष्वाकूंच्या ऋणांतून मुक्त होईन असें इष्ट अपत्य तुझ्यापासून प्राप्त करून घेण्याची माझी इच्छा आहे. यास्तव इक्ष्वाकूंच्या कुलवृद्धीसाठीं शील, रूप व गुण यांनीं युक्त असें एक अपत्य तूं मला दे." तें ऐकून त्या सत्यप्रतिज्ञ भगवान् वसिष्ठानें त्या महा धनुर्धर राजाला 'ठीक आहे' असें म्हटलें.

त्यानंतर योग्यकालीं वसिष्ठ त्या राजासह त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेल्या अयोध्या-नगरीस प्राप्त झाला. आपला राजा आला आहे, हें ऐकून सर्व प्रजेला अतिशय आनंद झाला व देव इंद्राला जसे सामोरे जातात, त्याप्रमाणें वसिष्ठाच्या अनुग्रहानें निष्पाप झालेल्या त्या महात्म्याला सर्व प्रजाजन सामोरे गेले. तेव्हां त्या नरेंद्रानें महर्षि वसिष्ठासह आपल्या पवित्र नगरींत दीर्घ कालानें प्रवेश केला.

अयोध्यानगरींत रहाणाऱ्या लोकांनीं पुरोहितासह आलेल्या त्या भूपालाला उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें पाहिलें. शरत्समयीं उदय पावलेला चंद्र जसा आकाशाला शोभवितो, त्याप्रमाणें त्या कांतिमान् राजानें आपल्या तेजानें अयोध्येला सुशोभित केलें. ज्यांतील सुंदर मार्गावर चंदनोदकाचा सेक केला आहे व ज्याला गुढ्या, तोरणें यांनीं सुशोभित केलें आहे अशा त्या नगरानें राजाच्या

मनाला आह्लाद दिला. शक्राच्या योगानें जशी अमरावती शोभते, तशी त्या राजाच्या सान्निध्यानें तुष्ट व पुष्ट जनांनीं व्याप्त असलेली अयोध्या अतिशय शोभली.

हे कुरुनंदना, त्या राजर्षि कल्माषपादानें आपल्या उत्तम नगरींत प्रवेश केल्यावर त्याच्या आज्ञेनें त्याची महाराज्ञी महात्म्या वसिष्ठाकडे गेली. तेव्हां त्या महर्षीनें चित्ताची एकाग्रता केली व दिव्य विधीनें तो तिच्याशीं संगत झाला. त्या श्रेष्ठ मुनीपासून तिला गर्भ राहिला. त्यानंतर राजानें अभिवादन केलेला तो वसिष्ठमुनि आपल्या आश्रमास परत गेला.

पुढें दीर्घ काल निघून गेला तरी ती राज्ञी प्रसूत होईना, म्हणून त्या यशस्विनीनें आपल्या उदरावर अश्म्याचे म्हणजे दगडाचे प्रहार केले. तेव्हां बारा वर्षांनंतर तो पुत्र जन्मला. तो 'अश्मक'-नांवानें प्रसिद्ध असून त्यानेंच 'पौदन्य'-नांवाचें नगर वसविलें. १. ११. १७७.

---

## अध्याय १७८ वा.

[ १ शक्तिपुत्र पराशराचा जन्म. २ पराशराचें लोकविनाशापासून निवारण करण्यासाठीं वसिष्ठानें सांगितलेला पूर्वेतिहास. ]

( १ ) गंधर्व म्हणाला—वसिष्ठ ऋषि आपल्या आश्रमास परत आल्यावर आश्रमांत असलेली अदृश्यंती, जणुं काय दुसरा वसिष्ठपुत्र शक्तिच, अशा शक्तीच्या पुत्राला प्रसवली. तेव्हां वसिष्ठमुनीनें आपल्या पौत्राच्या जातकर्मादि क्रिया स्वतः केल्या. अर्जुना, जणुंकाय मृत झालेल्या वसिष्ठाला त्या गर्भस्थ पुत्रानें या लोकीं पुनः प्रस्थापित केलें, म्हणून वसिष्ठानें त्या पौत्राचें 'पराशर' असें नांव ठेविलें.

त्या धर्मात्म्या मुनीनें वसिष्ठालाच आपला जनक पिता मानलें व जन्मापासून तो त्याच्याशीं पित्याप्रमाणें वागूं लागला. तो आपल्या माते समक्ष वसिष्ठ ब्रह्मर्षीला 'हे तात' अशी हाक मारीत असे. तेव्हां हे धनंजया, आपल्या अर्भकाचें तें अर्थपूर्ण मधुर वचन ऐकून अदृश्यंतीचे नेत्र अश्रूंनीं भरून येत. एकदा ती आपल्या प्रिय पुत्राला म्हणाली—"वत्सा, तूं आपल्या पितामहाला 'तात, तात,' असें म्हणूं नकोस. कारण हे बाळा, तुझ्या पित्याला राक्षसानें वनांत खाऊन टाकलें आहे. तूं ज्याला पिता समजतोस, तो तुझा पिता नव्हे. तर हा आर्य तुझ्या यशस्वी पित्याचा जनक आहे."

प्रिय मातेनें असें सांगितलें असतां तो सत्यवक्ता पराशर दुःखानें व्याकुळ झाला व त्या निग्रही मुनीनें सर्व लोकांचा विनाश करण्याचा निश्चय केला. तेव्हां ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठ व सिद्धांतामध्येंच ज्याची बुद्धि निष्णात आहे, असा मित्रावरुणपुत्र वसिष्ठ आपल्या पौत्राच्या त्या घोर निश्चयाचें निवारण करून त्यास असें हेतुवचन बोलला.

( २ ) 'हे वत्सा, पूर्वी ' कृतवीर्य'-नांवाचा एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. तो वेदवेत्त्या भृगूंचा याज्य--यजमान होता. त्या भूपतीनें सोमयागाच्या शेवटीं श्रेष्ठ पदार्थांचा उपभोग घेणाऱ्या आपल्या पुरोहितांस विपुल धन व धान्य यांनीं तृप्त केलें. तो राजसिंह स्वर्गलोकीं गेला असतां त्याच्या कुलांतील राजांना कांहीं कारणानें द्रव्याची फार आवश्यकता भासली. तेव्हां या आपल्या भृगुपुरोहिता-पाशीं पुष्कळ धन आहे, असें जाणून ते सर्व कार्तवीर्य राजे याचना करण्याच्या इच्छेनें त्या भार्गवश्रेष्ठांकडे आले. पण कांहीं भृगुकुलोत्पन्नांनीं आपलें अक्षय धन भूमींत पुरून ठेविलें होतें व कित्येकांनीं क्षत्रियांपासून आपल्याला धनासाठीं त्रास भोगावा लागेल, हें अगोदरच जाणून तें ब्राह्मणांना देऊन टाकिलें होतें. कित्येक भार्गवांनीं कांहीं कारणानें क्षत्रियांना इष्ट असलेलें धन त्यांना दिलें.

तेव्हां एका क्षत्रियानें धनाच्या आशेनें यदृच्छेनें भृगूच्या गृहांत खणण्यास आरंभ केला. त्याला त्यानें पुरून ठेविलेलें धन सांपडलें. त्याबरोबर सर्व क्षत्रिय तेथें जमले व त्यांनीं तें विपुल धन पाहिलें. आपल्या गृहांत इतकें धन असून या ब्राह्मणांनीं तें आपल्याला दिलें नाहीं, म्हणून त्यांना क्रोध आला व शरण आलेल्याहि सर्व भृगुकुलोत्पन्न ब्राह्मणांचा अपमान करून त्या धनुर्धरांनीं तीक्ष्ण बाणांनीं त्यांचा निर्दयपणें नाश केला. गर्भाशयांतील अर्भकांपर्यंत सर्व भृगुवंशजांचा उच्छेद करीत ते उन्मत्त क्षत्रिय सर्व पृथ्वीवर संचार करूं लागले.

याप्रमाणें भृगूंचा उच्छेद होऊं लागला असतां भृगुवंशजांच्या स्त्रिया भीतीनें दुर्गम हिमालय पर्वताकडे पळून गेल्या. त्यांतील एका ब्राह्मणीनें ' तूं आपल्या गर्भाचें रक्षण कां केलेंस ! ' असें म्हणून हे दुष्ट क्षत्रिय आपल्यालाहि मारतील या भीतीनें आपल्या गर्भाला एका मांडींत लपवून ठेवलें. आपल्या भर्तृकुलाच्या अभिवृद्धीसाठींच तिनें हें अद्भुत कर्म केलें.

पण भयानें व्याकुळ झालेल्या दुसऱ्या एका ब्राह्मणीनें तिचा मांडींत लपवून ठेवलेला गर्भ पाहून ' तुला हें कपट माहित असतांना तूं आम्हांला कां सांगि-

तर्ळें नाहींस,' असें म्हणून हे दुष्ट राक्षस आपल्यालाहि मारतील या भीतीनें ती क्षत्रियांपाशीं गेली व 'या भृगुस्त्रीनें आपल्या गर्भाला मांडींत लपवून ठेविलें आहे,' असें तिनें त्यांस निवेदन केलें. तेव्हां ते क्षत्रिय त्या गर्भाला मारण्यासाठीं तिच्या अंगावर धावून आले. पण तिच्या समीप येतांच त्यांना ती ब्राह्मणी आपल्या तेजानें देदीप्यमान झालेली दिसली. तो गर्भहि तिच्या मांडीचा भेद करून अकस्मात् बाहेर पडला.

मध्याह्नकालीन सूर्याप्रमाणें आपल्या तेजानें देदीप्यमान असलेल्या त्या गर्भानें त्या क्षत्रियांच्या दृष्टीला दिपवून त्यांना अंध करून सोडिलें. तेव्हां ते त्या पर्वताच्या दऱ्यांतून अडखळत मोठ्या कष्टानें भ्रमण करूं लागले. दृष्टिहीन झालेल्या त्यांचा सर्व दर्प एका क्षणांत उतरला. ते किंकर्तव्यतामूढ झाले व आपल्याला आपली शुभदृष्टि प्राप्त व्हावी म्हणून त्या अनिंद्य ब्राह्मणीला शरण गेले. ते अविवेकी क्षत्रिय त्या महाभागेला म्हणाले—

"हे कल्याणि, ज्यांच्या ज्वाला शांत झाल्या आहेत, अशा अग्नीप्रमाणें दृष्टिहीन झालेले आम्ही दुःखानें अतिशय व्याकुल झालों आहों. हे साध्वि, तुझ्या कृपाप्रसादानें आम्ही दृष्टियुक्त होऊन येथून निघून जाऊं. आम्ही सर्व पापकर्मापासून निवृत्त होऊन स्वस्थानीं जाऊं. असलें घोर कर्म पुनः कधीं करणार नाहीं. हे शोभने, आम्हांला दृष्टीचें दान देऊन तूं आमचें रक्षण कर. पुत्रासह तूं आम्हांवर प्रसन्न हो." १. ११. १७८.

---

## अध्याय १७९ वा.

[ १ और्वाच्या अनुग्रहानें क्षत्रियांना चक्षुःप्राप्ति. २ और्वानें केलेला सर्व लोकांच्या नाशाचा निश्चय. ३ पितरांनीं केलेलें त्याचें निवारण. ]

( १ ) ब्राह्मणी म्हणाली—अरे बाबांनो, मी तुमच्यावर रागावलें नाहीं व तुमची दृष्टिहि हरण केली नाहीं. परंतु हा माझ्या मांडीपासून उत्पन्न झालेला भार्गव आज तुमच्यावर क्रुद्ध झाला आहे. तुम्हीं त्याच्या आप्तांचा वध केला, हें स्मरून त्यानें क्रोधानें तुमच्या नेत्रांचें हरण केलें आहे, यांत संशय नाहीं. तुम्ही जेव्हां गर्भांतील भृगूंचाहि नाश केलात, तेव्हां मीं या गर्भाला माझ्या मांडीमध्यें शंभर वर्षें धारण केलें. हा गर्भांत असतांनाच भृगुकुलाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें षडंगांसह सर्व वेदानें याच्यावर अनुग्रह केला. तो हा माझा

पुत्र पितृवधामुळें क्रुद्ध होऊन तुमचा संहार करण्याची इच्छा करीत आहे. त्याच्या दिव्य तेजानें तुमची दृष्टि गेली, हें उघडच आहे. तरी आतां तुम्ही त्याचीच प्रार्थना करा. म्हणजे तुमच्या प्रणिपातानें संतुष्ट झालेला तो माझा श्रेष्ठ पुत्र और्व तुमची दृष्टि परत देईल.

ब्राह्मणीनें असें सांगितलें असतां ते सर्व क्षत्रिय और्वाला शरण गेले आणि त्याला 'हे महात्म्या प्रसन्न हो' असें म्हणाले. तेव्हां त्यानें संतुष्ट होऊन त्यांची दृष्टि परत दिली व नेत्र प्राप्त झालेले ते सर्व नृप तेथून परत गेले.

( २ ) याप्रमाणें तो विप्रर्षि मातेच्या मांडीचा भेद करून उत्पन्न झाला म्हणून 'और्व' या नांवानें लोकांत प्रसिद्ध झाला. त्या भार्गव-ऋषीनें लोकांचा विनाश करण्यासाठीं सर्व लोकांचा पराभव करण्याचा निश्चय केला. सर्व भृगूंच्या नाशाबद्दल सूड उगविण्याची इच्छा करणाऱ्या त्या भृगुनंदनानें आपलें मन पूर्णपणें तत्पर केलें. सर्व लोकांचा नाश करून आपल्या पूर्वजांना संतुष्ट करण्यासाठीं त्यानें उग्र तप आचरिलें व त्याच्या तेजानें सर्व देव, मनुष्य व असुर यांना अतिशय ताप दिला.

( ३ ) बाळा पराशरा, त्या वेळीं त्याचे पितर हा आपला कुलनंदन आहे, असें जाणून पितृलोकांतून त्याच्या समीप आले व त्याला म्हणाले—"हे वत्सा और्वा, तुझ्या उग्र तपाचा प्रभाव आम्हीं पाहिला. आतां तूं आपला क्रोध आवर व लोकांवर प्रसन्न हो. अरे बाबा, क्षत्रियांनीं जेव्हां सर्व भृगुकुलाचा वध चालविला तेव्हां आम्हीं भार्गवांनीं त्यांची जी उपेक्षा केली, ती त्यांचा प्रतिकार करण्यास असमर्थ होतों, म्हणून नव्हे; तर आम्हांला दीर्घ आयुष्याचा अतिशय कंटाळा आला होता, म्हणून क्षत्रियांना निमित्तमात्र करून आम्हीं इष्ट असलेलें मरण ओढवून घेतलें. कोणा एका भार्गवानें आपल्या घरांत जें धन पुरून ठेविलें होतें, तेंहि क्षत्रियांना क्रोध आणून वैर उत्पन्न करण्यासाठींच होय. नाहीं तर हे वत्सा, आम्हां स्वर्गाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांना द्रव्य घेऊन काय करावयाचें होतें! शिवाय कुबेरानें आम्हांला अगोदरच विपुल धन देऊन ठेविलें होतें. परंतु मृत्यु जेव्हां आम्हांला नेण्यास समर्थ होईना, तेव्हां आम्हीं इष्ट असलेला मरणाचा उपाय योजिला. आत्मघात करणाऱ्या पुरुषाला शुभलोक प्राप्त होत नाहींत, असा विचार करून आम्हीं आत्महत्या केली नाहीं.

यास्तव हे बाळा, तूं जें कार्य करण्याचें मनांत आणिलें आहेस, तें आम्हांला मुळींच प्रिय नाहीं. यास्तव सर्व लोकांचा पराभव करणाऱ्या या पापापासून तूं

आपलें मन निवृत्त कर आणि क्षत्रियांचा व सप्त लोकांचाहि नाश करूं नकोस, तर तुझ्या संपादित तपस्तेजाला दूषित करणाऱ्या क्रोधाचा त्याग कर." १. ११. १७९.

---

## अध्याय १८० वा.

[ १ और्वाचें पितरांस उत्तर. २ पितरांच्या आज्ञेनें और्वानें समुद्रजलांत केलेला क्रोधाग्नीचा त्याग. ]

( १ ) **वसिष्ठ** म्हणाला—वत्सा पराशरा, पितरांचें हें भाषण ऐकून और्व म्हणाला—" हे पूज्य पितरहो, मीं क्रोधानें सर्व लोकांचा नाश करण्याची जी प्रतिज्ञा केली आहे, ती कदापि मिथ्या होणार नाहीं. रोषानें केलेली प्रतिज्ञा व्यर्थ झाल्यास मी जिवंत रहाणें शक्य नाहीं. कारण माझा क्रोध निष्फल झाल्यास, अग्नि जसा अरणीला दग्ध करितो, तसा तो माझ्या देहाचाच दाह करील. जो मनुष्य कांहीं कारणानें आलेला क्रोध सहन करतो, तो धर्म, अर्थ व काम या त्रिवर्गांचें चांगल्या प्रकारें पालन करण्यास समर्थ होत नाहीं. दुर्जनांचें नियमन व सज्जनांचें रक्षण करणाऱ्या क्रोधाचा उपयोग योग्य प्रसंगीं केलाच पाहिजे. सर्वांना जिंकण्याची इच्छा करणाऱ्या त्या क्षत्रियाधमांनीं भृगूंचा निर्दयपणें वध केला. त्यामुळें भार्गवांच्या मातांनीं केलेला आक्रोश त्या वेळीं जननीच्या ऊरूमध्यें गर्भस्थ असलेल्या मीं ऐकला आहे.

त्या दुष्ट नृपांनीं भृगूंच्या गर्भापर्यंत जेव्हां त्यांचा संहार आरंभिला तेव्हांच माझ्या अंतःकरणांत क्रोध उत्पन्न झाला. ' तर मग तूं क्षत्रियांचाच वध करावास, हें उचित आहे; सर्व लोकांचा नाश करण्यास कां प्रवृत्त होतोस ! ' म्हणून म्हणाल तर त्याचेंहि कारण सांगतों, ऐका—हे पितरांनों, ज्यांचे गर्भ परिपूर्ण झाले आहेत, अशा माझ्या माता त्या क्षत्रियांना भिऊन सर्व लोकांमध्यें अभयाची याचना करीत फिरल्या, पण त्यांचें रक्षण करणारा एकहि वीर पुरुष त्यांना आढळला नाहीं. सामर्थ्य असूनहि लोकांनीं माझ्या मातांचें रक्षण केलें नाहीं, यास्तव तेहि मला वध्यच आहेत.

---

१ यो हि कारणतः क्रोधं संजातं क्षन्तुमर्हति । नालं स मनुजः सम्यक् त्रिवर्गं परिरक्षितुम् ॥ २ अशिष्टानां नियंता हि शिष्टानां परिरक्षिता । स्थाने रोषः प्रयुक्तः स्यात् ॥

हे पितरांनो, काय सांगूं! त्या भृगूच्या भार्यांना जेव्हां कोणीहि त्राता भेटला नाहीं, तेव्हां माझ्या या शुभ मातेनें मला आपल्या एका मांडींत धारण केलें. या लोकीं जेव्हां पापाचा प्रतिकार करणारा एखादा समर्थ पुरुष असतो, तेव्हां सर्व लोकांमध्यें एखादाहि पापकर्ता निपजत नाहीं. पण पाप्याला प्रतिबंध करणारा जेव्हां कोणीहि कोठेंच नसतो, तेव्हां पापकर्मामध्यें अनेक लोक प्रवृत्त होतात.

जो शक्तिमान् पापकर्त्याला जाणत असूनहि त्याचें नियमन करीत नाहीं, तो समर्थ पुरुष त्याच पापकर्मानें लिप्त होतो. समर्थ असलेल्या क्षत्रियांनीं व राजांनीं या लोकांतील आपलें जीवितच इष्ट मानून माझ्या पितरांचें रक्षण केलें नाहीं; त्यामुळें मीं या सर्व लोकांवर क्रुद्ध झालों आहें व मी त्यांचा नाश करण्यास समर्थ आहें. पण तुमच्या वचनाचें उल्लंघन करण्यासहि मी समर्थ नाहीं. मी समर्थ असूनहि जर या लोकांची उपेक्षा करीन, तर त्यांचें शासन न करणें याच पापापासून मला महद्भय उत्पन्न होईल. माझ्या क्रोधापासून उत्पन्न झालेला जो हा अग्नि सर्व लोकांचा नाश करण्याची इच्छा करीत आहे, त्याचाच जर मीं निग्रह केला तर तो आपल्या तेजानें मलाच जाळील. तुम्हांला सव लोकांचें हित करण्याची इच्छा आहे, हेंहि मी जाणतों. यास्तव हे समर्थ पितरांनों, माझें व या लोकांचेंहि ज्यामुळें हित होईल असें करा."

( २ ) पितर म्हणाले—वत्सा, तुझें कल्याण असो; तुझ्या क्रोधापासून उत्पन्न झालेला हा अग्नि लोकांना भक्षण करूं इच्छीत आहे, यास्तव तूं त्याला जलांत सोडून दे. कारण सर्व लोक जलामध्यें प्रतिष्ठित आहेत. सर्व रस आपोमय आहेत. फार काय, पण हें सर्व जगत् आपोमय आहे. यास्तव हे द्विजश्रेष्ठा, तूं आपल्या या क्रोधाग्नीला जलांत सोडून दे. तुझी जर इच्छा असेल, तर हा तुझा क्रोधजन्य अग्नि महासागरांतील जलाला दग्ध करीत राहूं दे. कारण हे सर्व लोक आपोमय आहेत. यास्तव कारणभूत जल दग्ध झालें असतां कार्यभूत लोकहि प्रायः दग्ध झाल्यासारखेच आहेत. हे निष्पाप और्वा, असें केल्यानें तुझी प्रतिज्ञाहि सत्य होईल व देवांसह या लोकांचाहि पराभव होणार नाहीं.

---

१ प्रतिषेद्धा हि पापस्य यदा लोकेषु विद्यते। तदा सर्वेषु लोकेषु पापकृन्नोपपद्यते ॥ २ यदा तु प्रतिषेद्धारं पापो न लभते क्वचित्। तिष्ठन्ति बहवो लोकास्तदा पापेषु कर्मसु ॥ ३ जानन्नपि च यः पापं शक्तिमान्न नियच्छति। ईशः सन्सोऽपि तेनैव कर्मणा संप्रयुज्यते ॥

वसिष्ठ म्हणाला—पराशरा, पितरांची ही हितबुद्धि ऐकून और्वानें आपल्या क्रोधजन्य अग्नीचा महासागरांत त्याग केला व तो अग्निहि त्या सागरांतील जलाला दग्ध करूं लागला. तो फार मोठें वडवामुख होऊन त्यांतून अग्नीच्या ज्वाला बाहेर सोडीत त्या महासागराचें जल प्राशन करूं लागला. वेदवेत्त्यांना वडवाग्नीचा हा वृत्तान्त अवगत आहे. बा पराशरा, तूं महाज्ञानी आहेस. तुला सर्व लोकस्थिति अवगत आहे. या सर्व लोकांचा नाश करणें तुला योग्य नाहीं. बाळा, तुझें कल्याण होवो. तूंहि और्वाप्रमाणेंच आपल्या क्रोधाचा त्याग कर. १. ११. १८०.

---

## अध्याय १८१ वा.

[ १ पराशराचें राक्षससत्र व पुलस्त्यमुनीनें केलेलें त्याचें निवारण. ]

( १ ) गंधर्व म्हणाला—हे कुंतीपुत्रा, महात्म्या वसिष्ठानें असें सांगितलें असतां त्या विप्रश्रेष्ठ पराशरानें आपल्या क्रोधाचें नियमन केलें व तो सर्व लोकांच्या पराभवापासून निवृत्त झाला. पण त्या वेदवेत्त्या पराशरानें राक्षस-सत्र आरंभिलें व त्यांत त्या शक्तिपुत्रानें आबालवृद्ध सर्व राक्षसांचें हवन केलें. आपला पिता जो शक्ति त्याला राक्षसानें भक्षण केलें, याचें स्मरण करून त्यानें सर्व राक्षसांना जाळून टाकलें. या आपल्या पौत्राची ही दुसरी प्रतिज्ञाहि मिथ्या होऊं नये म्हणून वसिष्ठानें राक्षसांच्या वधापासून त्याला निवृत्त केलें नाहीं. त्या सत्रांतील तीन अग्नींच्या पुढें तो महामुनि पराशर चवथ्या अग्नीप्रमाणेंच शोभला.

शरदृतूंत सूर्य जसा आकाशाला प्रकाशित करितो, त्याप्रमाणें त्या शक्तिपुत्रानें पाप्यांच्या निग्रहामुळें निर्मल यज्ञीय द्रव्यांनीं हवन केल्या जाणाऱ्या अग्नीच्या योगानें सर्व अंतरिक्षाला प्रकाशित केलें. त्यामुळें वसिष्ठादि सर्व मुनि तेजानें दीप्त झालेल्या पराशराला ‘ हा दुसरा सूर्यच आहे ’ असें समजले. त्यानंतर पराशरमुनि दुसऱ्या कोणालाहि सर्वथा दुष्प्राप्य असलेलें तें सत्र शेवटास नेण्याची इच्छा करूं लागला असतां त्याच्या समीप अत्रि-ऋषि आला. त्याचप्रमाणें पुलस्त्य, पुलह, क्रतु, व महाक्रतु हे ऋषिहि राक्षसांच्या जीविताचें रक्षण कर-ण्याच्या हेतूनें तेथें आले.

त्यांतील राक्षसांचा पूर्वज पुलस्त्यमुनि सर्व राक्षसांचा वध होत असल्यामुळें पराशराला म्हणाला—“हे वत्सा, तुझें हें सत्र निर्विघ्नपणें चाललें आहेना ! अज्ञ

व निर्दोष अशा सर्व राक्षसांचा वध करूनहि तुला सुख वाटत आहेना! हें पाप करूनहि तुझ्या मनाला उद्वेग होत नाहींना! पण वत्सा, माझ्या प्रजेचा असा उच्छेद करणें तुला उचित नाहीं. अरे बाबा, तपस्वी ब्राह्मणांचा हा धर्म नव्हे. शम हाच ब्राह्मणांचा श्रेष्ठ धर्म आहे. यास्तव बा पराशरा, तूं शमाचेंच आचरण कर. तूं इतका वरिष्ठ असतांना असा अधर्मिष्ठ कसा होतोस! धर्मज्ञ शक्तिमुनीचें अतिक्रमण करणें तुला उचित नाहीं.

हे द्विजा, शक्तीच्या शापामुळें मनुष्यभक्षक बनलेल्या राजानें शक्तीलाच भक्षण केलें, त्यांत राक्षसांचा काय अपराध! वस्तुतः कल्माषपादराजाला शाप देणें हा शक्तीचाच दोष आहे. त्या दोषामुळें राजाच्या शरीरांत शिरलेल्या राक्षसानें त्यालाच भक्षण केलें. कारण त्यानें जर शाप दिला नसता, तर कोणताहि राक्षस त्याला भक्षण करण्यास समर्थ झाला नसता.

तुझ्या पित्यानें स्वतःच आपल्यावर मृत्यु ओढवून घेतला. विश्वामित्र व राजा कल्माषपाद हे केवल निमित्तमात्र झाले. पण तुझा पिता शक्ति व त्याचे सर्व भ्राते स्वर्गामध्यें आनंदांत आहेत. ते सर्व देवांबरोबर विविध विलास करीत असतात. वसिष्ठाला हें सर्व विदित आहे. पराशरा, तूंहि या क्रतूच्या द्वारा बिचाऱ्या राक्षसांच्या नाशाचें केवल निमित्त झाला आहेस. यास्तव आतां तूं आपलें हें सत्र सत्वर समाप्त कर. वत्सा, तुझें कल्याण होवो."

हे पार्था, पुलस्त्य-मुनीनें पराशराला असा हितोपदेश केला व बुद्धिमान् वसिष्ठानेंहि त्याला अनुमोदन दिलें. तेव्हां त्या शक्तिपुत्रानें आपलें सत्र समाप्त केलें व राक्षसांच्या नाशासाठीं संपादन केलेल्या अग्नीचा हिमालय पर्वताच्या उत्तर भागांतील महावनांत उत्सर्ग केला. तो अग्नि सर्वदा प्रत्येक प्रतिपदेच्या आरंभीं तेथील राक्षस, वृक्ष व पाषाण यांना दग्ध करीत असलेला अद्यापि दिसतो. १. ११. १८१.

---

## अध्याय १८२ वा.

[ १ वसिष्ठापासून कल्माषपादाच्या पुत्रोत्पत्तीचें कारण. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें गंधर्वानें सांगितलेलें तें वृत्त ऐकून धर्मवेत्त्या अर्जुनानें त्याला असा प्रश्न केला—"हे मित्रा गंधर्वा, राजा कल्माषपादानें कोणतें कारण पुढें करून आपली पत्नी ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठ गुरु-

कडे पाठविली आणि त्या महात्म्या वसिष्ठानें परम धर्म जाणत असूनहि हें अधर्म-युक्त अगम्यागमन कसें केलें ! त्या महर्षीनें पूर्वी असलें पापकृत्य केलें असेल का, असा मला मोठा संशय येतो. यास्तव त्याचें निरसन करण्यास तूंच समर्थ आहेस."

गंधर्व—हे दुर्जय धनंजया, तूं मला जो वृतान्त विचारीत आहेस, तो मी तुला यथार्थ सांगतों, ऐक. वसिष्ठपुत्रानें त्या राजाला शाप दिल्याचें वृत्त मीं तुला सांगितलेंच आहे. तो शापवश झालेला राजा कल्माषपाद क्रोधानें नेत्र लाल करून राज्ञीसह आपल्या अयोध्या नगरींतून निघाला व अनेक मृगांच्या कळ-पांनीं व इतर क्रूर प्राण्यांनीं व्याप्त असलेल्या निर्जन अरण्यांत जाऊन पत्नीसह भटकूं लागला. याप्रमाणें वनांत भटकत असतां तो क्षुधेनें अतिशय व्याकुल झाला व भक्ष्य शोधूं लागला. तेव्हां मोठ्या प्रयासानेंहि भक्ष्य न मिळाल्यामुळें श्रांत व क्षुब्ध झालेल्या त्याला एकांत प्रदेशामध्यें विषयसुखांत प्रवृत्त झालेलें एक ब्राह्मणदांपत्य दिसलें. त्यांनींहि या राजाला पाहिलें व तीं दोघें तृप्त न होतांच भीतीनें पळूं लागलीं.

तें पाहून त्या राजानें त्यांचा पाठलाग केला व पळणाऱ्या ब्राह्मणाला बला-त्कारानें धरिलें. तेव्हां आपल्या भर्त्याला धरलेलें पाहून ती ब्राह्मणी म्हणाली—"हे राजा, माझें वचन ऐक. तूं सूर्यकुलोत्पन्न कल्माषपाद राजा या लोकांत सुप्रसिद्ध आहेस. तूं सावधान चित्तानें धर्मांत स्थित व गुरुसेवेंत तत्पर होतास. यास्तव आतां जरी तूं शापानें विवेकहीन झाला आहेस, तरी असलें पातक करणें तुला उचित नाहीं. मी ऋतुकाल प्राप्त झाला असतां संततीसाठीं भर्त्याशीं समागम करीत होतें. परंतु कृतार्थ होण्यापूर्वी भर्त्यावर ओढवलेल्या या संकटानें मला अत्यंत क्लेश होत आहेत. यास्तव हे नृपतिश्रेष्ठा, प्रसन्न हो आणि माझ्या पतीला सोडून दे."

हे धनंजया, याप्रमाणें ती ब्राह्मणस्त्री दुःखार्त होऊन त्याला विनवीत अस-तांहि, त्या निर्दय कल्माषपाद-राजानें, व्याघ्र जसा मृगाला मारून खातो, तसें त्या ब्राह्मणाला भक्षण केलें. त्या वेळीं क्रोधानें संतप्त झालेल्या तिच्या नेत्रांतून जे दुःखाश्रु भूमीवर पडले तोच प्रज्वलित अग्नि झाला व त्याच्या योगानें तो प्रदेश प्रदीप्त झाला. पतिघातानें विव्हल व शोकसंतप्त झालेल्या त्या ब्राह्मणीनें कल्माषपाद-राजाला क्रोधानें शाप दिला.

ती म्हणाली—हे क्षुद्रबुद्धे राजा, ज्याअर्थी मी अकृतार्थ असतांना माझ्या समक्ष तूं माझ्या प्रिय व महायशस्वी पतीला निर्दयपणानें भक्षण करीत आहेस, त्या अर्थी हे दुर्बुद्धे, तुलाहि माझ्या शापप्रभावानें भार्येच्या समागमकालीं मरण येईल व तूं ज्या वसिष्ठमहर्षींच्या पुत्रांचा वध केलास, त्याच मुनिश्रेष्ठ वसिष्ठापासून तुझ्या राज्ञीला संतति होईल आणि हे अधमा, तोच पुत्र तुझा वंश चालवील.

याप्रमाणें त्या राजाला शाप देऊन त्या अंगिरसकुलोत्पन्न साध्वीनें राजाच्या समक्ष तेथेंच प्रदीप्त झालेल्या अग्नींत प्रवेश केला. हे परंतप अर्जुना, भगवान् वसिष्ठानें आपल्या तपःसामर्थ्यानें व ज्ञानयोगानें हा सर्व प्रकार जाणला.

पुढें दीर्घ कालानंतर तो कल्माषपाद राजा शापमुक्त झाला व राज्ञी मदयंतीच्या ऋतुकालीं तो तिच्यापाशीं आला. पण तिनें त्याचें निवारण केलें. कामानें मोहित झालेल्या त्या राजाला ब्राह्मणीच्या शापाची आठवण नव्हती. पण त्याच्या राज्ञीनें त्याला आठवण दिली. राणीचें वचन ऐकून कल्माषपाद भ्याला व त्या शापाचें स्मरण करून अतिशय पश्चात्ताप पावला.

पार्था, या कारणास्तव राजानें वसिष्ठाला स्वस्त्रीच्या ठिकाणीं नियुक्त केलें. शापदोषानें युक्त झाल्यामुळें संततीसाठीं त्याला असें करावें लागलें. १.११.१८२.

---

## अध्याय १८३ वा.

[ १ पांडवांनीं धौम्यऋषीला आपला पुरोहित केलें. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, गंधर्वाच्या मुखानें हा वृत्तान्त श्रवण केल्यावर प्रतापवान् अर्जुनानें त्याला म्हटलें—" हे गंधर्वपते, तुला सर्व धर्मज्ञ ब्राह्मणांची माहिती आहे. यास्तव, आम्हांला अनुरूप असा एखादा वेदवेत्ता पुरोहित सांग. "

**गंधर्व** म्हणाला—हे धर्मनिष्ठ धनंजया, उत्कोचक तीर्थामध्यें देवल-ऋषीचा कनिष्ठ भ्राता धौम्यमुनि तपश्चर्या करीत आहे. तुमची इच्छा असल्यास तुम्ही त्याला पुरोहित करा. त्या गंधर्वश्रेष्ठाचें हें भाषण ऐकून अस्त्रवेत्त्या अर्जुनानें त्याला आग्नेय अस्त्र विधिपूर्वक अर्पण केलें व प्रेमानें म्हटलें—" हे गंधर्वराजा, तूं दिलेले अश्व सध्यां तुझ्यापाशींच राहूं देत. योग्य काल प्राप्त होतांच मी त्यांचें ग्रहण करीन. हे श्रेष्ठा, तुझें कल्याण असो."

त्यानंतर त्या गंधर्वानें व पांडवांनीं परस्परांचा सत्कार केला व ते त्या रम्य भागीरथीतीरावरून आपापल्या इष्ट प्रदेशीं निघून गेले. हे भारता, पांडव तेथून उत्कोचक तीर्थावरील धौम्यमुनीच्या आश्रमास गेले व त्यांनीं त्याला आपला पुरोहित होण्याविषयीं विनंति केली. तेव्हां त्या वेदवेत्त्यांतील श्रेष्ठ धौम्य महर्षीनें वनांतील फल-मूलांनीं पांडवांचें आतिथ्य केलें व त्यांचें पौरोहित्य स्वीकारिलें. त्यावेळीं पांडवांना आज आपल्याला राज्यलक्ष्मीच प्राप्त झाली आहे, असें वाटलें व ते त्या धौम्य-ऋषीला पुढें करून पांचालीच्या स्वयंवरास जावयास निघाले.

ते भरतर्षभ पांडुपुत्र त्या समर्थ पुरोहितानें युक्त होतांच स्वतःला सनाथ मानूं लागले. कारण तो त्यांचा गुरु वेदार्थतत्त्वज्ञ व मोठा बुद्धिमान् होता. तो श्रीमान् द्विजश्रेष्ठ धौम्यऋषि आपल्या तेजानें, बुद्धीनें, रूपानें, यशानें, श्रीनें, व विविध मंत्रांनीं देवगुरु बृहस्पतितुल्य होता. त्या धर्मज्ञ धौम्यानें आपले याज्य जे पृथापुत्र त्यांना धर्मज्ञ केलें व ते वीर स्वधर्मानें राज्याला प्राप्त झालेच आहेत, असें तो समजूं लागला. बुद्धि, वीर्य, बल व उत्साह यांनीं युक्त असलेल्या पांडवांना त्यानें दुसरे देवच मानिलें. धौम्य मुनीनें स्वस्त्ययन केल्यावर ते नरश्रेष्ठ कुंतीपुत्र पांचालीच्या स्वयंवरास जावयास निघाले. १. ११. १८३.

येथें अकरावें चैत्ररथपर्व समाप्त झालें.

---

# स्वयंवरपर्व १२.



## अध्याय १८४ वा.

[ १ पांडवांचा ब्राह्मणाशीं संवाद. ]

( १ ) वैशंपायन—हे कुरुश्रेष्ठा पारिक्षिता, त्यानंतर ते महापराक्रमी पांच भ्राते पांचाल देश, तेथील तो महोत्सव व विशेषतः अयोनिजा द्रौपदी, यांस पहाण्याच्या इच्छेनें तेथून निघून आपल्या मातेसह चालले असतां मार्गांत त्यांना पुष्कळ ब्राह्मणांचा समूह भेटला. त्या ब्राह्मणांनीं त्या ब्रह्मचारी पांडुपुत्रांना विचारिलें—"हे महात्म्यांनो, तुम्ही कोठून आलां व कोठें चाललां ?"

तेव्हां युधिष्ठिर म्हणाला—हे द्विजश्रेष्ठहो, आम्ही पांच भ्राते आमच्या या मातेसह एकचक्रा-नगरींतून आलों.

हें ऐकून ब्राह्मण म्हणाले—हे तापसहो, तुम्ही आमच्याबरोबर पांचाल-देशास चला. तेथें द्रुपदराजाच्या मंदिरांत स्वयंवर होणार असून विपुल द्रव्याचा

ण्यय होणार आहे. आम्ही सर्व तेथेंच जात आहों. त्या नगरींत 'न भूतो न भविष्यति' असा फार मोठा उत्सव होणार आहे. महात्म्या द्रुपदराजाची कन्या याज्ञसेनी यज्ञाच्या वेदींतून उत्पन्न झाली. तिचे नेत्र कमलपत्रासारखे असून ती सर्वांग सुंदरी मोठी मानी, सुकुमार व दर्शनीय आहे. द्रोणाचा शत्रु जो धृष्टद्युम्न, त्याची ही भगिनी आहे. धृष्टद्युम्नहि सहज कवच, खड्ग, बाण व धनुष्य यांसह प्रदीप्त अग्नीपासून उत्पन्न झाला. तो पराक्रमी धृष्टद्युम्न अग्नी-सारखा तेजस्वी आहे.

द्रौपदी ही त्याची अयोनिसंभव भगिनी असून तिच्या अंगाचा नील कमलासारखा सुगंध कोसभर पसरत असतो. ती यज्ञसेनाची कन्या स्वयंवरासाठीं उत्सुक झाली आहे. आम्ही तो दिव्य महोत्सव पहावयास चाललों आहों. तेथें ज्यांनीं विपुल दक्षिणा देऊन याग केले आहेत, असे वेदाध्ययन करणारे, पवित्र, महात्मे, नियतव्रत, तरुण व दर्शनीय राजे व राजपुत्र नाना देशांतून आले आहेत आणि अनेक महारथ व अस्त्रविद्येंत कुशल असलेले अनेक भूपाल येणार आहेत. ते नरेश्वर तेथें आपल्या विजयासाठीं नाना प्रकारचें देय धन, गायी, भक्ष्य व भोज्य पदार्थ सर्वांना देतील. आपण त्या सर्वांचा परिग्रह करून, स्वयंवर पाहून व महोत्सव अनुभवून आपआपल्या इष्ट स्थानीं जाऊं.

त्या मिथिला नगरींत अनेक नट, नर्तक, मंगलपाठक, पौराणिक, वंशसूचक, स्तुति पाठ करणारे व महा बलाढ्य मल्लहि निरनिराळ्या देशांतून येतील. हे महात्म्यांनो, तुम्हीहि आम्हांबरोबर तेथें चला आणि कांहीं दिवस आपल्या मनाचें रंजन करून व जें कांहीं धन मिळेल तें घेऊन पुनः स्वस्थानीं परत जा. तुम्हीहि सर्व मोठे दर्शनीय अहां. देवांच्या स्वरूपाप्रमाणें ज्यांचें स्वरूप आहे, अशा तुम्हांस पाहून दैवयोगानें तुम्हांपैकीं एखाद्याला ती कृष्णा कदाचित् वरीलहि! विशेषतः हा तुझा मध्यम भ्राता मोठा तेजस्वी, सुंदर व पराक्रमी दिसत आहे. कदाचित्, दैववशात् हा विजयामध्यें नियुक्त होऊन पुष्कळ धन संपादन करील व तुमचा संतोष वाढवील, असेंहि आम्हांला वाटतें.

ब्राह्मणांचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला—विप्रांनो, आम्हीहि तो महोत्सव पहाण्यासाठींच एकचक्रानगरींतून निघालों आहों. मार्गांत तुमचें दर्शन झालें, हा शुभ शकुनच आहे. यास्तव आम्ही तुम्हांबरोबरच पुढें येतों. १, १२, १८४.

---

## अध्याय १८५ वा.

[ १ पांडवांचें द्रुपदपुरींत गमन व वास. २ स्वयंवराची तयारी व त्यासाठीं ब्राह्मण-क्षत्रियादिकांचें आगमन. ३ स्वयंवरमंडपाचें वर्णन. ४ धृष्टद्युम्नाची प्रतिज्ञा. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, ब्राह्मणांशीं असा संवाद झाल्यावर पांडव त्यांच्याबरोबरच राजा द्रुपदानें रक्षण केलेल्या दक्षिण पांचाल देशाकडे जावयास निघाले. त्यावेळीं त्या ब्राह्मणसमूहांतच वीर पांडवांना निष्पाप व शुद्धात्म्या भगवान् कृष्णद्वैपायनाचें दर्शन झालें.

तेव्हां त्यांनीं त्याचा यथाविधि सत्कार केला व त्या महात्म्यानेंहि त्यांना योग्य आशीर्वाद दिले. कांहीं संभाषण झाल्यावर व्यासांच्या अनुज्ञेनें ते महारथ, रमणीय वनें आणि सरोवरें पहात व जागजागीं विश्रांति घेत हळुहळू द्रुपदाच्या राजधानीस येऊन पोंचले. ते अध्ययन करणारे, पवित्र, सुस्वरूप व प्रिय भाषण करणारे पांची पांडव राजनगरींत गेले व त्यांनीं राजाचें तें भव्य नगर आणि लोकसमूहस्थान प्रत्यक्ष पाहिलें; नंतर ते स्वतः एका कुंभाराच्या गृहांत जाऊन राहिले. तेथें ब्राह्मणांच्या वृत्तीचा आश्रय करून ते भिक्षेवर आपला निर्वाह करूं लागले. त्यामुळें त्या वीरांना कोणीहि ओळखूं शकलें नाहीं.

( २ ) हे भरतर्षभा, पांडुपुत्र पार्थालाच आपली कन्या कृष्णा द्यावी अशी त्या यज्ञसेन राजाची मनीषा होती. परंतु त्यानें ती प्रगट केली नाहीं. तथापि अर्जुनाचा शोध लावण्यासाठीं द्रुपदानें दुसऱ्या कोणासहि वांकविण्यास अशक्य असें एक दृढ धनुष्य तयार करविलें. अंतरिक्षांत अतिशयवेगानें फिरणारें एक कृत्रिम यंत्र बनविलें. त्या फिरणाऱ्या यंत्राच्या पलीकडे लक्ष्याची योजना केली. त्या फिरत्या यंत्रांतून लक्ष्यवेध करावयाचा असून त्याचें छिद्र सूक्ष्म होतें.

त्यानंतर नृपश्रेष्ठ द्रुपदानें "या येथें ठेविलेल्या बाणांनीं हें धनुष्य सज्ज करून जो या लक्ष्याचा वेध करील, त्यालाच माझी कन्या प्राप्त होईल." असा संकेत केला व त्याप्रमाणें पृथ्वीवर सर्वत्र स्वयंवराचा घोष करविला. तो ऐकून सर्व राजे तेथें जमले. हे भारता, त्या वेळीं स्वयंवर पहाण्याची इच्छा करणारे महात्मे ऋषि, कर्णासह दुर्योधनप्रभृति कौरव आणि महाभाग ब्राह्मण विविध देशांतून तेथें आले. तेव्हां धर्मनिष्ठ द्रुपदानें त्या सर्व नृपतींचा यथाविधि सत्कार करून स्वयंवर पहावयास आलेल्या त्यांना त्यांच्यासाठीं सिद्ध केलेल्या उच्च सिंहासनांवर बसविलें. त्या वेळीं सर्व नागरिकांनीं समुद्राच्या भयंकर ध्वनीसारखा मोठ्यानें जयघोष केला.

( ३ ) राजा, तो स्वयंवरमंडप नगराच्या समीप ईशान्य दिशेस सम व पवित्र भूमीवर उभारला होता. त्याच्या सभोंवर भव्य प्रासाद बांधले होते, त्यांच्या सभोंवतीं उंच तट असून त्याच्या पलीकडे खंदक खणलेला होता. त्या स्वयंवरमंडपाचीं द्वारें सुंदर तोरणांनीं अलंकृत केलीं होतीं व चित्र-विचित्र छतानें तो सुशोभित केला होता. अनेक मंगल वाद्यांचे ध्वनि व अगरु धूप इत्यादिकांचा सुगंध अनेक योजनें लांब पसरला होता. तेथील भूमीवर चंदनरसाचा सडा घातला होता व पुष्पांच्या मालांनीं तो मंडप विभूषित केला होता. प्रासादांचीं, कैलास शिखरांप्रमाणें, शुभ्र व उंच शिखरें जणुंकाय आकाशालाच जाऊन भिडलीं होतीं. त्यांच्या खिडक्या सुवर्णाच्या असून तेथील भूमि रत्नजडित होती.

त्या प्रासादांतील जिने चढण्यास सुलभ होते. त्यांत सर्व उपकरणांसह मोठमोठीं आसनें मांडलीं होतीं. त्यांचीं अंतर्गृहें पुष्पमालांनीं अलंकृत व उत्तम अगरु-धूपानें सुवासित केलीं होतीं. प्रासादांचा वर्ण हंसासारखा शुभ्र असून त्यांतील सुवास दूरवर पसरला होता. त्यांना अनेक विस्तीर्ण द्वारें होतीं. ते शय्या व आसनें यांनीं सुशोभित केले होते. हिमालयाच्या शिखरांप्रमाणें त्यांच्या भिंती अनेक रंगांनीं चित्रविचित्र केल्या होत्या.

अशाप्रकारें अलंकृत केलेल्या त्या सात मजली राजगृहांमध्यें एकमेकांशीं स्पर्धा करणारे ते सर्व नृप आपापल्या इच्छेप्रमाणें बसले. तेथें बसलेल्या त्या महा-पराक्रमी राजांना पांचालांनीं पाहिलें. ते महाभाग राजसिंह कृष्णागरूनें विभूषित झाले होते. ते सर्व मोठे उदार, ब्राह्मणभक्त व आपापल्या राष्ट्रांचें उत्तमप्रकारें रक्षण करणारे असून आपल्या शुभकर्मांनीं सर्व लोकांना प्रिय झाले होते. ते कृष्णेच्या दर्शनासाठीं त्या मंडपांत सभोंवार उंच मंचकावर बसले. पांडवहि ब्राह्मणांसह पांचालराजाचें अनुपम ऐश्वर्य पहात त्या स्वयंवरमंडपांत येऊन बसले.

हे राजा, याप्रमाणें तो समाज उत्तरोत्तर वाढतच गेला. तेथें रत्नांचें दान मोठ्या प्रमाणांत होऊं लागलें. नट-नर्तकांनीं सुशोभित झालेला तो जनसमूह अतिशय दर्शनीय होता. याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर सोळाव्या दिवशीं जिनें मंगल स्नान करून सुंदर वस्त्र परिधान केलें आहे व जी सर्व भूषणांनीं भूषित झाली आहे, अशी द्रौपदी हातांत सुवर्णमाला घेऊन त्या स्थानीं आली. तेव्हां सोमकांच्या मंत्रवेत्त्या शुचिर्भूत ब्राह्मण पुरोहितानें अग्नीच्या सभोंवतीं

दर्भांचीं परिस्तरणें घालून त्यांत घृतानें यथाविधि हवन केलें आणि अग्नीला तृप्त करून व ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून सभोंवार वाजत असलेलीं सर्व मंगलवाद्यें थांबविलीं.

( ४ ) हे राजन्, याप्रमाणें तें स्थान निःशब्द झालें असतां, ज्याचा आवाज मेघ किंवा दुंदुभि यांसारखा गंभीर आहे, असा धृष्टद्युम्न त्या रंगभूमींत, जेथें तें धनुष्य व बाण ठेविले होते, त्या स्थानीं कृष्णेला घेऊन आला व आपल्या गंभीर वाणीनें असें मधुर व अर्थपूर्ण उत्तम वचन बोलला—

"अहो येथें प्राप्त झालेले सर्व क्षत्रियवीरहो, या स्थानीं हें धनुष्य व हे बाण ठेविले आहेत व अंतरिक्षांत हें वेगानें फिरणारें यंत्र आहे. त्याच्या छिद्रांतून एकाच वेळीं हे पांच बाण सोडून त्या आकाशांत संचार करणाऱ्या तीक्ष्ण बाणांनीं जो वरील लक्ष्याचा भेद करील, त्याचीच ही माझी भगिनी भार्या होईल. उत्तम कुल, बल व रूप यांनीं युक्त असलेला जो कोणी हें महत्कार्य करील, त्यालाच ही कृष्णा वरील. हें मी तुम्हांला सत्य सांगतों."

त्या सर्व नृपतींना असें सांगून तो द्रुपदपुत्र तेथें जमलेल्या त्या सर्व भूपालांचीं नांवें, पराक्रम व कुल आपल्या भगिनीला सांगूं लागला. १. १२. १८५.

---

## अध्याय १८६ वा.

[ १ स्वयंवरास आलेल्या क्षत्रिय वीरांचें नामकथन. ]

(१) धृष्टद्युम्न म्हणाला—हे द्रौपदि, तुझ्यासाठीं हे दुर्योधन, दुर्विषह, दुर्मुख, दुष्प्रधर्षण, विविंशति, विकर्ण, सह, दुःशासन, युयुत्सु, वायुवेग, भीमवेग, रव, उग्रायुध, बलाकि, करकायु, विरोचन, कुंडक, चित्रसेन, सुवर्चा, कनकध्वज, नंदक, बाहुशाली, तुहुंड, विकट व आणखीहि अनेक पराक्रमी धृतराष्ट्रपुत्र कर्णासह येथें आले आहेत. त्याचप्रमाणें दुसरेहि असंख्य क्षत्रियश्रेष्ठ भूपाल आले आहेत. सौबल, शकुनि, वृषक आणि बृहद्बल हे गांधार देशांतील राजपुत्र येथें जमले आहेत. सर्व शस्त्रधारण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेले अश्वत्थामा व भोज हे दोघेहि उत्तम अलंकारांनीं भूषित होऊन तुझ्यासाठीं आले आहेत.

तसेच बृहंत, मणिमान् व दंडधार राजा, सहदेव, जयत्सेन, मेघसंधि, शंख आणि उत्तर या दोघां पुत्रांसह विराट राजा, वार्धक्षेमि, सुशर्मा, सेनाबिंदु हे भूपाल आणि आपल्या सुनामा व सुवर्चा या पुत्रांसह सुकेतु, सुचित्र, सुकुमार,

बृक, सत्यधृति, सूर्यध्वज, रोचमान, नील, चित्रायुध, अंशुमान्, चेकितान, महाबलाढ्य श्रेणिमान्, समुद्रसेनाचा पुत्र प्रतापशाली चंद्रसेन, जलसंध, विदंड व त्याचा पुत्र दंड, पौंड्रक, वासुदेव, वीर्यवान् भगदत्त, कलिंग आणि ताम्रलिप्त देशाचे अधिपति व पत्तनाधिपति, आपल्या पुत्रांसह मद्रदेशाचा राजा शल्य, वीर रुक्मांगद व रुक्मरथ यांसह कुरुकुलोत्पन्न सोमदत्त, त्याचा महारथ पुत्र सूरि, भूरिश्रवा व शल हे शूर क्षत्रिय, कांबोज-देशाचा राजा सुदक्षिण, पौरव दृढधन्वा, बृहद्बल, सुषेण, उशीनर राजाचा पुत्र शिबि, चोरांचा नाश करणारा कारूषाधिपति, हे सर्व वीर येथें जमले आहेत.

त्याचप्रमाणें बलराम, श्रीकृष्ण, रुक्मिणीचा पुत्र सांब, चारुदेष्ण, गद, प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध, अक्रूर, सात्यकि, महाबुद्धिमान् उद्धव, कृतवर्मा, हार्दिक्य, पृथु, विपृथु, विदूरथ, कंक, शंकु, गवेषण, आशावह, अनिरुद्ध, समीक, सारिमेजय, वीर वातपति, झिल्ली, पिंडारक व पराक्रमी उशीनर हे वृष्णिकुलांतील क्षत्रिय, भगीरथ, बृहत्क्षत्र, सिंधुदेशाचा राजा जयद्रथ, बृहद्रथ, बाह्लीक, महारथ श्रुतायु, उलूक, कैतव, चित्रांगद, शुभांगद, बुद्धिमान् वत्सराज, कोसलाधिपति पराक्रमी शिशुपाल व जरासंध हे सर्व येथें जमले आहेत. दुसरेहि अनेक देशांचे भूपति व पृथ्वीवर प्रसिद्ध असलेले क्षत्रिय तुझ्याकरितां येथें आलेले आहेत. ते या उत्कृष्ट लक्ष्याचा भेद करतील आणि हे भद्रे, त्यांतील जो कोणी या लक्ष्याचा भेद करील, त्याला तूं आज वरावेंस. १. १२. १८६.

---

## अध्याय १८७ वा.

[ १ लक्ष्यवेधासाठीं सर्व राजांचा प्रयत्न व त्याचें निष्फलत्व. ]

( १ ) वैशंपायन—हे राजेंद्रा, त्यानंतर विविध अलंकारांनीं भूषित झालेले व कुंडलें धारण केलेले ते तरुण नरेंद्र परस्परांशीं स्पर्धा करूं लागले आणि त्यांतील प्रत्येक जण आपल्यामध्यें अस्त्रविद्या व बल हीं दोन्ही आहेत असें समजूं लागला. ते सर्वच आपापलीं आयुधें उचलून त्वरेनें त्या लक्ष्याकडे जाऊं लागले. रूप, वीर्य, कुल, शील, वित्त व यौवन यांनीं ज्यांचा दर्प उद्दीपित झाला आहे, असे ते राजे हिमालय पर्वतांतील मदाचा स्राव करणाऱ्या गजेंद्रांप्रमाणें दिसले.

ज्यांच्या अंतःकरणांत मदनानें संचार केला आहे, असे ते राजे एकमेकांकडे स्पर्धेनें पाहूं लागले व ‘ ही कृष्णा माझी आहे ’ असें म्हणत ते सर्वहि आपा-

पल्या आसनावरून एकदम उठले. हिमालयाची कन्या जी उमा तिच्यासाठीं एकत्र जमलेले देवगण जसे शोभावे त्याप्रमाणें त्या स्वयंवरमंडपांत एकत्र जमलेले व त्या द्रुपदात्मजेला जिंकण्याची इच्छा करणारे ते सर्व क्षत्रिय शोभले. ज्यांचीं शरीरें कामशरांनीं जर्जर झालीं आहेत, असे ते राजे आपल्या मनानें कृष्णेजवळ गेले.

राजा, त्या रंगभूमींत उतरलेले ते सर्व क्षत्रिय त्यावेळीं आपसांतील मित्रभाव विसरून द्रुपदकन्येसाठीं सुहृदांचाहि द्वेष करूं लागले. त्या प्रसंगीं विमानांतून रुद्र, आदित्य इत्यादि देवगण, दैत्य, गरुडादि पक्षी, श्रेष्ठ नाग, देवर्षि, गुह्यक, चारण, विश्वावसु, नारद, पर्वत व अप्सरांसह मुख्य मुख्य गंधर्व आकाशांत येऊन उभे राहिले. बलराम, जनार्दन, वृष्णि व अंधक हे आपापल्या योग्यतेप्रमाणें स्वस्थानींच बसून राहिले. कृष्णाच्या इच्छेप्रमाणें वागणारे सर्व बलाढ्य यादवहि क्षत्रियांचा तो विचित्र क्षोभ नुसता पहात बसले.

इतक्यांत मत्त गजेंद्रासारखें ज्यांचें स्वरूप आहे अशा ब्राह्मणसमूहांत बसलेल्या सर्वांगसुंदर पांच वीरांना भस्माच्छादित अग्नीप्रमाणें पाहून यदुवीरांमध्यें श्रेष्ठ असलेल्या कृष्णानें 'हे कोण बरें असावे!' असा विचार केला व भीम आणि अर्जुन यांसह युधिष्ठिर व माद्रीपुत्र वीर नकुल-सहदेव असे पांच पांडवहि येथें ब्राह्मणवेषानें आले आहेत, असें त्यानें ओळखलें व तो बलरामास म्हणाला— "रामा, पांच पांडवहि ब्राह्मणवेषानें द्रौपदीच्या लोभानें आले आहेत; ते पहा."

तेव्हां बलरामानेंहि हळूच त्यांच्याकडे पाहिलें व त्यांस ओळखून संतोषानें श्रीकृष्णाकडे पुनः अवलोकन केलें. इतर राजांचे वीर पुत्र व पौत्र कृष्णेकडे निश्चल दृष्टीनें पाहूं लागले. त्यांचे नेत्र, मन व आशय कृष्णामय झाले. सर्व राजे नेत्र लाल करून व दांत-ओंठ खाऊन एकमेकांकडे पाहूं लागले. महा बलाढ्य पृथापुत्र व वीर माद्रीपुत्रहि द्रौपदीला पाहून मदनशरांनीं विह्वल झाले. त्यावेळीं अंतरिक्षांतहि देवर्षि-गंधर्वांची मोठी गर्दी झाली. तें दिव्य सुगंधांनीं भरून गेलें व दुंदुभींच्या ध्वनीनें दुमदुमलें. देवादिकांचीं विमानें एकमेकांना खेटून उभीं राहिलीं. इकडे विविध वाद्यांचा ध्वनि होत असतां त्यांनीं अंतरिक्षांतून पुष्पवृष्टि केली. नंतर कर्ण, दुर्योधन, शाल्व, शल्य, अश्वत्थामा, क्राथ, सुनीथ, वक्र, कलिंग, वंग, पांड्य, पौंड्र देशाचा राजा, विदेहाधिपति, यवन देश व इतर राष्ट्रांचे भूपाल, कमलपत्राप्रमाणें नेत्र असलेले राजपुत्र व राजपौत्र, या सर्व क्षत्रिय वीरांनीं द्रौपदीच्या प्राप्तीसाठीं क्रमानें आपआपला पराक्रम प्रकट केला.

त्यांनीं कुंडलें, बाहुभूषणें इत्यादि अलंकार धारण केले होते. ते विशालबाहू, पराक्रमी व शक्तिमान् होते. बलानें व वीर्यानें युक्त असलेले ते पराक्रमी वीर दर्पानें गर्जना करूं लागले. परंतु तें दृढ धनुष्य वांकविणें अशक्य आहे, असें पाहून तें सज्ज करण्याचें कोणी मनांतहि आणीना.

पण त्यांतील जे कित्येक तें धनुष्य वांकविण्याचा प्रयत्न करूं लागले, त्यांच्या हातांतून त्याचें टोंक निसटलें व दांडूनें जशी विटी फेंकतात, त्याप्रमाणें धनुष्याच्या टोंकानें त्यांना उडविलें, त्यामुळें ते भूतलावर सपशेल पडले. त्यांनीं आपलें सामर्थ्य व शिक्षण यांच्या अनुसार तें धनुष्य वांकविण्याचा बराच प्रयत्न केला, पण शेवटीं भूमीवर आदळल्यामुळें त्यांच्या उत्साहाचा भंग झाला. किरीट, हार इत्यादि भूषणें आपापल्या स्थानापासून गळून पडलीं व ते धापा टाकीत स्वस्थानीं जाऊन बसले. त्या वेळीं ज्यांचे हार व बाहूभूषणें अस्ताव्यस्त झालीं आहेत अशा राजमंडळांत त्या दृढ धनुष्यानें मोठा हाहाकार उडविला. कृष्णा आपली पत्नी व्हावी, ही त्यांची इच्छा सर्वथा लोपली व तें राजमंडळ अतिशय खिन्न झालें.

जनमेजया, त्या राजांची ही दुर्दशा पाहून धनुर्धरांतील श्रेष्ठ कर्ण त्या धनुष्याजवळ गेला व एका क्षणांत तें धनुष्य उचलून, त्यावर गुण चढवून त्यानें त्याला बाणहि जोडिले. तें पाहून ब्राह्मणसमुदायांत बसलेल्या पांडुपुत्रांनीं अंतरिक्षांतील लक्ष्य कर्णाच्या बाणांनीं विद्ध होऊन भूमीवर पडलेंच आहे, असें मानिलें. पण द्रौपदीच्या प्रीतीनें ज्यानें हें महत्कार्य करण्याची प्रतिज्ञा केली आहे व ज्यानें आपल्या तेजानें अग्नि, चंद्र व सूर्य यांनाहि दिपविलें आहे, अशा त्या सूर्यपुत्राला पाहून द्रौपदी 'मी सूतपुत्राला वरणार नाहीं' असें मोठ्यानें बोलली.

तेव्हां कर्णाला नीच कुलाच्या संबंधामुळें क्रोध आला व सूर्याच्या अपराधामुळें हसूंहि आलें. त्यानें सूर्याकडे पाहिलें व हातांतील धनुष्य टाकून दिलें. याप्रमाणें बहुतेक सर्व क्षत्रिय त्या महत्कार्यापासून निवृत्त झाले असतां चेदिदेशाचा बलवान्, धीर, वीर, व यमोपम राजा दमघोषपुत्र शिशुपाल त्या धनुष्यापाशीं जाऊन तें आपल्याला वांकवितां येईल किंवा नाहीं, असें पाहूं लागतांच तो भूमीवर गुडघे टेंकून पडला.

त्याच्या मागून महापराक्रमी जरासंध धनुष्यापाशीं गेला व निश्चल पर्वतासारखा उभा राहिला, पण त्याचीहि तीच स्थिति झाली. तेव्हां लज्जित झालेला

तो राजा स्वदेशीं निघून गेला. त्याच्या मागून महा बलाढ्य मद्रराज शैल्य त्यावर गुण चढवूं लागला, पण तोहि तोंडघशीं पडला. त्यामुळें सर्व क्षत्रियसमाज भयभीत झाला व त्यांतील एकाहि राजानें धनुष्य सज्ज करण्याचें नांवहि घेतलें नाहीं. तेव्हां कुंतीपुत्र अर्जुनानें त्याला सज्ज करण्याचें मनांत आणिलें. १. १२. १८७.

---

## अध्याय १८८ वा.

[ १ अर्जुनाचा लक्ष्यवेध. ]

(१) वैशंपायन म्हणाला—राजा जनमेजया, जेव्हां ते सर्व भूपाल निरुत्साह होऊन धनुष्य सज्ज करण्याच्या कार्यापासून निवृत्त झाले, तेव्हां महाबुद्धिमान् पार्थ ब्राह्मणसमूहांतून उठला. तें पहातांच सर्व ब्राह्मण आपलीं अजिनें हालवूं लागले. इंद्राच्या ध्वजाप्रमाणें उंच असलेला तेजस्वी पार्थ त्या धनुष्याकडे जात आहे हें पाहून कांहीं विप्रांना खेद झाला व कांहींना हर्ष झाला. त्यांतील कांहीं बुद्धिमान् द्विज इतरांस म्हणाले—

"हे विप्रहो, धनुर्विद्येंत प्रवीण असलेल्या कर्ण, शल्य इत्यादि प्रसिद्ध क्षत्रियांना जें धनुष्य वांकवितां आलें नाहीं, तें अस्त्रविद्या न जाणणारा, शक्तीनें व बलानें दुर्बल असलेला हा बटु सज्ज करण्यास कसा बरें समर्थ होईल! या अविचारानें केलेल्या कृत्यांत याला यश न मिळाल्यास खरोखर या राजसभेंत ब्राह्मणांचा मोठा उपहास होईल! यास्तव ब्राह्मणांच्या चंचल स्वभावाला अनुसरून हा दर्पानें व हर्षानें तें धनुष्य उचलण्यास जात आहे खरा, पण तुम्ही त्याचें निवारण करा. हा न गेलेलाच बरा !"

त्यावर कांहीं ब्राह्मण म्हणाले—आमचा उपहासहि होणार नाहीं व आम्हांला कमीपणाहि येणार नाहीं. त्याचप्रमाणें आम्हीं या भूपालांच्या द्वेषासहि पात्र होणार नाहीं !

दुसरे कित्येक म्हणाले—हा विप्र तरुण हत्तीच्या सोंडेसारखा उंच, बलवान् व तेजस्वी असून त्याचे स्कंध, बाहु व मांड्या पुष्ट दिसत आहेत. हा धैर्यानें हिमालयासारखा आहे. याची गति सिंहाच्या लीलेसारखी असून हा मत्त गजाप्रमाणें पराक्रमी दिसतो. याच्या उत्साहावरून हा लक्ष्यभेद करील, असेंच अनुमान होतें. याचा हा महान् उत्साहच याच्या शक्तीची कल्पना करून देत

आहे. कारण कोणीहि असमर्थ मनुष्य आपण होऊन त्या धनुष्याकडे जाण्याचें साहस करणार नाहीं.

शिवाय ब्रह्मलोकापर्यंत या सर्व देवासुरादि आकारांनीं संचार करणाऱ्या लोकांमध्यें ब्राह्मणांना असाध्य असें कांहींच नाहीं. ते जल प्राशन करणारे, वायु भक्षण करणारे, केवल फलाहार करणारे, दृढव्रत धारण करणारे व त्यामुळेंच दुर्बल जरी दिसले तरी आपल्या तेजानें बलवान् असतात. यास्तव एखादा ब्राह्मण सुखद, दुःखद, लहान, मोठें इत्यादि प्राप्त झालेलें चांगलें किंवा वाईट कर्म जरी करीत असला तरी त्याचा केव्हांहि अवमान करूं नये. परशुरामानें युद्धामध्यें क्षत्रियांना जिंकलें. अगस्त्य-मुनीनें आपल्या ब्रह्मतेजानें अगाध समुद्र प्राशन केला. त्याचप्रमाणें ‘ हा बटु हें धनुष्य सत्वर सज्ज करो ’ असेंच आपण सर्वांनीं बोलावें. तेव्हां ते सर्व विप्र त्याप्रमाणें बोलले.

पारिक्षिता, याप्रमाणें त्या ब्राह्मणांचीं विविध भाषणें चाललीं असतां अर्जुन त्या धनुष्याजवळ जाऊन क्षणभर पर्वताप्रमाणें निश्चल उभा राहिला. नंतर त्यानें त्या धनुष्याला प्रदक्षिणा घातली. वर देणाऱ्या प्रभु शंकराला शिरसा वंदन केलें व मनांत श्रीकृष्णाचें स्मरण करून तें धनुष्य हातीं घेतलें. जें धनुष्य रुक्म, सुनीथ, वक्र, कर्ण, दुर्योधन, शल्य, शाल्व, इत्यादि धनुर्वेदांत निष्णात असलेल्या नृपश्रेष्ठांना मोठ्या प्रयत्नानेंहि वांकवितां आलें नाहीं, तेंच धनुष्य श्रीविष्णूप्रमाणें प्रभावशाली असलेल्या पराक्रमी अर्जुनानें सहज सज्ज केलें आणि एका निमिषाच्या आंत त्या यंत्राच्या छिद्रांतून पांच बाण सोडून तें लक्ष्य छिन्न-विच्छिन्न करून भूमीवर पाडविलें.

त्यामुळें अंतरिक्षांत व त्या स्वयंवरमंडपांतील समाजांत फार मोठा जयघोष झाला व देवांनीं शत्रूंचा नाश करणाऱ्या पार्थावर दिव्य पुष्पवृष्टि केली. हजारों ब्राह्मणांनीं आपलीं वस्त्रें ध्वजाप्रमाणें फडफडविलीं व क्षत्रिय लज्जित होऊन सर्व बाजूंनीं हाहाकार करूं लागले. आकाशांतून चोहोंबाजूंनीं पुष्पवृष्टि झाली. असंख्य वाद्यें वाजूं लागलीं. सूत व मागध यांचा समुदाय सुस्वर स्तुति करूं लागला. तेव्हां त्या विजयी पार्थाला पाहून शत्रुनाशक द्रुपदराजा अतिशय संतुष्ट झाला व द्रौपदी प्राप्त न झाल्यामुळें क्षुब्ध झालेले नृपाल कदाचित् युद्धास तयार होतील, या भीतीनें तो सैन्यासह अर्जुनाच्या साह्यार्थ आला.

त्या मंडपांत फार मोठा कोलाहल वाढला असतां धर्मात्मा युधिष्ठिर पुरुष-श्रेष्ठ नकुल-सहदेवांसह तेथून त्वरेनें निघाला व आपल्या निवासस्थानीं आला.

इकडे लक्ष्याचा भेद करणाऱ्या इंद्रतुल्य अर्जुनाला पाहून आपल्याला उत्तम पतीचा लाभ झाला, याचा अत्यंत अभिमान बाळगणारी ती कृष्णा शुभ्र वस्त्र व पुष्पमाला घेऊन अर्जुनाच्या समीप गेली व तिनें त्याला माळ घातली. तेव्हां तो अर्जुन सर्व राजांसमक्ष तिला जिंकून व तिचा स्वीकार करून चालला असतां ब्राह्मणांनीं त्याचा सत्कार केला. नंतर ज्याच्या मागोमाग पत्नीहि चालली आहे असा तो अचिंत्य कर्म करणारा पार्थ तेथून निघाला. १. १२. १८८.

---

## अध्याय १८९ वा.

[ १ राजांचा द्रुपदाला मारण्याचा निश्चय. २ भीमार्जुनांनीं त्यांना केलेला प्रतिबंध. ३ हे पांडुपुत्रच आहेत असा श्रीकृष्णाचा तर्क. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, इकडे पांचालेश्वर आपली कन्या लक्ष्याचा वेध करणाऱ्या त्या ब्राह्मणाला देऊं इच्छित आहे, हें पाहून त्या सर्व श्रेष्ठ नृपालांना अतिशय क्रोध आला व ते परस्परांस म्हणाले—" हा द्रुपदराजा आमचें अतिक्रमण करून, येथें जमलेल्या आम्हां सर्वांस तृणतुल्य लेखून स्त्रियांतील श्रेष्ठ द्रौपदी या ब्राह्मणाला देऊं पहात आहे. एखाद्याला वृक्षावर चढवून तो फलापर्यंत जाऊन पोंचला असतां त्याला जसें अकस्मात् खालीं ढकलून द्यावें, तसेंच हें याचें कृत्य आहे. यास्तव आम्हांला कस्पटाप्रमाणें मानणाऱ्या या दुरात्म्याचा आपण वध करूं या.

अहो, हा राजा आपल्या गुणांनींच वृद्धांच्या उपचारास व मानास पात्र नाहीं. क्षत्रियांचा द्वेष करणाऱ्या या दुराचाऱ्याला पुत्रांसह मारून टाकूं या. आम्हां सर्व नराधिपांना येथें बोलावून सत्कार करून, सुग्रास भोजन देऊन शेवटीं हा आमचा असा अपमान करीत आहे. देवांसारख्या या एवढ्या मोठ्या राजसमूहांत या राजाला एकहि अनुरूप क्षत्रिय आढळला नाहीं काय ! वस्तुतः ब्राह्मणाला स्वयंवराचा अधिकारच नाहीं. क्षत्रियांना तो विहित आहे. किंवा ही कन्याच जर आम्हांपैकीं कोणाला वरण्याची इच्छा करीत नसेल, तर हिला अग्नींत फेकून आपण आपापल्या राष्ट्राला निघून जाऊं.

हे वीरहो, या ब्राह्मणानें आपल्या स्वाभाविक चापल्यामुळें व लोभामुळें हें राजेंद्रांना अप्रिय असलेलें कार्य जरी केलें आहे, तरी तो आम्हांला वध्य नाहीं. कारण आमचें राज्य, जीवित, विविध धन, पुत्र, पौत्र व दुसरेंहि जें

कांहीं धन आहे तें ब्राह्मणांसाठीं आहे. पण अवमानाच्या भीतीनें व स्वधर्माच्या रक्षणासाठीं इतर स्वयंवरांचाहि असाच प्रकार होऊं नये म्हणून आम्हांला या राजाचा प्रतीकार केलाच पाहिजे." असें बोलून ज्यांचे बाहु परिघासारखे पुष्ट आहेत, असे ते सर्व हृष्ट झालेले राजसिंह आपापलीं आयुधें सज्ज करून द्रुपदाला मारण्याच्या इच्छेनें त्याच्या अंगावर धावले.

( २ ) तेव्हां अतिशय क्रुद्ध होऊन व आपापलीं आयुधें उचलून वेगानें येत असलेल्या त्या असंख्य राजांना पाहून द्रुपदराजा भयभीत झाला व ब्राह्मणांना शरण गेला. इतक्यांत मदोन्मत्त हत्तीप्रमाणें वेगानें चाल करून येत असलेल्या त्या सर्व क्षत्रियांना अडविण्यासाठीं हे दोघे शत्रुनाशक वीर पांडुपुत्र त्यांच्या समोर गेले.

तें पाहून शस्त्रास्त्रांनीं सज्ज झालेल्या क्षत्रियांनीं त्या दोघां वीरांना मारण्याचा निश्चय केला. इकडे वज्राप्रमाणें ज्याचें सामर्थ्य आहे, अशा अद्भुत व भयंकर कर्म करणाऱ्या भीमानें एखाद्या गजेंद्राप्रमाणें दोन्ही हातांनीं एक वृक्ष उपटून घेतला. त्यावरील पानें काढून टाकिलीं आणि उग्र दंड हातीं घेतलेल्या यमराजाप्रमाणें तो भीम त्या वृक्षानें शत्रूंना झोडूं लागला. अर्जुनाचें रक्षण करण्यासाठीं तो शत्रूंचें मर्दन करणारा भीम हातांत वृक्ष घेऊन उभा राहिला असतां अर्जुनालाहि मोठा विस्मय वाटला व तोहि निर्भय झाला आणि महेंद्राप्रमाणें ज्याचें कर्म आहे, असा तो कुंतीपुत्र धनुष्य सज्ज करून आपलें सामर्थ्य प्रकट करण्यासाठीं पर्वताप्रमाणें स्थिर झाला.

( ३ ) भीमासह पार्थाचें हें अचिंत्य कर्म पाहून असामान्य बुद्धिमान् दामोदर आपल्या भ्रात्या हलायुधाला म्हणाला—"हे वीरा, सिंह किंवा वृषभ यांप्रमाणें लीलेनें गमन करणारा हा जो ताडासारखें फार मोठें धनुष्य सज्ज करून त्याची प्रत्यंचा आकर्ण ओढीत आहे, तो अर्जुनच आहे, यांत कांहीं संशय नाहीं. हे संकर्षणा, माझें हें बोलणें जर खोटें झालें तर मी आपलें 'वासुदेव' हें नांव बदलून टाकीन. त्याचप्रमाणें हा जो दुसरा वीर वेगानें वृक्ष उपटून या राजसमूहावर त्वरेनें धावून जात आहे तो वृकोदरच आहे. कारण भूलोकीं त्याच्या वांचून दुसरा कोणीहि समरांगणांत असें कृत्य करण्यास समर्थ नाहीं.

त्याचप्रमाणें आतांच जो एक कमलनयन, कृश, सिंहाप्रमाणें गमन करणारा, नम्र, गौरवर्ण, उंच व शुकासारख्या सुंदर नासिकेनें युक्त असलेला पुरुष येथून निघून गेला तो धर्मपुत्र युधिष्ठिर होय आणि कार्तिकस्वामीप्रमाणें असलेले जे

दोन कुमार त्याच्या मागोमाग निघून गेले, ते अश्विनिकुमारांचे पुत्र नकुल-सहदेव आहेत, असा माझा तर्क होतो. कारण त्या लाक्षागृहाच्या भयंकर दाहांतून पृथेसह पांचहि पांडुपुत्र सुखरूपपणें निघून गेले असें मी यापूर्वींच ऐकिलें आहे."

राजा, श्रीकृष्णाचें हें वचन ऐकून जलरहित मेघाप्रमाणें शुभ्रवर्ण असलेला बलराम आपल्या अनुजास म्हणाला—"कृष्णा, तूं म्हणतोस तें खरें आहे, असें मलाहि वाटतें. आपली पितृभगिनी पृथा व तिचे पुत्र पांच पांडव हे त्या अग्नीपासून सुरक्षितपणें मुक्त झाले, हें पाहून मला मोठा संतोष वाटत आहे. १. १२. १८९.

---

## अध्याय १९० वा.

[ १ भीमार्जुन व कर्ण-शल्यादि यांचें युद्ध. २ त्यांत पांडवांचा विजय. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजेश्वरा, द्रुपद ब्राह्मणांना शरण आला असतां आणि अर्जुन व भीम क्षुब्ध झालेल्या राजसमूहास प्रतीकार करण्यासाठीं पुढें सरसावले असतां ब्राह्मणश्रेष्ठ आपलीं अजिनें व कमंडलु हालवीत भीमार्जुनांस म्हणाले—"वीरांनो, भीऊं नका. आम्ही शत्रूंशीं युद्ध करतों."

तेव्हां असें बोलणाऱ्या त्या पूज्य ब्राह्मणांना अर्जुन हंसतच म्हणाला—हे भगवन्, आपण सर्व प्रेक्षक होऊन बाजूला उभे रहा. क्रुद्ध झालेल्या विषारी नागांचें मंत्रांनीं जसें निवारण करितात, त्याप्रमाणें मी या क्रुद्ध क्षत्रियांचें शेकडों बाणांनीं निवारण करीन. ज्यांचीं अग्रें सरळ आहेत, अशा तीक्ष्ण शरांचा सभोंवार वर्षाव करून मी यांना एक पाऊलभरहि पुढें येऊं देणार नाहीं. तुम्ही शांत चित्तानें युद्धचमत्कार पहात रहा.

राजा, ब्राह्मणांना असें सांगून व पणानें प्राप्त झालेलें तें धनुष्य सज्ज करून महा बलाढ्य अर्जुन भ्रात्या भीमासह त्या क्षत्रियांसमोर एखाद्या पर्वताप्रमाणें निश्चल उभा राहिला. त्यानंतर दोन मत्त गज जसे इतर गजांबरोबर झुंझतात, तसे ते दोघे निर्भय वीर युद्धाच्या मदानें उन्मत्त झालेल्या कर्णप्रभृति क्षत्रियांना पाहून त्यांच्यावर तुटून पडले.

तेव्हां ते युद्धाची इच्छा करणारे राजे 'युद्धामध्यें ब्राह्मणांचाहि वध विहित आहे' असें कठोर वचन बोलून त्या विप्रांवर वेगानें धावून गेले. हत्तिणीसाठीं एक गज दुसऱ्या गजावर जसा हल्ला करितो, तसा महा तेजस्वी कर्ण युद्धामध्यें पार्थावर चाल करून गेला. मद्रदेशाधिपति बलाढ्य शल्य भीमसेनावर तुटून पडला व दुर्योधनादिक योद्धे इतर ब्राह्मणांबरोबर युद्ध करूं लागले.

पण ते सर्व शूर क्षत्रिय भीमार्जुनांना न ओळखिल्यामुळें, ते ब्राह्मणच आहेत, अशा समजूतीनें प्रथम त्यांच्याशीं अनादरानें लढूं लागले, मोठ्या आवेशानें व प्रयत्नपूर्वक लढले नाहींत. पण अर्जुनानें आपलें दृढ धनुष्य आकर्ण ओढून आपल्यावर चालून आलेल्या सूर्यपुत्र कर्णाला जेव्हां तीक्ष्ण बाणांनीं वेध केला तेव्हां अग्नीसारख्या प्रखर तेजानें युक्त असलेल्या त्या बाणांच्या वेगानें राधासुताला मूर्च्छाच आली. तरीहि तो मोठ्या प्रयत्नानें धीर धरून पार्थावर धावला.

हे पांडवेया, त्या दोन्ही वीरांचें हस्तलाघव सारखेंच असल्यामुळें त्यांतील कर्ण कोणता व विप्रवेषधारी पार्थ कोणता हेंहि ओळखूं येईनासें झालें. एकमेकांना जिंकण्याची इच्छा करणारे ते दोघे अतिशय क्षुब्ध होऊन युद्ध करूं लागले. ते 'तुझ्या अस्त्रप्रयोगाचा प्रतीकार मी कसा केला! आतां हें पहा माझें बाहुबल!' अशीं शौर्य व्यक्त करणारीं अर्थपूर्ण वचनें परस्परांस बोलूं लागले. अर्जुनाचें बाहुबल या भूलोकीं अप्रतिम आहे, असें जाणून कर्ण मोठ्या वेगानें युद्ध करूं लागला. त्या वेळीं अर्जुनाच्या वेगवान् बाणांचा प्रतिकार करणाऱ्या सूर्यपुत्राचा क्षत्रियसैन्यांनीं उच्च स्वरानें मोठा जयघोष करून सत्कार केला.

इतक्यांत कर्ण अर्जुनाला म्हणाला—हे श्रेष्ठ ब्राह्मणा, तुझा उत्साह, युद्धांतील कौशल्य, शौर्य व शस्त्रास्त्रांतील प्रावीण्य पाहून मी संतुष्ट झालों आहें. हे विप्रसत्तमा, तूं कोण आहेस! तूं साक्षात् धनुर्वेद आहेस किंवा भार्गवराम आहेस, कीं साक्षात् इंद्र आहेस, कीं अच्युत विष्णु आहेस! तूं स्वतःचें स्वरूप गुप्त ठेवण्यासाठीं विप्ररूप धारण करून आपल्या बाहुबलाच्या आश्रयानें माझ्याशीं युद्ध करीत आहेस, असें मला वाटतें. कारण क्रुद्ध झालेल्या माझ्याशीं साक्षात् इंद्र किंवा पार्थ या दोघांशिवाय कोणीहि युद्ध करण्यास समर्थ नाहीं.

कर्णाचें हें भाषण ऐकून पार्थ त्यास म्हणाला—हे कर्णा, मी धनुर्वेदहि नाहीं व प्रतापवान् परशुरामहि नाहीं. सर्व शस्त्रधारण करणाऱ्या योद्ध्यांमध्यें श्रेष्ठ असा मी एक ब्राह्मण आहें. गुरूच्या उपदेशानें ब्राह्म व ऐंद्र हीं अस्त्रें मला उत्तमप्रकारें अवगत आहेत. आज मी तुला युद्धांत जिंकण्यासाठीं येथें स्थित आहें. यास्तव हे वीरा तूं स्थिर हो.

( २ ) राजा जनमेजया, अर्जुन असें बोलला असतां तो महारथ कर्ण 'ब्राह्म तेज जिंकण्यास अशक्य आहे' असें पाहून युद्धापासून निवृत्त झाला. इतक्यांत दुसरीकडे विद्या व बल यांनीं युक्त असलेले शल्य व वृकोदर हे दोघे बलाढ्य

वीर मत्त महागजांप्रमाणें एकमेकांस युद्धाचें आह्वान करून परस्परांवर गुद्ग्यांचे आघात व मुष्टिप्रहार करूं लागले, एकमेकांस ओढूं लागले व ठोसे मारूं लागले. तेव्हां त्यांच्या प्रहारांचा 'चट्‌चट्' असा फार मोठा ध्वनि ऐकूं येऊं लागला. पाषाणांच्या प्रहाराप्रमाणें ते परस्परांवर प्रहार करीत होते.

याप्रमाणें दोन घटका त्या दोघांचें द्वंद्वयुद्ध झालें. नंतर भीमानें आपल्या दोन्ही हातांनीं त्या शल्याला वर उचलून जोरानें खालीं आपटलें. तेव्हां हे कुरुश्रेष्ठा, ते सर्व ब्राह्मण हंसूं लागले. परंतु भीमसेनानें फार मोठें आश्चर्य केलें. त्या बलाढ्य वीरानें शल्याला भूमीवर भोपळ्याप्रमाणें आपटलें असूनहि त्याचा वध केला नाहीं.

याप्रमाणें भीमसेनानें शल्याला पाडलें असतां व कर्ण शंकित झाला असतां जयांविषयीं साशंक झालेले ते सर्व भूपाल भीमसेनाच्या भोंवतीं जमून म्हणाले—" हे दोघे ब्राह्मणवीर धन्य होत. यांचा जन्म कोठें झाला व हे रहातात कोठें, हें आपण समजून घेऊं या. कारण भार्गवराम, द्रोणाचार्य, धनंजय, देवकीचा पुत्र वासुदेव आणि कृपाचार्य यांच्यावांचून महापराक्रमी कर्णाशीं युद्ध करण्यास कोण बरें समर्थ आहे ! तसेंच, दुर्योधनाशीं युद्धांत स्पर्धा करण्याचें सामर्थ्य कोणाच्या अंगीं आहे !

त्याचप्रमाणें मद्राधिपति बलवान् शल्याचा पाडाव हलधर, वृकोदर, किंवा वीर दुर्योधन यांच्यावांचून दुसरा कोण करूं शकणार ! यास्तव ब्राह्मणांनीं व्यापिलेल्या या युद्धांतून आपण निवृत्त होऊं या. ब्राह्मणांनीं जरी नित्य अपराध केले, तरी त्यांचें सर्वदा रक्षण करावें, अशी नीति आहे. यास्तव हे कोण आहेत, तें आपण अगोदर समजून घेऊं व मग यांच्याशीं मोठ्या संतोषानें पुनः युद्ध करूं." याप्रमाणें त्यांचें बोलणें चाललें असतां भीमार्जुन स्वस्थ उभे राहिले होते.

हे कुरुश्रेष्ठा, भीमसेनाचें तें अचाट कर्म पाहून हे दोघे पांडुपुत्रच आहेत असें श्रीकृष्णानें निश्चित जाणलें व 'हे भूपालहो, या वीरानें द्रौपदीला धर्मानें जिंकलें आहे. यास्तव त्याच्याशीं युद्ध करणें योग्य नव्हे' असें म्हणून त्या सर्व बलाढ्य नृपश्रेष्ठांचें निवारण केलें; तेव्हां ते सर्व युद्धविशारद श्रेष्ठ क्षत्रिय युद्धापासून निवृत्त झाले व अतिशय विस्मित होऊन आपआपल्या निवासस्थानीं निघून गेले. तेथें जमलेला इतर जनसमूहहि 'या समारंभांत ब्राह्मणांचा विजय झाला व पांचालीनें ब्राह्मणाला वरिलें' असें म्हणत आपापल्या स्थानीं निघून गेला.

त्यानंतर 'रुरु'-नांवाच्या मृगाचीं अजिनें पांघरलेल्या ब्राह्मणांनीं भीमार्जुनांस वेढून टाकिलें. तेव्हां त्या जनसंमर्दांतून ते मोठ्या कष्टानें मार्ग काढूं लागले. पौर्णिमेच्या दिवशीं मेघमंडलापासून मुक्त होऊन उदय पावणारे चंद्र-सूर्य जसे शोभतात, तसे ज्यांच्या मागोमाग द्रौपदी चालली आहे, असे ते दोघे वीर शोभले.

हे राजा, इकडे भिक्षा घेऊन येण्याची वेळ टळून गेली, तरी पांडव घरीं आले नाहींत, हें पाहून त्यांची माता कुंती अतिशय चिंतातुर झाली. 'माझ्या शूर पुत्रांना ओळखून दुष्ट दुर्योधनादिकांनीं त्यांचा वध तर केला नसेल ना! किंवा मायावीरूप धारण करणाऱ्या दीर्घ द्वेषी राक्षसांनीं तर त्यांचा नाश केला नाहीं! महात्म्या कृष्णद्वैपायनाचा उपदेश असा विपरीत कसा बरें झाला!' असे अनेक तर्क-वितर्क करणारी पृथा पुत्रस्नेहानें व्याकुळ झाली. इतक्यांत अपराह्णकाल उलटण्याच्या सुमारास मेघांनीं परिवेष्टित झालेल्या सूर्याप्रमाणें ब्राह्मणांनीं परिवेष्टित झालेला जिष्णु त्या कुलालशालेंत येऊन पोंचला. १. १२. १९०.

---

## अध्याय १९१ वा.

[ १ कुंतीला द्रौपदीचें भिक्षारूपानें निवेदन व कुंतीचें वचन. २ त्याविषयीं विचार. ३ कृष्णदर्शन.]

( १ ) **वैशंपायन**—हे राजन्, याप्रमाणें ते दोघे विजयी नरश्रेष्ठ भीमार्जुन परम हृष्ट चित्तानें याज्ञसेनीसह त्या कुलालशालेंत शिरले व 'हे माते, ही पहा आम्ही भिक्षा आणली आहे.' असें बोलून त्यांनीं भिक्षा म्हणून कुंतीला याज्ञसेनीचेंच निवेदन केलें. त्यावेळीं कुंती कुलालशालेंत होती. त्यामुळें तिनें पुत्रांना न पहातांच 'सर्व मिळून सेवन करा' असें म्हटलें व हे शब्द मुखांतून निघून गेल्यावर पुढें येऊन तिनें कृष्णेला अवलोकन केलें आणि विह्वल होऊन "अरे अरे, मी हें काय बोललें!" असें म्हणत ती पश्चात्ताप पावली.

राजा, अधर्मभीरु साध्वी कुंती 'माझ्या तोंडून न कळत निघून गेलेलें वाक्य खरें कसें बरें होईल!' असा मनांत विचार करीत याज्ञसेनीजवळ गेली व अतिशय संतुष्ट झालेल्या तिचा हात धरून युधिष्ठिराला म्हणाली—"वत्सा, तुझ्या या दोघां अनुजांनीं द्रुपदराजाच्या कन्येचें भिक्षा म्हणून मला निवेदन केलें व मींहि तिला न पहातां प्रमादानें नेहमींप्रमाणें 'सर्व मिळून सेवन करा'

असें सांगितलें. पण एका स्त्रीचें बहुभर्तृत्व संभवत नाहीं. मला अधर्माची मोठी भीति वाटते. तेव्हां हे कुरुश्रेष्ठा, माझें भाषण असत्य कसें होणार नाहीं तें मला सांग. पांचालराजकन्येला अधर्म स्पर्श करणार नाहीं व अधर्मामुळें तिला पश्वादि योनींमध्यें पुनः पुनः भ्रमण करावें लागणार नाहीं, असा कांहीं उपाय मला सांग."

(२) जनमेजया, पूज्य कुंतीमातेनें असें म्हटलें असतां बुद्धिमान् युधिष्ठिरानें क्षणभर विचार केला व खिन्न झालेल्या जननीला धीर देऊन तो धनंजयाला म्हणाला—"अर्जुना, तूं या याज्ञसेनीला जिंकलें आहेस व ही याज्ञसेनी तुझ्या सांनिध्यांतच अधिक शोभेल. यास्तव हे वीरा, अग्नीला प्रज्वलित करून तूं हिचें पाणिग्रहण कर."

युधिष्ठिराचें हें आज्ञावचन ऐकून अर्जुन म्हणाला—हे नरेंद्रा, तूं मला अशा अधर्मांत नियुक्त करूं नकोस. तूं मला जो सांगत आहेस तो धर्म कोठेंहि रूढ नाहीं. प्रथम तुझा विवाह होणें उचित आहे. त्यानंतर अचिंत्य कर्में करणाऱ्या या पराक्रमी भीमसेनाचा विवाह होईल. त्यानंतर माझा व क्रमानें या दोघां नकुल-सहदेवांचा विवाह होणें उचित आहे. आम्ही वृकोदरादि चारी भ्राते ही वधू तुला अर्पण करीत आहों व असें करणें हा आमचा धर्मच आहे. यास्तव या प्रसंगीं धर्म व यश यांना अनुसरून जें करणें उचित असेल, तेंच करण्याचा तूं निश्चय कर. युधिष्ठिरा, पूर्ण विचार करून ज्याच्या योगें पांचालराजाचें हित होईल, तेंच करण्याची आम्हांला आज्ञा कर. आम्ही सर्व भ्राते तुझ्या अधीन आहों.

हे पारिक्षिता, जिष्णूचें हें भक्तिस्नेहयुक्त वचन ऐकून सर्व पांडुपुत्रांनीं पांचालीकडे पाहिलें. ती यशस्विनी कृष्णाहि त्यांच्याकडे पहात होती. याप्रमाणें परस्पर अवलोकन केल्यावर पांची पांडुपुत्रांनीं तिला आपल्या हृदयांत धारण केलें. कारण त्या सुंदरीला पाहून सर्वहि पराक्रमी पांडुपुत्रांच्या मनांत कामोद्भव झाला. मदनानें त्यांच्या इंद्रियांना व्याकुळ केलें. कारण स्वतःच विधात्यानें निर्मिलेलें तिचें स्वरूप त्रिभुवनांतील सर्व स्त्रियांच्या स्वरूपाहून अधिक मनोहर होतें. त्यामुळें तिच्याकडे पहाणाऱ्या कोणाहि पुरुषाचें मन ती आकर्षण करीत असे.

राजा, याप्रमाणें वृकोदरादिकांच्या चर्येवरूनच त्यांचा आशय ओळखून कुंतीपुत्र युधिष्ठिराला द्वैपायन व्यासांच्या वचनाचें स्मरण झालें व द्रौपदी

यांच्यापैकीं कोणा एकाचीच भार्या झाल्यास तो इतरांचा शत्रु होईल, हें जाणून तो म्हणाला—"ही शुभ द्रौपदी आम्हां सर्वांचीच भार्या होईल." हे कुरुश्रेष्ठा, आपल्या ज्येष्ठ भ्रात्याचें हें वचन ऐकून पांडूचे चारी पुत्र त्याचाच विचार करीत बसले.

( ३ ) इतक्यांत वृष्णिकुलांतील श्रेष्ठ महावीर वासुदेव रोहिणीपुत्र बलरामासह जेथें हे पांच पुरुषश्रेष्ठ रहात होते, त्या कुलालशालेंत आले. कारण हे कुरुकुलश्रेष्ठ पांडवच असावेत, अशी त्यांच्या मनाची खात्री झाली होती. बलरामासह कृष्णानें तेथें बसलेल्या अजातशत्रूला व त्याच्या सभोंवार असलेल्या अग्नितुल्य तेजस्वी चार भ्रात्यांना पाहिलें आणि वासुदेव धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ कुंतीसुतापाशीं जाऊन 'मी कृष्ण आहें' असें म्हणाला व त्यानें त्या अजामीढ युधिष्ठिर-राजाचे दोन्ही पाय आपल्या दोन्ही हातांनीं घट्ट धरिले.

कृष्णाच्या मागोमाग बलरामानेंहि आपलें नांव निवेदन करून त्यास तसेंच अभिवादन केलें. तेव्हां हृष्ट झालेल्या पांडवांनींहि त्यांचें अभिनंदन केलें. त्या दोघां यदुश्रेष्ठांनीं आपल्या पितृभगिनीचेहि चरण वंदिले. तेव्हां त्यांस बसावयास दर्भासनें देऊन व कृष्ण आपल्या भ्रात्यासह कुशल आहे, असें पाहून युधिष्ठिर म्हणाला—" हे वासुदेवा, आम्ही येथें गुप्त रीतीनें रहात असतांना 'आम्ही पांडवच आहों' हें तुला कसें कळलें ?"

हें ऐकून वासुदेव हंसून म्हणाला—हे राजा, अग्नि जरी गुप्त असला तरी तो जाणतां येतोच. या मनुष्यलोकीं कर्ण-शल्यासारख्या महावीरांचा पराभव करण्याचें सामर्थ्य पांडवांवांचून दुसऱ्या कोणामध्यें आहे ? शत्रूंचा वेग सहन करणारे पांची पांडव लाक्षागृहांतील त्या घोर अग्नीपासून जिवंत बाहेर पडले ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. अमात्यांसह पापी धृतराष्ट्रपुत्रांचे मनोरथ पूर्ण झाले नाहींत, याविषयीं आम्हांला मोठें समाधान वाटतें. तुमच्या मनांत गुप्त असलेल्या तुमच्या सर्व इच्छा पूर्ण होवोत. तुमचें कल्याण होवो. अग्नीप्रमाणें तुमची उत्तरोत्तर वृद्धि होवो. युधिष्ठिरा, आम्ही आतां येथें फार वेळ बसत नाहीं. इतर राजांनीं तुम्हांला ओळखूं नये म्हणून आम्ही आपल्या शिबिरासच जातों.

कृष्णाचें हें भाषण ऐकून पांडवांनीं त्यांना मोठ्या संतोषानें जाण्याची अनुज्ञा दिली व तो अक्षय, श्रीमान् वासुदेव बलदेवासह सत्वर निघून गेला. १. १२. १९१.

---

## अध्याय १९२ वा.

[ १ पांडवांच्या निवासस्थानीं धृष्टद्युम्नाचें गुप्तपणें गमन. २ चौघां पांडुपुत्रांनीं आणलेल्या भिक्षेची कुंतीच्या आज्ञेनें द्रौपदीनें केलेली वांटणी. ३ पांडवांचा वृत्तांत जाणून धृष्टद्युम्नाचें परत जाणें. ]

(१) **वैशंपायन**—हे भरतसत्तमा, ते पराक्रमी वीर भीमार्जुन आपल्या निवासस्थानाकडे चालले असतां पंचालदेशाचा राजपुत्र धृष्टद्युम्न त्यांच्या मागोमाग निघाला व कोणाच्या दृष्टीस न पडतां त्या कुलालशालेंत प्रवेश करून पांडवांच्या नकळत, त्यांच्या समीप गुप्तपणें राहिला. सायंकाळीं बलाढ्य भीमसेन, शत्रुनाशक पार्थ व महानुभाव माद्रीपुत्र नकुल-सहदेव यांनीं भिक्षा आणून तिचें युधिष्ठिराला निवेदन केलें.

(२) नंतर कुंती त्या द्रुपदात्मजेला म्हणाली—हे भद्रे, या अन्नांतून प्रथम बलि काढून ठेव. ब्राह्मणांना भिक्षा घाल व नंतर जे अन्नार्थी जन जवळपास असतील त्यांस कांहीं अन्न दे. नंतर जें शिल्लक राहील त्याचे दोन भाग कर. एक भाग भीमासाठीं तसाच ठेवून दुसऱ्या भागाचे सहा वांटे कर. त्यांतून दोन तुझ्या व माझ्यासाठीं ठेवून बाकीचे चार विभाग भीमाखेरिज माझ्या चौघां पुत्रांना दे आणि भीमासाठीं काढून ठेवलेला भाग सगळाच त्याला दे. हे वत्से, तो माझा पराक्रमी पुत्र रूपवान्, तरुण व गजेंद्रासारखा बलिष्ठ आहे. त्याची क्षुधा सदैव प्रज्वलित असते.

जनमेजया, कुंतीची ही आज्ञा आपल्या हिताची आहे असें त्या संतुष्ट झालेल्या राजकन्येनें मानिलें व त्याप्रमाणें अन्नाचे विभाग करून प्रत्येकाला त्याचा वांटा दिला असतां त्या सर्वांनीं तें अन्न भक्षण केलें. नंतर चपल सहदेवानें भूमीवर दर्भ पसरले व त्यांवर आपापलीं अजिनें आंथरून त्यांनीं भूमीवर शयन केलें. सर्व पांडव दक्षिणेकडे मस्तक करून अंथरुणावर पडले. त्यांच्या उशाकडे कुंती व पायांकडे द्रौपदी आडवें अंथरुण घालून निजल्या.

हे राजा, ती द्रुपदराजाची कन्या पांडुपुत्रांबरोबर नुस्त्या दर्भशय्येवर, त्यांच्या पायांचाहि स्पर्श होईल, इतक्या अंतरावर निजली. पण त्या वेळीं तिच्या मनाला दुःखाचा स्पर्शहि झाला नाहीं. किंवा तिनें त्या कुरुश्रेष्ठांचा अवमानहि केला नाहीं. त्या शय्येवर पडल्या पडल्या सेनाधीश होण्यास योग्य असलेले ते वीर पांडव आपसांत दिव्य अस्त्रें, रथ, गज, खड्ग, गदा, परशु इत्यादिकांविषयीं विचित्र कथा सांगूं लागले.

( ३ ) त्या वेळीं त्यांच्या त्या गोष्टी द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नानें आडून ऐकल्या व त्यांच्या पायाशीं निजलेल्या कृष्णेला त्यानें व इतर लोकांनींहि पाहिलें. नंतर तो राजपुत्र धृष्टद्युम्न रात्रीं पाहिलेला सर्व वृत्तांत द्रुपदराजाला निवेदन करण्या-साठीं त्वरेनें तिकडे गेला.

पांडवांना न ओळखिल्यामुळें खिन्न झालेल्या पांचालेश्वरानें धृष्टद्युम्नाला विचारिलें—" वत्सा, आपली कृष्णा कोठें आहे ! तिला कोणीं नेलें ! एखाद्या हीनवर्ण शूद्रानें किंवा कर देणाऱ्या वैश्यानें तिला जिंकून आपला चिखलाचा पाय माझ्या मस्तकावर दिला नाहींना ! किंवा ही माझी पुष्पमाला श्मशानांत तर पडली नाहींना ! हा वीर आपल्याच वर्णाचा क्षत्रिय आहे किंवा कोणी श्रेष्ठ वर्णाचा ब्राह्मण आहे ! हे पुत्रा, एखाद्या हीन वर्णाच्या मनुष्यानें आज याज्ञ-सेनीच्या अभिलाषानें मुद्दाम आपला डावा पाय माझ्या मस्तकावर ठेविला नाहीं ना ! परंतु तूं खिन्न दिसत नाहींस, तर उलट अशाप्रकारचें शौर्य अन्यत्र संभवत नसल्यामुळें नरवीर पार्थाशीं संयुक्त झाल्याप्रमाणें अत्यंत संतुष्ट दिस-तोस. यास्तव माझी कन्या आज कोणीं जिंकून नेली तें मला सांग. विचित्र-वीर्याचे पौत्र कुरुश्रेष्ठ पांडव जिवंत आहेत ना ! आज धनुष्य सज्ज करून लक्ष्याचा वेध करणारा तो मध्यम पांडव पार्थ तर नव्हे ?" १. १२. १९२.

येथें बारावें स्वयंवरपर्व समाप्त झालें.

---

# वैवाहिकपर्व १३.



## अध्याय १९३ वा.

[ १ धृष्टद्युम्नानें सांगितलेला पांडवांचा वृत्तांत. २ द्रुपदाच्या पुरोहिताचें पांडवांकडे शोधासाठीं आगमन. ३ त्यास युधिष्ठिराचें संदिग्ध उत्तर. ]

(१) वैशंपायन—राजा जनमेजया, द्रुपदाचे ते प्रश्न ऐकून सोमकवंशांतील श्रेष्ठ राजपुत्र धृष्टद्युम्नानें प्रसन्न मुखानें कृष्णेचें हरण करणारांचा सर्व वृत्तांत पित्याला कथन केला. तो म्हणाला—" स्वयंवरासाठीं जमलेल्या वीरांमध्यें जो आरक्त व विशाल नेत्राचा, कृष्णाजिन पांघरलेला व देवासारखा सुस्वरूप तरुण होता, ज्यानें तें धनुष्य सज्य करून यंत्रभेद केला व तें लक्ष्य भूमीवर पाडविलें,

ज्या वीराला श्रेष्ठ ब्राह्मणांनीं मोठ्या आदरानें सभोंवार वेढलें, देव व ऋषि यांनीं सेवन केलेला इंद्र दैत्यांचा जसा पराभव करतो, त्याप्रमाणें ज्या वेगवानानें कर्णादि सर्व क्षत्रियांचा आज पराभव केला, आपली कृष्णा ज्याचें अजिन आपल्या हातीं धरून गजेंद्राच्या मागोमाग जाणाऱ्या गजवधूप्रमाणें हर्षानें चालली व त्याच्याच बरोबर चाललेल्या ज्या दुसऱ्या वीरानें एक महावृक्ष उपटून घेऊन क्रुद्ध झालेल्या अंतकाप्रमाणें राजसंघामध्यें संचार करून सर्व क्षत्रियांना पिटाळून लाविलें, ते दोघे चंद्र-सूर्यांप्रमाणें शोभणारे नरश्रेष्ठ सर्व राजांच्या समक्ष कृष्णेला घेऊन नगराच्या बाहेर असलेल्या कुलालगृहाकडे गेले.

तेथें अग्नीच्या ज्वालेसारखी एक तेजस्वी स्त्री बसली होती. ती त्यांची जननी असावी असा माझा तर्क आहे. तिच्या जवळच अग्नीसारखे देदीप्यमान तीन वीर पुरुष बसले होते. हे दोघे वीर कृष्णेसह त्या स्त्रीपाशीं गेले. तिला प्रणाम करून त्यांनीं कृष्णेलाहि 'तूं हिला वंदन कर' असें सांगितलें व त्या वृद्ध स्त्रीला नमस्कार करून बाजूला उभ्या राहिलेल्या कृष्णेला तिच्या स्वाधीन केलें. ते नरश्रेष्ठ भिक्षा मागावयास गेले. कांहीं वेळानें त्यांनीं आणलेलें तें भिक्षान्न घेऊन कृष्णेनें देवतांना बलि समर्पण केला. कांहीं अन्न ब्राह्मणांनाहि दिलें. नंतर त्या वृद्ध स्त्रीला व त्या पांचहि नरश्रेष्ठांना वाढून स्वतः कृष्णेनेंहि अविशिष्ट अन्न भक्षण केलें. हे राजन्, त्यानंतर ते सर्व वीर निजले. कृष्णाहि त्यांच्याच पायांशीं झोंपली.

ते सर्व भूमीवर दर्भ पसरून व त्यांवर अजिनें अंथरून त्यांवर निजले. त्या वेळीं प्रलय कालच्या मेघाप्रमाणें गर्जना करणाऱ्या त्या वीरांच्या आपसांत विचित्र गोष्टी चालल्या होत्या. हे तात, त्या वेळीं ते जें बोलत होते, तें वैश्य, शूद्र, किंवा ब्राह्मण यांस शोभण्यासारखें नव्हतें. हे पूज्य राजा, ते युद्धासंबंधींच गोष्टी बोलत होते. त्यावरून ते निःसंशय क्षत्रियश्रेष्ठच आहेत. पृथापुत्र त्या प्रसिद्ध अग्निदाहांतून जिवंत बाहेर पडले, असें आम्हीं ऐकलें आहे. यास्तव आमचा मनोरथ निःसंशय पूर्ण झाला आहे."

(२) धृष्टद्युम्नाचें हें भाषण ऐकून द्रुपदराजा अतिशय संतुष्ट झाला व त्यानें 'तुम्ही महात्मे पांडुपुत्रच आहां कीं काय, हें जाणण्याची आमची इच्छा आहे,' असें सांगून आपला पुरोहित पांडवांकडे पाठविला. राजाचें वचन मान्य करून तो पुरोहित पांडवांकडे गेला व त्यानें त्यांची प्रशंसा करून त्यांस

राजाचा निरोप कळविला. तो म्हणाला—" वरार्ह असलेल्या वीरांनो, वरद पंचालराजा तुम्ही कोण अहांत हें जाणण्याची इच्छा करीत आहे. लक्ष्याचा वेध करणाऱ्या या वीर पुरुषाला पाहून आमच्या राजाला पराकाष्ठेचा हर्ष झाला आहे. यास्तव तुम्ही आतां आपली ज्ञाति व कुलपरंपरा सांगून शत्रूंच्या मस्तकांवर पाय द्या. हे देवस्वरूप वीरांनो, आपलें कुल निवेदन करून तुम्ही माझ्या व सर्व आप्तांसह पंचालराजाच्या हृदयाला आल्हादित करा.

हे वीरांनो, प्रसिद्ध पांडुराजा आमच्या द्रुपदराजाचा प्राणाहूनहि प्रिय मित्र होता. आपल्या कन्येनें त्या कुरुश्रेष्ठाची स्नुषा व्हावें, हाच आमच्या श्रेष्ठराजाचा मनोरथ होता. 'अलौकिक वीर्यवान् अर्जुनानेंच माझ्या या कन्येचें पाणिग्रहण करावें,' ही इच्छा द्रुपदराजाच्या मनांत अहर्निश घोळत होती. 'आजच्या या स्वयंवरप्रसंगानें ती याची इच्छा जर पूर्ण झाली असेल, तर माझें महत्पुण्य फळास आलें व माझें पवित्र यश त्रिभुवनांत पसरलें आणि माझें परम हित झालें असें मी समजेन,' असें तो राजा म्हणत आहे."

याप्रमाणें बोलून तो पुरोहित नम्रपणें बसला असतां युधिष्ठिरानें समीप असलेल्या आज्ञाधारक भीमाला म्हटलें—" हे वत्सा, द्रुपदराजाच्या पुरोहिताला अर्घ्य-पाद्य देऊन त्याचा सत्कार कर. हा राजाला मान्य असल्यामुळें याचा विशेष सत्कार करणें योग्य आहे." ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेप्रमाणें भीमानें त्याचा सत्कार केला. त्या पूजेचा मोठ्या हर्षानें स्वीकार करून सुखासनावर बसलेल्या पुरोहिताला युधिष्ठिर म्हणाला—

( ३ ) " हे विप्रश्रेष्ठा, पंचालराजानें क्षत्रियांना उचित अशा धर्मानेंच पण लावून आपल्या कन्येचा स्वयंवर आरंभिला. आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें कसा तरी अधर्मानें स्वयंवर केला नाहीं. त्यांत वर्ण, शील, कुल, गोत्र यांची कांहीं अपेक्षा नव्हती. हें धनुष्य सज्य करून लक्ष्यवेध करणें हीच त्याची मुख्य अट होती. त्याला अनुसरून या महात्म्यानें त्या नृपमंडलासमोर लक्ष्यभेद करून कृष्णेला जिंकिलें आहे. असें असतां आतां राजा द्रुपदानें या वीराच्या कुलशीलाविषयीं साशंक होणें उचित नाहीं. तथापि त्या नृपश्रेष्ठाचा मनोरथहि पूर्ण होईल.

कारण हे ब्राह्मणा, ही अप्रतिम रूपवती राजकन्या भलत्याच हीनपुरुषाला कदापि प्राप्त होणार नाहीं, असेंच मी समजतों. त्या प्रचंड धनुष्यावर गुण

चढविण्यास व त्या लक्ष्याचा भेद करून तें भूमीवर पाडविण्यास कोणीहि अस्त्रविद्याशून्य, हीनकुलोत्पन्न दुर्बल मनुष्य समर्थ होणार नाहीं. म्हणून मी म्हणतों कीं पंचालराजाला आज पश्चात्ताप करण्याचें कांहीं कारण नाहीं. हे विप्रेंद्रा, द्रुपदराजानें ज्या कृत्रिम लक्ष्याला अंतरिक्षांत योजून ठेविलें होतें, त्याला खालीं पाडविणें भूलोकांतील मानवाला शक्य नाहीं. यास्तव हें महत्कार्य असामान्य मनुष्यानेंच केलें आहे, एवढेंच निश्चयानें जाणून तुम्ही आतां स्वस्थ रहा."

जनमेजया, युधिष्ठिर जों इतकें बोलत आहे, तों पंचालराजाकडून दुसरा एक योग्य अधिकारी तेथें त्वरेनें आला व नम्रपणें म्हणाला—"महाराज, भोजन सिद्ध आहे. यास्तव आपण सर्वांनीं राजगृहीं चलावें." १. १३. १९३.

---

## अध्याय १९४ वा.

[ १ पांडवांचें कुंतीसह द्रुपदमंदिरांत गमन. २ त्यांचा सत्कार व परीक्षा. ]

( १ ) वैशंपायन—हे कुरुश्रेष्ठा, द्रुपदराजाकडून पांडवांस पाचारण करावयास आलेला तो दूत पुढें म्हणाला—"हे श्रेष्ठ वीरहो, पंचालेश्वर द्रुपदानें विवाहाप्रीत्यर्थ वरपक्षीय मंडळीसाठीं भोजनसमारंभ केला आहे; तरी आपलें सर्व नित्य कर्म उरकून राजकन्या कृष्णेसह त्वरित भोजनास चलावें व तेथेंच कृष्णेचें पाणिग्रहण करावें. भूपालांना योग्य अशा उत्तम अश्वांनीं युक्त असलेले व सुवर्णकमलांनीं अलंकृत केलेले हे रथ आपणांसाठीं आणले आहेत, त्यांतून आपण द्रुपदाच्या मंदिराकडे चलावें."

राजेंद्रा, याप्रमाणें द्रुपदाचा निरोप ऐकून युधिष्ठिरानें त्या राजपुरोहिताला पुढें पाठविलें. नंतर ते सर्व कुरुश्रेष्ठ त्या सुशोभित भव्य रथांत बसून जावयास निघाले. कृष्णा व कुंती एकाच रथांत बसल्या व ते पांचहि वीर भ्राते निरनिराळ्या रथांत बसून राजमंदिरांत आले.

हे भारता, इकडे पुरोहिताच्या तोंडून युधिष्ठिराचें भाषण ऐकून बुद्धिमान् द्रुपदराजानें ते क्षत्रियश्रेष्ठ पांडवच आहेत कीं काय या जिज्ञासेनें त्यांची परीक्षा पहाण्यासाठीं एक युक्ति योजली. त्यानें एक लहानसें पदार्थसंग्रहालय तयार केलें व तेथें नानाप्रकारच्या वस्तु ठेविल्या.

ब्राह्मणोपयोगी यज्ञपात्रें, अजिनें, फळें व विचित्र पुष्पमाला, क्षत्रियांचें लक्ष वेधणारीं चिलखतें, ढाली व धनुष्यें व वैश्यांना प्रिय असलेल्या गायी, बैल, दावीं, त्याचप्रमाणें शेतकीचीं सर्व आउतें, बियाणें व विविध धान्यें, शिल्प-कामाचीं हत्यारें, ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या रुचीप्रमाणें भिन्न भिन्न प्रकारचीं क्रीडासाधनें; तरवारी, उत्कृष्ट धनुष्यें, विचित्र बाण, शक्ति, भाले, पट्टे, भुशुंडी, परशु, अश्व, रथ इत्यादि युद्धसामग्री, उत्तम शृंगारलेलीं आसनें, मऊ शय्या, रत्नजडित अलंकार व मूल्यवान् वस्त्रें इत्यादि विविध वस्तु तेथें व्यवस्थित ठेवल्या होत्या.

( २ ) राजा जनमेजया, राजभवनापाशीं आल्यावर साध्वी कृष्णेला बरोबर घेऊन कुंतीनें द्रुपदराजाच्या मंदिरांत प्रवेश केला, तेव्हां द्रुपदाच्या स्त्रियांनीं त्या राजमातेचें स्वागत करून संतुष्ट चित्तानें तिला अंतःपुरांत नेलें. सिंहाच्या चालीनें चालणाऱ्या त्या भव्य पांडुपुत्रांनीं उत्तरीय वस्त्रासारखीं अजिनें पांघरलीं होतीं. त्यांचे नेत्र मत्त वृषभाच्या नेत्रांसारखे, खांदे भरींव व बाहु वासुकीच्या शरीरा-सारखे लांब व पुष्ट होते. त्यांना पाहून राजाचे सर्व मंत्री, सुहृद् व राजपुत्रांसह तो द्रुपदराजा अतिशय संतुष्ट झाला.

पादपीठांनीं युक्त असलेल्या मूल्यवान् आसनांवर ते पांचहि वीर निःशंकपणें बसले. आपापल्या मानाप्रमाणें ते क्रमानें बसले असतां तेथील अप्रतिम राजैश्वर्य पाहून त्यांना यत्किंचित्‌हि विस्मय वाटला नाहीं.

नंतर उत्तम वस्त्रं परिधान केलेल्या दासी, दास व परिचारक यांनीं सुवर्णाच्या व रुप्याच्या पात्रांतून नृपांना योग्य असे उत्तम भोज्यादि पदार्थ त्यांना वाढले. त्या वीरांचें भोजन झाल्यावर दासींनीं दिलेला सुवासिक तांबूल ग्रहण करून ते पदार्थसंग्रह पहावयास निघाले. पण तेथील इतर सर्व वस्तूंची उपेक्षा करून प्रथम ते युद्धसामग्री अवलोकन करूं लागले. तें पाहून संतुष्ट झालेला द्रुपदराजा व त्याचे मुख्य मंत्री यांनीं हे वीर कुंतीपुत्र पांडवच आहेत अशी कल्पना केली. १. १३. १९४.

## अध्याय १९५ वा.

[ १ आम्ही पांडवच आहों, असें युधिष्ठिराच्या तोंडून ऐकून द्रुपदाचा संतोष. २ विवाहाविषयीं त्यांचा संवाद. ]

( १ ) वैशंपायन—हे राजन्, त्यानंतर पंचालेश्वर द्रुपदानें राजपुत्र युधिष्ठिराला आपल्या समीप बोलाविलें, ब्राह्मणांना उचित असा त्याचा सत्कार केला व त्या महातेजस्वी कुंतीपुत्राला म्हटलें—" हे वीरा, तुम्ही कोण अहांत ! तुम्ही क्षत्रिय किंवा ब्राह्मण अहांत ! अथवा गुणसंपन्न वैश्य, कीं शूद्र अहांत ? मीं तुम्हांस कसें ओळखावें ! किंवा तुम्ही ब्राह्मणवेष धारण करून सर्वत्र संचार करणारे मायावी राक्षस कृष्णेला जिंकण्याच्या हेतूनें आलां अहां कीं, स्वयंवर पहाण्यासाठीं आलेले देव अहांत ! यांतील सत्य काय, तें आम्हांला सांग. आमच्या मनांत संशयकल्लोळ उठला आहे. तुम्ही याचें जेव्हां निरसन कराल तेव्हांच आम्हांला संतोष होईल. हे परंतपा, आमचें भाग्य शुभ आहेना ! यास्तव जें सत्य असेल तेंच सांग. राजांच्या समोर सत्यभाषणच शोभतें. जर तूं असत्य भाषण केलेंस तर यज्ञ, याग व इष्टापूर्त या धर्माचरणांनीं संपादिलेलें तुझें सर्व पुण्य नाश पावेल. हे श्रेष्ठा, तूं असत्य भाषण करूं नको. हे अमरतुल्य पुरुषश्रेष्ठा, तुझें भाषण ऐकून मी तत्काल कृष्णेचा यथाविधि विवाह करून देण्याचा निश्चय केला आहे. "

द्रुपदराजाचें हें भाषण ऐकून धर्मात्मा युधिष्ठिर म्हणाला—" हे पंचालेश्वरा, तूं खिन्न होऊं नको. प्रसन्नचित्त हो. तुझा मनोरथ निःसंशय पूर्ण झाला आहे. हे राजन्, आम्ही क्षत्रिय आहों. महात्म्या पांडुराजाचा मी ज्येष्ठपुत्र आहें. नृपसभेंत तुझ्या कन्येला जिंकणारे हे दोघे कुंतीपुत्र भीमार्जुन आहेत व ते दोघे माद्रीपुत्र नकुल-सहदेव असून आंत कृष्णेजवळ बसलेली आमची माता कुंती आहे. यास्तव हे राजन्, तूं मुळींच दुःखी होऊं नको. कारण एका सरोवरांतील पद्मिनी जशी दुसऱ्या सरोवरांत जावी, तशी ही राजकन्या एका क्षत्रियकुलांतून दुसऱ्या क्षत्रियकुलांतच प्रवेश करीत आहे. याप्रमाणें हे महाराज, मी तुला सर्व खरा वृत्तान्त सांगितला आहे. तूं आमच्या पूज्य वडिलांच्या स्थानीं असून आम्हांला आतां केवल तुझाच आधार आहे. "

राजा, युधिष्ठिराचें हें भाषण ऐकतांच द्रुपदराजाचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. हर्षातिशयानें त्याचा कंठ दाटून आला. त्यामुळें त्याच्या मुखांतून शब्द

उमटेना. तेव्हां क्षणभर थांबून त्यानें मोठ्या यत्नानें आपला हर्ष आवरला व त्या वेळेला योग्य असें प्रतिवचन तो युधिष्ठिराला बोलला.

नंतर त्या धर्मात्म्यानें ज्येष्ठ पांडवाला ते वारणावतांतून कसे निसटून गेले, इत्यादि सर्व वृत्तान्त विचारिला. तेव्हां त्यानें लाक्षागृहांतून मोठ्या कष्टानें बाहेर पडल्यापासून घडलेला इत्थंभूत वृत्तान्त त्यांस सविस्तर निवेदन केला. कुंतीपुत्र युधिष्ठिरानें सांगितलेलें वृत्त ऐकून वक्त्यांतील श्रेष्ठ द्रुपदराजानें कौरवाधिप धृतराष्ट्राची अतिशय निर्भर्त्सना केली आणि त्या कुंतीपुत्र युधिष्ठिराला आश्वासन देऊन त्यांचें राज्य परत मिळवून देण्याची प्रतिज्ञा केली.

त्यानंतर कुंती, कृष्णा, भीमसेन, पार्थ व नकुल-सहदेव यांनीं राजानें दाखविलेल्या भव्य मंदिरांत प्रवेश केला. तेथें यज्ञसेनानें त्यांचा सत्कार केल्यावर ते पांडव त्याच राजभवनांत राहिले.

( २ ) इकडे द्रुपदराजा आपल्या पुत्रांसह युधिष्ठिराला म्हणाला—हे कुरुनंदना, आज पराक्रमी अर्जुनानें कृष्णेचें यथाविधि पाणिग्रहण करावें. आजचा शुभ मुहूर्त आहे. यास्तव विवाहाच्या पूर्वीं करावयाचे सर्व कुलधर्म त्याला करूं दे. त्याचें हें वचन ऐकून धर्मात्मा युधिष्ठिर म्हणाला—" हे श्रेष्ठ नरेंद्रा, मलाहि स्त्रीपरिग्रह करावयाचा आहे."

द्रुपद्—हे वीरा, तर मग तूंच माझ्या कन्येचें यथाविधि पाणिग्रहण कर. किंवा तुझ्या अन्य भ्रात्यांतून तुला जो कोणी योग्य वाटत असेल, त्यास ही कृष्णा अर्पण करावयास मला सांग.

युधिष्ठिर—हे राजन्, ही द्रौपदी आम्हां सर्वांचीच राज्ञी होईल. कारण आमची माता पूर्वींच असें वचन बोलून गेली आहे. शिवाय मी व भीमसेन हे दोघेहि ज्येष्ठ भ्राते अविवाहित असतांना अर्जुनानें हें तुझें कन्यारत्न जिंकलें आहे. हे राजेश्वरा, आम्हां पांचहि भ्रात्यांचा असा नियम आहे कीं, कोणत्याहि अमूल्य रत्नाचा लाभ झाला असतां त्याचा सर्वांनीं सारखा उपभोग घ्यावा. हे महाराजा, हा आमचा नियम मोडण्याची माझी इच्छा नाहीं. यास्तव ही कृष्णा आम्हां पांची भ्रात्यांची धर्मतः पत्नी होईल. या पांचालीनें अग्नीसमक्ष आम्हां सर्वांचें क्रमानें पाणिग्रहण करावें.

द्रुपद्—हे कुरुश्रेष्ठा, एका पुरुषाला अनेक भार्या शास्त्रसंमत आहेत, परंतु एका स्त्रीला अनेक पति मात्र ज्याअर्थीं कोठेंहि श्रुत नाहींत त्याअर्थीं अनेकपतित्व

निषिद्ध आहे. हे कुंतीपुत्रा, तूं मोठा धर्मवेत्ता व पुण्यवान् आहेस. यास्तव असा वेदविरुद्ध व लोकविरुद्ध अधर्म करणें तुला उचित नाहीं. हे कुंतीपुत्रा, तुला ही अशी विपरीत बुद्धि कशी झाली ?

युधिष्ठिर—हे महाराज, धर्म अतिशय सूक्ष्म आहे. त्याची गति आम्हांला कळत नाहीं. प्राचीन पूर्वजांच्या मार्गालाच आम्ही अनुसरतों. माझी वाणी कधींहि असत्य भाषण करीत नाहीं व बुद्धि केव्हांहि अधर्मात प्रवृत्त होत नाहीं. माझ्या मातेची अशीच आज्ञा आहे व माझेंहि मनोगत तसेंच आहे. मातेच्या आज्ञेचें केव्हांहि उल्लंघन करूं नये, असें शास्त्रवचन आहे. पित्याच्या आज्ञेसाठीं परशुरामानें निषिद्ध असलेला मातृवधहि केला. मग या गोष्टीची काय कथा ! हा शाश्वत धर्म आहे, यास्तव हे राजेंद्रा, अधिक विचार न करतां तूं माझें म्हणणें मान्य कर. हे राजा, याविषयीं तूं मुळींच साशंक होऊं नकोस.

द्रुपद—हे धर्मज्ञा, तूं, साध्वी कुंती व माझा पुत्र धृष्टद्युम्न हीं तिघें जें कांहीं ठरवाल तें मला मान्य आहे. त्याप्रमाणें आपण उद्यां योग्य समयीं याचा विचार करूं. राजा जनमेजया, त्यानंतर दुसऱ्या दिवशीं ते सर्व एकत्र जमून विचार करीत असतां तेथें यदृच्छेनें कृष्णद्वैपायन मुनि आला. १. १३. १९५.

---

## अध्याय १९६ वा.

[ १ व्यासाज्ञेवरून द्रौपदीच्या बहुपतित्वाविषयीं द्रुपदादिकांचें मतकथन. ]

(१) वैशंपायन—हे राजा, भगवान् व्यास अकस्मात् प्रकट झाल्याचें पाहून ते सर्व पांडव व महायशस्वी पांचाल्य द्रुपद आपापल्या आसनावरून एकदम उठून उभे राहिले व त्या सर्वांनीं महात्म्या कृष्ण द्वैपायनाला अभिवादन केलें. त्यांच्या त्या सत्काराचा स्वीकार करून व त्यांना कुशल विचारून तो उदार बुद्धि व्यास सुवर्णाच्या शुद्ध आसनावर बसला व त्यानें त्या सर्वांना बसावयास सांगितलें.

तेव्हां ते नरश्रेष्ठ मूल्यवान् आसनांवर बसले असतां कांहीं वेळानें पृषतपुत्र द्रुपद त्या महात्म्याला द्रौपदीसाठीं मधुर वाणीनें म्हणाला—" हे भगवन्, एक कन्या अनेक पुरुषांची धर्मपत्नी कशी होऊं शकेल व त्यामुळें संकर झाल्यावांचून कसा राहील, हें सर्व मला यथाशास्त्र निवेदन कर." तें ऐकून व्यास

म्हणाला—" हा धर्म अति गहन असल्यामुळें शास्त्रीय कापट्यानें प्रतिहत झाला आहे. त्यामुळेंच तो लोक व वेद यांच्याशीं विरुद्ध आहे असें वाटतें. यास्तव तुम्हांपैकीं कोणाचें काय मत आहे, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे."

द्रुपद्—हे द्विजश्रेष्ठा, लोक व वेद या दोहोंच्याहि विरुद्ध असा हा अधर्म आहे असें माझें निश्चित मत आहे. अनेक पुरुषांची एक पत्नी असणें सर्वथा अनुचित होय. पूर्वींच्या महात्म्यांनींहि या धर्माचें आचरण केलेलें नाहीं. विद्वानांनीं अधर्माचें आचरण कोणत्याहि कारणानें करूं नये, असा शास्त्रसिद्धांत आहे. यास्तव असलें अधर्म कृत्य करण्याचा निश्चय मी केव्हांहि करणार नाहीं. हा धर्म मला सर्वदाच संदिग्ध आहे, असें वाटतें.

धृष्टद्युम्न—पूज्य महर्षे, ज्येष्ठ भ्राता सदाचारसंपन्न असतांना तो कनिष्ठ भ्रात्याच्या भार्येशीं असा असद्व्यवहार कसा करील ! हे तपोधना, धर्म अतिशय सूक्ष्म असल्यामुळें आम्हांला त्याचें स्वरूप कळत नाहीं. हा धर्म आहे किंवा अधर्म आहे, याविषयीं आमच्यासारख्यांना निश्चय करतां येत नाहीं. यास्तव हे ब्रह्मर्षे, कृष्णेनें पांच पांडवांची महिषी व्हावें या म्हणण्याला आम्ही आपलें अनुमोदन केव्हांहि देणार नाहीं.

युधिष्ठिर—माझी वाक् केव्हांहि अनृत भाषण करीत नाहीं. माझी मति कधींहि अधर्माचें चिंतन करीत नाहीं. हा कोणत्याहि प्रकारें अधर्म होत नाहीं, असेंच माझें मन मला सांगत आहे. धर्मधारण करणारांमध्यें श्रेष्ठ असलेली 'जटिला'-नांवाची गौतमी सात ऋषींची भार्या झाली, असें पुराणांतहि श्रुत आहे. त्याच प्रमाणें मुनिकन्या वार्क्षी तपानें अतिशय शुद्धचित्त झालेल्या, प्रचेतस'-नांवाच्या दहा भ्रात्यांशीं संगत झाल्याचा प्राचीन इतिहास श्रुत आहे. हे धर्मज्ञांतील श्रेष्ठा, गुरूचें वचन धर्माला सोडून केव्हांहि नसतें, असें धर्मज्ञ सांगतात. सर्व गुरूंमध्यें माता हा श्रेष्ठ गुरु आहे आणि त्या मातेनें 'भैक्ष्याप्रमाणें हिचें सेवन करा,' असें वचन स्वमुखानें उच्चारिलें आहे. यास्तव हे द्विजोत्तमा, हा परम धर्म आहे, असें मी समजतों.

कुंती—हे भगवन्, धर्मिष्ठ युधिष्ठिर जें सांगत आहे, तें अगदीं सत्य आहे. मला अनृताचें फार भय वाटतें. मी या अनृतापासून मुक्त कशी होईन !

व्यास—हे कल्याणि, तूं भिऊं नको. तूं अनृतापासून मुक्त होशील. हा सनातन धर्म आहे. हे पांचाला, हा विहित धर्म कसा आणि तो सनातन कां,

हें मी तुम्हां सर्वांना सांगतों. तुम्ही सावधान चित्तानें ऐका. कुंतीपुत्र युधिष्ठिराच्या म्हणण्याप्रमाणें हा धर्म आहे, यांत संशय नाहीं.

राजा जनमेजया, इतकें बोलून भगवान् व्यास आपल्या आसनावरून उठला व राजा द्रुपदाचा हात आपल्या हातांत धरून त्याला राजमंदिरांतील एकान्त स्थानीं घेऊन गेला. तेव्हां पांडव, कुंती व द्रुपदपुत्र धृष्टद्युम्न स्व-स्वस्थानीं जाऊन त्या दोघांची वाट पहात राहिलीं. एकान्त स्थानीं गेल्यावर महर्षि द्वैपायनानें महात्म्या द्रुपदाला ‘ अनेकांचें एकपत्नीत्व ’ हा धर्म कसा हें समजावून सांगितलें. १. १३. १९६.

---

## अध्याय १९७ वा.

[ १ व्यासानें द्रुपदाला सांगितलेला पांडव व द्रौपदी यांचा पूर्ववृत्तान्त. ]

( १ ) भगवान् व्यास म्हणाले—हे द्रुपदराजा, पूर्वीं नैमिषारण्यांत देवांनीं सत्र आरंभिलें. त्या सत्रांत वैवस्वत यमानें शामित्राचें म्हणजे पशुवधकर्त्या ऋत्विजाचें कर्म केलें. हे भूपाला, त्या वेळीं त्या सत्रांत दीक्षा घेतलेल्या यमानें प्रजेपैकीं कोणालाहि मारिलें नाहीं. त्यामुळें त्या प्रजा अतिशय वाढल्या. मरणकालाचें अतिक्रमण झाल्यामुळें त्या मरणरहित झाल्या. तेव्हां सोम, इंद्र, वरुण, कुबेर, साध्य, रुद्र, वसु, अश्विनिकुमार व दुसरेहि सर्व देव सृष्टिकर्त्या प्रजापतीकडे जाण्याचा विचार करूं लागले. कारण मनुष्यांची अतिशय वृद्धि झाल्यामुळें त्यांना फार भीति वाटली व सुखाची इच्छा करणारे ते सर्व देव भयानें उद्विग्न होऊन ‘आपण सर्व पूज्य प्रजापतीला शरण जाऊं,’ असा निश्चय करून त्याच्याकडे जावयास निघाले. हे पांचाला, त्या लोकगुरूपाशीं येऊन पोंचल्यावर त्या सर्वांनीं पितामहास अभिवादन करून म्हटलें—“ भगवन्, आम्ही सर्व तीव्र भयानें उद्विग्न होऊन तुला शरण आलों आहों. आमच्या भीतीचें निवारण कर.”

देवांचें हें वचन ऐकून ब्रह्मदेव म्हणाला—देवांनो, तुम्ही अमर असतांना मनुष्यांना कां भितां ! तुम्ही मर्त्यांना भिणें उचित नाहीं.

तें ऐकून देव म्हणाले—जे मर्त्य होते, तेच अमर झाले आहेत. आतां मर्त्यांमध्यें व आम्हांमध्यें कांहीं अंतर राहिलें नाहीं. त्यामुळेंच आम्ही अतिशय भयभीत होऊन मनुष्यांपेक्षां आम्हांमध्यें कांहीं विशेष असावा, म्हणून तुला शरण आलों आहों.

राजा, देवांची ही भीति सकारण आहे, असें जाणून भगवान् प्रजापति त्यांस म्हणाला—"देवांनों, सूर्यपुत्र यमराज तुमच्या यज्ञामध्यें गुंतला आहे, त्यामुळें ते मानव मरत नाहींत. तो पितृराज या वेळीं आपल्या कार्यांत निमग्न होऊन गेला आहे. यास्तव त्याचें तें सत्रकार्य समाप्त झालें म्हणजे या सर्व लोकांचा अंतकाल प्राप्त होईल. त्या सूर्यपुत्राचीच योगबलानें अतिशय वृद्धि पावलेली तनु दोन प्रकारें विभक्त होऊन ती यांचा नाश करील. मनुष्यांना देवतांचें सामर्थ्य केव्हांहि प्राप्त होणार नाहीं. तुम्ही स्वस्थ रहा.

राजा यज्ञसेना, त्या आदि देवाचें हें वाक्य ऐकून सोमादि देव नैमिषारण्यांतील त्या देवसत्रांत गेले व ते सर्व वीर एकत्र बसले. इतक्यांत भागीरथींत त्यांना एक सुवर्णकमल दिसलें. तें पाहून सर्व देव विस्मित झाले. तेव्हां त्यांतील शूर इंद्र त्या कमलाचा शोध करावयास गंगेच्या उगमापाशीं गेला. तों त्याला तेथें अग्नीच्या ज्वालेसारखी एक तेजस्वी स्त्री दिसली. जलाची इच्छा करणारी ती गंगेमध्यें प्रवेश करून रडत होती. तिच्या नेत्रांतून गंगेंत पडलेला प्रत्येक अश्रुबिंदु सुवर्णकमल होत असे.

तें आश्चर्य पाहून वज्रधर इंद्र त्या स्त्रीजवळ जाऊन म्हणाला—हे भद्रे, तूं कोण आहेस व अशी रडतेस कां! तुझ्या दुःखाचें खरें कारण ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव खरें काय असेल तें सांग.

इंद्राचा हा प्रश्न ऐकून ती स्त्री म्हणाली—हे इंद्रा, मी पुढें होतें व तूं माझ्या मागून ये. म्हणजे मी मंदभागिनी कोण आहें व कां रडत आहें, तें तुला कळेल. ज्यासाठीं मी रडत आहें, तें कारण तुला साक्षात् दिसेल.

हे पार्षता, इतकें बोलून ती सुंदरी पुढें जाऊं लागली व इंद्रहि तिच्या मागोमाग चालला. कांहीं वेळानें तीं दोघें हिमालयपर्वताच्या शिखरावर चढून गेलीं. तेव्हां तेथें इंद्रानें एका सिंहासनस्थ सुंदर तरुणाला एका तरुणीबरोबर फांशांनीं खेळत असलेलें पाहिलें. तो तरुण पुरुष साक्षात् रुद्रच होता. पण क्रुद्ध झालेला देवराज त्यास म्हणाला—"हे विद्वाना, हें सर्व भुवन माझें आहे. तें माझ्या अधीन आहे. मी त्याचा प्रभु आहें. असें असतांना तूं फांशांनीं खेळण्यांतच मग्न झाला आहेस, माझ्याकडे पहातहि नाहींस. तूं इतका प्रमत्त कां झालास! तुला या वेळीं शासन करणेंच उचित आहे."

द्रुपदा, असें बोलून देवेंद्रानें त्याला मारण्यासाठीं आपलें वज्र उगारलें. तेव्हां इंद्राला मोठा क्रोध आला आहे, असें जाणून महादेव अनादरानें हंसला व

वज्रप्रहार करण्याची इच्छा करणाऱ्या इंद्राकडे त्यानें वर मान करून हळूच नुसतें पाहिलें. रुद्रानें त्याच्याकडे पहातांच देवराज स्तंभासारखा स्तब्ध होऊन उभा राहिला. त्याला इकडचा हात तिकडे करतां येईना. मग वज्राचा प्रहार करण्याचें तर दूरच राहिलें. तशा स्थितींत इंद्र बराच वेळ उभा राहिला.

शेवटीं त्या पार्वतीपतीची अक्षक्रीडा जेव्हां संपली, तेव्हां तो भगवान् त्या रडणाऱ्या स्त्रीला म्हणाला—" हे भामिनि, याला इकडे घेऊन ये. माझ्या समोर हा पुनरपि असा दर्प करणार नाहीं, अशी मी योजना करितों." रुद्राची ही आज्ञा ऐकून ती स्त्री इंद्रापाशीं गेली व त्याला स्पर्श करतांच त्याचीं सर्व अंगें शिथिल होऊन तो भूमीवर पडला.

तेव्हां उग्र तेजस्वी भगवान् रुद्र त्याला म्हणाला—हे इंद्रा, तूं पुनः केव्हांहि असा अतिप्रसंग करूं नको. तुझें बल व वीर्य अमर्याद आहे. यास्तव तूं गुहेच्या द्वाराला झांकून टाकणाऱ्या या पर्वताला दूर करून तींत प्रवेश कर. तेथें तुझ्यासारखे दुसरे चार पुरुष आहेत. त्यांची कांति सूर्यासारखी आहे. तूंहि त्यांच्याच बरोबर आपल्या अपराधाचें फळ भोगीत रहा.

रुद्राच्या आज्ञेप्रमाणें गुहेच्या द्वारावरील पर्वत दूर सारून इंद्रानें त्या महागिरीच्या गुहेंत आपल्या सारखेच तेजस्वी आणखी चार पुरुष पाहिले. त्यांना अवलोकन करून ' माझीहि स्थिति यांच्या सारखीच होणार नाहींना ?' असें म्हणून इंद्र अतिशय दुःखी झाला व रुद्राच्या आज्ञेप्रमाणें गुहेंत शिरला नाहीं.

तेव्हां अतिशय क्रुद्ध झालेला भवानीपति डोळे वटारून इंद्रास म्हणाला—" हे शतक्रतो, तूं या विवरांत प्रवेश कर. कारण तूं अज्ञानानें माझा अवमान केला आहेस. त्या अपराधाचें फल तुला भोगिलेंच पाहिजे." रुद्राचें हें उग्र भाषण ऐकून देवराज दुःखानें भिऊन थरथर कांपूं लागला. वाऱ्यानें उडविलेल्या पिंपळाच्या पानाची जी अवस्था होते, तीच स्थिति ज्याचीं अंगें शिथिल झालीं आहेत, अशा इंद्राची झाली आणि तो हिमालयपर्वताच्या शिखरावर गलित पर्णासारखा हतबल होऊन, हात जोडून उभा राहिला.

तें पाहून वृषभवाहन रुद्र भयानें कांपणाऱ्या त्या इंद्राला पुनः क्रोधानें म्हणाला—" या दरींत सत्वर प्रवेश कर."

रुद्राचें तें उग्र स्वरूप पाहून इंद्र त्याला म्हणाला—" हे भव, या सर्व सृष्टीचा तूंच स्वामी आहेस."

हें ऐकून रुद्र हंसून म्हणाला—अशा प्रकारचें शील असलेल्या तुझ्यासारख्या लोकांवर मी केव्हांहि प्रसन्न होत नसतों. हे चौघेहि पूर्वीं तुझ्यासारखेच उन्मत्त झाले होते. यास्तव आतां तूं या दरींत प्रवेश करून तेथेंच पडून रहा. तुम्ही सर्वजण मनुष्ययोनींत जन्म घेऊन तेथेंहि असेच दुर्धर्ष व्हाल. पृथ्वीवर अलौकिक कर्में करून व असंख्य लोकांचे प्राण हरण करून पुनः तुम्ही सर्वजण पूर्वसंचितानें संपादिलेल्या आपल्या इंद्रलोकाला प्राप्त व्हाल. माझ्या या अर्थपूर्ण सांगण्याप्रमाणें वागणें हेंच तुमचें आतां कर्तव्य आहे.

रुद्राचें हें भाषण ऐकून पूर्वीचे चौघे इंद्र म्हणाले—हे महेश्वरा, जेथें मोक्ष अतिशय दुर्लभ आहे, अशा या देवलोकांतून आम्ही मनुष्यलोकीं जाऊं; परंतु हे ईश्वरा, आमच्या जननीच्या ठिकाणीं यम, वायु, इंद्र व अश्विनिकुमार या देवतांपासून आमची उत्पत्ति झाली पाहिजे. त्या भूलोकीं दिव्य अस्त्रांनीं युक्त होऊन, मानवांशीं युद्ध करून आम्ही पुनः इंद्रलोकीं परत येऊं.

हे पंचालेश्वरा, त्या पूर्वेंद्रांचें तें भाषण ऐकून पांचवा इंद्र पुनः म्हणाला—" या कार्यासाठीं उत्पन्न होणाऱ्या पांच पुरुषांपैकीं मी आज माझा एक अंश देतों. " याप्रमाणें त्या ईश्वराशीं संकेत करणाऱ्या पांच दिव्य पुरुषांतील पहिला विश्वभुक्, दुसरा भूतधामा, तिसरा शिबि, चवथा शांति व पांचवा पराक्रमी इंद्र होता. भगवान् शंकरानें 'त्यांची ती इच्छा पूर्ण होईल' असा वर दिला व मनुष्यलोकामध्यें उत्पन्न झालेल्या त्या पांचजणांच्या स्त्रीरूपी लोकमनोहर श्रीला त्यांची भार्या नियत केली.

त्यानंतर रुद्र त्या सर्वांना बरोबर घेऊन अप्रमेय, अनंत, अव्यक्त, अज, पुराण, सनातन विश्वरूप नारायणाकडे गेला व त्यानें त्यास हें वृत्त निवेदन केलें. तेव्हां त्या विश्वचालकानें ही योजना मान्य केली व आपल्या मस्तकावरील एक कृष्ण व एक शुक्ल असे दोन केंस उपटून ते आपले अंश यदुकुलांतील देवकी व रोहिणी या दोन श्रेष्ठ स्त्रियांच्या ठिकाणीं स्थापन केले. त्या विश्वरूप देवाच्या शुभ्र केंसापासून बलराम झाला आणि काळ्या केंसापासून केशव उत्पन्न झाला. त्याच्या वर्णावरून त्याला 'कृष्ण' हें नांव प्राप्त झालें. त्या उत्तर पर्वताच्या दरींत अडकवून ठेवलेले ते पूर्वीचे इंद्रच इहलोकीं हे वीर्यवान् पांडव झाले आहेत. त्यांतील इंद्राच्या अंशापासून हा सव्यसाची धनंजय झाला आहे.

हे राजा, याप्रमाणें पूर्वीं इंद्र असलेले ते महात्मेच या लोकीं पांडव झाले आहेत आणि मी पूर्वीं जिचें वर्णन केलें ती श्रीच त्यांची भार्या होण्यासाठीं

ही दिव्यरूप धारण करणारी द्रौपदी उत्पन्न झाली आहे. कारण दैवयोगावांचून चंद्र-सूर्यासारखें जिचें अप्रतिम रूप आहे व जिच्या अंगाचा सुवास कोसभर पसरतो, अशी अलौकिक दिव्य कन्या या पृथ्वीतलांतून अयोनिसंभव उद्भवणें कसें संभवतें! हे राजेंद्रा, मी तुजवर प्रसन्न होऊन तुला दिव्य दृष्टि प्राप्त होण्याचा अद्भुत वर देतों. त्यायोगें तूं या कुंतीपुत्रांना पूर्वजन्मींच्या पुण्यकारक दिव्य देहांनीं युक्त असलेलें पहाशील."

त्यानंतर त्या तपस्वी, परम उदार कर्में करणाऱ्या, पवित्र व्यास महर्षीनें आपल्या तपःसामर्थ्यानें त्या द्रुपदराजाला दिव्य दृष्टि दिली. तेव्हां त्या पांचालेश्वरानें पांची पांडवांस पूर्वी वर्णिलेल्या दिव्य स्वरूपांत पाहिलें. त्या दिव्य पुरुषांचे दिव्य देह अग्नि व सूर्य यांसारखे तेजस्वी, इंद्रासारखे दृढ, रत्नजडित सुवर्णकिरीट धारण करणारे, अतिशय मनोहर, तरुण व ताल वृक्षासारखे उंच असून ते शुभ्र दिव्य वस्त्रांनीं व श्रेष्ठ सुगंधी मालांनीं अतिशय शोभत होते. ते साक्षात् रुद्र, वसु, किंवा सर्व गुणसंपन्न आदित्यच आहेत कीं काय, असा त्या राजाला भास झाला. त्या चारी पूर्वेंद्रांना पाहून व अर्जुन हा इंद्राचा तत्तुल्य पुत्र आहे, असें व्यासमुखानें ऐकून द्रुपदराजा संतुष्ट झाला व ती अद्भुत दिव्य माया साक्षात् अवलोकन करून विस्मित झाला.

त्या पांच पूर्वेंद्रांबरोबरच त्यांचें रूप, तेज व यश यांस सर्व प्रकारें अनुरूप अशी ती दिव्य स्त्रीहि त्याच्या दृष्टीस पडली. चंद्र व अग्नि यांच्या सारख्या तेजानें युक्त असलेली ती दिव्य स्त्री त्यांची पत्नी असावी, असें त्याला वाटलें. राजा जनमेजया, तें महदाश्चर्य पाहून द्रुपदानें सत्यवतीपुत्राचे दोन्ही चरण घट्ट धरिले व 'हे महर्षे, तुझ्या ठिकाणीं हें कांहीं मोठेंसें आश्चर्य नाहीं.' असें त्यास प्रसन्न चित्तानें म्हटलें. तेव्हां भगवान् व्यास म्हणाला—"मी तुला आणखी एक इतिहास सांगतों, तो ऐक."

हे द्रुपदराजा, पूर्वी एका तपोवनामध्यें एका महात्म्या ऋषीची एक रूपवती व सुशील कन्या होती. तिला पति मिळेना. म्हणून तिनें उग्र तप आचरून शंकराला संतुष्ट केलें. तेव्हां शंकरानें 'मी प्रसन्न झालों आहें, इष्ट वर मागून घे' असें तिला म्हटलें. तें ऐकून ती कन्या वर देणाऱ्या ईश्वराला 'मीं सर्व गुणांनीं युक्त अशा पतीची इच्छा करीत आहें' असें पुनः पुनः म्हणाली.

तेव्हां त्या महादेवानें तिला 'तुझा मनोरथ पूर्ण होवो,' असा वर दिला आणि त्या शंकरानें प्रसन्न चित्तानें तिला म्हटलें—"हे भद्रे, तुला पांच पति

प्राप्त होतील." तें ऐकून ती पुनः त्या देवेशाला म्हणाली—"हे महेश्वरा, 'तुझ्या प्रसादानें मला सर्व गुणसंपन्न एकच पति प्राप्त व्हावा' अशी मी प्रार्थना करीत आहें."

राजा, तें ऐकून तो उमाकांत संतुष्ट मनानें तिला असें शुभवचन बोलला—"हे कन्ये, तूं 'मला पति दे' असें पुनः पुनः पांच वेळां म्हटलेंस. यास्तव तसेंच घडून येईल. तुझें कल्याण असो. पुढल्या जन्मीं तुला या वराची प्रतीति येईल."

हे पंचाला, तीच पूर्वजन्मींची ऋषिकन्या तुझी ही दिव्यरूप धारण करणारी दुहिता उत्पन्न झाली आहे. यास्तव हे पार्षता, ही कृष्णा पांची पांडवांची पत्नी होणेंच विहित आहे. त्यांत मुळींच दोष नाहीं. ही स्वर्गांतील 'श्री' पांडवांसाठीं तुझ्या महा यज्ञांत उत्पन्न झाली आहे. ती तीव्र तप आचरून या लोकीं तुझी कन्या झाली आहे. ही सुकुमार देवी स्वतःच्या कर्मानेंच पांच पतींची पत्नी होण्यासाठीं उत्पन्न झाली आहे. साक्षात् ब्रह्मदेवानें ही देवपत्नी निर्माण केली आहे. यास्तव हे द्रुपदराजा, हा सर्व पूर्ववृत्तान्त ऐकून तुला जसें योग्य वाटेल तसें कर. १. १३. १९७.

---

## अध्याय १९८ वा.

[ १ द्रौपदीचा पांच पांडवांशीं विवाह. ]

( १ ) वैशंपायन—हे पारिक्षिता, कृष्णद्वैपायनाचें तें भाषण ऐकून तो भाग्यवान् द्रुपदराजा संतुष्ट चित्तानें म्हणाला—"हे भगवन्, आपण सांगितलेला हा पूर्ववृत्तांत ठाऊक नसल्यामुळें मी ही कन्या एकाच पतीला देण्याचा आग्रह धरिला. परंतु दैवानें प्राप्त झालेल्या कर्तव्याचें उल्लंघन करितां येणें शक्य नाहीं. यास्तव प्राप्त कर्तव्य करणें सर्वथा उचित आहे. या लोकांतील आपल्या पुरुषार्थानें कोणाला कांहीं घडवून आणतां येत नाहीं. भवितव्यतेचें निवारण करितां येणें शक्य नाहीं. केवल वरासाठींच या कृष्णेनें पूर्वजन्मीं तप केलें व त्याचेंच हें फल तिला प्राप्त झालें आहे. ज्या अर्थीं कृष्णेनें पूर्वजन्मीं 'भगवान् मला पति देवो' असें अनेकदा म्हटलें व ईश्वरानेंहि तिला तसाच वर दिला, त्या अर्थीं शंकरच त्यांतील परम धर्म जाणण्यास समर्थ आहे. ही गोष्ट जर महेश्वराला विहित आहे तर मग तो धर्म असो किंवा अधर्म असो, माझा त्यांत कांहीं दोष नाहीं. यास्तव ही कृष्णा त्या पांचहि भ्रात्यांचें विधियुक्त पाणिग्रहण करो."

हे भारता, द्रुपदराजाची अशी संमति मिळतांच भगवान् व्यास युधिष्ठिराला म्हणाला—"हे वत्सा, आज शुभ दिवस आहे, आज चंद्र बहु संततिप्रद पौष्य योगास प्राप्त होत आहे. यास्तव हे ज्येष्ठ पांडवा, आज प्रथम तूं कृष्णेचें पाणिग्रहण कर." त्यानंतर पुत्रांसह यज्ञसेनराजानें वरपक्षीय लोकांना विपुल व विविध धन दिलें. कृष्णेला मंगल स्नान घालून व अनेक रत्नांनीं भूषित करून मंडपांत आणविलें. इतक्यांत राजाचे सर्व सुहृद् व मंत्रीहि तेथें आले. अतिशय संतुष्ट झालेले ब्राह्मण व मुख्य मुख्य पौरजन कृष्णेचा विवाह पहावयास राजगृहांत एकत्र जमले. त्यामुळें ज्याचें अंगण विस्तीर्ण कमलमालांनीं सुशोभित केलें आहे, असें तें राजगृह श्रेष्ठ जन, सैन्यसमूह व विविध रत्नें यांच्या योगानें नक्षत्रयुक्त निर्मल आकाशाप्रमाणें शोभलें.

त्यानंतर तरुण पांडव मंगल स्नान व मंगल क्रिया करून कानांत कुंडलें घालून, महावस्त्रें नेसून, चंदनाची उटी लावून व विचित्र भूषणांनीं भूषित होऊन अग्नीसारख्या तेजस्वी धौम्य पुरोहितासह क्रमानें विवाहमंडपांत आले. त्यांना पहातांच तेथें जमलेल्या सर्व लोकांना मोठा हर्ष झाला. कारण मदोन्मत्त ऋषभ जसे गोठ्यांत प्रवेश करतात, तसेच ते पांची प्रसन्नमुख भ्राते एकामागून एक असे त्या मंगलस्थानीं प्रविष्ट झाले.

त्यावेळीं त्यांच्या वेदवेत्त्या पुरोहितानें अग्नीचें आधान करून प्रदीप्त हुताशनामध्यें मंत्रयुक्त हवन केलें व युधिष्ठिराला अग्नीसमीप आणून त्याच्याकडून कृष्णेचें मंत्रयुक्त पाणिग्रहण करविलें. त्या वेदविधिज्ञ धौम्यानें परस्परांचा हात धरवून त्यांच्याकडून अग्नीला प्रदक्षिणा करविली व रणांगणांत शोभणाऱ्या त्या युधिष्ठिराची आज्ञा घेऊन धौम्य-ऋषि राजगृहांतून निघून गेला.

त्यानंतर क्रमानें एकेक दिवसाच्या अंतरानें सुस्वरूप व पराक्रमी वृकोदरादि पांडवांनींहि त्या श्रेष्ठ स्त्रीचें पाणिग्रहण पूर्वोक्त विधीनेंच केलें. त्यावेळीं देवर्षीच्या सांगण्याप्रमाणें एक अलौकिक चमत्कार घडला. द्रौपदी प्रतिदिवशीं एकेका पांडवाचें पाणिग्रहण जरी करीत होती, तरी तो दिवस निघून गेला असतां दुसऱ्या दिवशीं ती सुंदरी कन्याच होत असे.

याप्रमाणें पांची पांडवांशीं द्रौपदीचा यथाविधि विवाह झाला असतां द्रुपदानें त्या पांची महारथांना अनेक प्रकारचें सर्वोत्तम धन दिलें. सुवर्णाच्या रश्मींनीं युक्त असलेले चार अश्व जोडलेले प्रत्येकाला शंभर शंभर सुवर्ण रथ दिले.

त्याच प्रमाणें पर्वताच्या सुवर्ण शिखरासारखे शोभणारे व उत्तम लक्षणांनीं युक्त असे प्रचंड शंभर गज दिले. तशाच उत्तम वस्त्रालंकारांनीं भूषित केलेल्या तरुण शंभर दासी प्रत्येकाला पृथक् पृथक् दिल्या. त्या द्रुपदराजानें अग्नीसमक्ष त्यांना आणखीहि इतर मूल्यवान् देणग्या, वस्त्रें, भूषणें व धन अर्पण केलें.

जनमेजया, त्याप्रमाणें विवाहविधि झाल्यानंतर ते इंद्रासारखे महाबलाढ्य पांडव प्राप्त झालेलीं विपुल रत्नें घेऊन, साक्षात् लक्ष्मीप्रमाणें शोभणाऱ्या द्रौपदीसह, त्या पंचालेश्वराच्या नगरांत कांहीं काल राहिले. १. १३. १९८.

---

## अध्याय १९९ वा.

[ १ द्रौपदीला कुंतीचा आशीर्वाद. २ पांडवांना श्रीकृष्णकडून अहेर. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, याप्रमाणें पांडवांचा द्रुपदाशीं निकट आप्तसंबंध जडल्यामुळें त्यांना देवांपासूनहि भय राहिलें नाहीं. त्यानंतर महात्म्या द्रुपदाच्या स्त्रियांनीं कुंतीपाशीं येऊन आपापलीं नांवें सांगून तिच्या चरणांवर मस्तकें ठेविलीं. त्यावेळीं जिनें उंची रेशमी वस्त्र परिधान केलें आहे व सौभाग्यालंकार धारण केले आहेत अशी कृष्णा सासूला नमस्कार करून हात जोडून उभी राहिली.

तेव्हां त्या रूपवती, सुशील व सद्गुणी स्नुषेला पाहून पृथा प्रेमानें असें आशीर्वचन बोलली—"हे शोभने, इंद्राला जशी शची, अग्नीला जशी स्वाहा, नलाला जशी दमयंती, चंद्राला जशी रोहिणी, कुबेराला जशी भद्रा, वसिष्ठाला जशी अरुंधती व नारायणाला जशी लक्ष्मी तशी तूं आपल्या पतींना शोभविणारी हो. हे वत्से, तुला दीर्घायु वीर पुत्र होवोत. तूं यज्ञपत्नी, पतिव्रता व सर्वैश्वर्यसंपन्न होऊन विपुल सुख भोग, अतिथि, अभ्यागत, साधु, आबालवृद्ध व गुरुजन यांचा यथायोग्य सत्कार करण्यांत तुझें आयुष्य दीर्घ काल जावो.

हे धर्मवत्सले, कुरुजांगलादि राष्ट्रें व नगरें यांची तूं आपल्या सार्वभौम पतींसह अभिषिक्त सम्राज्ञी हो. तुझ्या वीर पतींनीं स्वपराक्रमानें जिंकलेली पृथ्वी अश्वमेधादि महाक्रतूंमध्यें ब्राह्मणांना अर्पण कर. हे गुणवति, पृथ्वीमध्यें जेवढ्या उत्कृष्ट व गुणसंपन्न वस्तु आहेत, तेवढ्या सर्व तुला प्राप्त होवोत आणि त्या सर्व ऐश्वर्यांचा तूं पूर्ण शंभर वर्षें उपभोग घे. हे वधू, त्याचप्रमाणें

विवाहकालीन मंगल वस्त्र नेसलेल्या तुला मी आज जसा आशीर्वाद देत आहें, तसेंच पुत्रवती झालेल्या तुझें मी पुनः अभिनंदन करीन."

( २ ) राजेंद्रा, त्यावेळीं पांडुपुत्रांचा विवाह झालेला ऐकून मधुसूदनानें त्यांस मूल्यवान् अहेर पाठविला. त्या बरोबर वैडूर्यरत्नें जडलेलीं सुवर्णभूषणें, नानादेशांतील अमूल्य वस्त्रें, विविध रत्नें, मृदु शालजोड्या, पवित्र अजिनें, अनेक मऊ शय्या, उंची आसनें, नानाप्रकारचीं वाहनें, शेकडों रत्नजडित पात्रें, नानादेशांतील अलंकारांनीं भूषित झालेल्या रूप-यौवनयुक्त अनेक दासी माधवानें त्यांस दिल्या. तसेच उत्तमप्रकारें शृंगारिलेले सुलक्षणी गज व अश्व, शुभ्र जरतारी वस्त्रानें आच्छादिलेले व सुवर्णानें सुशोभित केलेले हस्तिदंती रथ व त्याचप्रमाणें धान्यांच्या राशींसारखे कोट्यवधि सुवर्णाचे ढीग श्रीकृष्णानें त्यांच्याकडे रवाना केले. धर्मराज युधिष्ठिरानें गोविंदाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें त्या सर्व बहुमोल वस्तूंचा मोठ्या संतोषानें स्वीकार केला. १. १३. १९९.

येथें तेरावें वैवाहिक पर्व समाप्त झालें.

---

# विदुरागमन-राज्यलंभपर्व १४.



## अध्याय २०० वा.

[ १ पांडवांच्या उत्कर्षामुळें दुर्योधनाचा खेद व धृतराष्ट्राचा कृत्रिम संतोष. ]

( १ ) वैशंपायन—राजा पारिक्षिता, याप्रमाणें नृपश्रेष्ठ द्रुपदाच्या नगरींत वीर्यवान् पांडवांचा सुलक्षणी द्रौपदीबरोबर विवाहसमारंभ झाला असतां तो वृत्तांत निरनिराळ्या राजांना त्यांच्या विश्वसनीय हेरांकडून कळला. 'ज्या महात्म्यानें स्वयंवरमंडपांतील तें प्रचंड धनुष्य उचलून लक्ष्याचा भेद केला, तो द्रौपदीला जिंकणारा वीर महा धनुर्धर पार्थ होय आणि ज्या बलाढ्य वीरानें मद्रराज शल्याला भूमीवर आपटिलें आणि क्रुद्ध होऊन एका वृक्षानें ताडण करीत समरांगणांत सर्व क्षत्रियांना भयभीत केलें, पण ज्या महात्म्याला एवढ्या मोठ्या शत्रुसमूहांत दंडधर यमाप्रमाणें संचार करीत असतांना यत्किंचित्‌हि भीति वाटली नाहीं, तो शत्रूंच्या सेनेंतील रथ व गज यांचा विध्वंस करणारा भीमकर्मा वृकोदर होय. ब्राह्मणांचा वेष धारण करून बाह्यतः शांत दिसणारे ते पांच वीर कुंतीपुत्र पांडव आहेत.' हें ऐकून सर्व नरेंद्रांना मोठा विस्मय वाटला.

कुंती आपल्या पुत्रांसह लाक्षागृहांत दग्ध झाली, असें त्यांनीं पूर्वी ऐकिलें होतें. त्यामुळें ते सर्व भूपाल पांडवांचा आज जणुकाय पुनर्जन्मच झाला, असें समजले. पुरोचनानें केलेल्या त्या अति दुष्ट कर्मामुळें त्या सर्वांनीं कौरव, भीष्म व धृतराष्ट्र यांचा धिक्कार केला. 'द्रौपदीचा स्वयंवर होऊन त्यांत तिनें पांडवांना वरिलें आहे,' हें ऐकून ते आपआपल्या नगरास परत गेले.

द्रौपदीनें अर्जुनाला वरिलें आहे, असें पाहून दुर्योधनराजा अतिशय खिन्न झाला व आपले सर्व भ्राते, अश्वत्थामा, शकुनि, कर्ण व कृप यांसह तेथून परतला. तेव्हां लज्जित झालेला दुःशासन त्याला हळु हळू म्हणाला—" हे राजन्, हा अर्जुन जर ब्राह्मणवेषानें आला नसता, तर त्याला द्रौपदी मिळाली नसती. कारण हा धनंजय आहे, असें त्या वेळीं कोणासच कळलें नाहीं. खरोखरें दैवच बलवत्तर आहे. मनुष्याचा प्रयत्न व्यर्थ आहे. पांडव मरावे म्हणून आम्हीं इतके यत्न केले असूनहि ज्याअर्थी ते अद्यापि जिवंत आहेत, त्याअर्थी पुरुषप्रयत्नाला धिक्कार असो."

राजा, याप्रमाणें आपसांत संभाषण करणारे व पुरोचनाची निंदा करणारे ते कौरव दीन व खिन्न होऊन हास्तिनपुरास परत आले. पांची पांडव अग्नीच्या भयंकर मुखांतून जिवंत सुटले व द्रुपदराजाशीं प्रेमबद्ध झाले, हें पाहून ते भयभीत झाले. त्यांचे सर्व संकल्प अस्त पावले. राजा जनमेजया, धृष्टद्युम्न, शिखंडी व द्रुपदाचे सर्व प्रकारच्या युद्धामध्यें विशारद असलेले इतर पुत्र यांचा विचार करून पांडवांना पराभूत करण्याचे त्यांचे सर्व मनोरथ शिथिल झाले.

पांडवांनीं द्रौपदीला वरिलें आहे, असें ऐकून व धृतराष्ट्राचे पुत्र लज्जित व भग्नदर्प होऊन परत आले आहेत, असें पाहून विदुर संतुष्ट मनानें धृतराष्ट्राला म्हणाला —" हे राजन्, द्रुपदकन्येच्या संबंधानें कौरवांचा मोठा उत्कर्ष झाला आहे. खरोखर हें मोठें आश्चर्य आहे!"

विदुराचें हें भाषण ऐकून वैचित्रवीर्य राजाहि परम संतोषानें 'फार चांगलें झालें, फार उत्तम झालें, वत्सा, खरोखरच हा आमचा फार मोठा उत्कर्ष आहे' असें म्हणाला. कारण अज्ञानामुळें तो प्रज्ञाचक्षु नरेंद्र 'द्रुपदकन्येनें आपल्या ज्येष्ठ पुत्र दुर्योधनालाच वरिलें आहे,' असें समजला व त्या आनंदाच्या भरांत त्यानें

१ दैवं च परमं मन्ये पौरुषं चाप्यनर्थकम्।

'द्रौपदीला अनेक भूषणें देऊन माझ्याकडे घेऊन ये' अशी दुर्योधनाला आज्ञा केली.

पण राजाचा हा हर्ष अस्थानीं आहे, असें पाहून विदुर त्यास म्हणाला— "हे महाराजा, सर्व पांडुपुत्र कुशल आहेत. द्रौपदीनें स्वयंवरांत त्यांना वरिलें असून द्रुपदानें त्यांचा मोठा सत्कार केला आहे. त्या स्वयंवरांत पांडवांना अनेक बलाढ्य आप्तसंबंधी प्राप्त झाले असून राजानें त्या सर्वांचा अतिशय सन्मान केला आहे."

विदुराचें हें भाषण ऐकूनहि धृतराष्ट्रानें आपणास मोठा संतोष झालासें दाखवून म्हटलें—"हे क्षत्त्या, पांडुराजाला त्याचे पांच पुत्र जसे प्रिय होते, तसेच किंबहुना त्याहूनहि अधिक ते मला प्रिय आहेत. ते मला प्रियतम असण्याचें कारण सांगतों ऐक. ते पांचहि वीर सुस्वरूप असून त्यांना उत्तम मित्रांचा लाभ झाला आहे. त्यांना या विवाहामुळें दुसरेहि अनेक महाबलाढ्य संबंधी लाभले आहेत. हे विदुरा, बांधवांसह द्रुपदासारख्यांचें मित्रत्व प्राप्त झाल्यावर नष्ट झालेलें राज्य परत मिळविण्याची इच्छा कोणता वैभवशून्य झालेलाहि राजा करणार नाहीं!" तेव्हां 'राजन्, तुझी ही बुद्धि चिरकाल अशीच राहूं दे' असें बोलून विदुर स्वगृहीं परत गेला.

त्यानंतर हे राजश्रेष्ठा, दुर्योधन व कर्ण धृतराष्ट्रापाशीं येऊन म्हणाले—"हे तात, विदुराच्या समक्ष आमच्यानें तुला दोष देववेना. पण आतां येथें एकान्त असल्यामुळें आम्ही आपलें म्हणणें तुला स्पष्ट सांगतों. तूं हें काय करण्याचें मनांत आणिलें आहेस! शत्रूच्या उत्कर्षाला तूं स्वतःचा उत्कर्ष कसा समजतोस? हे श्रेष्ठ राजन्, विदुरासमक्ष तूं शत्रूचें अभीष्ट कसें चिंतिलेंस! आज आपलें जें कर्तव्य आहे, त्याच्या विपरीत तूं वागत आहेस. हे निष्पाप राजा, आम्हीं त्या शत्रूंना नित्य हतबल करण्याचीच योजना करावी, हें उचित आहे. ज्यायोगें ते आमचे पुत्र, मित्र, सामर्थ्य व बांधव, यांस ग्रासणार नाहींत, असा कांहीं तरी उत्कृष्ट उपाय योजण्याचा काल प्राप्त झाला आहे, यास्तव आतां काय करावें, याचा आपण निश्चित विचार ठरवूं या." १. १४. २००.

## अध्याय २०१ ला.

[ १ पांडवांच्या नाशासाठीं दुर्योधनानें धृतराष्ट्राला सुचविलेले उपाय. ]

(१) वैशंपायन—हे भारता, दुर्योधनाचें हें भाषण ऐकून तो प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र म्हणाला—"पुत्रांनों, मीहि तुमच्यासारखीच इच्छा करीत आहें. परंतु माझें खरें मनोगत विदुरापाशीं प्रकट करण्याचें धैर्य मला नसल्यामुळें त्याच्या समक्ष मी पांडवांची नेहमीं स्तुतिच करीत असतों. विदुराला माझा आशय माझ्या चर्येवरून कळणेंहि इष्ट नाहीं. बा सुयोधना, तूं जें प्राप्तकाल कर्तव्य समजत आहेस, तें मला सांग. हे राधेया, या वेळीं तुला काय करावेंसें वाटतें, तें तूंहि मला सत्वर सांग."

पित्याचा हा प्रश्न ऐकून दुर्योधन म्हणाला—तात, आपण आतां अगोदर अतिशय गुप्तपणें आपलें हित करणाऱ्या चतुर ब्राह्मणांकडून कुंतीपुत्र व माद्रीपुत्र यांच्यामध्यें भेद उत्पन्न करूं या. किंवा राजा द्रुपद, त्याचे पुत्र व सर्व अमात्य यांना विपुल धन देऊन तो कुंतीपुत्र युधिष्ठिराचा त्याग करील, अशा प्रकारें त्याच्या मनांत लोभ उत्पन्न करूं या. किंवा आपल्या कुशल ब्राह्मण हेरांनीं पांडवांकडे जाऊन त्यांतील प्रत्येकाला पृथक् पृथक् भेटून 'त्यांनीं पुनः येथें येऊन राहणें योग्य नाहीं' असें सांगावें व तेथेंच रहाण्याविषयीं त्यांच्या मनांत रुचि उत्पन्न करावी व आमच्यापासून विभक्त होऊन त्यांनीं तेथेंच रहाण्याचा निश्चय करावा.

किंवा कुशल व उपाय योजण्यांत चतुर असलेल्या कांहीं लोकांनीं पांची पांडवांचें परस्परांवरील प्रेम कमी करून त्यांच्या मध्यें भेद उत्पन्न करावा. किंवा कृष्णेकडून भर्त्याचा त्याग करवावा. तिला अनेक भर्ते असल्यामुळें हें कार्य सुकरहि आहे. किंवा ती आपल्या पांची पतींवर सारखें प्रेम करीत नाहीं, असें निदर्शनास आणून पांडव तिचा त्याग करतील असें करावें, म्हणजे ती अनायासानेंच आम्हांला प्राप्त होईल.

किंवा आपल्या साहसी गुप्त हेरांकडून भीमसेनाचा वध करवावा. कारण हे राजा, तोच त्या सर्वांमध्यें अधिक बलवान् आहे. त्याच्याच बलावर कुंतीपुत्र युधिष्ठिर पूर्वीपासून आम्हांला कस्पटासारखा लेखीत आहे. भीमच मोठा क्रूर, शूर व त्यांचा मुख्य आधार आहे. यास्तव हे राजा, त्याला मारविलें असतां सर्व पांडव निरुत्साह व निस्तेज होऊन राज्यप्राप्तीसाठीं

पुनः यत्न करणार नाहींत. कारण तो भीमच त्या सर्वांचा आधारस्तंभ आहे. वृकोदर पाठिराखा असला, म्हणजे अर्जुन संग्रामांत अजेय होतो. भीमावांचून अर्जुन युद्धामध्यें राधेयाच्या पासंगालाहि पुरणार नाहीं. भीमसेनाच्या अभावीं आपलें अत्यंत दौर्बल्य जाणणारे बाकीचे चारी पांडव आम्हांला बलवान् समजून राज्यासाठीं यत्न करणार नाहींत. किंवा दुर्बल झालेले ते चारी भ्राते येथें येऊन आमचे आज्ञांकित होऊन राहिले असतां हे भूपते, आम्ही यथाशास्त्र त्यांचा वध घडवून आणूं.

किंवा अतिशय सुस्वरूप तरुण स्त्रियांकडून एकेका कुंतीपुत्राला विषयासक्त करवावें. म्हणजे कृष्णा अन्य स्त्रीच्या ठिकाणीं आसक्त झालेल्या त्यांतील प्रत्येकाविषयीं विरक्त होईल. किंवा त्यांना येथें आणण्यासाठीं या राधेयाला पाठवावें व निरनिराळया उपायांनीं त्यांच्या मनांत आपल्याविषयीं विश्वास उत्पन्न करून आमच्या गुप्त हेरांनीं त्यांचा नाश करावा.

हे तात, या अनेक उपायांतील जो तुला योग्य वाटत असेल, त्याची तत्काल योजना कर. आतां त्यांची उपेक्षा करणें केव्हांहि हितावह होणार नाहीं. जोंवर त्यांनीं द्रुपदराजाच्या मनांत विश्वास उत्पन्न केला नाहीं तोंवरच त्यांचा घात करतां येणें शक्य आहे. एकदा त्या राजाचें प्रेम त्यांच्यावर जडलें म्हणजे आपल्याला कांहीं करतां येणार नाहीं. बाबा, त्या शत्रूंचा निग्रह करण्यास मला हे उपाय सुचतात. राधेया, याविषयीं तुझें मत काय आहे? १. १४. २०१.

---

## अध्याय २०२ रा.

[ १ कर्णानें सुचविलेला उपाय. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, दुर्योधनाचे हे बालिश उपाय ऐकून वीर कर्ण त्यास म्हणाला—" दुर्योधना, तुझा हा विचार माझ्या बुद्धीला मुळींच पटत नाहीं. हे कुरुनंदना, शूर पांडव असल्या क्षुद्र उपायांनीं साध्य होतील असें मला वाटत नाहीं. हे वीरा, तूं यापूर्वीच अनेक सूक्ष्म उपायांनीं त्यांचा वध करण्याचा अनेक वेळां यत्न केलास. पण त्यांतील एकाहि उपायानें तूं त्यांना मारूं शकला नाहींस.

हे राजा, ते सहायशून्य व वयानें अल्प असून येथें तुझ्या समीप तुझ्या घरांत रहात असतांनाहि जर तूं त्यांचा वध करूं शकला नाहींस, तर आतां

बलाढ्य साह्यकर्त्यांनीं युक्त होऊन परदेशांत रहाणाऱ्या व सर्व प्रकारें उत्कर्ष पावलेल्या कुंतीपुत्रांना तूं उपायानें स्ववश कसें करून घेशील! ते वीर उपायानें साध्य होण्यासारखे नाहींत, असें माझें निश्चित मत आहे. त्यांना संकटांत टाकणेंहि शक्य नाहीं.

अनुकूल दैवयोगानें जे जतुगृहादि संकटांतूनहि स्वसंरक्षण करण्यास समर्थ झाले व आतां पितृ-पितामहांच्या परंपरेनें प्राप्त झालेलें राज्यपद मिळविण्याची इच्छा करीत आहेत त्या पांडवांचा आपसांत भेद करणेंहि शक्य नाहीं. कारण एका स्त्रीवर आसक्त असलेले ते परस्परांच्या विरुद्ध कदापि जाणार नाहींत. शिवाय कृष्णेला त्यांच्यापासून दूर करण्यास कोणीहि समर्थ होणार नाहीं. भिक्षेवर उपजीविका करणाऱ्या व त्यामुळेंच हीन स्थितींत असलेल्याहि त्यांना जिनें वरलें, ती आतां सुंदर वेष धारण करून सुस्थितींत असलेल्या त्यांना कशी सोडील! एका स्त्रीचें बहुभर्तृत्व हा स्त्रियांना अत्यंत इष्ट असलेलाच गुण आहे. त्याला अनायासानें प्राप्त झालेली कृष्णा त्यांच्यापासून दूर करितां येणें कोणालाहि शक्य नाहीं.

तो पांचालेश्वर अत्यंत धर्मनिष्ठ आहे. तो राजा द्रव्यलोभी नाहीं. त्याला आपण समग्र राज्य जरी देऊं केलें तरी तो पांडवांचा त्याग कदापि करणार नाहीं. त्या राजाचा गुणवान् पुत्र धृष्टद्युम्न तर पांडवांवर अतिशय लुब्ध झाला आहे. यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, पांडव असल्या उपायांनीं साध्य होतील असें मला मुळींच वाटत नाहीं. यावेळीं आपल्याला एकच गोष्ट करितां येणें शक्य आहे.

हे राजा, ते पांडुपुत्र जोंवर दृढमूल झाले नाहींत, तोंवर त्यांच्यावर उघड उघड प्रहार करावा आणि हे मित्रा, हा उपाय तुलाहि रुचावा असें मी म्हणतों. जोंवर आमचा पक्ष बलवान् आहे व पांचालपक्ष दुर्बल आहे, तोंवरच त्यांच्यावर शस्त्रप्रहार करावा. आतां विचार करीत बसूं नकोस. हे गांधारेया, जोंवर पांडवांनीं विपुल वाहनें, मित्र व क्षत्रियकुलें यांचा संग्रह केला नाहीं, तोंवर तूं त्यांच्यावर चाल करून जा. राजा, महापराक्रमी पुत्रांसह द्रुपदराजानें जोंवर पांडवांस साह्य करण्याचें मनांत आणलें नाहीं, तोंवर तूं आपला पराक्रम प्रकट कर.

हे कौरवा, वृष्णिकुलोत्पन्न कृष्ण आपली अजिंक्य यादवसेना बरोबर घेऊन पांडवांना राज्य मिळवून देण्यासाठीं जोंवर पांचालराजाच्या घरीं येऊन पोंचला

नाहीं, तोंवर तूं त्या वीरांना पराभूत करण्याचा प्रयत्न कर. त्या देवकीपुत्र कृष्णाला पांडवांसाठीं विपुल धन, विविध भोग, किंबहुना स्वतःचें राज्यहि अत्याज्य नाहीं. तो आपल्या प्रिय मित्रांसाठीं त्या सर्वांचाहि त्याग करील. महात्म्या भरतानें पराक्रमानेंच पृथ्वी मिळविली. इंद्रानें पराक्रमानेंच त्रिभुवन जिंकलें. हे राजन्, क्षत्रियांच्या पराक्रमाचीच प्रशंसा करितात. हे नरश्रेष्ठा, पराक्रम हाच शूरांचा स्वाभाविक धर्म आहे.

आम्ही फार मोठ्या चतुरंग सैन्यानें द्रुपदाचा पराभव करून पांडवांना सत्वर आपल्या स्वाधीन करून घेऊं या. साम, दान किंवा भेद, यांतील एकाहि उपायानें ते साध्य होणारे नाहींत. यास्तव हे दुर्योधना, तूं पराक्रमानेंच त्यांचा नाश कर. तूं शौर्यानें या सर्व पृथ्वीला जिंकून तिचा भोग घे. हे जनेश्वरा, द्रुपद व पांडव यांच्याशीं शक्य तितक्या लवकर युद्ध करण्यावांचून दुसरा कोणताहि उपाय मला दिसत नाहीं."

राजा जनमेजया, प्रतापी धृतराष्ट्रानें राधेयाचें हें वचन ऐकून सत्कारपूर्वक मान डोलविली व म्हटलें—" कर्णा, तूं मोठा बुद्धिमान् व कृतास्त्र आहेस. तूं असें पराक्रमयुक्त भाषण करावेंस हें योग्यच आहे. पण भीष्म, द्रोण, विदुर व तुम्ही दोघे एकत्र बसून ज्याच्या योगानें आपलें हित होईल असा उपाय निश्चित करा. तुम्हां सर्वांचें एकमत झालें म्हणजे आपण तत्काल त्याप्रमाणें आचरण करूं." हे महाराज, कर्णाला असें बोलून महायशस्वी धृतराष्ट्रानें भीष्मादि सर्व मंत्र्यांना बोलाविलें व तो पुढील कर्तव्याविषयीं त्यांच्याशीं विचार करूं लागला. १. १४. २०२.

---

## अध्याय २०३ रा.

[ १ भीष्माचें मत. २ दुर्योधनाला उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भूपाला, भीष्मादि मंत्री एकान्तांत येऊन बसल्यावर धृतराष्ट्रानें पांडवांना साध्य करून घेण्याचा कर्णानें सुचविलेला उपाय त्यांस सांगितला व त्याविषयीं त्यांचें मत विचारिलें.

---

१ विक्रमेण मही प्राप्ता भरतेन महात्मना । विक्रमेण च लोकांस्त्रीञ्जितवान्पाकशासनः ॥ विक्रमं च प्रशंसन्ति क्षत्रियस्य विशांपते ।

तेव्हां भीष्म म्हणाला—राजा, पांडुपुत्रांशीं युद्ध करणें मला मुळींच संमत नाहीं, कारण मला जसा तूं तसाच पांडु व जसे गांधारीचे पुत्र तसेच कुंतीपुत्र. हे धृतराष्ट्रा, पांडव मला जसे रक्षणीय आहेत, तसेच ते तुलाहि आहेत. ते जसे तुला व मला रक्षणीय आहेत, तसेच दुर्योधनाला व इतर कौरवांनाहि आहेत. असें असल्यामुळें हे राजा, पांडवांशीं युद्ध करणें हा मोठा अन्याय आहे. माझें सांगणें जर तुला ऐकावयाचें असेल तर त्या वीरांशीं संधि करून त्यांना अर्धे राज्य दे. कारण हें राज्य त्या कुरुश्रेष्ठांच्या प्रपितामहाचें व पित्याचें आहे.

(२) हे दुर्योधना, तूं जसा या राज्याकडे आत्मत्वानें पहात आहेस, त्याप्रमाणें वत्सा, तेहि पहात आहेत बरें! व तें त्यांचें पहाणें सर्वथा योग्यहि आहे. बा गांधारेया, हें माझ्या पित्याचें राज्य आहे, असें जर तूं समजतोस तर त्यांनींहि हें आमच्या पांडूचें राज्य आहे, असें कां समजूं नये! आणि ते यशस्वी पांडुपुत्र जर राज्याला प्राप्त होत नसतील, तर दुसऱ्या कोणा भारताचा तरी त्यावर अधिकार कसा पोंचतो! उलट हे भरतनंदना, तूंच अधर्मानें हें राज्य संपादन केलें आहेस. तुझ्या पूर्वीं तेच या राज्याचे खरे अधिकारी आहेत, असें माझें निश्चित मत आहे. यास्तव या राज्याचा अर्धा भाग तुम्ही त्यांना संतोषानेंच द्या. हे पुरुषश्रेष्ठा, असें करणेंच सर्व लोकांना हितावह होईल. याहून दुसरा कांहीं उपाय जर कराल, तर आपलें कधींहि हित होणार नाहीं. या लोकीं तुझीहि अपकीर्ति होईल, यांत संशय नाहीं.

बाबा, आपल्या कीर्तीचें रक्षण कर. दुर्योधना, कीर्ति हेंच परम बल आहे. ज्या मनुष्याची कीर्ति नष्ट होते, त्याचें जीवित निष्फल आहे, असें श्रेष्ठ लोक म्हणतात. जोंवर मनुष्याची कीर्ति अढळ असते, तोंवरच तो जिवंत असतो. एकदा कीर्ति नष्ट झाली म्हणजे त्याचाहि नाशच होतो. यास्तव हे वीरा, तूं कुरुकुलाला उचित असें धर्माचेंच आचरण कर. आपल्या पूर्वजांना शोभेल असेंच वर्तन ठेव.

पांडव व पृथा त्या भयंकर अग्निमुखांतून जिवंत राहिलीं ही मोठ्या समाधानाची गोष्ट आहे आणि त्या पापी पुरोचनाचा पांडवांना जाळण्याचा मनोरथ

---

१ कीर्तिरक्षणमातिष्ठ कीर्तिर्हि परमं बलम् । नष्टकीर्तेर्मनुष्यस्य जीवितं ह्यफलं स्मृतम् । यावत्कीर्तिर्मनुष्यस्य न प्रणश्यति कौरव । तावज्जीवति गान्धारे नष्टकीर्तिस्तु नश्यति ॥

सिद्धीस गेला नाहीं, उलट तोच दुष्ट नाश पावला, हें सर्वथा योग्यच घडलें. मला या दोन्ही गोष्टींविषयीं परम संतोष होत आहे. ज्या दिवशीं ते अनाथ कुंतीपुत्र आपल्या वृद्ध जननीसह लाक्षागृहांत दग्ध झाले असें मीं ऐकलें, तेव्हांपासून माझ्यानें तुझें मुखावलोकनहि करवत नाहीं.

कुंती तशा निर्दयपणें जाळली गेली हें ऐकून या लोकांतील कोणीहि जिवंत मनुष्य तुला जसा दोष देईल, तसा पुरोचनाला देणार नाहीं. पांडव जिवंत आहेत, असें कळेपर्यंत मला जगांत तोंड दाखविण्याचीहि लाज वाटत होती. यास्तव त्या पांडवांचें जिवंत राहणें, हें तुझ्या पापाचें परिमार्जनच आहे, असें तूं समज आणि हे महाराजा, पांडवांच्या दर्शनाला आपलें अनुमोदन दे. मृत्यूच्या मुखांतून सुटलेल्या व स्वधर्माचरणानेंच उत्कर्ष पावलेल्या त्या वीरांचें आम्हांला मुखावलोकन घडूं दे.

शिवाय हे कुरुनंदना, तूं व तुझ्या दुर्मंत्र्यांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, ते वीर जिवंत असतांना पितृ-पितामहांच्या परंपरेनें प्राप्त झालेल्या त्यांच्या अंशाचा अपहार प्रत्यक्ष इंद्रालाहि करितां येणार नाहीं. ते सर्व वीर धर्मामध्यें निश्चित आहेत. सर्व एकचित्त आहेत. मनानेंहि अधर्माला स्पर्श करीत नाहींत आणि विशेषतः राज्याचे ते समान भागीदार आहेत. यास्तव वत्सा दुर्योधना, तुला जर धर्माचें आचरण करावयाचें असेल, माझें प्रिय करावयाचें असेल व आपलें हित करून घ्यावयाचें असेल तर त्यांना अर्धें राज्य दे. १. १४. २०३.

---

## अध्याय २०४ था.

[ १ द्रोणाचार्यांचा हितोपदेश. २ कर्णाचें द्वेषमूलक भाषण. ]

( १ ) **वैशंपायन**—राजन्, भीष्मानें असें निःपक्षपात भाषण करून दुर्योधनाला सदुपदेश केला असतां धनुर्वेदाचार्य द्रोण म्हणाला—" राजा धृतराष्ट्रा, हितावह व गुप्त मंत्र करावयास बोलाविलेल्या राजाच्या हितेच्छूंनीं धर्माला सोडून नसलेलें आणि अर्थ व यश यांच्या वृद्धीला कारण होणारें वचनच बोलावें, असें आम्हीं नीतिज्ञांच्या तोंडून ऐकिलें आहे. यास्तव महात्म्या भीष्मासारखेंच माझेंहि मत आहे. कुंतीपुत्रांना राज्याचा भाग द्यावा, हेंच उचित होय. हा सनातन धर्म आहे.

हे राजा, एखादा प्रिय भाषण करणारा तुझा अमात्य पांडवांसाठीं विपुल रत्नें घेऊन द्रुपदाकडे जाऊं दे. वरपक्षीयांनीं वधूपक्षाला जें जें वस्त्र-भूषणादि वस्तु-जात देणें उचित आहे तें सर्व घेऊन त्याला तेथें पाठीव आणि 'आपल्या संबंधा-मुळें आमचा फार मोठा उत्कर्ष झाला आहे, त्यामुळें राजा धृतराष्ट्राला व त्याच्या दुर्योधनादि पुत्रांना अतिशय संतोष झाला आहे.' असें द्रुपदराजा व धृष्टद्युम्न यांच्या समक्ष त्यानें वारंवार बोलावें. 'हा अतिशय प्रिय व उचित असाच योग घडून आला आहे' असेंहि त्यानें पुनः पुनः वर्णन करावें आणि कुंतीपुत्र व माद्रीपुत्र यांचें सांत्वन करावें.

त्याचप्रमाणें हे राजेंद्रा, सुवर्णाचीं व रत्नांचीं अनेक सुंदर भूषणें द्रौपदीला अर्पण करण्याची तुझ्या अमात्याला आज्ञा दे. हे कुरुनंदना, द्रुपदराजाचे सर्व पुत्र, सर्व पांडव व कुंती यांचाहि वस्त्रालंकारांनीं योग्य सत्कार कर. याप्रमाणें पांडवांसह द्रुपदाला आपल्या नम्र भाषणानें व देणग्यांनीं संतुष्ट करून नंतर त्या अमात्यानें द्रुपदापाशीं पांडवांच्या हस्तिनापुरगमनाविषयीं योग्य वेळीं बोलणें करावें.

द्रुपदानें त्या वीरांस हस्तिनापुरास जाण्याची अनुज्ञा दिली असतां त्यांना येथें आणण्यासाठीं दुःशासन व विकर्ण यांनीं चतुरंग सैन्यासह पंचाल देशास जावें. ते श्रेष्ठ पांडव येथें आल्यावर राजा, तूं त्यांचा सर्वदा पुत्रांप्रमाणें सत्कार करावास. म्हणजे तुझ्या आदरास पात्र झालेले ते वीर प्रजेला संमत असलेल्या त्यांच्या पैतृक स्थानावर स्थिर होतील. हे महाराज, कौरव व पांडव या दोघांशीं तूं असेंच वर्तन अवश्य करावेंस, असें भीष्माप्रमाणेंच मलाहि वाटतें."

(२) भीष्म व द्रोण या उभयतांचें हें अनिष्ट भाषण ऐकून राधापुत्र **कर्ण** म्हणाला—राजा धृतराष्ट्रा, तूं भीष्म व द्रोण यांना धन व मान यांनीं युक्त केलेंस. सर्व कार्यांमध्यें त्यांना आपले अंतरंग मंत्री बनविलेंस. असें असूनहि हे तुला हितावह उपदेश करीत नाहींत. यापेक्षां अधिक आश्चर्य तें काय आहे! जो मनांतून शत्रूंचें हित करण्याची इच्छा करितो व बाहेरून हें स्वामीचें हितच आहे असें दाखवितो, तो वस्तुतः स्वामीचा हितकर्ता नसून प्रच्छन्न शत्रुच आहे. अशा पुरुषानें आपल्या दूषित मनानें केलेला उपदेश स्वामीला हितावह कसा होणार! त्याच्या उपदेशाप्रमाणें वागणाऱ्या स्वामीचें कधींहि कल्याण होणार नाहीं. कारण शठ मित्र स्वामीचा घातच करितो. तो त्याला केव्हांहि हितावह होत नाहीं.

राजा, उत्कर्ष व अपकर्ष यांचें मुख्य कारण दैवच आहे. एखादें संकट प्राप्त झालें असतां पुरुषाचें हित व अहित होण्यास त्याचे मित्र मुळींच कारण होत नाहींत. प्रत्येक जीवाला दैवयोगानेंच सुख किंवा दुःख प्राप्त होतें. मनुष्य मोठा बुद्धिमान् व विद्वान् असो, कीं बुद्धिहीन व अज्ञ असो. तो बाल असो कीं वृद्ध असो. ससहाय असो कीं असहाय असो. त्याला ज्यावेळीं जें इष्ट किंवा अनिष्ट प्राप्त व्हावयाचें तें त्या त्या वेळीं होतेंच.

राजा, पूर्वी मागधराजांच्या राजगृह-नामक नगरांत कोणी एक अंबुवीच नामक राजा होता. तो सर्व इंद्रियांनीं रहित असल्यामुळें त्याचें अस्तित्व केवल श्वासमात्र होतें. त्यायोगें त्याचा ' महाकर्णि '-नांवाचा अमात्य त्याच्या राज्याचा स्वामी होऊन बसला. राजाचें सर्व बल मला प्राप्त झालें आहे असें समजणारा तो मूर्ख राजाचा अवमान करूं लागला. तो मूढ त्या राजाच्या भोग्य स्त्रिया, रत्नें, धन व सर्व ऐश्वर्य यांचा स्वतःच उपभोग घेऊं लागला. त्या सर्वांचा स्वीकार करूनहि त्या लोभी अमात्याचा लोभ अधिकच वाढत चालला व तो त्याचें राज्यहि हरण करण्याची इच्छा करूं लागला. परंतु सर्व इंद्रियशून्य व श्वासमात्र असलेल्या त्या राजाचें राज्य तो अमात्य मोठ्या प्रयत्नानेंहि घेऊं शकला नाहीं, असें आम्हीं ऐकिलें आहे. कारण त्या राजाची राजेंद्रता त्याला दैवानेंच प्राप्त झाली होती. ती मनुष्यप्रयत्नानें मिळणारी नव्हती.

यास्तव हे भूपाला, तुझ्या दैवांतच जर राज्य असेल तर या सर्व लोकांच्या देखत तें तुझ्या ठिकाणींच अढळ राहील. परंतु तें जर तुझ्या दैवांतच नसेल तर तूं कितीहि प्रयत्न केलास तरी तें तुला प्राप्त होणार नाहीं. तस्मात्, हे बुद्धिमान् राजा, तूं आपल्या मंत्र्यांच्या उपदेशांतील हितावह उपदेश कोणता व अहितावह कोणता, सदोष भाषण कोणाचें व निर्दोष कोणाचें याचा विचार करून त्यांतील जें योग्य वाटेल त्याचा स्वीकार कर.

कर्णाचें हें भाषण ऐकून द्रोणाचार्य त्याला क्रोधानें म्हणाला—" हे दुष्टा, तुझी मत्सर बुद्धि मी जाणून आहें. पांडवद्वेषानें तूं हें बोलत आहेस. कर्णा, कुरुकुलाचें परम हित व्हावें, असाच उपदेश मी राजाला केला आहे. परंतु तें माझें वचन दुष्ट आहे, असें जर तूं समजत असशील, तर तुला ज्यांत परम हित वाटत असेल तें सांग. पण हेंहि लक्षांत ठेव कीं, मी जें परम हितवचन बोललों आहें, त्याच्या विपरीत जर तुम्हीं कराल, तर कौरवांचा सत्वर विनाश होईल, असें माझें निश्चित मत आहे." १. १४. २०४.

---

## अध्याय २०५ वा.

[ १ धृतराष्ट्राला विदुराचा उपदेश. ]

(१) वैशंपायन—राजा पारिक्षिता, याप्रमाणें द्रोणाचार्यांचें हितवचन ऐकून महा बुद्धिमान् विदुर धृतराष्ट्राला म्हणाला—" हे राजन्, तुझ्या बांधवांनीं तुला निःसंशय श्रेयस्कर असेंच हितवचन सांगावें, हेंच त्यांचें खरें कर्तव्य आहे. परंतु तें हितवचन न ऐकणाराच्या मनावर त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं. हे राजा, शान्तनव भीष्मानें तुला प्रिय व हित असा उपदेश केला असतां तो तूं मान्य करीत नाहींस. त्याचप्रमाणें हा द्रोणाचार्य तुझ्या परम कल्याणाचा बोध करीत असतां हा राधासुत कर्ण त्यांत तुझें हित मानीत नाहीं.

हे कुरुनंदना, मी आपल्या मनाशीं पुष्कळ विचार केला, परंतु मला या दोघां पुरुषश्रेष्ठ भीष्म-द्रोणांपेक्षां बुद्धीनें अधिक व तुझा परम सुहृद् दुसरा कोणीहि दिसत नाहीं. ते दोघे वयानें, बुद्धीनें व विद्येनें वृद्ध असून हे राजेंद्रा, तूं व पांडुपुत्र यांच्याशीं समवृत्तीनें वागणारे आहेत. दाशरथिराम व गय यांहून हे दोघेहि धर्म व सत्य यांत हीन नाहींत. त्यांनीं या पूर्वींहि तुला तुझें अकल्याण होईल, असें कधीं सांगितलेलें नाहीं व तुला कधीं कोणत्याहि प्रकारें अपकार केलेला नाहीं.

तेव्हां हे वीरा, ते पुरुषश्रेष्ठ व सत्यपराक्रमी भीष्म द्रोण स्वतः निरपराध असलेल्या तुझ्या अकल्याणाची गोष्ट तुला कशी सांगतील ! या लोकीं मोठे बुद्धिमान् म्हणून प्रसिद्ध असलेले हे दोघेहि महात्मे तुझें हितच सांगत आहेत, यत्किंचित्‌हि कुटिल भाषण करीत नाहींत, अशी माझी निश्चित मति आहे. हे धर्मज्ञ भीष्म-द्रोण धनादिकांच्या लोभानें कोणत्या तरी एकाच पक्षाचा आश्रय करून कधींहि बोलणार नाहींत. हे भारता, ते जें सांगत आहेत, त्यांतच तुझें परम हित आहे, असें मलाहि वाटतें.

हे धृतराष्ट्रा, दुर्योधनादि जसे तुझे पुत्र आहेत, तसे पांडवहि तुझे पुत्रच आहेत. पण हें तत्त्व न जाणतां पांडवांविषयीं जर तुला कोणी अहिताचा उपदेश करूं लागेल, तर तो तुझा खरा मंत्रीच नव्हे, त्याच्या बुद्धीनें चालल्यास तुझें कल्याण केव्हांहि होणार नाहीं. राजा, पांडवांचें अहित चिंतिणारे तुझे मंत्री तुझें व या कुरुकुलाचें हित कशांत आहे, हें जाणत नाहींत, असें मी समजतों. धृतराष्ट्रा, तुझा आपल्या पुत्रांवर जर अधिक स्नेह असेल तर तो तुझ्या मनांतील

गुप्त आशयच बाहेर प्रकट करणारे ते तुझे मंत्री केव्हांहि शाश्वत हित करणार नाहींत, उलट तुझ्या मनांतील वैषम्यच प्रकट करतील व तुझें कोणतेंहि कार्य साधणार नाहींत.

यासाठीं हे राजा, या तेजस्वी महात्म्यांनीं पांडवांच्या हितासाठीं उघड असें कांहींच सांगितलें नाहीं. कारण पांडवांचें हित व्हावें अशी तुझी सद्बुद्धि नाहीं, हें त्यांना माहित आहे. म्हणूनच त्यांनीं पांडवांना अर्धराज्य देण्याचा जो उपदेश केला तो त्यांच्या हितासाठीं नव्हे, तर तुझ्या व तुझ्या पुत्रांच्या कल्याणासाठीं आहे. त्या दोघां पुरुषश्रेष्ठांनीं पांडव तुझ्या पुत्रांना अजिंक्य आहेत, असें जें सांगितलें आहे, तें अक्षरशः खरें आहे. हे नरेंद्रा, तुझें कल्याण असो व तुलाहि त्यांचें तें म्हणणें सत्य वाटो.

श्रीमान् सव्यसाची धनंजय युद्धामध्यें साक्षात् इंद्रालाहि अजिंक्य आहे. दहा हजार नागांचें बल धारण करणाऱ्या पराक्रमी भीमसेनाला युद्धामध्यें या भूलोकांतील कोणता मानव पराभूत करील! देवांनाहि त्याला जिंकतां येणें शक्य नाहीं. खड्गयुद्धामध्यें अति विशारद असलेले जे माद्रीपुत्र नकुल-सहदेव हे तर समरांगणांत साक्षात् यमपुत्रांसारखेच भासतात. तेव्हां जिवंत रहाण्याची इच्छा करणारा कोणता पुरुष समरांगणांत त्यांना जिंकील! त्याचप्रमाणें ज्याच्या ठिकाणीं संतोष, दया, क्षमा, सत्य व पराक्रम नित्य वास करितात, त्या ज्येष्ठ पांडवाला तरी समरांगणांत कोण जिंकणार! ज्यांचा पक्षपाती हलधर राम आहे, मंत्री जनार्दन आहे व ज्यांच्या पक्षामध्यें सात्यकि आहे, त्यांना समरांगणांत अजिंक्य असें काय आहे!

ज्या पांडवांचा श्वशुर द्रुपद आहे व धृष्टद्युम्नादि द्रुपदपुत्र वीर भ्राते श्यालक आहेत, ते पांडव युद्धांत कोणालाहि जिंकतां येणें शक्य नाहीं. हें जाणून व ते दुर्योधनादि कौरवांच्याहि पूर्वींच आपल्या पितृधनाचे मुख्य भागीदार आहेत, त्यांच्या पित्यापासूनच त्यांना या राज्याचा भाग प्राप्त झाला आहे, हें लक्षांत आणून तूं त्यांच्याशीं धर्म्य आचरण कर. राजा धर्माला सोडून तूं जर विषम दृष्टि ठेवशील तर तुझें व तुझ्या कुलाचेंहि हित होणार नाहीं. पुरोचनाच्या दुष्ट कृत्यानें तुझें जें फार मोठें अपयश जगांत पसरलें आहे, त्याचें पांडवांवर अनुग्रह करून तूं या वेळीं परिमार्जन कर.

वस्तुतः हा पांडवांवर अनुग्रह नसून आमच्या कुलांतील सर्वांवर हा तुझा अनुग्रह आहे. क्षत्रियकुलाची वृद्धि करणें व आपलें जीवित राखणें, यांतच परम

कल्याण आहे. आम्हीं पूर्वीं द्रुपदाचेंहि वैर संपादन केलें आहे. यास्तव पांडवांच्या निमित्तानें या वेळीं त्यांचा संग्रह करणें म्हणजे आपल्या पक्षाची वृद्धि करणेंच आहे.

राजा, कृष्णाच्या अंकित असलेले दाशार्ह यादवहि महाबलाढ्य व संख्येनें अधिक आहेत. ज्या पक्षामध्यें कृष्ण असेल, त्याच पक्षामध्यें ते सर्व रहाणार व जेथें कृष्ण तेथेंच जय निश्चित आहे. जें कार्य सामोपचारानेंच साध्य होणें शक्य आहे, तें युद्धानें साधण्यास कोणता दुर्दैवी मनुष्य तयार होईल!

हे राजा, पांडव जिवंत आहेत हें ऐकून सर्व प्रजाजन व नगरवासीजन त्यांच्या दर्शनाविषयीं उत्सुक झाले आहेत. यास्तव पांडवांना येथें आणवून आपल्या प्रजाजनांना संतुष्ट कर. हे महाराज, दुर्योधन, कर्ण व शकुनि, हे तिघेहि अधार्मिक, दुर्बुद्धि व मूर्ख आहेत. त्यांचें वचन तूं मान्य करूं नकोस. हे गुणवान् राजा, या तुझ्या दुर्योधनाच्या अपराधामुळें तुझ्या सर्व प्रजेचा विनाश होईल, असें मीं तुला या पूर्वींच सांगितलेलें आहे. १. १४. २०५.

---

## अध्याय २०६ वा.

[ १ विदुराचें द्रुपदनगरीं गमन. २ द्रुपदादि सर्वांस धनादि देऊन पांडवांना हस्तिनापुरास पाठविण्याविषयीं द्रुपदाची प्रार्थना ]

(१) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें विदुराची स्पष्टोक्ति ऐकून धृतराष्ट्र म्हणाला—“ हे विदुरा, विद्वान् शांतनव भीष्म, पूज्य द्रोणाचार्य व तूं मला अगदीं सत्य व परम हितवचन सांगत अहां. ते वीर कुंतीपुत्र जसे महात्म्या पांडूचे पुत्र आहेत, तसेंच ते सर्व धर्मतः माझेहि पुत्र आहेत, यांत संशय नाहीं. ज्याप्रमाणें हें राज्य माझ्या पुत्रांचें आहे, तसेंच तें निःसंशय पांडुपुत्रांचेंहि आहे. यास्तव हे क्षत्त्या, तूं जाऊन त्या पांची भ्रात्यांना त्यांच्या मातेसह व दिव्य स्वरूपवती कृष्णेसह मोठ्या सन्मानानें घेऊन ये. ते पार्थादि सर्व भ्राते पृथेसह जिवंत आहेत व त्या महारथांना द्रुपदराजाची कन्या प्राप्त झाली, हें केवढें महद्भाग्य! आज आपला केवढा उत्कर्ष झाला हा! दुष्ट पुरोचनाचा नाश झाला व माझें महद्दुःख नष्ट झालें हें तरी केवढें भाग्य! खरोखर हें सर्व ऐकून मला परम आल्हाद होत आहे. ”

हे राजा, त्यानंतर विदुर धृतराष्ट्राच्या आज्ञेनें द्रुपदराजा व पांडव यांच्याकडे जावयास निघाला. त्यानें आपल्या बरोबर द्रौपदी, पांडव व द्रुपद यांच्यासाठीं विविध रत्नें व विपुल धन घेतलें होतें. सर्व शास्त्रविशारद व धर्मज्ञ विदुर पंचाल देशांत जाऊन द्रुपदाला भेटला व ज्येष्ठांच्या अनुक्रमानें आलिंगन, नमस्कार इत्यादि उपायांनीं भेटलेल्या द्रुपदाजवळ उभा राहिला. तेव्हां द्रुपदराजानेंहि विदुराचें धर्माला अनुसरून स्वागत केलें. त्यांनीं परस्परांस कुशल प्रश्न विचारले. नंतर विदुर पांडवांना व तेथेंच असलेल्या वासुदेवाला भेटला. हे भारता, विदुरानें त्या सर्वांना आलिंगन दिलें व कुशल प्रश्न केले. उलट पांडवांनींहि क्रमानें त्या महा बुद्धिमान् पितृतुल्य विदुराचा मोठा सत्कार केला.

त्यानंतर धृतराष्ट्राच्या सांगण्यावरून विदुरानें मोठ्या प्रेमानें त्या सर्व पांडुपुत्रांना पुनः पुनः कुशल विचारलें. युधिष्ठिरादि पांच भ्राते, कुंती, द्रौपदी, द्रुपद व त्याचे पुत्र यांच्यासाठीं कौरवांनीं पाठविलेलीं विविध रत्नें व धन ज्यांचीं त्यांस दिलीं व तो मतिमान् विदुर पांडुपुत्र व केशव यांच्या समक्ष मोठ्या विनयानें असें मधुर वचन बोलला—

( २ ) " हे राजन्, तूं आपले अमात्य व पुत्र यांसह माझें वचन ऐक. तुझ्याशीं जडलेल्या या नूतन संबंधानें संतुष्ट झालेल्या धृतराष्ट्राजानें पुत्र, अमात्य व बांधव यांसह आपलें कुशल निवेदन करावयास सांगून मला तुमचें कुशल पुनः पुनः विचारावयाची आज्ञा केली आहे. हे नरेंद्रा, तुझ्या दृढ संबंधानें त्याला परम आल्हाद वाटत आहे. महाबुद्धिमान् शांतनव भीष्मानें सर्व कौरवांसह तुला सर्व प्रकारचें कुशल विचारलें आहे. तुझा प्रिय सखा जो भरद्वाजपुत्र द्रोण, त्यानें दृढ आलिंगनपूर्वक तुझें कुशल विचारलें आहे.

हे पांचाल्या, कन्येच्या द्वारा तुझ्याशीं संबद्ध झालेला राजा धृतराष्ट्र व सर्वहि कौरव आपल्याला कृतार्थ समजत आहेत. हे यज्ञसेना, तुझा संबंध त्यांना जेवढा प्रीतिकर वाटत आहे, तशी राज्यप्राप्तिहि वाटत नाहीं. हें जाणून हे राजा, तूं मजबरोबर पांडवांना हस्तिनापुरास पाठीव. सर्व कौरव त्यांना पहाण्यास फार उत्सुक झाले आहेत.

हे नरश्रेष्ठहि हस्तिनापुर सोडून आज बरेच दिवस बाहेर आहेत; त्यामुळें ते व पृथाहि आपलें नगर पहाण्यास उत्सुक झाली असेल. सर्व श्रेष्ठ कुरुस्त्रिया पांचाली कृष्णला पहाण्याची इच्छा करीत आहेत; त्या यांच्या आगमनाची

वाटच पहात असतील. सर्व हस्तिनापुर व आमचा कुरुजांगल देश यांची मार्ग-प्रतीक्षा करीत आहे. यास्तव हे उदार नृपते, तूं पांडुपुत्रांना आपल्या राजधानीस जाण्याची सत्वर अनुज्ञा दे. त्यांनीं या वेळीं आपल्या भार्येसह तेथें जावें, असें माझें मत आहे. हे नरेंद्रा, तूं महात्म्या पांडवांना जाण्याची अनुज्ञा दिलीस म्हणजे मी शीघ्र गमन करणारे दूत पुढें पाठवून 'वीर कुंतीपुत्र कृष्णा व कुंती यांसह येत आहेत,' असें धृतराष्ट्राला कळवीन." १. १४. २०६.

---

## अध्याय २०७ वा.

[ १ पांडवांचें हस्तिनापुरीं गमन. २ खांडवप्रस्थाची प्राप्ति व तेथें वास्तव्य. ]

( १ ) वैशंपायन—हे परिक्षित्पुत्रा, विदुराचें हें मधुर भाषण ऐकून द्रुपदराजा त्यास म्हणाला—"हे महाप्राज्ञ विदुरा, तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे. तुमच्याशीं माझ्या कुलाचा संबंध जडल्यामुळें मलाहि परम हर्ष वाटत आहे. आतां या महात्म्यांनीं हस्तिनापुरास गमन करावें, हें सर्वथा युक्तच आहे. पण मी स्वतः आपल्या मुखानें त्यांस असें सांगणें उचित नाहीं. यास्तव वीर कुंतीपुत्र युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन, पुरुषश्रेष्ठ नकुल, सहदेव आणि धर्मज्ञ राम व कृष्ण यांना येथून जेव्हां जावेंसें वाटेल तेव्हां ते येथून खुशाल जावोत. हे पुरुषश्रेष्ठ राम व कृष्ण पांडवांचें प्रिय व हित करण्यांत नेहमीं तत्पर आहेत. यास्तव ते जेव्हां सांगतील तेव्हां यांनीं खुशाल येथून निघावें."

द्रुपदाचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला—हे राजन्, आम्ही सर्व भ्राते तुझ्या अधीन आहों. तूं आम्हांला जशी आज्ञा करशील, तसें आम्ही मोठ्या आनंदानें करूं.

हे कुरुश्रेष्ठा, यावर श्रीकृष्णानें म्हटलें—बा युधिष्ठिरा, तुम्हीं हस्तिनापुरास गमन करावें, हेंच मला योग्य दिसतें. परंतु या धर्मवेत्त्या राजा द्रुपदाचें काय मत आहे?

तेव्हां लगेच द्रुपद म्हणाला—हे पुरुषोत्तमा, या वेळीं वीर पांडवांनीं जें कांहीं करणें उचित आहे, असें तुला वाटेल तें मला पूर्णपणें संमत आहे, असें तूं समज. कारण हे महाभाग कुंतीपुत्र जसे माझे आप्त आहेत, तसेच ते वासुदेवाचेहि आहेत, यांत संशय नाहीं. हा पुरुषश्रेष्ठ केशव यांच्या कल्याणाचें जसें अहर्निश चिंतन करीत असतो, तसें स्वतः युधिष्ठिरहि करीत नाहीं.

जनमेजया, द्रुपदानें इतकें बोलून ज्यांना स्वनगरास जाण्याचें अनुमोदन दिलें आहे, असे पांडव कृष्ण, विदुर, यशस्विनी कुंती व द्रुपदकन्या कृष्णा, यांस बरोबर घेऊन लीलेनें हस्तिनापुरास जावयास निघाले. ते सुखानें प्रवास करीत होते. पांडवांचा हस्तिनापुरास जाण्याचा निश्चय होतांच विदुरानें शीघ्र-गामी दूत धृतराष्ट्राकडे पाठविले होते. त्यांच्या तोंडून पराक्रमी पांडव इकडे जावयास निघाले आहेत, असें ऐकून धृतराष्ट्रानें त्यांचें स्वागत करण्यासाठीं पराक्रमी विकर्ण, चित्रसेन, द्रोणाचार्य, कृप व इतर कौरव यांस पुढें पाठविलें. त्यांनीं परिवेष्टित झाल्यामुळें अतिशय शोभणारे ते पांडव हळुहळू हस्तिनापुर नगरांत आले.

त्या राजपुत्रांना पहाण्याच्या उत्सुकतेनें सर्व नगर जणुंकाय सागरासारखें क्षुब्ध झालें. सर्वांच्या संतापाचा व दुःखाचा नाश करणारे ते पुरुषव्याघ्र आपल्या राजधानींत शिरतांच त्यांचें प्रिय करण्याची इच्छा करणाऱ्या पौरजनांनीं कृतज्ञ-तेनें उच्चारलेले असे हृदयंगम उच्च-नीच शब्द त्यांच्या कानीं पडले—" जो आपल्या पुत्रांप्रमाणें आमचें धर्मानें रक्षण करीत असे, तो हा धर्मज्ञ पुरुषश्रेष्ठ युधिष्ठिर आज पुनः या नगरांत येत आहे. त्याला पाहून आज लोकांना प्रिय असलेला महाराज पांडूच जणुंकाय आमचें प्रिय करण्यासाठीं वनांतून आला आहे, असें आम्हांला वाटतें. हे वीर कुंतीपुत्र आज या नगरास पुनः परत आले, हें फार चांगलें झालें. त्यांनीं या आपल्या उदार आगमनानें आम्हां सर्वांचें कोणतें प्रिय केलें नाहीं! खरोखर आमचें सर्व प्रिय झालें. आमचें जर कांहीं दान, हवन व तप यांपासून निष्पन्न झालेलें पुण्य असेल, तर त्याच्या बलानें हे पांडुपुत्र या नगरांत शंभर वर्षें राहोत."

त्यानंतर ते वीर हळुहळू मोठ्या समारंभानें राजगृहांत येऊन पोंचले व त्यांनीं राजा धृतराष्ट्र, महात्मा भीष्म व इतर पूजार्ह लोक यांस वंदन केलें. नंतर नगरांतील सर्व लोकांना कुशल प्रश्न करून ते धृतराष्ट्राच्या आज्ञेनें निरनिराळ्या राजमंदिरांत जाऊन राहिले.

कांहीं वेळ विश्रांति घेतल्यावर त्या बलाढ्य महात्म्यांना राजा धृतराष्ट्र व शांतनव भीष्म यांनीं आपल्यापाशीं बोलावून आणिलें व धृतराष्ट्र मोठ्या प्रेमानें म्हणाला—" वत्सा युधिष्ठिरा, तूं आपल्या चारी भ्रात्यांसह मी काय सांगतों तें ऐक. आपलें परस्पर वैर वाढूं नये, म्हणून तूं खांडवप्रस्थामध्यें जाऊन रहा. वज्रपाणि इंद्राकडून सुरक्षित असलेल्या देवांप्रमाणें धनुर्धर पार्थाकडून संरक्षण

केल्या जाणाऱ्या तुम्हांला तेथें पीडा देण्यास कोणीहि समर्थ होणार नाहीं. राज्याचा अर्धा भाग घेऊन तुम्ही खांडवप्रस्थामध्यें सुखानें रहा. ”

( २ ) हे पारिक्षित राजा, धृतराष्ट्राचें तें हितवचन पांडवांनीं शिरसा मान्य केलें व ते पुरुषश्रेष्ठ त्याला वंदन करून त्या घोर वनांत जावयास निघाले. कारण धृतराष्ट्रानें त्यांना लागवडीस न आलेला भूमीचा अर्धा भाग दिला होता व धन-धान्यांनीं संपन्न असलेला अर्धा भाग आपल्याकडे ठेविला होता. तथापि तसलें अर्धे राज्य स्वीकारूनहि पांडव कृष्णासह खांडवप्रस्थास गेले व अल्पावधींतच त्यांनीं त्या घोर अरण्याला स्वर्गाप्रमाणें मंडित केलें.

तेथें जाऊन पोंचतांच त्या महारथांनीं आपलें नगर वसविण्यासाठीं एक पवित्र व सुखावह प्रदेश निश्चित केला. तेथें व्यासादि महर्षींनीं यथाविधि शांति करून खांडवप्रस्थ नगराची सीमा आंखली. त्या नगराच्या सभोंवार समुद्रासारखा विस्तीर्ण खंदक खणला आणि त्याच्या आंतल्या अंगाला गगन-चुंबित उंच तट उभारला. तेव्हां शुभ्र अभ्रांच्या प्रकाशांनीं तें नगर नागांच्या योगानें शोभणाऱ्या भोगावती नगरीप्रमाणें शोभूं लागलें.

त्या नगराचीं प्रवेशद्वारें गरुडाच्या पंखांप्रमाणें दिसत होतीं. तेथें अनेक उंच शिखरांचीं भुवनें असून मेघसमूहाप्रमाणें भासणाऱ्या गोपुरांनीं त्यांचें रक्षण केलें होतें. त्या उंच तटाच्या बुरुजावरून मोठ्याल्या शक्ति व शस्त्रास्त्रें ठेविलीं होतीं. त्यामुळें तें नगर द्विजिह्व सर्पांनीं वेढल्याप्रमाणें भासत होतें. त्या नगरांत जागजागीं रक्षकांचे समूह नगराचें व तटाचें रक्षण करीत होते. तीक्ष्ण अंकुश, तोफा व बंदुका यांच्या योगानें तो विशाल तट भूषित झाला होता. लोखंडी महाचक्रांनीं तें श्रेष्ठ नगर अतिशय शोभत होतें. त्या नगरांत मोठाले रुंद रस्ते सारख्या प्रमाणांत आंखले होते व तें खांडवप्रस्थ अतिवृष्टयादि दैवी आपत्तींनीं रहित होतें.

याप्रमाणें नानाप्रकारच्या रम्य भुवनांनीं युक्त असलेलें तें इंद्रप्रस्थ स्वर्गा-प्रमाणें शोभत होतें. अशा त्या स्वर्गतुल्य नगरांतील पवित्र व रम्य प्रदेशीं ज्येष्ठ पांडवाचें राजमंदिर होतें. तें मेघसमूहामध्यें चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें सर्व मंदिरांच्या समूहांत झळकत होतें. तें सर्व प्रकारच्या धनांनीं परिपूर्ण असलेलें राजमंदिर कुबेराच्या समृद्ध गृहाप्रमाणेंच शोभत होतें.

हे राजन्, युधिष्ठिरानें अशाप्रकारें तें इंद्रप्रस्थ नगर वसविल्यावर तेथें सर्व वेदवेत्त्यांतील श्रेष्ठ ब्राह्मण येऊन राहिले. द्रव्याची इच्छा करणारे सर्व भाषा-

भिन्न व्यापारी चोहोंकडून तेथें आले व त्यांना तेथेंच वास्तव्य करणें आवडलें. तसेच सर्व शिल्पवेत्तेहि तेथें रहाण्यासाठीं आले.

त्या नगराच्या सभोंवतीं रम्य उद्यानें होतीं. त्यांत आम्र, आम्रातक, कदंब, जांभुळ, फणस इत्यादि अनेक मधुर फलांचे व कण्हेर, बकुल, पारिजात, केतकी, चंपक इत्यादि सुगंधित पुष्पांचे व ताल, तमाल, शाल इत्यादि दुसरेहि अनेक प्रचंड वृक्ष होते. तसेंच, इतर सुवासिक फुलांचे वृक्ष व लता असंख्य असून त्या सर्व पुष्प-फलांनीं युक्त होत्या. त्या वृक्षांवर व लतांवर अनेक जातींचे पक्षी मोठ्या आनंदानें रहात असत. तेथें मत्त मयूरांच्या केका व तरुण कोकिलांचे मंजुल ध्वनि सर्वदा ऐकूं येत. त्या उद्यानांत रमणीय लताकुंज असून तेथें आरशासारखीं निर्मल गृहें होतीं. कांहीं ठिकाणीं कृत्रिम पर्वत व मनोहर विचित्र क्रीडागृहें होतीं. अनेक प्रकारचे जलाशय, पुष्करणी व सरोवरें सुगंधी व रम्य कमलांनीं व हंसादि सर्व जल-चरांनीं शोभत होतीं. राजा, अशा प्रकारच्या पुण्यवान् लोकांनीं युक्त असलेल्या त्या रम्य नगरींत पांडवांनीं प्रवेश करतांच त्यांचें त्यांवरील प्रेम अधिकच वाढलें. याप्रमाणें भीष्माचार्य व राजा धृतराष्ट्र यांनीं प्रयाणाची आज्ञा दिल्यावर पांड-वांनीं खांडवप्रस्थांत वास्तव्य केलें. ते महा धनुर्धर इंद्रतुल्य पांच भ्राते तेथें रहातांच ती नगरी नागांनीं परिवेष्टित असलेल्या श्रेष्ठ भोगावती नगरीसारखी शोभूं लागली. राजा, याप्रमाणें त्या वीर पांडवांना तेथें स्थिर करून महा बुद्धिमान् श्रीकृष्ण त्यांचें अनुमोदन घेऊन बलरामासह द्वारकेस परत आला. १. १४. २०७.

---

## अध्याय २०८ वा.

[ १ धर्मानें राज्य करीत असलेल्या पांडवांकडे नारदाचें आगमन. २ सुदोपसुंदाच्या कथेचा प्रस्ताव. ]

(१) जनमेजय म्हणाला—हे तपोधना, याप्रमाणें इंद्रप्रस्थ नगरीचें राज्य प्राप्त झाल्यावर त्या महात्म्या पांडवांनीं काय केलें ? माझे ते सर्व पूर्व प्रपितामह महा बलवान् होते. असें असतां द्रौपदी त्या सर्वांची धर्मपत्नी होऊन त्यांच्या आज्ञेंत कशी राहिली ? त्या पांच नरश्रेष्ठांची एकच पत्नी असतां त्यांचा पर-स्परांत कलह कसा झाला नाहीं ? हे विप्रश्रेष्ठा, कृष्णेनें युक्त असलेल्या त्यांचें परस्परांशीं वर्तन कसें होतें ? हें सर्व सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे.

जनमेजयाचा हा प्रश्न ऐकून वैशंपायन म्हणाला—हे राजा, धृतराष्ट्रानें अनुज्ञा दिलेले पांडव राज्यारूढ होऊन खांडवप्रस्थांत द्रौपदीसह सुखानें राहिले. त्या महा तेजस्वी, सत्यनिष्ठ युधिष्ठिरानें राज्य प्राप्त झालें असतां आपल्या भ्रात्यांसह पृथ्वीचें धर्मानें पालन केलें. ते सर्व सत्यधर्मपरायण, बुद्धिमान् भ्राते शत्रूंना जिंकून इंद्रप्रस्थ नगरींत आनंदानें राहूं लागले. ते नरश्रेष्ठ पांडुपुत्र आपापल्या अधिकाराप्रमाणें श्रेष्ठ सिंहासनावर बसून राज्याचें सर्व कार्य पहात असत व प्रजेला न्याय देत असत.

हे भारता, एकदा ते सर्व महात्मे आपल्या उच्च आसनांवर बसले असतां देवर्षि नारदमुनि यदृच्छेनें तेथें आला. त्याला पहातांच युधिष्ठिरानें उठून स्वतःचें मूल्यवान् सुंदर उच्चासन त्यास दिलें व तो देवर्षि त्यावर बसला असतां बुद्धिमान् युधिष्ठिरानें स्वतः त्याचें अर्घ्य-पाद्यादिकांनीं यथाविधि पूजन करून त्याला आपलें राज्य निवेदन केलें. तेव्हां त्या देवर्षीनें त्याच्या पूजेचा परम प्रीतीनें स्वीकार करून त्याला शुभाशीर्वाद दिले व बसावयास सांगितलें. नारदाच्या आज्ञेनें बसलेल्या युधिष्ठिरानें द्रौपदीला भगवान् नारदमुनि आल्याचें वर्तमान कळविलें.

तें ऐकतांच द्रौपदी तत्काल शुचिर्भूत व शांतचित्त होऊन जेथें पांडवांसह नारद बसला होता तेथें आली व ती धर्मशालिनी कृष्णा त्या देवर्षीच्या दोन्ही चरणांना वंदन करून आपले पाय व मस्तक वस्त्रानें आच्छादून नम्रपणानें हात जोडून उभी राहिली. त्या वेळीं धर्मात्म्या सत्यवक्त्या नारदमुनीनें त्या द्रुपदनंदिनीला अनेक शुभाशीर्वाद दिले आणि त्या निष्पाप नववधूला जाण्याची आज्ञा दिली.

राजा, द्रौपदी अंतःपुरांत गेल्यावर भगवान् नारद युधिष्ठिरादि पांची भ्रात्यांना एकांतांत म्हणाला—" हे पांडवहो, ही यशस्विनी पांचाली तुम्हां पांचजणांची एकच धर्मपत्नी आहे. यास्तव ज्यायोगें तुमच्यामध्यें वैमनस्य उत्पन्न होणार नाहीं, असाच कांहीं नियम तुम्ही करून ठेवा.

(२) पूर्वी 'सुंद' व 'उपसुंद' या नांवाचे दोघे सोदर भ्राते होते. ते त्रिभुवनांत दुसऱ्या सर्वांना अवध्य व प्रसिद्ध होते. त्या दोघांचें एकच राज्य होतें व त्यांचें गृह, आसन व शय्या हीं सर्व एकत्र होतीं. परंतु इतक्या एकमतानें रहाणाऱ्याहि त्या भ्रात्यांनीं तिलोत्तमेसाठीं एकमेकांचा वध केला.

यास्तव हे युधिष्ठिरा, तुम्ही परस्परांवरील प्रेम व स्नेह यांचें रक्षण करा आणि ज्यायोगें तुमच्यामध्यें भेद उत्पन्न होणार नाहीं, असेच परस्परांशीं वागा.

देवर्षि नारदाचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला—हे भगवन्, सुंदोपसुंद हे असुर कोणाचे पुत्र, त्यांच्यामध्यें भेद कसा उत्पन्न झाला व त्यांनीं परस्परांचा घात कसा केला ? जिच्या कामनेनें उन्मत्त होऊन त्यांनीं एकमेकांचा वध केला ती तिलोत्तमा कोण होती ? अप्सरा कि देवकन्या ? हा सर्व वृत्तान्त सविस्तर ऐकण्याची आमची इच्छा आहे. हे महामुने, त्याविषयीं आमची जिज्ञासा फार वाढली आहे. १. १४. २०८.

---

## अध्याय २०९ वा.

[ १ सुंदोपसुंदांचें तप, वरप्राप्ति व त्यांचा उत्कर्ष. ]

( १ ) **वैशंपायन**—कुरुनंदना, युधिष्ठिराचा हा प्रश्न ऐकून नारदमुनि म्हणाला—हे युधिष्ठिरा, हा प्राचीन इतिहास मी तुला सविस्तर सांगतों, तो तूं भ्रात्यांसह श्रवण कर.

पूर्वीं हिरण्यकशिपूच्या वंशांत 'निकुंभ'-नांवाचा एक तेजस्वी व बलवान् दैत्य होता. त्याला सुंद व उपसुंद म्हणून महा बलाढ्य दोन पुत्र झाले. ते दोघेहि दैत्यश्रेष्ठ भयंकर पराक्रम करणारे, निष्ठुर व क्रूर स्वभावाचे होते. ते दोघेहि सर्व कार्यांत एकमतानें वागत होते व त्या दोघांचा निश्चयहि एकसारखाच होता. ते दोघेहि दैत्य निरंतर एकमेकांच्या सुख-दुःखांनीं सुखी व दुःखी होत. एक दुसऱ्यावांचून कधींहि भोजन करीत नसे व कोणाशीं बोलतहि नसे. ते दोघे परस्परांचें प्रिय करणारे व एकमेकांशीं प्रिय भाषण करणारे होते. एकाच पदार्थाचे दोन भाग केल्याप्रमाणें त्यांचा आचार व शील एकसारखेंच होतें.

सर्व कार्यांमध्यें एकमत असलेल्या त्या दोघांनीं त्रैलोक्य जिंकण्याचा निश्चय केला व दीक्षा घेऊन विंध्यपर्वतावर उग्र तप आचरिलें. दीर्घ कालानें त्यांची तपश्चर्या सिद्ध झाली. नंतर जटा-वल्कलें धारण करणारे ते क्षुधा व तृषा यांनीं श्रांत होऊन वायुभक्षण करून राहिले. त्यांच्या सर्वांगावर धुळीचीं पुटें बसलीं. त्यांनीं आपल्या अंगाचें मांस तोडून त्याच्या अग्नीमध्यें आहुत्या दिल्या. दोन्ही हात वर करून निमेषोन्मेषहि न करितां ते पायांच्या आंगठ्यांवर दीर्घ काल उभे राहिले.

त्या दोघां असुरांच्या उग्र तपश्चर्येनें तप्त झालेल्या विंध्य पर्वतांतून धुराचे लोट निघूं लागले. खरोखर ती मोठी अद्भुत गोष्ट घडली. तेव्हां त्यांचें तें उग्र तप पाहून देव भयभीत झाले व त्यांच्या तपाला प्रतिबंध करण्यासाठीं देवांनीं त्यांत अनेक विघ्नें आणिलीं. त्यांनीं अमूल्य रत्नें व सुंदर स्त्रिया यांचा त्या दोघांस पुनः पुनः लोभ दाखविला. परंतु दृढ व्रत धारण करणाऱ्या त्यांच्या तपाचा यत्किंचित्‌हि भंग झाला नाहीं.

तेव्हां देवांनीं त्या महात्म्यांच्या दृष्टीपुढें अद्भुत माया पसरविली. हातांत शूल घेतलेले राक्षस त्यांच्या भगिनी, माता, भार्या व इतर आप्त स्त्रिया यांच्या पाठीस लागल्यामुळें त्या सर्व त्रस्त होऊन पळत आहेत, अडखळून पडत आहेत, त्यांचीं भूषणें गळून पडलीं आहेत, केंस व वस्त्रें अस्ताव्यस्त झालीं आहेत व भयानें त्या सर्व ‘ आमचें रक्षण करा, रक्षण करा ’ असा आक्रोश करीत आहेत, असें एक मायावी दृश्य त्यांच्या दृष्टीस पाडिलें; परंतु त्यामुळेंहि ते दोघे महा तपस्वी आपल्या व्रतापासून च्युत झाले नाहींत. तेव्हां ते दोघे क्षुब्ध किंवा खिन्नहि होत नाहींत, असें पाहून त्या स्त्रियांसह तें सर्व दृश्य नाहींसें झालें.

पुढें कांहीं कालानें साक्षात् पितामह त्या दोघां महा असुरांपाशीं आला व त्या सर्व लोकांचें हित करणाऱ्या प्रभूनें त्यांस इष्ट वर मागावयास सांगितलें. त्या वेळीं ते दृढनिश्चयी पराक्रमी भ्राते सुंदोपसुंद पितामहाला पाहून हात जोडून उभे राहिले व ते दोघे एकाच वेळीं त्या प्रभूला म्हणाले—“हे भगवन्, तूं जर आमच्या तपानें प्रसन्न झाला असशील तर आम्हां दोघांनाहि मायाविद्, अस्त्रवेत्ते, बलवान् व कामरूपी होण्याचा वर दे. हे प्रभो, तुझ्या प्रसादानें आम्हां उभयतांसहि अमर होऊं दे.”

ब्रह्मदेव म्हणाला—हे दैत्यांनो, अमरत्वावांचून तुमची सर्व इच्छा पूर्ण होईल. तुम्हांला देवांप्रमाणें सर्व ऐश्वर्य प्राप्त होईल. मृत्यूला मात्र जिंकतां येणार नाहीं. कारण तुम्ही जें अद्भुत तप आचरिलेंत, तें अमरत्व मिळविण्याच्या हेतूनें नव्हे, तर त्रैलोक्याला जिंकण्यासाठीं तुम्हीं ही तीव्र तपश्चर्या केलीत. यास्तव हे श्रेष्ठ दैत्यांनो, मला ही तुमची इच्छा पूर्ण करतां येत नाहीं.

सुंदोपसुंद म्हणाले—हे पितामहा, तर मग आम्हांला एकमेकांवांचून त्रिभुवनांतील दुसऱ्या कोणत्याहि स्थावर-जंगम पदार्थापासून भय नसावें, असा वर दे. तें ऐकून ब्रह्मदेव म्हणाला—“तुम्हीं प्रार्थिलेले सर्व वर मी तुम्हांला देतों. मृत्यूविषयींहि तुमच्या इच्छेप्रमाणेंच घडून येईल.”

बा युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या दोघां दैत्यांना वर देऊन पितामह ब्रह्मलोकीं निघून गेला व ते दोघे दैत्य तपापासून निवृत्त झाले. त्यानंतर वरानें सर्व लोकांना अवध्य झालेले ते दोघे दैत्येंद्र भ्राते स्वगृहीं परत आले. वर मिळवून कृतकृत्य व मनांत येईल तें करण्यास समर्थ झालेल्या त्या दोघांस पाहून त्यांचे सर्व आप्तसंबंधी जन अतिशय आनंदित झाले.

त्यांनीं आपल्या मस्तकावरील जटा काढून मुकुट धारण केले व ते निर्मल वस्त्रें व अमूल्य अलंकार यांनीं भूषित झाले. त्यांनीं आपल्या नगरांत सतत कौमुदीमहोत्सव सुरू केला. त्यांचे सर्व सुहृद् व आप्तजन नित्य सुखांत राहूं लागले. खा, प्या, द्या, क्रीडा करा, गा, हे शब्द घरोघर ऐकूं येऊं लागले. मंगल वाद्यांच्या व टाळ्यांच्या ध्वनींनीं तें दैत्यांचें नगर दुमदुमून गेलें व सर्वत्र आनंद पसरला. असे विविध विहार करण्यांत त्या कामरूपी दैत्यांचीं अनेक वर्षें एका दिवसाप्रमाणें निघून गेलीं. १. १४. २०९.

---

## अध्याय २१० वा.

[ १ सुंदोपसुंदांनीं केलेला जगाचा विध्वंस. ]

( १ ) नारद—युधिष्ठिरा, याप्रमाणें त्या दोघां बलाढ्य दैत्यांनीं दीर्घकाल आनंदांत घालविल्यानंतर त्रिभुवन जिंकण्याची इच्छा करणाऱ्या त्या दोघांनीं संकेत करून सैन्याला सज्ज होण्याची आज्ञा दिली. नंतर सुहृद्, आप्त व वृद्ध दैत्य मंत्री यांची अनुज्ञा घेऊन त्यांनीं प्रस्थानविधि केला व शुभ गमनाला निषिद्ध असलेल्या मघा नक्षत्रावर रात्रीं त्या असुरांनीं प्रयाण केलें. त्यांच्या बरोबर गदा, पट्टे, शूल व मुद्गर हातांत घेतलेली आणि इतर आयुधें धारण केलेली कवचयुक्त फार मोठी दैत्यसेना होती. त्या वेळीं चारणादिक विजयद्योतक मंगल गीतें व स्तुतिपाठ म्हणत असतां इच्छेस येईल तेथें गमन करणारे व युद्धाचा मद चढलेले ते दोघे दैत्य अंतरिक्षांत उड्डाण करून सैन्यासह देवलोकीं गेले. त्यांचें आगमन व पितामहानें त्यांना दिलेला वर जाणून सर्व देव स्वर्ग सोडून ब्रह्मलोकीं निघून गेले.

तेव्हां त्या दोघां भयंकर पराक्रमी दैत्यांनीं इंद्रलोक जिंकून यक्ष-राक्षसांचा समुदाय व अंतरिक्षांतील इतर प्राणी यांचा वध केला. त्यानंतर ते महारथ

वीर पातालांत गेले व तेथें त्यांनीं नागांना जिंकून समुद्रांत रहाणाऱ्या सर्व म्लेच्छ जातींना पराभूत केलें. तेथून ते क्रूर कर्मे करणारे दैत्य पृथ्वीतलावर आले व सर्व पृथ्वी जिंकण्याची इच्छा करणाऱ्या त्या असुरांनीं आपल्या सैनिकांना बोलावून त्यांस अशी निष्ठुर आज्ञा केली, " हे सैनिकहो, या पृथ्वीवर क्षत्रिय आणि ब्राह्मण यज्ञ व हव्य-कव्य यांच्या योगानें देवांचें बल व ऐश्वर्य वाढवीत असतात. यास्तव या कर्मांत प्रवृत्त होणाऱ्या त्या सर्व असुरशत्रूंचा आम्हीं सर्वांनीं मिळून पूर्णपणें नाश करावा, हेंच आपलें मुख्य कर्तव्य आहे."

याप्रमाणें आपल्या सैनिकांना आज्ञा करून ते दोघेहि सर्वत्र संचार करूं लागले. ते क्रूर कर्मांचा निश्चय करून प्रथम समुद्राच्या पूर्व तीरावर गेले. तेथें त्या बलाढ्य दैत्यांना यज्ञ-याग करणारे किंवा याजन करणारे जेवढे द्विज आढळले, त्या सर्वांचा बलात्कारानें वध करून ते पुढें निघाले. त्यांच्या सैन्यानें धार्मिक मुनींच्या आश्रमांत प्रवेश करून त्यांचीं अग्निहोत्रें उचलून निःशंकपणें जलांत फेकून दिलीं.

तेव्हां त्या क्रुद्ध झालेल्या तपोनिष्ठ महात्म्यांनीं त्यांना शाप दिले. परंतु ब्रह्मदेवाच्या वरानें निर्भय झालेल्या त्यांना ते शाप कांहीं करूं शकले नाहींत. उलट शिळेवर मारलेल्या बाणाप्रमाणें ते निष्फळ झाले. म्हणजे एखादा बाण शिळेवर मारला असतां तो तिचा छेद न करितां स्वतःच जसा बोथट होतो, त्याप्रमाणें वरसामर्थ्यानें वज्रप्राय झालेल्या त्या दैत्यांवर शापांचा कांहींच परिणाम झाला नाहीं.

त्यामुळें उद्विग्न झालेले ते सर्व द्विज आपलें व्रत व नियम सोडून मार्ग सांपडेल तेथें निघून गेले. पृथ्वीवर जेवढे तपोनिष्ठ, दमनशील व शमपरायण मुनि होते, तेवढे सर्व गरुडाला पाहून सर्प जसे पळतात तसे, त्या दोघां दैत्यांच्या भयानें पळाले, त्या दैत्यांनीं ऋषींचे आश्रम भग्न केले, त्यांचीं यज्ञोपयोगी कलश, स्रुक्, स्रुवा इत्यादि उपकरणें फोडून टाकिलीं. त्यामुळें सर्व जगत् कालानें ग्रासल्याप्रमाणें शून्य दिसूं लागलें. हे राजन्, कांहीं ऋषि अदृश्य होऊन राहिले आहेत असें जाणून त्या दोघां दैत्यांनीं व्याघ्र-सिंहादि विविध हिंस्र प्राण्यांचीं रूपें धारण करण्याचा निश्चय केला. आपलें हें कपट न जाणून ऋषि भूतलावर निर्भयपणें फिरूं लागले म्हणजे त्यांच्यावर गजादि रूपांनीं चाल करून त्यांचा वध करण्याचा त्या दैत्यांचा आशय होता.

याप्रमाणें ऋषिवधाची इच्छा करणारे ते दोघे दैत्य ज्यांच्या गंडस्थलांतून मद-स्राव होत आहे, अशा मत्त गजांचीं रूपें धारण करून निघाले व त्यांनीं पर्वतांच्या दुर्गम गुहेमध्यें गुप्तपणें बसलेल्या त्या मुनींना यमसदनीं पाठविलें. ते दोघे कधीं सिंह होऊन कधीं व्याघ्र होऊन तर केव्हां मध्येंच अदृश्य होऊन फिरूं लागले व त्यांनीं ऋषि दृष्टीस पडतांच त्यांचा निरनिराळ्या उपायांनीं वध केला. त्यामुळें त्या वेळीं सर्व पृथ्वींतील यज्ञ व स्वाध्याय निवृत्त झाले. ब्राह्मण व क्षत्रिय नष्ट झाले आणि सर्व उत्सव व याग उच्छिन्न झाले. सर्वत्र हाहाकार उडाला. जगांतील क्रय-विक्रयादि व्यवहार थांबला. देवकार्यें बंद पडलीं. विवाहादि मंगल-कार्यांचा अभाव झाला. कृषी व गोरक्षण कोणी करीनासे झाले.

फार काय, पण हे राजा, क्षत्रियांचीं नगरें व ब्राह्मणांचे आश्रम यांचा विध्वंस झाला. पृथ्वीवर सर्वत्र अस्थिपंजरांच्या राशी पडल्या. त्यामुळें सर्व भूलोक भयावह झाला. पितृकार्यें व वषट्कारादि मंगल कृत्यें यांचा अभाव झाला. सर्व जगत् भीषण व दुष्प्रेक्ष्य झालें. सुंदोपसुंदांचें हें क्रूर कर्म पाहून चंद्र, सूर्य, ग्रह, तारा, नक्षत्रें व देव अतिशय खिन्न झाले. राजा युधिष्ठिरा, अशा क्रूर कर्मानें सर्व दिशा जिंकून शत्रुरहित झालेले ते दोघे दैत्य कुरुक्षेत्रांत वास करूं लागले. १. १४. २१०.

---

## अध्याय २११ वा.

[ १ तिलोत्तमेची उत्पत्ति व तिचें सुंदोपसुंदांकडे गमन. ]

( १ ) **नारद**—हे पांडुपुत्रा, याप्रमाणें त्या दैत्यांनीं सर्व त्रिभुवनाला त्रस्त केलें. तेव्हां देवर्षि, सिद्ध व इतर श्रेष्ठ महर्षि तें महत् कदन पाहून परम दुःखार्त झाले व जितेंद्रिय, जितक्रोध व जितात्मे असलेले ते सर्व जगावर कृपा करण्यासाठीं ब्रह्मलोकीं गेले. तेथें त्यांनीं पितामहाला देव, सिद्ध व ब्रह्मर्षि यांच्या परिवारासह बसलेलें पाहिलें. तेथें महादेव, वायूसह अग्नि, चंद्र, आदित्य, इंद्र, ब्रह्मोपासक ऋषि, वैखानस, वालखिल्य, वानप्रस्थ, मरीचिप, अज, विमूढ, व तजोगर्भ या नांवाचे तपस्वी आले होते. ते सर्व महर्षि दीन होऊन ब्रह्मदेवापाशीं गेले व त्यांनीं सुंदापसुंदांचें तें सर्व घोर कृत्य त्यास निवेदन केलें. त्यांनीं पृथ्वीवर धनादिकांचा अपहार व प्राण्यांची हिंसा कशी कशी चालविली आहे तें सर्व पितामहाला सांगितलें आणि ते सर्व देवगण व महर्षि यांनीं असुरांच्या या कृत्याचा प्रतीकार करण्याविषयीं पितामहाची प्रार्थना केली.

तेव्हां त्या पूज्य देवाधिदेवानें त्या सर्वांचें तें आर्त वचन ऐकून क्षणभर विचार केला व कर्तव्याचा निश्चय करून त्यांच्या वधाचें साधन उत्पन्न करण्यासाठीं विश्वकर्म्याला बोलाविलें. तो समीप आला असतां, त्याच्याकडे पाहून 'हे विश्वकर्मन्, एक अतिशय कमनीय स्त्री निर्माण कर' अशी विधात्यानें त्यास आज्ञा केली.

ती ऐकून विश्वकर्म्यानें त्या पितामहाला नमस्कार केला व त्याच्या आज्ञावचनाचें अभिनंदन करून त्या निर्माणकुशल त्वष्ट्यानें पुनः पुनः विचार केला आणि एक अप्रतिम स्वरूपवती स्त्री निर्माण केली. या त्रिभुवनांत जें जें कांहीं दर्शनीय स्थावर-जंगम होतें, तें सर्व त्यानें एकत्र जमविलें. कोट्यवधि रत्नांनीं तिचे अवयव घडविले व ती देवरूपिणी स्त्री जणुं काय रत्नसंघातमयीच निर्मिली.

त्रिभुवनांतील स्त्रियांमध्यें रूपानें अप्रतिम अशी ती अप्सरा फार मोठ्या प्रयत्नानेंच उत्पन्न केली होती. तिच्याकडे पहाणाऱ्या लोकांची दृष्टि तिच्या रूपसंपत्तीमुळें ज्यामध्यें आसक्त होत नाहीं, असा तिच्या अवयवांमध्यें एखादा सूक्ष्म भागहि नव्हता. ती मूर्तिमंत कामरूपा श्रीच असून जणुंकाय सर्व लोकांना मोहित करण्यासाठीं सशरीर झाली होती. त्या कामिनीनें लोकांचे चक्षु व मन यांचें हरण केलें. ज्या अर्थी सर्व रत्नांतील तिळ तिळ अंश घेऊन विश्वकर्म्यानें तिला निर्मिलें होतें त्या अर्थी तिचें 'तिलोत्तमा' असें नांव ठेविलें.

त्यानंतर ब्रह्मदेवाला नमस्कार करून व हात जोडून ती म्हणाली—हे भूतेशा, ज्यासाठीं तूं मला उत्पन्न केलेंस, तें कोणतें कार्य मी आज करूं, त्याची आज्ञा कर.

तिचें वचन ऐकून पितामह म्हणाला—हे भद्रे तिलोत्तमे, सुंदोपसुंद असुरांकडे जा व आपल्या कमनीय रूपानें त्यांना मोहित कर. नुसत्या दर्शनानेंच तुझ्या स्वरूपावर आसक्त होऊन त्या दोघां असुरांचा तुझ्यासाठीं परस्पर विरोध उत्पन्न होईल असें कर.

ही आज्ञा ऐकतांच तिलोत्तमा 'ठीक आहे' असें बोलून, पितामहाला नमस्कार करून व देवसमूहाला प्रदक्षिणा घालून निघाली. ती प्रदक्षिणा घालीत असतां तिचें स्वरूप पाहून देवांनाहि मोह पडला.

हे राजन्, भगवान् विष्णु प्राङ्मुख झाला. महेश्वर दक्षिणेकडे पाहूं लागला. इतर देव उत्तरेकडे पाहूं लागले. ऋषि सर्व दिशांकडे पाहूं लागले. इंद्र व

भगवान् रुद्र हे दोघे मात्र त्या वेळीं धैर्यानें स्थिर राहिले. आपल्या जवळून गेलेल्या तिलोत्तमेला पाहण्याची इच्छा करणाऱ्या त्या रुद्राचें कमलाप्रमाणें नेत्र असलेलें सुंदर दक्षिण मुख उत्पन्न झालें. पाठीमागून जाणाऱ्या तिला पहाण्यासाठीं पश्चिममुख उद्भवलें. ती प्रदक्षिणा क्रमानें डाव्या बाजूनें जाऊं लागली असतां त्याचें उत्तर मुख उद्भवलें. इंद्राच्या तर अग्रभागीं, पृष्ठभागीं आणि दोन्ही पार्श्वभागीं विशाल आरक्त वर्ण सहस्र नेत्र उत्पन्न झाले. याप्रमाणें पूर्वी महादेव स्थाणु चतुर्मुख झाला व बलसूदन इंद्र सहस्रनेत्र झाला. देव व महर्षि यांनीं ज्या ज्या बाजूनें तिलोत्तमा गेली, त्या त्या बाजूला आपलें मुख फिरविलें.

युधिष्ठिरा, एका पितामहावांचून बाकी सर्व महात्म्या देवर्षींची दृष्टि तिच्या शरीरावर खिळून राहिली. देवलोकांतून जात असलेल्या तिलोत्तमेनें आपल्या रूपसंपत्तीनें सर्व देव व महर्षि यांना मोहित केलेलें पाहून ब्रह्मदेवादि सर्व देवगण सुंदोपसुंदांच्या नाशाचें कार्य हिनें केलेंच आहे, असें समजले. याप्रमाणें तिलोत्तमा तेथून गेली आहे असें पाहून देवाधिदेव प्रजापतीनें देव व ऋषिगण यांस स्व-स्वस्थानीं जावयास सांगितलें. १. १४. २११.

---

## अध्याय २१२ वा.

[ १ सुंदोपसुंदांचा नाश. २ पांडवांचा नियम. ]

( १ ) **नारद**—हे युधिष्ठिरा, पृथ्वीला जिंकून शत्रुरहित व निर्भय झालेले ते दोघे दैत्य सर्व त्रिभुवन एकरूप करून कृतकृत्य झाले होते. देव, गंधर्व, यक्ष, नाग, राक्षस व मानव, या लोकांत जेवढ्या उत्कृष्ट वस्तु होत्या, त्या सर्वांचें ग्रहण करून ते दोघे असुर संतुष्ट झाले. त्यांना प्रतिबंध करणारा कोणीहि शत्रु राहिला नसल्यामुळें ते निरुद्योगी होऊन दोन देवांप्रमाणें विहार करूं लागले. ते असुर स्त्रिया, पुष्पमाला, सुगंधित द्रव्यें, विपुल भक्ष्य-भोज्य पदार्थ व आल्हादकारक विविध पेयें यांचें परम प्रीतीनें सेवन करूं लागले. अंतःपुर, उद्यान, पर्वत, वन इत्यादि इच्छेस येईल त्या प्रदेशांत ते विहार करीत.

एकदा ते दोघे भ्राते विंध्यपर्वताच्या शिखरावरील समान व सपाट प्रदेशीं विहार करावयास गेले. तें शिलातल पुष्पित तालवृक्षांनीं युक्त होतें. सर्व दिव्य भोग भोगल्यावर त्याच श्रेष्ठ आसनावर ते दोघे स्त्रियांसह हृष्ट चित्तानें बसले.

त्यावेळीं त्या स्त्रियांनीं गायन, वादन व नृत्य यांच्या योगानें त्यांची उपासना करून व स्तुतियुक्त गीत गाऊन त्यांचें रंजन केलें.

इतक्यांत त्या वनामध्यें फुलें वेंचणारी तिलोत्तमा आली. तिनें अतिशय पातळ एकच तांबडें वस्त्र धारण केलें होतें. ती नदीतीरावरील कण्हेरीचीं फुलें वेंचीत हळुहळू जेथें ते महा असुर बसले होते तेथें आली.

त्यावेळीं उत्कृष्ट मद्यपानाच्या धुंदीनें आरक्त नेत्र झालेले ते दोघे भ्राते त्या सुंदरीला पाहून कामविह्वल झाले. ते दोघेहि आपल्या आसनावरून उठले व जेथें ती लावण्यवती उभी होती तेथें आले. ते दोघेहि कामासक्त होऊन तिची कामना करूं लागले. सुंदानें तिचा उजवा हात धरिला व उपसुंदानें डावा हात धरिला. ते दोघेहि दैत्य प्रजापतीच्या वरानें व स्वतःच्या शरीरबलानें आधींच मत्त झाले होते. त्यांत धन, ऐश्वर्य आणि सुरापान यांची भर पडली. या सर्व मदांनीं उन्मत्त होऊन ते एकमेकांकडे डोळे वटारून पाहूं लागले. त्यांच्या शरीरांत काममदाचा संचार होतांच ते परस्परांस क्रोधानें असें बोलूं लागले.

सुंद म्हणाला—ही माझी भार्या तुला मातेसमान आहे. त्यावर उपसुंद म्हणाला—नाहीं, ही माझी भार्या आहे, ती तुला स्नुषेसमान आहे. याप्रमाणें 'ही तुझी नाहीं, माझी,' असें बोलतां बोलतां ते दोघेहि क्रोधाविष्ट झाले. तिच्या रूपावर आसक्त झालेले ते भ्राते परस्परांवरील निःसीम स्नेह विसरले व त्यांनीं आपल्या भयंकर गदा हातांत घेतल्या.

याप्रमाणें काममोहित झालेले ते दोघे दैत्य 'मी आधीं, मी आधीं,' असें बोलून एकमेकांच्या मस्तकावर आपल्या उग्र गदांचे प्रहार करून भूमीवर मृत होऊन पडले. त्यावेळीं त्या दोघांचे रक्तानें माखलेले देह आकाशांतून च्युत झालेल्या बाल सूर्याप्रमाणें दिसले. अशाप्रकारें ते बलाढ्य भ्राते| मरण पावलेले पहातांच त्या स्त्रिया व सर्व दैत्यगण तेथून पळाले आणि भय व खेद यांनीं कंपित होऊन त्या सर्वांनीं पातालांत प्रवेश केला.

त्यानंतर सर्व देव व महर्षि यांसह पितामह तेथें आला. त्या विशुद्धात्म्यानें तिलोत्तमेचा योग्य सत्कार केला व तिला वर दिला. संतुष्ट होऊन वर देण्याची इच्छा करणारा तो भगवान् पितामह तिला म्हणाला—" हे भामिनि, जेथें जेथें सूर्याचा संचार होतो, त्या सर्व लोकांत तूं संचार करशील. तुझ्या उग्र तेजामुळें तुला पहाणारांची दृष्टि दिपून जाईल." याप्रमाणें तिला वर व इंद्राला त्रिभुवनाचें राज्य देऊन तो प्रभु आपल्या ब्रह्मलोकीं निघून गेला.

हे कुंतीपुत्रा, याप्रमाणें सर्व कर्तव्यांमध्यें एक निश्चयानें वागणाऱ्या व सर्वदा एकत्र रहाणाऱ्या त्या भ्रात्यांनीं तिलोत्तमेसाठीं क्रुद्ध होऊन एकमेकांचा नाश केला. यास्तव मी तुम्हांला मोठ्या स्नेहानें सांगतों कीं, जर तुम्हांला माझें प्रिय करण्याची इच्छा असेल तर, ज्यायोगें द्रौपदीसाठीं तुम्हांमध्यें भेद उत्पन्न होणार नाहीं, असें वर्तन तुम्ही ठेवा. तुमचें कल्याण होवो.

( २ ) राजा जनमेजया, नारदाचें हें वचन ऐकून परस्परांवर प्रेम करणाऱ्या महा बलाढ्य पांडवांनीं ' आमच्यापैकीं एक भ्राता द्रौपदीसह असतांना तेथें जो कोणी दुसरा भ्राता जाईल, त्यानें बारा वर्षें ब्रह्मचर्यानें वनांत रहावें. ' असा देवर्षीच्या समक्ष नियम केला. त्या धार्मिक पांडवांनीं असा नियम केला असतां तो महामुनि मोठ्या संतोषानें आपल्या इष्ट देशीं निघून गेला. याप्रमाणें त्या बुद्धिमान् पांडवांनीं नारदमुनीच्या प्रेरणेनें पूर्वीच नियम करून ठेवल्यामुळें त्यांच्यामध्यें केव्हांहि परस्पर वैर उत्पन्न झालें नाहीं. १. १४. २१२.

येथें चवदावें विदुरागमन-राज्यलंभपर्व समाप्त झालें.

---

# अर्जुनवनवासपर्व १५.



## अध्याय २१३ वा.

[ १ ब्राह्मणाच्या गोधनाचें हरण. २ त्यास अर्जुनाचा प्रतीकार. ३ नियम-भंगाच्या निवृत्तीसाठीं अर्जुनाचा वनवास. ]

( १ ) **वैशंपायन**—हे परिक्षित्पुत्रा, वर सांगितल्याप्रमाणें परस्पर नियम करून ते पांडव खांडवप्रस्थ नगरांत आपल्या शस्त्रप्रतापानें अन्य राजांना अधीन करून सुखानें राहूं लागले. कृष्णा त्या पांची अति बलाढ्य पार्थांना अनुकूल होऊन राहिली. ज्याप्रमाणें अनेक सरोवरांनीं युक्त असलेली वनस्थली गजांच्या योगानें व ते गज त्या स्थलीच्या योगानें शोभतात, त्याचप्रमाणें कृष्णेच्या योगानें पांडव व पांच वीर पतींच्या योगानें कृष्णा परम संतुष्ट होऊन शोभली. महात्मे पांडव धर्मानें वागत असतां सर्व कुरुदेशाचा मोठा उत्कर्ष झाला. त्यांतील सर्व दोष निवृत्त झाले व प्रजा सुखी झाली.

हे पांडवेया, याप्रमाणें दीर्घ काल लोटल्यावर एकदा कांहीं चोरांनीं एका ब्राह्मणाच्या गायी चोरल्या. आपलें गोधन चोर हरण करून नेत आहेत, असें

पाहून ब्राह्मण क्रुद्ध होऊन खांडवप्रस्थास आला व पांडवांना संबोधून तो मोठ-मोठ्यानें आक्रोश करूं लागला—" हे पांडवहो, हे क्षुद्र, निर्दय व दुर्बुद्धि चोर माझ्या घरांतून माझें गोधन बलात्कारानें हरण करून नेत आहेत. एका शांत ब्राह्मणाचा हा हवि दुष्ट काक पळवीत आहेत. सिंहाच्या शून्य गुहेला हा नीच कोल्हा दूषित करीत आहे. प्रजेपासून षष्ठांश कर घेऊन जो राजा प्रजेचें रक्षण करीत नाहीं, तो सर्व लोकांच्या पापाचा अधिकारी होतो असें म्हणतात. यास्तव चोरांनीं ब्राह्मणाचें धन हरण केल्यामुळें धर्मकार्य लुप्त होणार, या भीतीनें आक्रोश करीत असलेल्या मज ब्राह्मणाला अभय द्या."

( २ ) जनमेजया, याप्रमाणें राजगृहापाशीं येऊन मोठ-मोठ्यानें आक्रोश करणाऱ्या त्या ब्राह्मणाचें वचन ऐकून कुंतिपुत्र धनंजय ' ब्राह्मणा, भिऊं नकोस.' असें म्हणाला; पण महात्म्या पांडवांचीं आयुधें जेथें ठेवलीं होतीं, तेथें धर्मराज युधिष्ठिर कृष्णेसह होता. त्यामुळें त्या वीर पांडवाला आपलीं आयुधें घेण्यासाठीं तेथें जातां येईना व आयुधावांचून त्याला चोरांचा पाठलागहि करितां येईना. गोधन नष्ट झाल्यामुळें आर्त झालेल्या त्या ब्राह्मणाचीं वाक्यें त्याला स्वस्थहि राहूं देईनात. त्यामुळें मनांत अतिशय खिन्न झालेल्या धनंजयानें मनांत असा विचार केला.

" या तपस्वी ब्राह्मणाचें गोधन चोर हरण करीत असतांना त्यांचा प्रतीकार करून ब्राह्मणाच्या दुःखाचें परिमार्जन करणें हा आपला धर्म आहे. याची उपेक्षा केल्यास राजाला फार मोठा अधर्म लागेल. हा ब्राह्मण राजद्वारीं येऊन असा मोठा आक्रोश करीत असतांना जर मी आज याचें रक्षण केलें नाहीं, तर आमच्या रक्षणावरील सर्वांचा विश्वास उडेल. आम्ही संकटप्रसंगीं प्रजेचें रक्षण करीत नाहीं, अशी आमची अपकीर्ति होईल व आम्हांला अधर्महि लागेल. बरें, राजाचा अनादर करून स्त्रीसह असलेल्या त्या अजातशत्रूपाशीं जर मी गेलों तर त्याचा नियम मोडला असें होईल व आमच्या नियमाप्रमाणें मला बारा वर्षें वनवास करावा लागेल. पण वनवासादि बाकीचें सर्व राजाच्या अपमानापुढें तुच्छ आहे. अधर्म त्याहिपेक्षां भयंकर आहे. यास्तव वनामध्यें मला मरण आलें तरी चालेल; कारण शरीराच्या विनाशानें मला श्रेष्ठ धर्म जोडतां येईल; पण या प्रसंगीं ब्राह्मणाच्या धनाचें रक्षण करणें सर्वथा उचित होय."

असा विचार करून कुंतीपुत्र धनंजय आयुधागारांत गेला व राजाच्या आज्ञेनें आपलें धनुष्य घेऊन संतुष्ट चित्तानें बाहेर आला आणि ब्राह्मणास

म्हणाला—" ब्राह्मणा, माझ्याबरोबर सत्वर ये. दुसऱ्याच्या धनाची इच्छा करणारे ते क्षुद्र चोर दूर गेले नाहींत तोंच आपण त्यांना गांठूं. मी त्यांच्यापासून तुझें धन हिरावून घेऊन तुला देईन."

त्यानंतर अंगांत चिलखत घालून, ध्वजयुक्त रथांत बसून धनुर्धर पार्थ निघाला व त्यानें थोड्याच अवधींत बाणांनीं त्या चोरांचा नाश करून ब्राह्मणाचें गोधन सोडविलें आणि तें ब्राह्मणाला परत देऊन संतुष्ट केलें. त्यामुळें सर्व प्रजेमध्यें त्याचें निर्मल यश पसरलें.

( ३ ) राजा जनमेजया, याप्रमाणें तुझ्या वीर पूर्वजानें चोरांनीं हरण केलेलें ब्राह्मणाचें गोधन त्यास परत देऊन त्याचा आशीर्वाद घेतला व तो वीर सव्यसाची धनंजय खांडवप्रस्थास परत आला. राजमंदिरांत आल्यावर त्यानें कुंती, युधिष्ठिर, भीम व इतर पूज्य गुरुजन, यांस अभिवादन केलें. तेव्हां विजयी धनंजयाचें सर्व लहान-थोरांनीं अभिनंदन केलें.

त्यानंतर तो सत्यप्रतिज्ञ अर्जुन धर्मराजास म्हणाला—हे प्रभो, मला व्रताचरणाची आज्ञा दे. द्रौपदीसह एकांतांत असलेल्या तुझ्याजवळ येऊन मीं नियमाचें उल्लंघन केलें आहे. यास्तव आतां मी बारा वर्षें वनवास करीन. कारण आपण हाच नियम केला आहे.

अर्जुनाच्या मुखांतून अकस्मात् निघालेलें हें अप्रिय वाक्य ऐकून धर्मराज शोकाकुल झाला व सद्गदित स्वरानें त्यास म्हणाला—" वत्सा, तूं हें काय म्हणतोस ! तुझें हें भाषण ऐकून माझें देहभान नाहींसें झालें आहे. "

त्यानंतर भ्राता युधिष्ठिर मनांत पुष्कळ विचार करून अतिशय दीन झाला व आपल्या धनंजय भ्रात्याला पुनः म्हणाला—"हे प्रियदर्शन अर्जुना, मी जर तुला प्रमाण असेन, तर मी काय म्हणतों, तें ऐक. हे वीरा, तूं आयुधासाठीं माझ्या अंतःपुरांत प्रवेश करून जें माझें अप्रिय केलें आहेस, त्यांत यत्किंचित्‌हि दोष न पहातां मी तो तुझा गुणच समजत आहें. त्यामुळें 'माझें तूं कांहीं अप्रिय केलेंस' असें माझ्या मनांतहि येत नाहीं. कनिष्ठ भ्रात्यानें ज्येष्ठ भ्रात्याच्या एकान्तांत प्रवेश करणें यांत अनिष्ट असें कांहींच नाहीं. पण कनिष्ठ भ्रात्याच्या एकान्तांत ज्येष्ठ भ्रात्यानें प्रवेश केल्यास तो मात्र धर्मघ्न होतो. यास्तव हे वीरा, तूं आपला हा संकल्प सोड व माझें वचन मान्य कर. तुझा धर्मलोप झालेला नाहीं व तूं माझा अपमानहि केला नाहींस, हें मी तुला सत्य सांगत आहें."

युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला—अशा कपटानें धर्माचरण करूं नये असें मी तुझ्याच तोंडून ऐकिलें आहे. यास्तव मी आपल्या आयुधाला स्पर्श करून सत्य सांगतों कीं, मी आपल्या सत्य प्रतिज्ञेपासून केव्हांहि ढळणार नाहीं.

राजा जनमेजया, असा आपला निग्रह व्यक्त करून व धर्मराजाची आज्ञा घेऊन कुंतीचा कनिष्ठ पुत्र अर्जुन वनवासास सज्ज झाला व बारा वर्षें वनांत रहाण्याच्या संकल्पानें निघून गेला. १. १५. २१३.

---

## अध्याय २१४ वा.

[ १ अर्जुनाची तीर्थयात्रा. २ उलूपीनागकन्येचा भार्यात्वानें स्वीकार. ]

(१) वैशंपायन—राजा परिक्षित्पुत्रा, वनवासास निघालेल्या त्या महाबाहु, यशस्वी कुंतीपुत्राबरोबर वेदवेत्ते महात्मे ब्राह्मण, वेदवेदाङ्गपरायण विद्वान्, त्याचप्रमाणें अध्यात्मवेत्ते, भिक्षाचरण करणारे, भगवद्भक्त, सूत, पौराणिक, कथेकरी, वनौकस ऊर्ध्वरेते, यति व ब्रह्मचारी यांचा समुदाय निघाला. तसेच, दिव्य आख्यानांचा मधुर स्वरानें पाठ करणारे द्विजहि त्याच्याबरोबर होते. या सर्व मृदुभाषण करणाऱ्या अनेक विप्रसंघाच्या सोबतीनें चाललेला तो पांडुनंदन देवगणांनीं वेष्टिलेल्या इंद्राप्रमाणें शोभला.

हे भारता, मार्गामध्यें त्यानें अनेक चित्र-विचित्र वनें, रमणीय सरोवरें, नद्या, सागर, विविध देश व पवित्र तीर्थें पाहिलीं. गंगाद्वाराला पोंचल्यावर पार्थ त्या तीर्थाचा आश्रय करून तेथें राहिला.

( २ ) हे जनमेजया, तेथें त्या सदाचरणी पांडुपुत्रानें जें एक अद्भुत कर्म केलें तें ऐक. त्या स्थानीं अर्जुनासह रहात असतां ब्राह्मणांनीं अनेक अग्निहोत्रें सुरू केलीं. ते सर्व द्विज प्रथम गंगेंत स्नान करीत, नंतर त्या गंगातीरावर अग्नि प्रज्वलित करीत व त्या प्रज्वलित झालेल्या अग्नींत आहुत्या देत आणि पुष्पादिकांनीं पूजा करून त्याची उपासना करीत. याप्रमाणें धर्माचरणांत स्थित असलेल्या व व्रतधारण करणाऱ्या त्या महात्म्या विद्वानांच्या योगानें तें गंगाद्वार अतिशय शोभलें.

हे राजन्, तें गंगातीर असें गजबजून गेलें असतां एकदा धर्मात्मा कौंतेय स्नानासाठीं गंगेंत उतरला. तेथें स्नान करून त्यानें पितरांचें तर्पण केलें आणि पत्नीसांनिध्याच्या अभावींहि, उपासनाहोम इत्यादि अग्निकार्य करण्यासाठीं

तो तीरावर येण्याची जों इच्छा करीत आहे तोंच अकस्मात् एका नागकन्येनें त्याला जलांत ओढून नेलें.

ती उलूपी-नांवाची नागराजाची कन्या त्या महाबाहु अर्जुनाची पतीच्या इच्छेनें कामना करीत होती. नागलोकीं गेल्यावर शांतचित्त पार्थानें 'कौरव्य-' नामक नागाच्या सुंदर भवनांत प्रदीप्त अग्नि पाहिला व आपद्धर्म समजून निःशंकपणें त्यांतच अग्निकार्य केलें. त्यामुळें अग्नि त्याच्यावर संतुष्ट झाला.

याप्रमाणें आपलें अग्निकार्य उरकल्यावर त्या कुंतीपुत्रानें नागराजकन्येला हंसत म्हटलें—हे भामिनि, तूं हें साहस कशासाठीं केलेंस ? हे सुभगे, हा कोणाचा देश आणि तूं कोणाची कन्या ?

त्याचा हा प्रश्न ऐकून उलूपी म्हणाली—हे राजन्, 'कौरव्य'-नांवाचा एक ऐरावतकुलोत्पन्न नाग आहे. त्याची मी 'उलूपी'-नांवाची कन्या आहें. हे नरव्याघ्रा, मी तुला स्नानासाठीं नदीमध्यें उतरलेलें पाहून कामविह्वल झालें व येथें आणिलें. हे निष्पाप कुंतीपुत्रा, तुझ्यावर आसक्त होऊन काममोहित झालेल्या मला संतुष्ट कर. मी तुला अनन्य शरण आलें आहें; माझा स्वीकार कर.

अर्जुन म्हणाला—हे कल्याणि, धर्मराजानें मला बारा वर्षें ब्रह्मचर्य पालन करण्याची आज्ञा केली आहे. त्यामुळें मी स्वतंत्र नाहीं. हे नागकन्ये, तुझें प्रिय करण्याचीहि माझी इच्छा आहे, परंतु मी यापूर्वीं केव्हांहि असत्य भाषण केलेलें नाहीं. यास्तव मला असत्याचा दोष न लागतां तुझेंहि प्रिय होईल व माझा धर्महि दूषित न होईल, असें तूं कर.

तेव्हां उलूपी स्वतःचें अतींद्रिय ज्ञान प्रकट करीत म्हणाली—हे पांडवेया, तूं पृथ्वीवर कां फिरत आहेस व तुला या ब्रह्मचर्याची आज्ञा ज्येष्ठ भ्रात्यानें कां केली आहे, तें सर्व मी जाणतें. द्रौपदीसह एक भ्राता एकान्तांत असतां तेथें जो कोणी दुसरा भ्राता मोहानें जाईल, त्यानें बारा वर्षें ब्रह्मचर्यव्रतानें वनांत रहावें, असा जो नियम तुम्हीं केलात तो केवल द्रौपदीसंबंधीच आहे. हा नियम तुम्ही आपल्या राजमंदिरांत असतांना आपल्या धर्माचें रक्षण करण्यासाठीं केला आहे. पण तो तुझा धर्म येथें दूषित होणार नाहीं. कारण आर्ताचें रक्षण अवश्य करावें, अशी धर्माज्ञा आहे. माझें रक्षण केल्यानें तुझा धर्म लुप्त होणार नाहीं. किंवा हे अर्जुना, यांत जरी धर्माचें सूक्ष्म प्रमाणानें अतिक्रमण झालें, तरी माझे प्राण वांचविण्यानें तुला पुण्यच लागेल.

हे पार्था, मज भक्तावर प्रसन्न हो व माझा स्वीकार कर. अनुरक्त कामिनीचा स्वीकार करणें सज्जनांना संमत आहे. हे प्रभो, माझी इच्छा जर तूं पूर्ण करणार नाहींस, तर मी मृतच झालें असें तूं समज. हे महाबाहो, मला प्राणदान देऊन उत्तम धर्माचें आचरण कर. हे पुरुषोत्तमा, मी तुला आज शरण आलें आहें. हे कौंतेया, तूं नित्य दीन व अनाथांचें रक्षण करितोस. मी दुःखानें विह्वल होऊन तुला शरण आलें आहें, तुझ्यापाशीं याचना करीत आहें, यास्तव माझें प्रिय कर व आत्मसमर्पणानें मला तृप्त कर.

राजा, त्या नागराजकन्येनें आर्त होऊन अशी प्रार्थना केली असतां कौंतेयानें तिला संतुष्ट केलें. तो प्रतापवान् पार्थ त्या रात्रीं नागभुवनांतच राहिला व प्रातःकालीं सूर्योदय होतांच त्या कौरव्यनागाच्या मंदिरांतून निघून तिच्यासह पुनः गंगाद्वारीं परत आला. पार्थाला मुनिसमुदायांत सोडून त्या साध्वी उलूपीनें 'तुला जलामध्यें सर्वत्र जय प्राप्त होईल व सर्व जलचर तुला अनुकूल होतील' असा वर दिला आणि ती श्रेष्ठ नागकन्या आपल्या मंदिरांत निघून गेली. १. १५. २१४.

---

## अध्याय २१५ वा.

[ १ अर्जुनाची पुढील तीर्थयात्रा. २ चित्रांगदेचें पाणिग्रहण. ]

( १ ) वैशंपायन—हे भरतश्रेष्ठा, तो पराक्रमी शक्रात्मज पार्थ गंगेतून बाहेर आल्यावर घडलेला सर्व प्रकार ब्राह्मणांना निवेदन करून हिमालय पर्वताकडे निघून गेला. तेथून तो अगस्त्य-वटाला प्राप्त होऊन तेथून वसिष्ठ-पर्वतावर गेला व तुंगनाथ तीर्थावर जाऊन तेथें स्नानादिकांनीं तो शुचिर्भूत झाला. त्यानें ब्राह्मणांना हजारों गायी व अनेक गृहें दान दिलीं. नंतर त्यानें हिरण्यबिंदुतीर्थांत स्नान करून पवित्र देवालयें पाहिलीं व तो ब्राह्मणांसह पर्वतावरून खालीं उतरून पूर्वदिशेकडे जावयास निघाला.

हे भारता, जातां जातां त्यानें मार्गांतील अनेक तीर्थें क्रमानें पाहिलीं. नैमिषारण्य, उत्पलिनी नदी, नंदा, अपरनंदा, कौशिकी, यशस्विनी, महानदी, गया, गंगा इत्यादि सर्व नद्या, तीर्थें व आश्रम पहाणाऱ्या त्यानें स्वतःला पावन केलें. ब्राह्मणांना गायी दिल्या. अंग, वंग, कलिंग या प्रदेशांत जेवढीं तीर्थें व पवित्र स्थलें होतीं, तीं सर्व त्यानें यथाविधि पाहून तेथील ब्राह्मणांना धन दिलें.

कलिंग-राष्ट्राच्या सीमेवर पार्थाचे अनुयायी ब्राह्मण त्याला पुढें जाण्याची अनुज्ञा देऊन परत फिरले. तेव्हां तो कुंतीपुत्र धनंजय बरोबर थोडेसे शूर सहायक घेऊन समुद्राकडे निघाला.

कलिंग-देश सोडल्यावर रम्य मंदिरें, प्रेक्षणीय देश व विविध स्थलें पहात पहात तो वीर तापसांनीं शोभणाऱ्या महेंद्रपर्वतापाशीं आला. तो पर्वत पाहून कौंतेय समुद्राच्या तीरानें हळुहळू मणिपुरास गेला. तेथील सर्व तीर्थें व पुण्यप्रद स्थानें पहात तो मणिपुराधिपति धर्मज्ञ चित्रवाहन-राजापाशीं गेला. कारण त्या नृपतीला 'चित्रांगदा'-नांवाची एक सुंदर कन्या होती. ती यदृच्छेनें नगरांत फिरत असतां अर्जुनाच्या दृष्टीं पडली. त्या रूपवतीला पाहून पार्थाला तिच्या प्राप्तीची इच्छा झाली. त्यानें राजापाशीं जाऊन आपल्या येण्याचें प्रयोजन त्यास निवेदन केलें. तो म्हणाला—"हे राजन्, मज महात्म्या क्षत्रियाला ही कन्या दे."

तें ऐकून राजा म्हणाला—तूं कोणाचा पुत्र आहेस? तुझें नांव काय? तेव्हां 'मी पांडव कुंतीपुत्र धनंजय आहे' असें पार्थानें सांगितलें असतां चित्रवाहन-राजा मोठ्या आदरानें त्यास असें मधुर वचन बोलला—

(२) हे वीर पांडवा, आमच्या या कुलांत 'प्रभंजन'-नांवाचा एक राजा होऊन गेला. त्याला पुत्र नव्हता, म्हणून त्यानें पुत्रासाठीं उत्तम तप केलें. हे पार्था, त्याच्या उग्र तपानें संतुष्ट झालेल्या देवाधिदेव उमापतीनें त्याला त्याच्या कुलांत एकेकच अपत्य होईल असा वर दिला. त्यामुळें या कुलांतील पुरुषांना सर्वदा एकेकच अपत्य होतें. आजपर्यंत माझ्या सर्व पूर्वजांना पुत्रच होत आले. मला मात्र ही कन्या झाली आहे. तीच माझ्या कुलाची वृद्धि करणारी आहे. त्यामुळें हे पुरुषश्रेष्ठा, हा माझा पुत्रच आहे, अशी माझी भावना आहे. कारण ब्रह्मदेवानें 'पुत्राला कारण होणाऱ्या पुत्रिकेलाहि पुत्रच म्हणावें' असें विधान केलें आहे.

यास्तव हे वीरा, मी तुला ही आपली कन्या पुत्रिकाधर्मानें देतों. पण तुझ्यापासून हिच्या ठिकाणीं जो पुत्र होईल, तोच हिचें शुल्क असून तुझा पुत्र माझ्या कुलाची वृद्धि करणारा होईल. यास्तव हे पांडवा, तूं या नियमानें माझ्या कन्येचा स्वीकार कर. तेव्हां 'ठीक आहे' अशी सत्य प्रतिज्ञा करून व त्या राजकन्येचें पाणिग्रहण करून तो कुंतीपुत्र त्या नगरांत तीन् वर्षें राहिला.

तिच्या ठिकाणीं पुत्रोत्पत्ति झाली असतां त्या श्रेष्ठ भार्येला आलिंगन देऊन व राजाचा निरोप घेऊन तो तीर्थयात्रा करावयास तेथून निघाला. १.१५. २१५.

---

## अध्याय २१६ वा.

[ १ पांच शून्य तीर्थांचें दर्शन व सौभद्रतीर्थांतून वर्गा अप्सरेचा उद्धार. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, त्यानंतर पराक्रमी पार्थ तपस्व्यांनीं शोभणाऱ्या दक्षिण समुद्राच्या तीरावरील अतिशय पुण्यपद तीर्थांस गेला. तेथील अगस्त्य तीर्थ, सौभद्र, परम पावन पौलोम, अश्वमेधाचें फळ देणारें प्रसन्न कारन्धम व महापापांचें क्षालन करणारें भारद्वाज तीर्थ, हीं पांच तीर्थें पूर्वीं तपस्व्यांनीं व्यापिलेलीं असून सांप्रत वर्ज्य केलीं होतीं, म्हणून तीं पांची तीर्थें त्या कुंतीपुत्रानें मुद्दाम पाहिलीं. जेथील दुर्मरणाचा दोष तीर्थानेंहि नाश पावत नाहीं, असें जाणणाऱ्या मुनींनीं वर्ज्य केलेलीं तीं निर्जन तीर्थें पाहून त्या पांडवानें हात जोडून—'हे तापसहो, ब्रह्मवेत्त्यांनीं हीं तीर्थें कशासाठीं वर्ज्य केलीं आहेत ?' असें तपस्व्यांना विचारलें.

**तापस** म्हणाले—कुरुनंदना, या तीर्थांमध्यें पांच सुसरी रहातात आणि त्या तपस्व्यांना ओढून नेतात. त्यामुळें त्यांनीं हीं तीर्थें वर्ज्य केलीं आहेत.

हे राजन्, त्यांचें हें वचन ऐकून तो कुरुनंदन, तापसांनीं त्याचें निवारण केलें असतांहि, तीं तीर्थें पहावयास गेला. प्रथम तो महर्षींच्या सौभद्र-नामक उत्तम तीर्थावर गेला. तेथील मोठ्या ऱ्हदांत त्या शूरानें निःशंकपणें स्नान केलें. पण तो बाहेर येत असतां एका महा सुसरीनें त्या पराक्रमी धनंजयाचा पाय धरला; तेव्हां त्या बलवानांतील श्रेष्ठ कौंतेयानें आपल्या बाहुबलानें त्या धडपड करणाऱ्या सुसरीला उचलून पाण्याच्या बाहेर आणिलें व तिला त्या यशस्वी अर्जुनानें भूमीवर ठेविलें, तोंच ती आपलें सुसरीचें रूप टाकून सर्व अलंकारांनीं युक्त अशी सुंदर स्त्री झाली. हे राजन्, ती स्त्री आपल्या कांतीनें शोभणारी, दिव्यरूप धारण करणारी व मनोरम होती. तें महदाश्चर्य पाहून संतुष्ट झालेला कुंतीपुत्र धनंजय त्या स्त्रीला म्हणाला—"हे कल्याणि, तूं कोण आहेस ? तूं जलचरी कशी झालीस ? तूं पूर्वीं कोणतें महत्पाप आचरिलें होतेंस ?"

अर्जुनाचा हा प्रश्न ऐकून ती देवस्त्री म्हणाली—हे महाबाहो, देवांच्या वनांत विहार करणारी मी 'वर्गा'-नामक अप्सरा आहें. कुबेराला मी नित्य

प्रिय होतें. हे महाबल, माझ्या आणखी चौघी सख्या आहेत. त्याहि सर्व इच्छेस येईल तेथें गमन करण्यास समर्थ व सुलक्षणी आहेत. एकदा मीं त्यांच्यासह कुबेरच्या निवासस्थानाकडे जात असतां मार्गांत एक तीव्र व्रतधारण करणारा ब्राह्मण पाहिला. तो रूपवान्, अध्ययन करणारा व एकान्तवासी होता.

हे राजा, त्या ब्राह्मणाच्या तपस्तेजानें तें वन व्याप्त झालें होतें. आदित्य जसा सर्व लोकांना प्रकाशित करितो त्याप्रमाणें त्याच्या तेजानें तो सर्व प्रदेश प्रकाशित झाला होता. त्याचें तें उग्र तप पाहून त्याच्या तपांत विघ्न करण्याच्या इच्छेनें आम्हीं त्या वनांत प्रवेश केला आणि हे भारता, सौरभेयी, समीची, बुद्बुदा, लता व मी अशा आम्ही पांचीजणी एकाच वेळीं त्याच्यापाशीं गेलों व गायन, हास्य, विनोद इत्यादिकांच्या योगानें त्या ब्राह्मणाला मोहित करण्याचा प्रयत्न केला. परंतु हे वीरा, त्यानें आमच्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं किंवा तो महातेजस्वी विप्र आपल्या निर्मल तपापासून च्युत झाला नाहीं. हे क्षत्रिया, उलट त्या क्रुद्ध झालेल्या ब्राह्मणानें आम्हांला 'तुम्हीं सुसरी होऊन शंभर वर्षें जलांत रहाल' असा शाप दिला. १. १५. २१६.

## अध्याय २१७ वा.

[ १ अर्जुनानें केलेला इतर चार अप्सरांचा उद्धार व गोकर्णक्षेत्रीं गमन. ]

( १ ) वैशंपायन—हे नृपश्रेष्ठा, ती वर्गा आपला पुढील वृत्तान्त सांगण्यासाठीं त्या महाधनुर्धराला पुनः म्हणाली—"हे वीरा, तें शापवचन ऐकून आम्ही सर्वजणी दुःखानें व्यथित झालों व आपल्या व्रतापासून न ढळणाऱ्या त्या तपोधन ब्राह्मणाला शरण जाऊन म्हणालों—

हे पूज्य ब्राह्मणा, आम्हीं रूपानें, तारुण्यानें व काममदानें मत्त होऊन असें अनुचित कर्म केलें खरें, पण आतां तूं आम्हांला क्षमा कर. हे तपोधना, आम्ही तुझ्यासारख्या जितेंद्रिय महात्म्याला मोहित करावयास आलों असतां आमचाच पूर्ण पराभव झाला, ही दुष्कीर्ति आम्हांला अगदीं पुरेशी आहे. खरोखर, हें आमचें मरणच आहे. स्त्रिया अवध्य आहेत, असें धर्मवेत्ते समजतात. यास्तव धर्मानें तुझा उत्कर्ष होवो. आमची हिंसा करणें तुला योग्य नाहीं. हे धर्मज्ञा,

ब्राह्मण सर्व प्राण्यांचा मित्र[1] आहे, असें म्हणतात. विद्वानांचें तें वचन सत्य होवो. हे दयाळो विप्रा, सज्जन शरण आलेल्यांचें रक्षण करितात, आम्ही तुला शरण आलों आहोंत; तस्मात् हे कल्याणा, आम्हांला क्षमा कर."

राजन्, त्या स्त्रियांचें हें दीन भाषण ऐकून तो शुभ कर्मे करणारा धर्मात्मा ब्राह्मण त्यांच्यावर प्रसन्न झाला व सूर्य-चंद्रांप्रमाणें तेजस्वी असलेला तो तपोनिष्ठ त्यांना म्हणाला—"हे अप्सरांनो, शत, शतसंवत्सर इत्यादि शब्द अक्षय्य असा अर्थ व्यक्त करितात; पण मीं उच्चारिलेला हा शतशब्द अक्षय्य हा अर्थ व्यक्त न करतां केवल शंभर वर्षांचाच वाचक होईल. तुम्ही सुसरी होऊन पुरुषांना जलांत ओढीत असतां जेव्हां एखादा नरश्रेष्ठ तुम्हांला जलांतून वर काढील, तेव्हां तुम्ही सर्वजणी आपल्या पूर्वरूपाला प्राप्त व्हाल. मी केव्हांहि थट्टेनें सुद्धां असत्य भाषण केलेलें नाहीं. यास्तव माझें वचन कदापि मिथ्या होणार नाहीं. तुमचा उद्धार झाल्यावर त्या सर्व नद्या सर्वत्र '**नारीतीर्थें**'-या नांवानें प्रसिद्ध होऊन विद्वानांना पावन करणारीं पवित्र तीर्थें होतील."

वर्गा—हे वीरा, ब्राह्मणानें प्रसन्न होऊन असा वर दिला असतां आम्ही त्याला वंदन व प्रदक्षिणा करून तेथून निघालों आणि अंतःकरणांत अतिशय खिन्न होऊन 'आपण आतां कोठें बरें जावें कीं जेथें आम्हांला त्या जलचरयोनींतून सोडवून आमचें मूळ स्वरूप प्राप्त करून देणारा तो पुरुष लवकर भेटेल!' असा विचार करूं लागलों. आम्ही कांहीं वेळ असा विचार करीत आहों, तोंच महाभाग देवर्षि नारद आम्हांला दिसला.

त्या महा तेजस्वी नारदाला पाहून आम्हांला संतोप झाला. हे पार्था, आम्ही त्याला अभिवंदन करून लज्जेनें अधोमुख झालों. तेव्हां त्या देवर्षीनें आमच्या दुःखाचें कारण विचारिलें व आम्हींहि तें त्याला सांगितलें.

त्यावर तो महात्मा म्हणाला—हे अप्सरांनों, दक्षिण समुद्राच्या तीरावरील जलप्रचुर प्रदेशीं रमणीय व पवित्र पांच तीर्थें आहेत. तेथें तुम्ही सत्वर जा. त्या प्रदेशीं पुरुपश्रेष्ठ धनंजय लवकरच जाणार आहे. तो शुद्धात्मा तुम्हांला निःसंशय या दुःखांतून मुक्त करील.

नारदाचें हें वचन ऐकून आम्हीं पांची जणी या तीर्थांत येऊन राहिलों. हे निष्पापा, आज तूं मला मुक्त करून तें देवर्षीचें वचन सत्य केलेंस. हे वीरा,

---

१ मैत्रो ब्राह्मण उच्यते ।

माझ्या त्या चार सख्या अद्यापि जलांतच आहेत, यास्तव त्यांनाहि मुक्त करण्याचें शुभकर्म तूं कर.

हे भूपाला, त्यानंतर त्या श्रेष्ठ पांडवानें त्या सर्वांना जलांतून वर काढून शापमुक्त केलें. त्या सुसरी जलाबाहेर येतांच आपल्या पूर्व स्वरूपाला प्राप्त होऊन अप्सरा झाल्या.

हे राजन्, तो वीर्यवान् पांडुपुत्र याप्रमाणें त्या सर्व तीर्थांना पावन करून व अप्सरांना स्वधामाला जाण्याची अनुज्ञा देऊन चित्रांगदेला भेटण्यासाठीं पुनः मणिपुरास गेला आणि तिला झालेल्या आपल्या बभ्रुवाहन पुत्राला पाहून पार्थ चित्रवाहन-राजाला म्हणाला—" हे नराधिपा, हा माझा पुत्र बभ्रुवाहन चित्रांगदेचें शुल्क म्हणून मी तुला देत आहें. त्याचा स्वीकार कर. याच्या योगानें मी तुझ्या ऋणांतून मुक्त होईन. "

चित्रवाहन-राजाला असें सांगून तो पांडुनंदन चित्रांगदेला म्हणाला—हे विमले, तुझें कल्याण असो. तूं येथेंच राहून बभ्रुवाहनाला वाढीव. लवकरच तूं माझ्या इंद्रप्रस्थ-नगरीस येशील व माझी माता कुंती, युधिष्ठिर व भीमसेन हे ज्येष्ठ भ्राते, तसेच माझे दुसरे कनिष्ठ भ्राते व इतर बांधव यांना पहाशील आणि तेथें माझ्या सर्व आप्तांमध्यें आनंदानें रहाशील.

हे भद्रे, माझा धर्मनिष्ठ व सत्यप्रतिज्ञ भ्राता युधिष्ठिर सर्व पृथ्वी जिंकून राजसूय यज्ञ करील. त्यावेळीं 'नृप' ही संज्ञा असलेले पृथ्वींतील सर्व क्षत्रिय विपुल रत्नें घेऊन तेथें येतील. त्यांत तुझा पिता चित्रवाहनहि येईल. त्यावेळीं त्याची सेवा करण्याच्या निमित्तानें तूं त्याच्याबरोबर ये. हे कमलाक्षि, त्या राजसूययज्ञाच्या वेळीं मी तुला भेटेन. तूं खिन्न होऊं नको. पुत्राचें पालन करीत येथें प्रसन्न चित्तानें रहा. हा बभ्रुवाहन माझा केवल पृथ्वीवर संचार करणारा प्राणच आहे. यास्तव तूं या वंशवर्धन पुत्राचें पोषण कर. चित्रवाहनाचा हा पौरवनंदन धर्मतः दायाद पुत्र असून तो पांडवांचा प्रिय पुत्र आहे. त्याचें प्रेमानें पालन कर. हे निर्मले, माझ्या विरहानें खिन्न होऊं नको.

राजा जनमेजया, याप्रमाणें चित्रांगदेचें सांत्वन करून तो धनुर्धर पार्थ गोकर्णक्षेत्राकडे जावयास निघाला. तें पशुपतीचें आद्यस्थान केवल दर्शनानेंच मुक्ति देणारें आहे. तेथें पातकी मनुष्यहि अभयपदाला प्राप्त होतो. १. १५. २१७.

---

## अध्याय २१८ वा.

[ १. अर्जुनाचें प्रभासक्षेत्रीं गमन व तेथें कृष्णदर्शन. २ रैवतक पर्वतावरील विहार व द्वारकागमन. ]

(१) वैशंपायन—हे पारिक्षिता, तो अतुल पराक्रमी कुंतीपुत्र गोकर्ण-तीर्थाला जाऊन तेथून पश्चिम समुद्राच्या तीरावर जेवढीं पवित्र तीर्थें व स्थानें होतीं तेवढीं सर्व क्रमानें पहात पहात प्रभास क्षेत्रीं आला. तीर्थयात्रा करणारा तो पार्थ पवित्र, रमणीय व अजिंक्य अशा प्रभास देशास आला आहे, असें ऐकून भगवान् मधुसूदन आपल्यां मित्राला भेटावयास तेथें आला. त्या कृष्ण-पांडवांनीं प्रभासक्षेत्रीं एकमेकांस भेटून दृढ आलिंगन दिलें व कृष्णानें अर्जुनाला त्याच्या वनवासांतील कुशल विचारिल्यावर ते दोघे प्रिय मित्र नर-नारायण ऋषि तेथेंच राहिले.

एकदा बोलतां बोलतां वासुदेव अर्जुनास म्हणाला—"हे पार्था, तूं हें तीर्थाटन व वनवास कशासाठीं करीत आहेस ?" हा प्रश्न ऐकून अर्जुनानें घडलेला सर्व वृत्तान्त त्यास निवेदन केला. तो ऐकून भगवान् वार्ष्णेयानें आपला संतोष प्रदर्शित केला व 'तुम्हीं केलेला हा नियम फारच चांगला आहे' असें म्हटलें. त्यानंतर ते दोघे कृष्ण-पांडव प्रभासक्षेत्रीं यथेच्छ विहार करून रैवतकपर्वतावर रहावयास गेले. कृष्णाच्या आज्ञेवरून त्याच्या भृत्यांनीं तो पर्वत अगोदरच भूषित करून ठेविला होता.

(२) हे दोघे वीर तेथें पोंचतांच कृष्णाच्या भृत्यांनीं षड्रस भोजन तयार केलें. वासुदेवासह अर्जुनानें त्या सर्वांचा स्वीकार करून व तृप्त होऊन नट व नर्तक यांचें नाट्य अवलोकन केलें. कांहीं वेळानें त्या सर्वांचा सत्कार करून त्यांस जाण्याची अनुज्ञा दिली व अर्जुनानें उत्कृष्ट शय्येवर शयन करून पडल्या पडल्या श्रीकृष्णाला आपण वनवासांत पाहिलेलीं तीर्थें, सरोवरें, नद्या, पर्वत, वनें इत्यादिकांचें निवेदन केलें. त्या सुखावह शयनावर पडलेल्या अर्जुनाला बोलतां बोलतां झोंप लागली.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं मधुर गीत, वीणाध्वनि, स्तुति व मंगल या उपायांनीं जागा केला जाणारा तो महात्मा उठला व आपलीं सर्व अवश्य असलेलीं आह्निक कार्यें करून कृष्णासह सुवर्णमय ध्वजादिकांनीं युक्त असलेल्या रथांत बसून द्वारकेस जावयास निघाला.

हे जनमेजया, कुंतीपुत्राच्या सत्कारासाठीं द्वारकानगरी अलंकृत केली होती. त्याच्या शुभ आगमनासाठीं केवल राजमार्गच नव्हेत, तर सर्व गृहें व क्रीडास्थानेंहि भूषित केलीं होतीं. त्या कुंतीपुत्राला पहाण्याची इच्छा करणारे द्वारकावासी हजारों लोक त्वरेनें राजमार्गावर येऊन उभे राहिले. हजारों स्त्रियाहि त्याला पहाण्यासाठीं आपापल्या मंदिराच्या खिडक्यांत उभ्या राहिल्या. वृष्णि, भोज व अंधक यांचा फार मोठा समूह जमला.

याप्रमाणें त्या सर्व वीरांकडून सत्कार केला गेलेला अर्जुन राजमंदिरांत गेल्यावर पूज्य गुरूंना वंदन करून स्वतःला कृतकृत्य मानूं लागला. सर्व कुमारांनींहि मोठ्या सत्कारानें त्या वीराचें स्वागत केलें. आपल्या समवयस्क मित्रांना त्यानें पुनः पुनः आलिंगन दिलें व तो महावीर कृष्णाच्या रत्नजडित रम्य मंदिरांत वासुदेवासह कांहीं काल आहार-विहार करीत राहिला. १. १५. २१८.

येथें पंधरावें अर्जुनवनवासपर्व समाप्त झालें.

---

# सुभद्राहरणपर्व १६.



## अध्याय २१९ वा.

[ १ रैवतक-पर्वतावरील उत्सव. २ सुभद्राहरणाचा संकेत. ]

( १ ) **वैशंपायन**—हे नृपश्रेष्ठा, त्यानंतर लवकरच वृष्णि व अंधक यांचा रैवतक-पर्वतोत्सव सुरू झाला. तेथें वृष्णि, अंधक व भोजवीर त्या पर्वतदेवतेच्या उत्सवाप्रीत्यर्थ ब्राह्मणांना हजारों प्रकारचीं दानें देत असत.

हे राजेंद्रा, त्या पर्वताच्या सभोंवार रत्नखचित भव्य प्रासाद होते आणि तो कल्पवृक्षांनीं सर्व बाजूंनीं सुशोभित झाला होता. तेथें कांहीं वादक नानाप्रकारचीं वाद्यें वाजवीत होते, नट नृत्य करीत होते व गायक गात होते. वृष्णिकुलांतील अतिशय बलाढ्य कुमार अलंकार धारण करून व सुवर्णानें चित्रविचित्र केलेल्या रथांत बसून सर्वत्र चमकत होते.

त्याचप्रमाणें हजारों पौरजन आपल्या स्त्रिया व अनुचर यांसह पायांनीं व लहान-मोठ्या वाहनांतून फिरत होते. हे भारता, ज्याच्या मागून गंधर्व चालले आहेत असा प्रमत्त बलराम तेथें रेवतीसह फिरत होता. त्याचप्रमाणें गाणाऱ्या

गंधर्वांनीं युक्त असलेला वृष्णींचा प्रतापी राजा उग्रसेन सहस्र स्त्रियांसह चालला होता. युद्धांत हार न जाणारे रुक्मिणीपुत्र प्रद्युम्न व सांब मधुमत्त झाले होते. दिव्य माला व वस्त्रें धारण करणारे ते दोघे देवांप्रमाणें विहार करीत होते.

तसेच अक्रूर, सारण, गद, बभ्रु, विदूरथ, निशठ, चारुदेष्ण, पृथु, विपृथु, सत्यक, सात्यकि, भंगकार, महारव, हार्दिक्य, उद्धव व आणखीहि अनेक वीर गंधर्व व स्त्रिया यांच्या समुदायांसह पृथक् पृथक् फिरत होते. या उत्सवानें त्या रैवतकपर्वताला अतिशय शोभा आली होती. त्या पर्वतावर असा अद्भुत उत्सव चालला असतां तो पहाण्याच्या कौतुकानें श्रीकृष्ण व पार्थ हे दोघे बरोबरच तेथें आले.

त्या वेळीं त्या उत्सवांत अलंकार धारण करून आपल्या सख्यांसह फिरणारी सुलक्षणी सुभद्रा पार्थाच्या दृष्टीं पडली. तिला पाहतांच तो कामवश झाला व एकाग्रतेनें तिजकडे पाहूं लागला.

त्याच्या मनाची ही चलबिचल पाहून नरश्रेष्ठ कृष्ण हंसत हंसत म्हणाला— "पार्था काय हें ! अरे, वनांत राहून तीर्थयात्रा करणाराचें मन असें कामासक्त का होत असतें ! ही सारणाची अनुजा व माझी भगिनी सुभद्रा आहे. ही माझ्या पित्याची प्रिय कन्या आहे. तुझें कल्याण असो. तुझें मन जर खरोखरच हिच्यावर बसलें असेल तर मी स्वतः पित्याला सांगून ती तुला देववीन."

( २ ) त्यावर अर्जुन म्हणाला—हे कृष्णा, ही वसुदेवाची कन्या व वासुदेवाची भगिनी आहे. तेव्हां ही रूपसंपन्न सुंदरी कोणाला मोहित करणार नाहीं ? हे माधवा, ही वार्ष्णेयी जर माझी अभिषिक्त राणी होईल तर तूं माझें सर्वप्रकारें कल्याण केलेंस, असेंच मी समजेन. हे जनार्दना, ही मला कोणत्या उपायानें प्राप्त होईल तें सांग. म्हणजे मनुष्याला जें कांहीं शक्य आहे तें सर्व मी हिच्या प्राप्तीसाठीं करीन.

धनुर्धर पार्थाचें हें भाषण ऐकून वासुदेव म्हणाला—हे पुरुषश्रेष्ठा, क्षत्रियांना स्वयंवर-विवाह विहित आहे. परंतु स्त्रियांचें चित्त स्वभावतःच चंचल असतें. स्त्रिया पुरुषाची खरी योग्यता न पहातां त्याच्या बाह्य स्वरूपावर तत्काल भाळतात. त्यामुळें स्वयंवरांतील निवड संशयितच असते. बलात्कारानें वधूचें हरण करणें क्षत्रियांना विहित आहे. शूरांचा विवाह अशाच प्रकारें व्हावा, असें धर्मवेत्ते म्हणतात. यास्तव हे वीरा, या माझ्या भगिनीचें तूं बलात्कारानें हरण कर. कारण स्वयंवरांत ती कोणाला वरील याचा काय नेम सांगावा ?

राजा पारिक्षिता, असें बोलून श्रीकृष्ण व अर्जुन यांनीं पुढील सर्व योजना निश्चित केली आणि धर्मराजाची संमति घेण्यासाठीं शीघ्रगामी दूत इंद्रप्रस्थास रवाना केले. तेव्हां युधिष्ठिरानें तें सर्व ऐकून पार्थाला सुभद्राहरणाची अनुज्ञा दिली. १. १६. २१९.

---

## अध्याय २२० वा.

### [ १. सुभद्राहरण. ]

(१) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, त्यानंतर युधिष्ठिरानें सुभद्राहरणाला अनुज्ञा दिली असतां वसुदेवकन्या रैवतक-पर्वतास गेली आहे, असें जाणून धनंजयानें वासुदेवाची संमति घेतली व त्याच्या मतानेंच पुढील कर्तव्याची योजना करून तो सुवर्णध्वजानें युक्त असलेल्या दिव्य रथांत बसून निघाला.

त्या रथाला घुंगुरमालांनीं भूषविलें होतें. त्याला शैब्य व सुग्रीव नांवाचे श्रेष्ठ अश्व जोडले असून तो सर्व शस्त्रांनीं युक्त होता. तो चालत असतां मेघगर्जनेसारखा प्रचंड आवाज होत असून त्याचा प्रकाश प्रज्वलित अग्नीसारखा सभोंवार पसरत होता व तो रथ शत्रूंचा हर्ष नाहींसा करीत होता. अशा सज्ज केलेल्या रथांतून तो महावीर कवच, खड्ग, अंगुलित्राण इत्यादि धारण करून मृगयेच्या निमित्तानें द्वारकेंतून बाहेर पडला.

राजा, इतक्यांत सुभद्रा त्या श्रेष्ठ रैवतक-पर्वताचें व देवतांचें पूजन करून, सर्व ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन केलें असतां, पर्वताला प्रदक्षिणा घालून द्वारकेला परत यावयास निघाली. तेव्हां कौंतेयानें बलात्कारानें तिला ओढून आपल्या रथांत घेतलें व तो कामबाणांनीं विद्ध झालेला पार्थ त्या हास्यमुखी सुंदरीला घेऊन व आपल्या सुवर्णध्वजालंकृत रथांत बसून स्वनगरीला त्वरेनें जावयास निघाला.

याप्रमाणें सुभद्रा हरण केली जात आहे, असें पहातांच सव सैनिक मोठा आक्रोश करीत द्वारकेकडे धांवले. त्यांनीं 'सुधर्मा'-नामक सभेंत जाऊन तेथील सभापतीला पार्थाचा सर्व पराक्रम निवेदन केला. त्यांच्या तोंडून हा वृत्तांत ऐकतांच सभापतीनें 'सर्वांनीं एकत्र जमावें.' असें सुचविणारा सुवर्णालंकृत नगारा वाजवून मोठा घोष केला.

तो शब्द ऐकून भोज, वृष्णि व अंधक अत्यंत क्षुब्ध झाले व पुढील अन्नपानहि सोडून ते सर्व चोहोंकडून तेथें जमले. त्या सभास्थानांत उंची वस्त्रांनीं

आच्छादिलेलीं सुवर्णाचीं भव्य सिंहासनें होतीं. त्यांस जडविलेल्या विविध रत्नांची प्रज्वलित अग्नीसारखी प्रभा पसरली होती. त्या सिंहासनांवर बसलेले महारथ नरश्रेष्ठ वृष्णि व अंधक वेदींतील अग्नीप्रमाणें शोभत होते. सभापालानें आपल्या अनुचरांसह देवांच्या समुदायाप्रमाणें शोभणाऱ्या त्या सिंहासनस्थ वृष्णींच्या समूहांत प्रवेश करून जिष्णूचें साहस त्यांस निवेदन केलें.

तें ऐकतांच सर्व स्वाभिमानी वृष्णिवीर संतापानें नेत्र आरक्त करून पार्थाचें तें कृत्य सहन न झाल्यामुळें आपआपल्या स्थानावरून एकदम उठले. त्यांतील कित्येक 'सत्वर रथ सज्ज करा, प्रास आणा, मोठालीं धनुष्यें व चिलखतें घेऊन या' असें ओरडूं लागले. कोणी सारथ्यांना 'रथ जोडा' असें ओरडून सांगूं लागले, तर कित्येकांनीं स्वतःच सुवर्णभूषणांनीं अलंकृत केलेले अश्व रथाला जोडिले.

याप्रमाणें रथ, कवचें व ध्वजादि आणण्याची त्या वीरांची गडबड उडाली. पण त्या वेळीं वनमाला व नील वस्त्र धारण केलेला कैलासशिखरासारखा प्रमत्त बलराम त्यांना म्हणाला—" हे मूढांनो, वासुदेव स्वस्थ बसला असतांना तुम्ही

---

१. या सुभद्राहरणाविषयीं लोकांमध्यें वीर अर्जुनाला कमीपणा आणणाऱ्या अनेक असंबद्ध गोष्टी प्रचलित आहेत. पण त्यांना **मूळ महाभारतांत** आधार नाहीं, हें वाचकांच्या लक्षांत येईलच. महाराष्ट्रांतील लोकांच्या अशा समजूती होण्यास 'सौभद्रनाटक' हें मुख्य कारण आहे. परंतु 'कुंभकोणम्' येथें छापलेल्या महाभारताच्या प्रतींत अर्जुनाचा संन्यासग्रहणाचा जो प्रक्षिप्त वृत्तांत आहे, तो कदाचित् 'सौभद्र'-कर्त्यांच्या अवलोकनांत आला असावा व त्यावरून त्यांनीं आपल्या नाटकाची कल्पना बसविली असावी. पण अर्जुनाच्या एकंदर चरित्राकडे लक्ष दिलें असतां त्यानें सुभद्रेसाठीं '**कपटसंन्यास**' घेतला असेल अशी कल्पनाहि करवत नाहीं. महात्मा अर्जुन लोकैक वीर, अधर्मभीरु, सत्यनिष्ठ व मोठा कुलाभिमानी होता. त्यानें अशा कुटिल मार्गानें सुभद्रेचें हरण केलें असावें, हें संभवत नाहीं. अर्थात् येथें जें सुभद्राहरणाचें वर्णन केलें आहे, तेंच अर्जुनाच्या प्रभावाला उचित आहे, असें आम्हांला वाटतें. पुढील १२१ व्या अध्यायाच्या आरंभीं भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनाच्या वर्तनाचें जें समर्थन केलें आहे, त्यावरून वाचकांनाहि हें आमचें म्हणणें पटेल.

हें काय करितां ! त्याचा आशय समजून घेतल्यावांचून व्यर्थ क्रुद्ध होऊन गर्जना करण्यांत काय अर्थ आहे ! या बुद्धिमान् कृष्णाला अगोदर त्याचा अभिप्राय सांगूं द्या आणि त्याला जें योग्य दिसेल तेंच दक्षतेनें करा."

बलरामाचें हें ग्राह्य व युक्त वचन ऐकून ते सर्व वीर 'ठीक ठीक, फार चांगलें' असें बोलून सभेमध्यें पुनः स्वस्थानीं येऊन बसले. तेव्हां परंतप बलराम वासुदेवाला म्हणाला—"हे जनार्दना, तूं असा नुस्ता तोंडें पहात स्वस्थ काय बसला आहेस ! हे अच्युता, आम्हीं त्या पार्थाचा एवढा सत्कार केवळ तुझ्यासाठीं केला. परंतु तो कुलाला कलंक लावणारा दुर्बुद्धि सन्मानास मुळींच पात्र नाहीं. स्वतःला कुलीन समजणारा असा कोणता पुरुष ज्या पात्रांत अन्न सेवन केलें तेंच पात्र फोडून टाकील ! पूर्वीच्या संबंधाला मान देऊन पुढील संबंधाची इच्छा करणारा कोणता जीवितार्थी मनुष्य असें साहस करील ! हे कृष्णा, आम्हां सर्वांचा अवमान करून व तुझाहि अनादर करून त्यानें हें सुभद्रेचें हरण केलें नसून स्वतःचा मृत्यूच ओढवून घेतला आहे. हे गोविंदा, सर्पाला जसें पायाच्या स्पर्शानें डंवचावें, तसा त्यानें आज माझ्या मस्तकावर पाय दिला आहे, तो मीं कसा बरें सहन करावा ! मी आतां सर्व पृथ्वी कौरवरहित करीन, पण अर्जुनाचा हा अतिक्रम केव्हांहि सहन करणार नाहीं."

जनमेजया, याप्रमाणें मेघ किंवा दुंदुभि यांच्या आवाजासारखी गर्जना करून बलराम बोलत असतां वृष्णि, अंधक व भोज यांनीं त्यास आपली संमति दर्शविली. १. १६. २२०.

येथें सोळावें सुभद्राहरणपर्व समाप्त झालें.

---

# हरणहारिकापर्व १७.



## अध्याय २२१ वा.

[ १ श्रीकृष्णाचें हितावह भाषण. २ सुभद्रेशीं अर्जुनाचा विवाह व खांडवप्रस्थास गमन. ३. यादवांनीं पांडवांस केलेला अहेर. ४ पांडवपुत्रांची उत्पत्ति. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजेंद्रा, याप्रमाणें सर्व वृष्णिवीरांनीं आपआपल्या सामर्थ्यानुसार भाषण केल्यावर वासुदेव धम आणि अर्थ यांनीं युक्त असें वचन

बोलला—"हे यादवांनो, धनंजयानें आपल्या कुलाचा मुळींच अपमान केला नसून उलट त्यानें अधिक सन्मानच केला आहे, यांत संशय नाहीं.

पार्थ तुम्हां सात्वतांना केव्हांहि धनलुब्ध मानीत नाहीं. त्यामुळें त्याला आसुरविवाह शक्य नव्हता. स्वयंवरांत वधू आपल्यालाच वरील असा नियम नसल्यामुळें त्याला स्वयंवरहि ग्राह्य वाटला नाहीं. पशूप्रमाणें कन्येचा प्रतिग्रह करणें, हें नीच कर्म त्या वीराला कसें रुचावें ! या भूलोकीं आपल्या अपत्याचा विक्रय तरी कोण करील ? तस्मात् क्षत्रियांना विहित असलेल्या आसुरादि विवाहप्रकारांत त्या वीरानें हे दोष पाहिले असावेत, असें मला वाटतें. त्यामुळेंच त्या पांडुपुत्रानें कन्येचें बलात्कारानें हरण केलें आहे.

शिवाय सुभद्रा व पार्थ हीं परस्परांस सर्वथा अनुरूप असल्यामुळें हा संबंधहि योग्यच आहे. या सर्व गोष्टींचा विचार करूनच पार्थानें सुभद्रेला बलात्कारानें हरण केलें. यशस्वी भरत व शांतनु यांच्या कुलांमध्यें उत्पन्न झालेला व कुंतीभोजकन्येचा पुत्र अर्जुन आपल्याला पति मिळावा अशी कोणती वरेप्सु कन्या इच्छा करणार नाहीं ? विरूपाक्ष शंकरावांचून समरांगणांत पार्थाला जिंकील असा एकहि वीर मला दिसत नाहीं.

हे श्रेष्ठ हो, इंद्र व रुद्र इत्यादिकांच्या लोकींहि अर्जुनाचा पराभव करणारा पुरुष संभवत नाहीं. तो दिव्य रथ, ते माझे वेगवान् अश्व व शीघ्र अस्त्रप्रयोग करणारा योद्धा पार्थ, यांचा एकत्र संयोग जमल्यावर अर्जुनाची बरोबरी कोण करणार ! यास्तव तुम्ही सत्वर शांतवृत्तीनें त्याच्या मागोमाग जाऊन संतोषानें त्याला परत आणा. हाच माझा दृढ निश्चय आहे. तुम्ही विरोधबुद्धीनें त्याचा पाठलाग केलात व तो तुम्हांला स्वसामर्थ्यानें जिंकून आपल्या खांडवप्रस्थाला परत गेला, तर तुमचें यश तत्काल नाहींसें होईल. यापेक्षां योग्य संबंधाचें महत्त्व ओळखून तुम्ही त्याला परत बोलवा. त्यांत पराजयाची मुळींच भीति नाहीं."

( २ ) हे राजा, वासुदेवाचें हें वचन ऐकून यादवांनीं तसेंच वर्तन केलें. त्यांच्या विनंतीस मान देऊन अर्जुन परत आला; त्या प्रभूनें सुभद्रेशीं यथाविधि विवाह केला व वनवासाच्या बारा वर्षांतील जो एक वर्षाहून कांहीं अधिक काल अवशिष्ट राहिला होता, त्यांतील बहुतेक काल तेथेंच घालविला. द्वारकेंत असेपर्यंत त्यानें यथेष्ट विहार केला व वृष्णिपुत्रांनींहि त्याचा मोठा

सत्कार केला. त्यानंतर जो थोडासा काल अवशिष्ट राहिला होता, तो सुभद्रेसह पुष्करतीर्थावर घालवून बारा वर्षें पूर्ण झालीं असतां अर्जुन खांडवप्रस्थास आला. प्रतिज्ञेप्रमाणें बारा वर्षांचा नियम पाळल्यामुळें शांत चित्त झालेला अर्जुन युधिष्ठिर राजाजवळ जाऊन, त्याचा सत्कार करून व ब्राह्मणांची पूजा करून द्रौपदीकडे गेला. तेव्हां ती प्रीतीनें कुरुनंदनाला म्हणाली—" हे कौंतेया, जेथें ती यदुकन्या आहे, तेथेंच जा. येथें कशाला येतोस? गवताचा भारा कितीहि घट्ट बांधला तरी त्याला दुसरा बंध बांधला कीं, पूर्वबंध शिथिल होतोच!"

अशा प्रकारें बोलणाऱ्या कृष्णेचें सांत्वन करून अर्जुनानें तिची वारंवार क्षमा मागितली व मोठ्या त्वरेनें स्वगृहीं परत येऊन तांबडें रेशमी वस्त्र परिधान केलेल्या सुभद्रेला गवळणीचा वेष देऊन द्रौपदीकडे पाठविलें. त्या वेषानें अधिकच शोभणारी यशस्विनी सुभद्रा श्रेष्ठ राजगृहास प्राप्त झाली. त्या आरक्तलोचन कृष्णभगिनीनें पृथेला वंदन केलें. तेव्हां त्या कुंतीनेंहि त्या सुंदरीच्या मस्तकाचें अवघ्राण करून मोठ्या प्रीतीनें तिला आशीर्वाद दिले. त्यानंतर ती चंद्रमुखी सुभद्रा सत्वर द्रौपदीपाशीं गेली व 'मी तुझी दासी आहें' असें म्हणून तिनें तिला वंदन केलें. तेव्हां द्रुपदकन्या कृष्णाहि आसनावरून उठली व माधवाच्या त्या कनिष्ठ भगिनीला प्रीतीनें आलिंगन देऊन 'तुझा पति शत्रुरहित होवो' असें म्हणाली. तिचा तो आशीर्वाद ऐकून सुभद्रेलाहि मोठा संतोष वाटला व ती 'तथास्तु' असें म्हणाली.

राजा कृष्णाबरोबर अशाप्रकारें आपला दृढ संबंध जडलेला पाहून महारथ पांडवांना परम संतोष झाला; अर्जुनानें सुभद्रेला महिषीचा वेष न देतां गोपालकृष्णाच्या संबंधामुळें गोपालिकेचा वेष देऊन पाठविलें, हें पाहून द्रौपदीलाहि आनंद वाटला आणि अर्जुन बारा वर्षें अरण्यवास करून सुखरूपपणें परत आल्यामुळें सर्वांनाच आल्हाद झाला.

( ३ ) हे वीरा, त्यानंतर पराक्रमी अर्जुन सुभद्रेसह आपल्या इंद्रप्रस्थ नगरीस जाऊन पोंचला आहे, हें वर्तमान ऐकून विशुद्धात्मा कमलनयन श्रीकृष्ण बलरामासह इंद्रप्रस्थास आला. त्यांच्याबरोबर श्रेष्ठ अंधक व वृष्णिवीर, अनेक महारथ भ्राते व कुमार मोठ्या सैन्यासह निघाले. त्या वेळीं मोठा बुद्धिमान्, यशस्वी व वृष्णिवीरांचा शत्रुनाशक सेनापति अक्रूर, अतितेजस्वी अनाधृष्टि, महाभक्त म्हणून प्रसिद्ध असलेला बृहस्पतीचा शिष्य उदार उद्धव, सत्यक, सात्यकि,

सात्वत कृतवर्मा, प्रद्युम्न, सांब, विपृथु हे व असेच दुसरेहि अनेक वृष्णि, भोज व अंधक वीर पांडवांस द्यावयाचें प्रीतिदान घेऊन खांडवप्रस्थास आले.

माधव अगदीं समीप आला आहे, असें ऐकून युधिष्ठिर राजानें नकुल-सहदेवांस त्याचें स्वागत करून सन्मानानें आणण्यासाठीं पुढें पाठविलें. मोठ्या ऐश्वर्यासह येत असलेल्या त्या वृष्णींचा नकुल-सहदेवांनीं मोठा सत्कार केला आणि पताका, ध्वज यांनीं सुशोभित केलेल्या खांडवप्रस्थ-नगरांत त्यांना बहुमानानें आणिलें.

त्या नगरांतील राजमार्गांचें संमार्जन करून त्यांवर शीतल चंदनरसाचा सेक केला होता. सुगंधी पुष्पांचा सर्वत्र वर्षाव केला होता. प्रत्येक चव्हाट्यावर अग्नि प्रज्वलित करून त्यांत निरनिराळीं सुगंधी द्रव्यें टाकिल्यामुळें सर्व नगरभर पुष्पांचा व धूपाचा गंध भरून गेला होता. कृष्ण व बलराम यांसह प्रसिद्ध यादवांना पहाण्यासाठीं हृष्ट-पुष्ट जनांची मोठी गर्दी जमली होती. श्रीमंत वैश्यांच्या स्थानांनीं तें नगर अतिशय सुशोभित झालें होतें. अशा त्या देवलोकाप्रमाणें शोभणाऱ्या खांडवप्रस्थ नगरांत अतिशय पराक्रमी केशव, बलराम व यादव यांसह प्रविष्ट झाला आणि हजारों पौर व ब्राह्मण यांकडून पूजला जाणारा राजा युधिष्ठिर कृष्ण-बलरामांसह इंद्राच्या मंदिराप्रमाणें शोभणाऱ्या राजगृहांत येऊन पोंचला.

त्याबरोबर युधिष्ठिरानें बलरामाला यथाविधि आलिंगन देऊन कृष्णाच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व दोन्ही बाहूंनीं त्याला आपल्या हृदयाशीं घट्ट धरिलें. त्यामुळें गोविंदालाहि फार समाधान वाटलें. त्यानें धर्मराजाचें विनयानें समाधान करून पुरुषश्रेष्ठ भीमालाहि वंदन केलें. युधिष्ठिरानें इतर यादवांचा त्यांच्या वयाच्या अनुरोधानें यथाविधि सत्कार केला. त्यानें कोणाला गुरूप्रमाणें वंदन केलें, तो कित्येकांना मित्राप्रमाणें भेटला, कांहींजणांशीं बोलला व कित्येकांनीं त्याला अभिवादन केलें.

श्रीकृष्णानेंहि पांडवपक्षीयांचा तसाच यथोचित सत्कार करून वराच्या आप्तांना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें वस्त्रालंकारादि अमूल्य वस्तु व धन दिलें. सुभद्रेच्या ज्ञातिबांधवांनीं वरपक्षाच्या लोकांना जें जें कांहीं अवश्य द्यावयास पाहिजे होतें तें दिलें. सुवर्णध्वज व घुंघुरमाळा यांनीं सुशोभित केलेले व चार अश्व जोडलेले सहस्र रथ निपुण सारथ्यांसह दिले. मथुरेच्या पवित्र व तेजस्वी

दहा हजार दुभत्या गायी दिल्या. चंद्रकिरणांसारख्या तेजस्वी, शुभ्र वर्णाच्या एक हजार घोड्या सुवर्णालंकारांनीं भूषित करून दिल्या.

त्याचप्रमाणें ज्यांचें सर्व शरीर शुभ्र असून फक्त मानेवर काळे केंस आहेत, अशा वायूप्रमाणें वेगवान् असलेल्या खेचरी प्रत्येक भ्रात्याला पांच-पांचशें दिल्या व स्नान, पान, उत्सव इत्यादि कार्यांमध्यें निपुण असलेल्या गौरवर्ण व तेजस्वी एक हजार तरुण दासी पांडवांस अर्पण केल्या. त्या सर्व अलंकारांनीं युक्त, लोभरहित व परिचर्येंत दक्ष होत्या. तसेच बाल्हिक देशांतील रुंद पाठीचे एक लक्ष जातिवंत अश्व 'कन्याधन' म्हणून दिले. दहा मनुष्यांच्या भारंभार घडिवलेलें व न घडिवलेलें अग्नीसारखें तेजस्वी सुवर्ण जनार्दनानें पांडवांना दिलें. साहस-प्रिय हलधरानें पर्वतासारखे उंच व मदाचा स्राव करणारे, सुवर्णघंटांच्या माळांनीं युक्त असलेले सहस्र हत्ती माहुतांसह पाणिग्रहणप्रसंगीं अर्जुनाला दिले.

याप्रमाणें महाधन, रत्नें, वस्त्रें, शालजोड्या, गज, अश्व इत्यादि विविध पदार्थांनीं युक्त असलेला तो मूल्यवान् रत्नौघ पांडुरूपी सागरांत शिरला. त्यामुळें अगोदरच परिपूर्ण असलेल्या पांडवांच्या रत्नौघास वाढविणारा तो यादवांपासून प्राप्त झालेला रत्नौघ त्यांच्या शत्रूला असह्य झाला.

धर्मराज युधिष्ठिरानें त्या सर्व धनाचा स्वीकार केला आणि वृष्णि व अंधक या महावीरांचा प्रतिसत्कार केला. नंतर ते महात्मे कौरवोत्तम व वृष्णि-अंधकोत्तम हे परस्परांसह इंद्राच्या अमरावतीप्रमाणें खांडवप्रस्थांत विहार करूं लागले. ते मोठ्या हर्षानें मोठ-मोठ्यानें बोलून टाळ्या वाजवूं लागले. कौरव व वृष्णि आपल्या बरोबरीच्या मित्रांशीं संतोषानें असा विहार करीत असतां अनेक दिवस एका दिवसासारखे निघून गेले. यादवांनीं पांडवांच्या त्या अपूर्व नगरींत याप्रमाणें पुष्कळ दिवस विहार करून आपल्या द्वारवती नगरीस परत जाण्याचा निश्चय केला असतां पांडवांनीं त्यांचा मोठा सत्कार केला. तेव्हां त्यांनीं दिलेलीं अमूल्य रत्नें घेऊन ते वृष्णि-अंधक महारथ बलरामासह आपल्या नगरीस निघून गेले.

महात्मा वासुदेव मात्र रम्य इंद्रप्रस्थ नगरींत पार्थापाशींच राहिला. तो महा यशस्वी कृष्ण अर्जुनासह यमुनेच्या तीरावरील हरिणादिकांचा वध करीत मृगयाविहारांत रममाण झाला. कांहीं दिवसांनीं केशवाची प्रिय भगिनी जी सुभद्रा तिला शचीच्या जयंताप्रमाणें वीर पुत्र झाला.

जनमेजया, वीरमाता सुभद्रा ज्याचे बाहु दीर्घ, वक्षःस्थल विशाल व नेत्र वृषभाच्या नेत्राप्रमाणें आहेत, अशा वीर अभिमन्यूला प्रसवली. तो शत्रुनाशक सुभद्रापुत्र निर्भय व मोठा शूर असल्यामुळें लोक त्याला **अभिमन्यु** म्हणूं लागले. यज्ञामध्यें अरणिमंथनानें अग्नि जसा प्रकट व्हावा, त्याप्रमाणें धनंजयापासून सात्वती सुभद्रेच्या ठिकाणीं हा अतिरथ अर्जुनपुत्र उत्पन्न झाला. त्याच्या जन्मकाळीं महातेजस्वी कुंतीपुत्र युधिष्ठिरानें दहा हजार गायी व सुवर्ण मणिमाला ब्राह्मणांना दिल्या. चंद्र जसा सर्व लोकांस आल्हादकारक वाटतो, तसा अभिमन्यु सर्व पांडवांना प्रिय झाला. वासुदेवाला तर तो अगदीं बालपणापासूनच फार आवडत असे. श्रीकृष्णानें जन्मापासून त्याच्या लालन-पालन, अलंकरण इत्यादि सर्व शुभ क्रिया केल्या. तो बालकहि शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें वाढूं लागला.

जनमेजया, त्या शत्रुनाशक वेदज्ञ अभिमन्यूनें अर्जुनापासूनच सर्व दिव्य व मानुष चैतुष्पाद देशविध धनुर्वेदाचें ग्रहण केलें. अर्जुनानें आपल्या पुत्राला

---

१. मंत्रमुक्तं पाणिमुक्तं मुक्तामुक्तं तथैव च । अमुक्तं च धनुर्वेदे चतुष्पाच्छस्त्रमीरितम् ॥ अर्थ—ज्या शस्त्राचा केवल प्रयोगच होतो, उपसंहार करतां येत नाहीं तें मंत्रमुक्त. बाणादि हें पाणिमुक्त. जें शस्त्र प्रयोग व उपसंहार यांनीं युक्त असतें तें मुक्तामुक्त. जें मंत्रानें सिद्ध केलेलें ध्वजादि शस्त्र पहातांच शत्रु पळून जातात, तें अमुक्त, असें धनुर्वेदांत चतुष्पाद शस्त्र सांगितलें आहे. किंवा सूत्र, शिक्षा, प्रयोग व रहस्य असे चार ग्रंथपाद आहेत.

२. आदानमथ संधानं मोक्षणं विनिवर्तनम् । स्थानं मुष्टिः प्रयोगश्च प्रायश्चित्तानि मण्डलम् ॥ रहस्यं चेति दशधा धनुर्वेदांगमिष्यते ॥ अर्थ—१ बाणाचें भात्यांतून ग्रहण. २ त्याला प्रत्यंचेशीं जोडणें. ३ तो बाण लक्ष्यावर सोडणें. ४ असमर्थ लक्ष्यावर टाकलेल्याहि अस्त्राला परत घेणें. ५ धनुष्य व प्रत्यंचा यांचें शरसंधानाच्या वेळीं किंवा तें धारण करण्याच्या वेळीं त्याचा मध्यभाग किंवा त्याजवळील भाग, ६ तीन किंवा चार अंगुलींची मुष्टि, ७ तर्जनी व मध्यमा किंवा मध्यमा व अंगुष्ठ यांच्या मधून बाणाची योजना करणें, ८ स्वतः किंवा शत्रु यांच्यापासून प्राप्त झालेल्या किंवा होणाऱ्या ज्याघात-शरघातादिकांच्या निवारणासाठीं तलत्राण, प्रत्यस्त्र इत्यादिकांची योजना, ९ चक्राप्रमाणें भ्रमण करीत असलेल्या रथांत बसून भ्रमण करीत असलेल्या लक्ष्याचा वेध आणि १० शब्दादि वेध व एकाच वेळीं अनेक लक्ष्यांवर शरसंधान, अशीं धनुर्वेदाचीं दहा अंगें आहेत.

अस्त्रांच्या विज्ञानांतील, प्रयोगपटुत्वांतील व शरीरसंबंधक्रियांतील सर्व विशेष शिकविले. त्यानें त्या आपल्या अद्वितीय पुत्राला शास्त्र व अनुष्ठान यांमध्यें आपल्या-सारखें तयार केलें. शत्रूंचा पराभव करणाऱ्या सर्व गुणांनीं युक्त, सर्व लक्षणांनीं लक्षित, अजिंक्य, पुष्ट, सिंहासारखा अभिमानी, मत्त गजाप्रमाणें संचार करणारा, मेघ किंवा दुंदुभि यांप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे, पूर्ण चंद्राप्रमाणें ज्याचें मुख आहे, शौर्य, वीर्य, रूप व आकार यांमध्यें जो कृष्णतुल्य आहे, अशा आपल्या सौभद्र अभिमन्यूला अर्जुन, इंद्र जसा पार्थाला पहात होता, तसा पाहूं लागला.

साध्वी द्रौपदीलाहि पांच पतींपासून पांच शुभलक्षणी पुत्र झाले; ते पांची पुत्र पर्वतासारखे श्रेष्ठ व वीर होते. युधिष्ठिरापासून प्रतिविंध्य, वृकोदरापासून सुतसोम, अर्जुनापासून श्रुतकर्मा, नकुलापासून शतानीक व सहदेवापासून श्रुतसेन उत्पन्न झाला. पांचालीनें अशा या पांच महारथ वीरांना अदिति जशी आदित्यांस जन्म देते, तसा जन्म दिला.

राजा, त्या वेळीं विप्रांनीं युधिष्ठिराला सांगितलें कीं, विंध्यपर्वताप्रमाणें हा शत्रूंच्या प्रहाराला तुच्छ लेखील म्हणून युधिष्ठिरानें त्याचें नांव '**प्रतिविंध्य**' ठेविलें. भीमानें सहस्र सोमयाग केल्यावर त्याला चंद्र-सूर्याप्रमाणें तेजस्वी व धनुर्धारी पुत्र झाला. म्हणून त्याचें नांव '**सुतसोम**' ठेविलें. श्रुत म्हणजे महत्कृत्य, तें करून पार्थ परत आल्यावर या पुत्राचा जन्म झाला, म्हणून त्याचें नांव '**श्रुतकर्मा**' असें ठेविलें.

कुरुकुलांत 'शतानीक' या नांवाचा एक महात्मा राजर्षि होऊन गेला. नकुलानें आपल्या कीर्तिमान् पुत्राला त्याचेंच नांव दिलें. त्यानंतर कृत्तिका नक्षत्रावर कृष्णा सहदेवापासून श्रुतसेन-नामक पुत्राला प्रसवली. हे सर्व यशस्वी द्रौपदीपुत्र एकेका वर्षाच्या अंतरानें झाले. हे राजेंद्रा, ते पांची पांडव-पुत्र परस्परांचें हित इच्छिणारे होते. धौम्य महर्षीनें त्या सर्व कुमारांचे जातकर्म, उपनयन इत्यादि संस्कार क्रमानें यथाविधि केले. त्यानंतर त्या सदाचारसंपन्न पांडवकुमारांनीं वेदाध्ययन केलें. अर्जुनापासून सर्व दिव्य व मानुष इष्वस्त्रांचें ग्रहण केलें. त्या देवपुत्रांप्रमाणें सुदृढ व पराक्रमी पुत्रांना पाहून पांडवांना परम आल्हाद झाला. १. १७. २२१.

येथें सतरावें हरणहारिकापर्व समाप्त झालें.

# खांडवदाहपर्व १८.



## अध्याय २२२ वा.

[ १ पांडवांचा खांडवप्रस्थांतील सुखनिवास. २ अर्जुन व कृष्ण यांचा यमुना तीरावरील विहार. ]

(१) **वैशंपायन**—राजा जनमेजया, धृतराष्ट्र आणि शांतनव भीष्म यांच्या आज्ञेप्रमाणें इंद्रप्रस्थास रहाणाऱ्या पांडवांनीं इतर दुष्ट राजांचा वध केला. धर्मराज राज्य करीत असतां ऊर्ध्वरेखादि व गांभीर्यादि पुण्य लक्षणें आणि पवित्र कर्मे यांनीं युक्त असलेल्या धर्मराजाचा आश्रय करून सर्व प्रजा स्वदेहाचा आश्रय केलेल्या देहीप्रमाणें सुखानें राहिली. ज्याप्रमाणें तीन अमात्यांना चवथा राजा आराधना करण्यास योग्य असल्याप्रमाणें भासतो, किंवा धर्म, अर्थ व काम यांना चवथा मोक्षस्वरूप आत्मा आराधनीय असतो, त्याप्रमाणें तो भरतश्रेष्ठ युधिष्ठिर धर्मादिकांना आराधनीय वाटला. त्यामुळें त्या नीतिमान् युधिष्ठिरानें प्राणाप्रमाणें प्रिय असलेल्या तीन बंधूंसारखेंच धर्म, अर्थ व काम यांचें मोठ्या आदरानें सेवन केलें.

पारिक्षिता, वेदांचें उत्तम अध्ययन करणारा, महायज्ञामध्यें त्यांचा विनियोग करणारा व साधूंचें रक्षण करणारा, तो राजा प्रजेला मोठ्या भाग्यानेंच लाधला. चंचल असलेलीहि लक्ष्मी त्या राजापाशीं स्थिर होऊन राहिली. त्याच्या ठिकाणीं बुद्धि पराकाष्ठेला प्राप्त झाली व त्या राजाच्या उदाहरणानें इतर राजांचाहि सर्व धर्म वृद्धि पावला. चार भ्रात्यांनीं युक्त असलेला तो राजा अथर्ववेदोक्त कर्मे व तदंगभूत उपासना, यांनीं युक्त असलेला ऋग्यजुःसामसाध्य ज्योतिष्टोमादि याग जसा शोभतो, तसा आपल्या चार भ्रात्यांच्या योगानें अधिकच शोभला. प्रजापतीपाशीं मुख्य देव जसे उपस्थित होतात, त्याप्रमाणें बृहस्पतीसारखे धौम्यादि ब्राह्मण त्याच्या सभोंवार उपस्थित होत.

हे राजन्, शरदृतूंतील पूर्णचंद्राप्रमाणें सर्व प्रजांचें नेत्र व हृदय धर्मराजाच्या ठिकाणीं अति प्रीतीनें आसक्त झालीं. प्रजापालन करणें या राजकर्तव्यामुळेंच प्रजा त्याच्यावर अनुरक्त झाली, असें नाहीं, तर प्रजेला हितावह असलेलें प्रत्येक कार्य करून लोकप्रीति संपादन केल्यामुळें सर्व प्रजा मोठ्या भक्तीनें त्याच्यावर

आसक्त झाली. त्या बुद्धिमान् व मधुर भाषण करणाऱ्या कुंतीपुत्राच्या तोंडून अयुक्त, असत्य, असह्य किंवा अप्रिय भाषण कधींहि निघत नसे. तो महातेजस्वी युधिष्ठिर सर्व लोकांचें व आपलें हित करण्यांतच नेहमीं तत्पर असे.

राजा जनमेजया, याप्रमाणें आपल्या तेजानें सर्व शत्रूंना ताप देणारे ते पांडव सर्व शोकरहित होऊन इंद्रप्रस्थनगरींत स्वसंतोषानें काल घालवूं लागले. अशा प्रकारें कांहीं काल गेल्यावर एके दिवशीं अर्जुन श्रीकृष्णाला म्हणाला—"हे जनार्दना, आज फार ऊष्मा होत आहे, तरी आपण सुहृज्जनांसह यमुनातीरावर जाऊन जलक्रीडा करूं या व संध्याकाळीं परत येऊं. तुला हा विचार रुचतो का?"

वासुदेव म्हणाला—हे पार्था, इष्टमित्रांसह जलक्रीडा करावी अशी माझीहि इच्छा आहे.

(२) राजा, वासुदेव व पार्थ या दोघांनीं आपसांत असा संकेत करून धर्मराजाची अनुज्ञा घेतली व ते दोघे सुहृज्जनांसह यमुनातीरीं गेले. तें क्रीडास्थान विविध वृक्षांनीं युक्त असून तेथें यमुनेच्या पात्रामध्यें निर्माण केलेलीं विहारस्थानें होतीं. तो प्रदेश इंद्राच्या अमरावतीसारखा होता. तें स्थान भक्ष्य व भोज्य पदार्थ, सुगंधी द्रव्यें आणि इतर पुष्पमाला इत्यादि सर्व अमूल्य वस्तू, यांनीं युक्त होतें. पार्थ व गोविंद यांनीं क्रीडास्थानांत प्रवेश केल्यावर त्यांच्या बरोबरचे सुहृज्जन भिन्न भिन्न रत्नखचित विहारस्थानांत जाऊन क्रीडा करूं लागले. रम्य अवयवांनीं युक्त असलेल्या कृष्णार्जुनांच्या सुंदर स्त्रियाहि तेथें कोणी वनांतून तर कोणी जलांतून यथेच्छ विहार करूं लागल्या.

हे महाराज, द्रौपदी व सुभद्रा यांनीं त्या क्रीडानंदाच्या भरांत इतर स्त्रियांना विपुल वस्त्राभरणें दिलीं. त्या स्त्रियांपैकीं कित्येक आनंदानें नृत्य करूं लागल्या तर कोणी हंसूं लागल्या. कोणी एकमेकींशीं विनोद करूं लागल्या व आपलीं रहस्यें परस्परांस निवेदन करूं लागल्या. तो वनप्रदेश वेणु, वीणा, मृदंग इत्यादि वाद्यांच्या मधुर ध्वनीनें दुमदुमून गेला होता; असा तेथें सर्वत्र आनंद चालला असतां कृष्ण व अर्जुन हे दोघे जवळच एका रम्य प्रदेशांत गेले व हे राजा, भिन्न भिन्न अमूल्य आसनावर बसले. ते वीर कृष्णार्जुन मागें घडलेल्या पराक्रमांच्या व इतर कथा परस्परांस सांगून एकमेकांचें रंजन करूं लागले. स्वर्गांतील अश्विनिकुमारांप्रमाणें बसलेले ते दोघे अतिशय हृष्ट झाले.

इतक्यांत त्यांच्याजवळ एक ब्राह्मण आला. तो मोठ्या साल वृक्षाप्रमाणें उंच होता. त्याची अंगकांति तापविलेल्या सोन्यासारखी होती. त्याचें सर्व अंग

नील-पीत वर्णाचें होतें. केंस अग्नीच्या ज्वालेप्रमाणें पीतवर्ण होते. तो जसा उंच होता, तसाच स्थूलहि होता. बाल सूर्याप्रमाणें शोभणाऱ्या त्या विप्रानें वल्कलें व जटा धारण केल्या होत्या. त्याचे नेत्र कमलाच्या पाकळीप्रमाणें असून तो आपल्या अंगकांतीनें जणुं काय प्रज्वलित होत होता. तो तेजस्वी द्विजोत्तम आपल्या समीप आला आहे असें पाहून अर्जुन व वासुदेव सत्वर उठून उभे राहिले. १. १८. २२२.

---

## अध्याय २२३ वा.

[ १ ब्राह्मणरूपी अग्नीची प्रार्थना. २ श्वेतकिराजाचा वृत्तान्त. ३ अग्नीची व्याधि व निष्फल उपाय. ]

( १ ) वैशंपायन—हे राजा, तो ब्राह्मण खांडववनाच्या समीप असलेल्या त्या दोघां लोकप्रवीर अर्जुन-वासुदेवांना म्हणाला—"हे यादव-पांडवहो, मी अपरिमित भोजन करणारा ब्राह्मण आहें. मी नेहमीं विपुल अन्न भक्षण करतों. तुम्ही दोघेहि वीर मोठे उदार अहां. यास्तव मी तुम्हांपाशीं भिक्षा मागावयास आलों आहें. मी एकदा तृप्त होईन, इतकें अन्न मला द्या."

ब्राह्मणाचें हें वचन ऐकून ते दोघेहि सर्वसमर्थ कृष्ण-पांडव म्हणाले—हे भगवन्, कोणत्या अन्नानें तुझी तृप्ति होईल, तें सांग. म्हणजे आम्ही तें संपादन करण्याचा यत्न करूं.

तेव्हां 'आम्हीं तुझ्यासाठीं कोणतें अन्न तयार करावें' असें विचारणाऱ्या त्या वीरांस तो पूज्य ब्राह्मण म्हणाला—"हे वीरांनो, मी साधें अन्न खात नसतों. मी अग्नि आहें, असें तुम्ही समजा व मला अनुरूप अन्न द्या. देवेंद्र या खांडववनाचें सर्वदा सर्वप्रकारें रक्षण करीत असतो. त्यामुळेंच त्या महात्म्याकडून सुरक्षित असलेल्या या वनास मी दग्ध करूं शकत नाहीं. या वनांत त्याचा मित्र तक्षक-नाग आपल्या सर्व परिवारासह रहातो व त्या आपल्या मित्रासाठीं तो या वनाचें व त्याबरोबरच इतर प्राण्यांचेंहि रक्षण करतो. त्यामुळेंच इंद्राच्या तेजानें मी त्याला जाळूं शकत नाहीं. मी या वनांत प्रज्वलित झालों आहें, असें पाहतांच तो मेघजलाची वृष्टि करूं लागतो. त्यामुळें मला अत्यंत अभीष्ट असलेल्याहि या वनाला मी जाळूं शकत नाहीं. तुम्ही दोघे अस्त्रवेत्ते आहां. तुम्हीं

मला साह्य केल्यास मी हें खांडववन दग्ध करीन. एवढी भिक्षा मला घाला. हे श्रेष्ठ अस्त्रज्ञहो, तुझी जलधारा व वनचर प्राणी यांचें निवारण करा."

जनमेजय म्हणाला—हे ब्रह्मन्, इंद्रानें रक्षण केलेलें व विविध प्राण्यांनीं युक्त असलेलें तें खांडववन दग्ध करण्याची भगवान् अग्नीनें कां इच्छा केली? क्रुद्ध झालेल्या अग्नीनें ज्या अर्थी खांडववन जाळिलें त्या अर्थी त्याचें कारणहि तसेंच मोठें असलें पाहिजे. यास्तव हे मुने, पूर्वी खांडववन कसें दग्ध झालें तें सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. तरी तो यथार्थ वृत्तान्त मला सांग.

(२) राजाचा हा प्रश्न ऐकून वैशंपायन म्हणाला—हे राजन्, अग्नीनें खांडववन दग्ध करण्याचें कारण मी तुला मोठ्या संतोषानें सांगतों, ऐक. पुराणांत वर्णन केलेली ही खांडववनाच्या नाशाची कथा सविस्तर श्रवण कर.

पूर्वी 'श्वेतकि'-नांवाचा महा पराक्रमी इंद्रतुल्य प्रसिद्ध राजा होऊन गेला. त्याच्यासारखा बुद्धिमान्, यज्ञ करणारा व दाता दुसरा कोणीहि झाला नाहीं. त्यानें असंख्य देवयज्ञादि स्मार्त व ज्योतिष्टोमादि श्रौत यज्ञ करून विपुल दक्षिणेनें ब्राह्मणांना तृप्त केलें. हे भूपते, दिवसेंदिवस त्या राजाला यज्ञ व दान यांवांचून दुसरा उद्योगच नाहींसा झाला. तो एकसारखा ऋत्विजांसह यजन करूं लागला. त्यामुळें ज्यांचे नेत्र धुरानें व्याकुळ झाले आहेत असे ते सर्व ऋत्विज दीर्घकाल चाललेल्या राजाच्या यज्ञाला कंटाळले व त्या यज्ञशील राजाला सोडून निघून गेले. तेव्हां राजानें त्या ऋत्विजांना अनेक प्रकारें विनविलें; परंतु दृष्टिरहित झाल्यामुळें ते त्याचा यज्ञ करावयास आले नाहींत. शेवटीं त्यांची अनुमति घेऊन राजानें तो यज्ञ इतर ऋत्विजांकडून समाप्त करविला.

त्यानंतर कांहीं कालानें राजाला पुनः शतसंवत्सर सत्र करण्याची इच्छा झाली. परंतु त्या महात्म्याला तें करण्यास कोणी ऋत्विज मिळाला नाहीं. त्या महायशस्वी राजानें आपल्या सुहृज्जनांसह ऋत्विज मिळविण्यासाठीं पुष्कळ यत्न केला. त्यानें ऋत्विजांना नमस्कार करून मधुर भाषणानें त्यांचें सांत्वन केलें, त्यांना दान दिलें व पुनः पुनः त्यांचीं आर्जवें केलीं. परंतु त्यांनीं राजाची विनंति मान्य केली नाहीं.

तेव्हां तो क्रुद्ध होऊन त्या आश्रमवासी तेजस्वी ब्राह्मणांना म्हणाला—हे द्विजश्रेष्ठहो, मी जर पतित व तुमच्या सेवेंत तत्पर नसेन, तर तुम्ही सर्व ब्राह्मण माझा सत्वर त्याग करा. परंतु तसें नसेल तर मात्र तुम्हांला माझी उत्पन्न

झालेली यज्ञश्रद्धा ढळविणें योग्य नाहीं. किंवा माझा त्याग करणेंहि तुम्हांला उचित नाहीं.

हे विप्रहो, मी तुम्हांला शरण आलों आहें. मजवर प्रसन्न व्हा. सान्त्ववचन, दान इत्यादि उपायांनीं मी आपल्या कार्यासाठीं तुम्हांला प्रसन्न करून ही प्रार्थना करीत आहें. यास्तव तुम्ही हें माझें कार्य अवश्य करा; अथवा तुम्ही जर केवल द्वेषानें माझा त्याग करीत असाल तर मी अन्य ऋत्विजांकडे जाऊन हें यज्ञकार्य स्वीकारण्याविषयीं त्यांची प्रार्थना करीन. असें बोलून तो राजा स्वस्थ बसला.

तेव्हां हे परंतपा, ते सर्व ऋत्विज राजाचें याजन करण्यास समर्थ नसल्यामुळें क्रुद्ध होऊन त्या राजाला म्हणाले—" हे नृपश्रेष्ठा, तुझें हें सतत चालणारें यज्ञ-कर्म करून आम्ही श्रांत झालों आहों. यास्तव श्रमानें श्रांत झालेल्या आम्हांला तूं आतां विश्रांति द्यावीस, हेंच योग्य आहे. हे निष्पापा, तुला बुद्धिवैकल्यामुळें यज्ञ करण्याविषयीं अतिशय त्वरा झाली आहे. पण आम्ही किती श्रांत झालों आहों याची तुला कल्पना नाहीं. यास्तव तूं आतां रुद्राकडे जा, म्हणजे तो तुझ्याकडून यज्ञ करवील. "

ऋत्विजांचें हें निंदावचन ऐकून राजाला अतिशय क्रोध आला. तो कैलास पर्वतावर गेला व नियत चित्तानें तीक्ष्ण व्रतें धारण करून महादेवाच्या आरा-धनेसाठीं उग्र तप करूं लागला. हे राजा, तो दीर्घकाल उपवासपरायण झाला. तो कधीं बारावे दिवशीं, तर कधीं सोळावे दिवशीं कंदमूल व फळें यांचा आहार करीत असे.

तो श्वेतकि-राजा शांत चित्तानें हात वर करून नेत्र न मिटतां सहा महिने स्तंभासारखा अचल राहिला. तेव्हां महत्तप करणाऱ्या त्या नरेंद्राला शंकरानें परम प्रीतीनें दर्शन दिलें आणि स्निग्ध व गंभीर वाणीनें तो पूज्य उमापति त्यास म्हणाला—" हे नरवीरा, मी तुझ्या तपश्चर्येनें प्रसन्न झालों आहें. तुझें कल्याण असो. तुला जो वर इष्ट असेल तो मागून घे. "

अतितेजस्वी रुद्राचें हें भाषण ऐकून राजर्षीनें त्याला प्रणाम केला व म्हटलें—" सर्व लोकांना पूज्य असलेला भगवान् जर मजवर प्रसन्न झाला असेल तर त्यानें स्वतः माझें याजन करावें. हे सुरेश्वरा, तूं माझा याजक हो व मजकडून शतसांवत्सरिक सत्र करीव."

राजाचें हें वचन ऐकून प्रसन्न झालेला भगवान् हंसत त्यास म्हणाला—हे राजा ज्या याजनासाठीं तूं हें महत्तप केलेंस, तें या आमच्या लोकीं नाहीं. कारण आम्हांला याजनाचा अधिकार नाहीं. तथापि मी तुला जसें सांगत आहें, त्याप्रमाणें तूं जर नियमानें वागशील तर मी तुझें याजन करवीन. हे राजेंद्रा, बारा वर्षें ब्रह्मचारी व शांतचित्त राहून तूं अविछिन्न घृतधारेनें जर अग्नीला तृप्त केलेंस तर तूं मजपाशीं जो वर मागत आहेस, तो तुला प्राप्त होईल.

जनमेजया, रुद्राचें हें भाषण ऐकून श्वेतकि-राजानें बारा वर्षें व्रतस्थ राहून अविछिन्न घृतधारेनें अग्नीला तृप्त केलें.

बारावें वर्ष पुरें झालें असतां महेश्वर पुनः त्या राजापाशीं आला व परम प्रीतीनें त्यास म्हणाला—" हे राजश्रेष्ठा, तुझ्या या अनादि वेदविहित कर्मानें मी संतुष्ट झालों आहें. याजन हें ब्राह्मणांचें विधिप्राप्त कर्म आहे. यास्तव मी स्वतः तुझ्याकडून यज्ञ करविणार नाहीं. कारण मी स्वतः यज्ञभोक्ता आहें. पण माझा अंशभूत 'दुर्वास' या नांवानें प्रसिद्ध असलेला महाभाग द्विजोत्तम भूलोकीं आहे, तो माझ्या आज्ञेनें तुजकडून यज्ञ करवील. तूं यज्ञसामग्री सिद्ध करीव."

रुद्राचें हें वचन ऐकून तो राजा आपल्या नगरीला परत आला व त्यानें पुनरपि यज्ञसंभार संपादन केले. यज्ञाची सर्व सामग्री सिद्ध होतांच तो राजा पुनः रुद्राकडे गेला व 'हे भगवन्, तुझ्या कृपेनें माझे सर्व संभार व सर्व उपकरणें तयार आहेत. उद्यां यज्ञदीक्षा घ्यावी, अशी माझी इच्छा आहे' असें बोलला.

त्या महात्म्या राजाचें हें वचन ऐकून रुद्रानें दुर्वासाला बोलाविलें व म्हटलें—" हे द्विजश्रेष्ठा, हा महाभाग श्वेतकि-राजा आहे. माझ्या आज्ञेनें तूं या राजाकडून यज्ञ करीव."

तेव्हां 'ठीक आहे' असें बोलून दुर्वासमुनि राजाबरोबर त्याच्या राजधानीस गेला व त्याचा यज्ञ यथाकालीं व यथाविधि सुरू झाला. राजानें त्या यज्ञांत ब्राह्मणांना विपुल दक्षिणा दिली. महात्म्या श्वेतकिराजाचें तें सत्र समाप्त झालें असतां दुर्वासानें ज्यांना अनुज्ञा दिली आहे, असे सर्व दीक्षित याजक व तेजस्वी सदस्य स्व-स्वस्थानीं गेले. महाभाग राजाहि आपल्या नगरास परत आला.

त्या वेळीं वेदज्ञ ब्राह्मणांनीं त्याचा मोठा सत्कार केला, स्तुतिपाठकांनीं अर्थपूर्ण स्तुति केली व नागरिकांनीं त्याचें अभिनंदन केलें. हे राजन्, याप्रमाणें याग व दीर्घ सत्र करणारा श्वेतकिराजा पुढें दीर्घ कालानें सत्रांतील ऋत्विज व सर्व सदस्य यांसह दिव्य लोकीं गेला. तेथें देवादिकांनीं त्याची फार स्तुति केली.

( ३ ) जनमेजया, श्वेतकीच्या यज्ञांत अग्नीनें बारा वर्षें अविच्छिन्न घृतधारांचें प्राशन केलें व त्या एकरूप कर्मांतील हवीनें तो देव अतिशय तृप्त झाला. त्यामुळें त्याला दुसऱ्या कोणाहि यजमानाच्या यज्ञांतील हवि भक्षण करण्याची इच्छा राहिली नाहीं. तो निस्तेज झाला. पूर्वीसारखा प्रकाशित होईना. भगवान् वह्नीला विकार उत्पन्न झाला. त्याचें सर्व तेज नष्ट झालें व त्याला ग्लानि आली. तेव्हां आपलें स्वाभाविक तेज नष्ट झालें आहे असें पाहून भगवान् हुताशन सर्व लोकांना पूज्य असलेल्या पवित्र ब्रह्मलोकीं गेला व कमलासनावर बसलेल्या ब्रह्मदेवाला म्हणाला—"भगवन्, श्वेतकिराजानें मला अतिशय तृप्त केलें. त्यामुळें मला अत्यंत अरुचि उत्पन्न झाली आहे. मी तिचें निवारण करण्यास समर्थ नाहीं. मी निस्तेज व बलहीन झालों आहें. यास्तव तुझ्या प्रसादानें आपल्या पूर्वस्थितीला प्राप्त व्हावें अशी माझी इच्छा आहे."

अग्नीचें हें वचन ऐकून सर्व लोककर्ता भगवान् ब्रह्मदेव हंसतच अग्नीला म्हणाला—"हे हुताशना, तूं बारा वर्षें सतत 'वसोर्धारा'-नांवाच्या पात्रानें अविच्छिन्न घृतधारेचें सेवन करून या अवस्थेस प्राप्त झाला आहेस. त्या अविच्छिन्न घृतपानानें तुला ही ग्लानि आली असून तूं अकस्मात् असा निस्तेज झाला आहेस. पण हे महाभाग, तूं असा खिन्न होऊं नकोस. मी तुझी ही अरुचि लवकरच घालवीन व तूं आपल्या पूर्वप्रकृतीस प्राप्त होशील. हे विभावसो, पूर्वीं तूं देवांच्या आज्ञेनें देवशत्रूंचें निवासस्थान, जें घोर खांडववन त्याला जाळलेंस. तेथेंच आतां सर्व प्राणी सुखानें राहत आहेत. त्यांच्या मेदानें तूं तृप्त झालास म्हणजे पुनः आपल्या पूर्व स्वरूपास प्राप्त होशील. यास्तव तूं आतां सत्वर तें अरण्य दग्ध करावयास जा. म्हणजे तुझी ग्लानि नाहींशी होईल."

ब्रह्मदेवाच्या मुखांतून निघालेलें हें वचन ऐकून अग्नि ब्रह्मलोकांतून मोठ्या वेगानें निघाला व खांडववनांत येऊन वायूच्या प्रेरणेनें क्रुद्ध झालेला तो उत्तम वीर्य धारण करून अकस्मात् प्रज्वलित झाला. तेव्हां खांडववन प्रदीप्त झालेलें

पाहून त्यांत राहणाऱ्या प्राण्यांनीं अग्नीच्या शांतीसाठीं पराकाष्ठेचा यत्न केला. क्रुद्ध झालेल्या हजारों मदोन्मत्त गजांनीं आपल्या सोंडांनीं जलाशयांतून विपुल जल आणून अग्नीवर त्याचा सेक केला. ज्यांना अनेक मस्तकें आहेत, अशा क्रोधानें देहभान विसरलेल्या नागांनीं आपल्या मस्तकांनीं अग्नीवर जलाची वृष्टि केली. इतर प्राण्यांनींहि आपापल्या सामर्थ्याप्रमाणें उद्यम करून अग्नीला शांत केलें. याप्रमाणें खांडववनांत पुनः पुनः प्रज्वलित झालेल्या अग्नीला तेथील प्राण्यांनीं सात वेळां विझविलें. १. १८. २२३.

---

## अध्याय २२४ वा.

[ १ ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून अग्नीचें कृष्णार्जुनांपाशीं आगमन व साह्याची याचना. २ अर्जुनानें केलेली धनुरादि युद्धसाधनांची मागणी. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें ज्याचा प्रयत्न सात वेळां निष्फल झाला आहे असा निराश, खिन्न व क्रुद्ध झालेला अग्नि ब्रह्मदेवाकडे गेला व त्यानें घडलेला सर्व वृत्तान्त त्यास निवेदन केला.

तेव्हां एक क्षणभर विचार करून तो अग्नीला म्हणाला—हे महाभागा, तुला खांडववन कसें दग्ध करितां येईल याचा विचार करून मीं त्याचा उपायहि निश्चित केला आहे. पण तूं कांहीं काल धीर धर. अनुकूल काल आला म्हणजे मी तो तुला सांगेन. त्या वेळीं नर-नारायण तुला साह्य करतील व त्यांच्या साह्यानें तूं तें वन निर्विघ्नपणें जाळूं शकशील. तेव्हां 'तथास्तु' असें बोलून अग्नि तेथून निघाला.

त्यानंतर दीर्घकालानें ते नर-नारायण ऋषि भूलोकीं उत्पन्न झाले आहेत, असें जाणून व ब्रह्मदेवाचें वाक्य स्मरून तो पुनरपि पितामहाकडे गेला. तेव्हां ब्रह्मदेव त्यास म्हणाला—"हे अग्ने, तूं इंद्राच्या डोळयांदेखत आजच खांडववन कसें दग्ध करूं शकशील, तें सांगतों, ऐक. हे विभावसो, नर व नारायण हे दोघे पूर्वदेव सध्यां देवांच्या कार्यासाठीं मनुष्यलोकीं अवतीर्ण झाले आहेत. लोक ज्यांना अर्जुन व वासुदेव असें समजतात, तेच नर-नारायण ऋषि होत.

या वेळीं ते दोघेहि एकत्र खांडववनासमीपच आहेत. त्यांच्यापाशीं जाऊन 'या वनाचा दाह करण्यास तुम्ही मला साह्य करा,' अशी तूं त्यांची याचना

कर. त्या पूर्वऋषींनीं तुला साह्य करण्याचें आश्वासन दिलें म्हणजे सर्व देव जरी रक्षण करीत असले, तरी तूं त्या वनाला जाळशील. ते दोघे वीर मोठ्या यत्नानें सर्व प्राण्यांचें व देवराजाचेंहि निवारण करतील, याविषयीं मला मुळींच शंका वाटत नाहीं." ब्रह्मदेवाचें हें वचन ऐकून अग्नि मोठ्या त्वरेनें तेथून निघाला व खांडववनासमीप असलेल्या कृष्णार्जुनापाशीं ब्राह्मणरूपानें येऊन त्यांस जें कांहीं बोलला तें मीं तुला सांगितलेंच आहे.

( २ ) त्या ब्राह्मणरूपी अग्नीचें पूर्वोक्त भाषण ऐकून कुंतीपुत्र अर्जुन इंद्राची इच्छा नसतांनाहि खांडववनाला जाळण्याची इच्छा करणाऱ्या अग्नीस त्या प्रसंगाला अनुरूप असें वचन बोलला—"हे हव्यवाहना, ज्यांच्या योगानें मी अनेक वज्रधरांशींहि युद्ध करूं शकेन, अशीं मजपाशीं अनेक दिव्य व लौकिक अस्त्रें आहेत. पण हे भगवन्, माझ्या बाहुबलाला शोभण्यासारखें धनुष्य नाहीं. समरामध्यें युद्ध करीत असतांना माझा वेग सहन करील असें धनुष्य व मी मोठ्या त्वरेनें शरसंधान करीत असतांहि क्षीण न होणारे असंख्य बाण मला पाहिजेत. मला इष्ट असलेले असंख्य शर व वाहून नेण्यास समर्थ असा रथहि मजपाशीं नाहीं. यास्तव हे विभावसो, वायूसारखे वेगवान्, दिव्य, व शुभ्र अश्व, यांनीं युक्त व मेघाप्रमाणें ज्याचा निर्घोष आहे, असा सूर्यासारखा तेजस्वी रथ, दृढ धनुष्य व अक्षय्य बाणभाते, यांची मला अपेक्षा आहे.

त्याचप्रमाणें या कृष्णाच्या सामर्थ्याला अनुरूप असें आयुध त्याच्यापाशीं नाहीं. त्याला जर अनुरूप आयुध मिळालें तर हा माधव संग्रामांत त्याच्या योगानें नाग व पिशाच यांसहि एका क्षणांत मारील. हे भगवन्, खांडव महावनावर जलधारांनीं सतत वृष्टि करणाऱ्या इंद्राचें निवारण मी ज्याच्या योगानें करूं शकेन, असा उपाय मला सांग. तुझा मनोरथ सिद्ध होईल, असा उपाय योजिल्यास, हे अग्ने, आम्ही दोघेहि प्रयत्नानें जें कांहीं करतां येणें शक्य आहे तें सर्व करूं. पण हे भगवन्, आम्हांला धनुरादिक समर्थ युद्धसाधनें तूं दे."
१. १८. २२४.

## अध्याय २२५ वा.

[ १ अर्जुनाला अग्नीपासून दिव्य आयुधांची प्राप्ति. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, ज्याचा ध्वज धूम आहे अशा अग्नीनें अर्जुनाचें तें भाषण ऐकून जलांत वास करणाऱ्या अदितिपुत्र वरुणाचें, दर्शनाच्या इच्छेनें, ध्यान केलें. त्याच्या चिंतनाचा हेतु जाणून वरुण प्रकट झाला. तेव्हां पूजादि उपचारांनीं त्या लोकपालांतील चवथ्या सनातन देवाधिदेव जलेश्वरास प्रसन्न करून धूमकेतु म्हणाला—" हे भगवन्, सोमराजानें तुला जें दिव्य धनुष्य व अक्षय्य भाते दिले आहेत, ते सत्वर मला दे. ज्याच्यावर कपीचें चिह्न आहे, तो रथहि मला अर्पण कर. या युद्धोपकरणांनीं व विशेषतः गांडीव धनुष्याच्या योगानें पृथापुत्र अर्जुन देवांचें महत्कार्य करील. त्याचप्रमाणें तुजपाशीं असलेल्या दिव्य चक्रानें वासुदेवहि देवकार्य करणार आहे. यास्तव तेंहि मला दे."

तेव्हां वरुण 'ठीक आहे. देवकार्यासाठीं हें सर्व उपकरण मी तुला देतों' असें अग्नीला बोलला व तें अति अद्भुत, दृढ, यश व कीर्ति यांची वृद्धि करणारें, कोणत्याहि शस्त्रांनीं पराभूत न होणारें, शत्रूंच्या सर्व शस्त्रांचा विध्वंस करणारें, सर्व आयुधांपेक्षां प्रमाणानें मोठें असलेलें, शत्रुसैन्याचा पराभव करणारें, हजारों धनुष्यांचें एकटेंच कार्य करणारें, राष्ट्राची वृद्धि करणारें, विचित्र उच्च-नीच वर्णांनीं सुशोभित केलेलें, सुंदर, व्रणरहित, देव, दानव व गंधर्व यांनीं असंख्य वर्षें पूजिलेलें उत्कृष्ट धनुष्य, दोन अक्षय्य दिव्य भाते आणि दिव्य अश्व जोडलेला रथ त्यानें अग्नीला दिला.

श्रेष्ठ कपि हाच त्या रथाचा ध्वज असून, ज्यांच्या गळयांत सुवर्णमाला घातल्या आहेत, अशा रजतासारख्या शुभ्र गांधर्व अश्वांनीं तो युक्त होता. ते अश्व वायु किंवा मन यांसारखे वेगवान् होते. वरुणानें दिलेला तो दिव्य रथ सर्व उपकरणांनीं युक्त, देव-दानवांना जिंकण्यास अशक्य, तेजस्वी, भयंकर घोष करणारा व सर्व रत्नांनीं मनोहर होता.

पूर्वी भुवनेश्वर भौमन-प्रजापतीनें मोठी तपश्चर्या करून त्या रथाला उत्पन्न केलें. त्याचें स्वरूप सूर्यासारखें असून त्यांत बसून सोमानें दानवांना जिंकलें. आपल्या दीप्तीनें तो अग्नीसारखा प्रज्वलित दिसत होता. त्याच्या ध्वजाची यष्टि सुवर्णाची असून, त्यावरील पताका नीलवर्ण होती. त्यामुळें तो ध्वज इंद्रधनुष्या-

सारखा दिसत होता. त्याच्या अग्रभागीं सिंह किंवा व्याघ्र यांप्रमाणें भयंकर शरीरानें युक्त असलेला दिव्य वानर जणुं काय शत्रुपक्षाला दग्ध करीतच स्थिर स्थित असे.

त्याचप्रमाणें त्या ध्वजावर मोठमोठीं विविध भूतें त्या कपीच्या सभोंवार बसून आपल्या भयंकर नादानें शत्रुसैन्यांना भयभीत करीत असत. विविध पताकांनीं सुशोभित केलेला तो उत्तम रथ जवळ येतांच कवच, खड्ग, अंगुलित्राण इत्यादिकांनीं सज्ज झालेल्या पार्थानें त्याला प्रदक्षिणा घातली व देवतांस प्रणाम करून एखादा पुण्यवान् पुरुष विमानांत जसा विराजमान होतो, त्याप्रमाणें त्यावर आरूढ झाला.

पूर्वी ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या त्या दिव्य धनुःश्रेष्ठ गांडीवाला स्पर्श करून अर्जुन अतिशय प्रसन्न झाला. अग्नीला साक्षी ठेवून त्या वीर्यवानानें स्वसामर्थ्यानें रथांतील तें धनुष्य उचललें व एका क्षणांत त्यावर गुण चढविला. त्या वेळीं त्याचा जो ध्वनि झाला तो ऐकून तेथील जीवांचें मन भयानें थरारलें. याप्रमाणें तो दिव्य रथ, अक्षय्य बाणभाते व गांडीव धनुष्य यांनीं युक्त झालेला अर्जुन अतिशय संतुष्ट व अग्नीला साह्य करण्यास सज्ज झाला.

त्यानंतर अग्नीनें ज्याच्या उदरांत सूक्ष्म रज्जु आहे असें दिव्य चक्र व आपलें प्रिय आग्नेय अस्त्र कृष्णाला दिलें. त्यामुळें तो देवकीनंदनहि त्याला साह्य करण्यास समर्थ झाला.

अस्त्र व दिव्य चक्र दिल्यावर अग्नि त्यास म्हणाला—हे मधुसूदना, या अस्त्रानें तूं अमानुष शत्रूंनाहि रणांत जिंकशील, यांत कांहीं संशय नाहीं. या दिव्य चक्राच्या योगानें तूं मनुष्य, देव, राक्षस, पिशाच व नाग यांच्याशीं युद्ध करीत असतांना विजयी होशील, यांत मुळींच शंका नाहीं. किंबहुना तूं संग्रामांत या दिव्य चक्राचा ज्याच्यावर प्रयोग करशील, तो अमरहि जिवंत रहाणार नाहीं. मग इतरांची गोष्ट कशाला पाहिजे !

हे माधवा, याच्या नाभीमध्यें जें सूत्र आहे, त्याच्या योगानें तूं समरांगणांत शत्रूवर पुनः पुनः फेकलेलेंहि हें चक्र त्याला मारून पुनः तुझ्या हातीं येईल. त्याला दुसरें कोणतेंहि शस्त्र प्रतिबंध करूं शकणार नाहीं. वरुणानें त्या देवकीनंदनाला कौमोदकी गदा दिली. तिचा ध्वनि विजेच्या कडकडाटासारखा असून ती घोर गदा दैत्यांचा नाश करणारी होती. त्यानंतर हृष्ट झालेले कृष्णार्जुन

अग्नीला म्हणाले—" भगवन्, आम्ही कृतास्त्र, शस्त्रसंपन्न, रथी व ध्वजयुक्त झाल्यामुळें आतां सर्व सुरासुरांशींहि युद्ध करण्यास समर्थ आहों. मग तक्षकासाठीं आमच्याशीं युद्ध करण्याची इच्छा करणाऱ्या एका इंद्राशीं आम्ही अनायासानें युद्ध करूं, यांत काय संशय !"

अर्जुन म्हणाला—हा वीर्यवान् जनार्दन हातांत चक्र घेऊन युद्धामध्यें संचार करूं लागला, म्हणजे त्यानें सोडलेल्या या चक्रानें त्रिभुवनांतील कोणताहि जीव दग्ध झाल्यावांचून रहाणार नाहीं. त्याचप्रमाणें हें गांडीव धनुष्य व हे अक्षय्य भाते यांच्या साह्यानें मीहि सर्व लोकांना जिंकण्यास समर्थ आहें. यास्तव हे अग्ने, तूं आजच या खांडव वनाला सर्वतः व्यापून यथेच्छ प्रज्वलित हो. आम्ही दोघे तुला साह्य करण्यास समर्थ आहों.

राजा जनमेजया, दाशार्ह कृष्ण व कुंतीपुत्र अर्जुन यांनीं असें आश्वासन दिलें असतां भगवान् अग्नि तैजसरूप धारण करून खांडववन जाळण्यास प्रवृत्त झाला. तो त्या वनाला सर्वतः परिवेष्टित करून जाळूं लागला असतां प्रलयकालाचाच भास झाला.

राजा, अग्नीनें एकाच वेळीं आपल्या ज्वालांनीं खांडववनाला व्यापिलें असतां मेघगर्जनेप्रमाणें त्यांतून भयंकर ध्वनि निघूं लागला. तो ऐकून सर्व भूतें भयभीत झालीं. त्या वेळीं दग्ध होणाऱ्या त्या खांडववनाचें स्वरूप सूर्याच्या किरणांनीं सर्वतः व्याप्त झालेल्या मेरूप्रमाणें शोभलें. १. १८. २२५.

---

## अध्याय २२६ वा.

[ १ खांडववनदाह ऐकून इंद्राचा क्रोध. ]

( १ ) वैशंपायन—हे नृपश्रेष्ठा, त्यानंतर ते श्रेष्ठ रथी कृष्णार्जुन दोन पृथक् रथांत बसले आणि ते दोघे त्या खांडववनाच्या दोन बाजूंस उभे राहून सर्व दिशांतील प्राण्यांचा भयंकर नाश करूं लागले. खांडववनांतील प्राणी ज्या दिशेनें पळून जात असलेले दिसत, त्या बाजूला हे दोघेहि वीर धांवत जाऊन त्यांचा वध करीत. त्या दोन रथांनीं वेगानें संचार करणारे ते दोघे अलातचक्राप्रमाणें गरगर फिरत असल्यामुळें त्यांतील अंतर कोणालाच दिसलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर तें एक रथाचें अविच्छिन्न वलयच आहे, असा भास झाला.

खांडववन पेटलें असतां हजारों प्राण्यांचे भयंकर आक्रोश सर्व बाजूंनीं ऐकूं येऊं लागले. त्यांतील कित्येकांच्या शरीराचा कांहीं भाग जळाला, कांहीं होरपळले, कित्येकांची दृष्टि गेली व ते अंध झाल्यामुळें भयंकर अग्निज्वालेंत पडून दग्ध झाले. कित्येक इतस्ततः पळूं लागले. कोणी आपल्या पुत्रांना, पित्यांना व भ्रात्यांना स्नेहानें आलिंगन देऊन एकमेकांस सोडण्यास समर्थ न झाल्यामुळें तेथेंच मरण पावले.

कित्येक दांत-ओंठ खाऊन मोठ्या सामर्थ्यानें वनांतून बाहेर उड्या टाकूं लागले, पण त्यांना मूर्च्छा आल्यामुळें ते पुनः अग्नीमध्येंच पडले. कित्येकांचे पंख जळाले, कित्येकांचे पाय होरपळले व त्यामुळें ते भूतलावर तडफडूं लागले. याप्रमाणें त्या वनांतील निरनिराळ्या भागीं जीवांचा भयंकर नाश होत असलेला सर्वत्र दिसला.

अग्नीच्या उष्णतेनें त्यांतील जलाशयांना कड आले व मत्स्य-कूर्मादि प्राणी त्यांत जणुंकाय शिजत आहेत असें भासलें. ज्यांचीं शरीरें अग्नीनें प्रदीप्त झालीं आहेत, असे देहवान् जीव मूर्तिमंत अग्नीसारखेच दिसले. कांहीं पक्ष्यादि प्राणी अंतरिक्षांत उडून जाण्याचा यत्न करूं लागले असतां अर्जुनानें आपल्या बाणांनीं त्यांचे तुकडे तुकडे करून त्यांस पुनः प्रदीप्त अग्नीमध्यें पाडविलें. अर्जुनाच्या तीक्ष्ण बाणांनीं ज्यांचीं शरीरें छिन्न-भिन्न झालीं आहेत, असे खांडववनांतील प्राणी भयंकर आक्रोश करून व वेगानें अग्निज्वालांतून बाहेर पडण्याचा यत्न करून पुनः त्यांतच पडले.

अर्जुनाच्या बाणांनीं ताडीत झालेले खांडववनांतील जीव संघानें आक्रोश करूं लागले असतां समुद्राच्या मंथनासारखा घोर ध्वनि सर्वत्र पसरला. त्या वेळीं अतिशय प्रदीप्त झालेल्या अग्नीच्या ज्वालाहि आकाशाला जाऊन भिडल्या. त्यामुळें स्वर्गस्थ देवांना मोठा उद्वेग झाला. त्या ज्वालांनीं सर्व देव ऋषींसह संतप्त झाले. ते सर्व महात्मे देवाधिदेव शतक्रतूकडे गेले आणि म्हणाले—"अग्नि आज सर्वच सृष्टीला जाळणार कीं काय! हे देवेंद्रा, आज सर्व लोकांचा प्रलयकाल तर प्राप्त झाला नाहीं ना!"

राजा जनमेजया, देवांचें हें भाषण ऐकून इंद्रानें स्वतःच अग्नीचा आशय जाणला व तो खांडववनाच्या रक्षणासाठीं फार मोठ्या विचित्र रथसमूहासह तेथें आला. सर्व आकाशाला व्यापून त्यानें त्या पेटलेल्या वनावर वृष्टि करण्यास

आरंभ केला. इंद्रानें त्या वनावर मोठ्या त्वेषानें वृष्टि करण्याची आज्ञा केली असतां मेघ रथचक्राच्या आरांसारख्या हजारों धारांनीं वृष्टि करूं लागले.

पण त्या धारा खांडववनापर्यंत येऊन पोंचण्यापूर्वीच अग्नीच्या तेजानें अंतरिक्षांत सुकून गेल्या. त्या वनांत भडकलेल्या अग्नीपर्यंत जलाचा एक बिंदुहि येऊं शकला नाहीं. त्यामुळें नमुचिसूदन देवेंद्र अग्नीवर अत्यंत क्रुद्ध झाला व तो महामेघांच्या द्वारा विपुल जलवृष्टि करूं लागला. तेव्हां अग्नीच्या ज्वाला व मेघांची वृष्टि यांचा परस्परसंबंध झाल्यामुळें त्या वनांत धूम व विद्युत् यांचा भयंकर लोट उठला व मेघांनीं त्या वनाला सर्वतः व्यापून सोडिलें. १. १८. २२६.

---

## अध्याय २२७ वा.

[ १ खांडववनासमीप देव व कृष्णार्जुन यांचें युद्ध. ]

(१) वैशंपायन—राजा जनमेजया, इंद्र अशा रीतीनें महावृष्टि करूं लागला असतां अर्जुनानें शरवृष्टीनें तिचें निवारण केलें. त्या वेळीं त्या बीभत्सूनें आपल्या उत्तमोत्तम अस्त्रांचा प्रयोग करून धुक्यानें चंद्र जसा आच्छादित होतो त्याप्रमाणें खांडववनाला आच्छादित केलें. त्याच्या त्या बाणाच्छादनांतून एकहि प्राणी बाहेर पडण्यास समर्थ झाला नाहीं. मोठ्या कौशल्यानें व त्वरेनें बाण सोडणाऱ्या अर्जुनानें जणुं काय अंतरिक्षांत छतच उत्पन्न केलें व त्याच्या खालीं अग्नीला तें वन यथेच्छ भक्षण करूं दिलें.

याप्रमाणें तें वन जाळलें जात असतां महा बलाढ्य नागराज तक्षक तेथें नव्हता. तो कुरुक्षेत्रांत गेला होता. तथापि त्याचा बलाढ्य पुत्र अश्वसेन तेथेंच होता. त्यानें अग्नीच्या मुखांतून सुटण्यासाठीं तीव्र यत्न केला, पण पार्थाच्या बाणांनीं प्रतिबंध केल्यामुळें तो तेथून बाहेर पडूं शकला नाहीं. तेव्हां त्याच्या मातेनें त्याला गिळून त्या प्राणसंकटांतून सोडविलें. तिनें त्याचें मस्तक प्रथम गिळलें व ती नागीण त्याला वांचविण्याच्या इच्छेनें त्याचें पुच्छ गिळून अग्नींतून बाहेर पडत आहे, तों पांडवानें तीक्ष्ण धारेच्या बाणानें तिचें मस्तक तोडिलें. तक्षकाची भार्या पुत्राला वांचविण्याच्या इच्छेनें अशा युक्तीनें बाहेर पडत असतां अर्जुनानें तिचा शिरश्छेद केलेला पाहून इंद्रानें तक्षकपुत्र अश्वसेनाला सोडविण्याच्या इच्छेनें अर्जुनाला झंझावातानें मोहित केलें व मोठ्या पराकाष्ठेनें अश्वसेनाला सोडविलें.

इंद्रानें उत्पन्न केलेली ती घोर माया पाहून व या नागानें आपल्याला फसविलें आहे असें जाणून अर्जुनानें आकाशामध्यें उड्डाण करणाऱ्या प्राण्यांचे दोन-दोन, तीन-तीन तुकडे केले व क्रुद्ध झालेला अग्नि, पार्थ व कृष्ण यांनीं त्या नागास 'तुझ्या वंशाचा उच्छेद होईल' असा शाप दिला.

नंतर इंद्रानें केलेली वंचना पाहून क्रुद्ध झालेला अर्जुन आपल्या शरांनीं सर्व आकाश व्यापून इंद्राबरोबर युद्ध करूं लागला. तेव्हां समरामध्यें क्षुब्ध झालेल्या त्याला पाहून इंद्रानेंहि सर्व आकाश आच्छादित करून आपलें तीव्र अस्त्र सोडलें. त्यामुळें सर्व समुद्राला क्षुब्ध करणारा सोसाट्याचा वायु मोठा शब्द करीत आकाशांत पसरला व त्यानें जलवृष्टि, विद्युत्पात व गडगडाट करणारे मेघ उत्पन्न केले.

तेव्हां अस्त्रविद्येंत विशारद असलेल्या पार्थानें मेघाला प्रतिकार करणारें वायव्यास्त्र मंत्रवून सोडलें. त्यायोगें इंद्रानें निर्माण केलेल्या मेघांचें सामर्थ्य नाहींसें झालें. सर्व जलधारा वाळून गेल्या, विजा लोपल्या व धूलियुक्त अंधकाराचा नाश होऊन एका क्षणांत आकाश निरभ्र व स्वच्छ झालें आणि सुखकर शीतल वायु वाहूं लागला. निष्प्रतिबंध झालेला सूर्य हृष्ट होऊन प्रकाशला व निर्विघ्न झालेला अग्नि नानाविध आकार धारण करून जागजागीं प्रज्वलित झाला. त्यांत अनेक प्राण्यांच्या शरीरांतील वसा पडल्यामुळें त्याच्या ज्वाला अधिकच भडकल्या. याप्रमाणें त्या खांडववनांत अग्नि प्रज्वलित झाला असतां त्याचा महान् शब्द सगळ्या जगांत पसरला.

राजा, याप्रमाणें पार्थ व वासुदेव अग्नीचें रक्षण करीत असलेले पाहून आकाशांत गरुडादि पक्षी अभिमानानें एकत्र जमले. गरुडानें आपल्या वज्रतुल्य पंखांनीं, चोचीनें व नखांनीं कृष्ण व अर्जुन यांच्यावर प्रहार करण्याच्या हेतूनें झडप घातली. तसेंच, ज्यांचीं मुखें संतापानें रक्तवर्ण झालीं आहेत, असे सर्पांचे समूह त्या दोघां वीरांवर घोर विषाचा वर्षाव करण्यासाठीं त्यांच्या समीप आले. परंतु पार्थानें आपल्या रोषरूपी अग्नीनें युक्त केलेल्या बाणांचा वर्षाव करून त्या सर्वांचे तुकडे केले. तेव्हां ते सर्व आपल्या देहाचा नाश करण्यासाठीं त्या अग्नींतच येऊन पडले.

त्यानंतर असुर, गंधर्व, यक्ष, राक्षस व नाग कृष्णार्जुनांशीं युद्ध करण्यासाठीं भयंकर सिंहनाद करूं लागले व विविध शस्त्रास्त्रें हातांत घेऊन त्यांस मारण्या-

साठीं मोठ्या क्रोधानें त्यांच्या अंगावर धावून आले. तेव्हां भयंकर सिंहनाद व शस्त्रांचा वर्षाव करणाऱ्या त्या सर्वांचीं मस्तकें पार्थानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं छेदिलीं व शत्रूंचा नाश करणाऱ्या वासुदेवानें दैत्य व दानव यांच्या संघांचा भयंकर संहार केला. तेव्हां समुद्राच्या भयंकर भोंवऱ्यांत सांपडलेलें तृणादिक जसें तीरावर येऊन पडतें, तसे अस्त्रबलाच्या वेगानें भ्रमण करणारे असुरादिक कृष्णार्जुनाच्या समीप येऊन पडले. त्यानंतर अतिशय क्रुद्ध झालेला देवाधिपति इंद्र ऐरावतावर बसून कृष्णार्जुनांवर चाल करून आला व त्यानें मोठ्या वेगानें आपलें वज्र व अशनि घेऊन तीं त्या दोघांवर सोडिलीं आणि पार्थ व वासुदेव हे दोघेहि मरण पावले, असें त्यानें देवांना सांगितलें. इंद्रानें वज्र उचललेलें पाहतांच इतर सर्व देवहि आपापलीं आयुधें घेऊन सज्ज झाले.

हे राजन्, यमानें कालदंड घेतला. कुबेरानें गदा धारण केली. वरुणानें पाश हातीं घेतला. स्कंद 'अशनि'-संज्ञक महाशक्ति धारण करून 'मेरु'-पर्वतासारखा अचल होऊन उभा राहिला. अश्विनिकुमारांनीं दिव्य औषधि ग्रहण केल्या. ब्रह्मदेवानें धनुष्य व जयानें मुसल हातीं घेतलें. महा बलाढ्य विश्वकर्म्यानें क्रुद्ध होऊन पर्वत उचलून घेतला. अंशानें शक्ति, मृत्युदेवानें परश्वध, अर्यमानें परिघ व मित्रानें अनेक तीक्ष्ण पात्यांनीं युक्त असलेलें चक्र घेतलें व ते सर्व सज्ज झाले.

हे नृपश्रेष्ठा, पूषा, भग व सविता हेहि संतप्त होऊन आणि धनुष्यें व खड्ग हातीं घेऊन कृष्णार्जुनांवर धांवले. त्याचप्रमाणें रुद्र, वसु, महा बलवान् मरुत, विश्वेदेव, स्वतःच्या तेजानें देदीप्यमान होणारे साध्य व आणखीहि असंख्य देव त्या दोघां पुरुषोत्तम पार्थ-गोविंदांचा प्राण घेण्यासाठीं त्यांच्यावर चाल करून आले. त्या वेळीं प्रलयकालासारखीं उल्कापातादि दुश्चिन्हें होऊं लागलीं.

इंद्र सर्व देवांसह अत्यंत क्रुद्ध होऊन आपल्यावर चाल करून येत आहे, हें पहातांच ते दोघे अजिंक्य वीर आपलीं धनुष्यें सज्ज करून उभे राहिले व ते दोघेहि युद्धविशारद योद्धे त्या सर्व देवांवर आपल्या वज्रतुल्य बाणांचा वर्षाव करूं लागले. तेव्हां ज्यांचा सर्व प्रयत्न निष्फल झाला आहे असे समस्त देव अनेकदा पराभव पावून, शेवटीं रणांगणाचा त्याग करून भयानें इंद्राच्या आश्र-याला गेले.

अशाप्रकारें अर्जुन व माधव यांनीं देवांचा पराभव केलेला पाहून अंतरिक्षांत स्थित असलेल्या सर्व मुनींना विस्मय वाटला. त्यांचें संग्रामांतील अतुल वीर्य

पुनः पुनः अवलोकन करून इंद्र अतिशय संतुष्ट झाला व त्यांच्याशीं पुनः युद्ध करूं लागला. सव्यसाची अर्जुनाचें वीर्य पुनः पहाण्याच्या इच्छेनें त्या देवेंद्रानें त्याच्यावर फार मोठी पाषाणवृष्टि केली. पण इंद्रपुत्र अर्जुनानें मोठ्या क्रोधानें आपल्या बाणांनीं तिला पूर्णपणें प्रतीकार केला.

तेव्हां आपला यत्न निष्फल झाला आहे, असें पाहून इंद्रानें पुनः जिज्ञासेनें पाषाणवृष्टि अधिक वाढविली. पण त्या यशस्वी पांडुपुत्रानें अति वेगवान् बाणांनीं त्यांतील प्रत्येक पाषाणाचें चूर्ण करून सोडलें. तें पाहून इंद्रालाहि मोठा हर्ष झाला. नंतर त्या देवेंद्रानें पांडुनंदनाला मारण्याच्या इच्छेनें आपल्या दोन्ही हातांनीं वृक्षांसह मंदरपर्वताचें फार मोठें शिखर उपटून अर्जुनाच्या मस्तकावर फेकलें.

परंतु त्या बलाढ्य व अस्त्रकुशल अर्जुनानें ज्यांचीं अग्रें प्रदीप्त झालीं आहेत, अशा सरळ जाणाऱ्या वेगवान् बाणांनीं त्या पर्वतशिखराचेहि हजारों तुकडे केले. तेव्हां छिन्न-भिन्न होणाऱ्या त्या पर्वतशिखराचें स्वरूप सूर्य, चंद्र व ग्रह यांसह विशीर्ण होणाऱ्या आकाशासारखें भासलें. खांडववनावर छिन्न-भिन्न होऊन पडणाऱ्या त्या विशाल पर्वतशिखराखालीं तेथील अनेक प्राणी चेंगरून मरण पावले. १. १८. २२७.

येथें अठरावें खांडवदाहपर्व समाप्त झालें.

## मयदर्शनपर्व १९.



### अध्याय २२८ वा.

[ १ देवादिकांचा पराभव व खांडववनाचा पूर्णपणें दाह. ]

( १ ) **वैशंपायन**—हे कुरुनंदना, त्या पर्वताचें शिखर पडतांच खांडववनांत रहाणारे सर्व दानव, राक्षस, नाग, तरसें, आस्वलें, मत्त हत्ति, वाघ, सिंह हरिणें, रानरेडे, शरभ, पक्षी व इतर अनेक जातीचे प्राणी भीतीनें पळूं लागले. ते दीन मुखानें त्या वनाकडे व सशस्त्र कृष्णार्जुनांकडे पाहूं लागले. तें शिखर पडतांना जो प्रचंड शब्द झाला, त्यामुळें सर्व प्राणी घाबरून देहभान विसरले. तेव्हां त्यांना तें सर्व वन चोहोंकडून जळत असलेलें दिसलें व कृष्ण अस्त्र सज्ज

करून तेथें उभा असलेला त्यांच्या दृष्टीं पडला. तेव्हां ते त्रस्त झालेले जीव भयंकर आक्रोश करूं लागले. त्यांचें तें ओरडणें व भडकलेल्या अग्नीचा भयंकर शब्द आकाशांत प्रलयकालच्या मेघगर्जनेप्रमाणें पसरला.

इतक्यांत महाबाहु श्रीकृष्णानें स्वतःच्या तेजानें प्रकाशित झालेलें उग्र चक्र त्यांच्या नाशार्थ सोडिलें. त्यामुळें दानव, राक्षस व इतर सर्व क्षुद्र जंतू यांचा संहार होऊन ते सर्व अग्नींत जाऊन पडले. त्या वेळीं कृष्णाच्या चक्रानें विदीर्ण झालेलीं दैत्यांचीं शरीरें वसा व रक्त यांनीं माखल्यामुळें आकाशांतील सायं-कालाच्या मेघांप्रमाणें आरक्त दिसूं लागलीं.

हे भारता, त्या समयीं तो वार्ष्णेय केशव साक्षात् काळाप्रमाणें हजारों पिशाच, पक्षी, नाग व इतर पशु यांचा संहार करीत तेथें फिरत होता. त्या शत्रुनाशक वासुदेवानें पुनः पुनः फेकलेलें तें चक्र अनेक प्राण्यांना छिन्न-भिन्न करून पुन-रपि त्याच्या हातांत येत असे. पिशाच, राक्षस व नाग यांस मारणाऱ्या त्या सर्व भूतात्म्या कृष्णाचें स्वरूप अत्युग्र झालें.

तेथें एकत्र जमलेल्या सर्वदानवांमध्यें संग्रामांत कृष्ण व अर्जुन यांस जिंकील असा एकहि नव्हता. देवहि त्या दोघांपासून खांडववनाचें स्वबलानें रक्षण कर-ण्यास समर्थ झाले नाहींत. उलट या दोन वीरांपुढें आपलें कांहीं सामर्थ्य चालत नाहीं, असें पाहून ते सव युद्धापासून पराङ्मुख झाले. सर्व देवगण विमुख झाले आहेत, असें पाहून हे राजा, इंद्र अतिशय संतुष्ट झाला व तो केशवार्जुनांची प्रशंसा करूं लागला.

सर्व देव युद्ध सोडून निवृत्त झाले असतां आकाशवाणी इंद्राला संबोधून अति गंभीर ध्वनीनें म्हणाली—" हे देवेंद्रा, तुझा सखा नागोत्तम तक्षक या खांडववनांत नाहीं. या वनाच्या दाहसमयींच तो कुरुक्षेत्राला निघून गेला आहे. शिवाय हे वासवा, तुला कृष्ण व अर्जुन यांना युद्धांत जिंकतां येणार नाहीं. हे स्वर्गलोकांत प्रसिद्ध असलेले पूर्व देव नर-नारायण आहेत, हें तूं माझ्या वचनावरून निश्चित जाण. त्या नर-नारायणांचा पराक्रम व वीर्य किती आहे, हें तुलाहि माहित आहेच. हे पुराण ऋषिश्रेष्ठ युद्धामध्यें अजित असल्यामुळें त्रिभुवनांत कोठेंहि व कोणाच्याहि हातून पराभूत होणें शक्य नाहीं. देव, दानव, यक्ष, राक्षस, गंधर्व, किन्नर, नर, पन्नग या सर्वांना हे दोघेहि अतिशय पूज्य आहेत. यास्तव हे देवेंद्रा, खांडववनाचा दाह दैवप्राप्त आहे, असें समजून तूं देवांसह निघून जा."

अशा प्रकारची देववाणी ऐकून इंद्रानें क्रोध व मत्सर टाकून अमरावतीस प्रयाण केलें. अमरेश्वराला परत जात असलेलें पाहून इतर सर्व देवगण आपापल्या सैन्यासह त्यालाच अनुसरले. देवांसह इंद्र युद्धापासून निवृत्त झाला आहे असें पाहतांच कृष्णार्जुनांनीं सिंहनाद केला व इंद्र परत गेल्यामुळें संतुष्ट झालेल्या त्या दोघां वीरांनीं अग्नीला तें वन निःशंकपणें दग्ध करूं दिलें.

वायु जसा मेघांना दूर घालवितो, तसें अर्जुनानें त्या देवांना पळावयास लावल्यानंतर त्या वनांतील प्राण्यांनाहि त्यानें शरसंघातांनीं विद्ध केलें. तो सव्यसाची पार्थ बाणांचा वर्षाव करूं लागला असतां कोणताहि प्राणी तेथून पळून जाण्यास समर्थ झाला नाहीं. त्याचीं अमोघ अस्त्रें पाहून कोणीहि बलाढ्य प्राणी त्याच्याकडे नुस्तें पाहूं शकला नाहीं. मग रणांगणांत जाऊन त्याच्याशीं युद्ध कोठून करणार !

पार्थानें केव्हां एका बाणानें शेकडों पक्ष्यांना वेध केला, तर केव्हां एकाच पक्ष्यावर शंभर बाण सोडले. त्यावेळीं ते प्राणी साक्षात् कालानेंच मारल्याप्रमाणें गतप्राण होऊन अग्नींत पडले. कृष्णार्जुनांकडून असा प्रतिबंध झाल्यामुळें खांडववनांतील एकाहि प्राण्याला सुखानें बाहेर पडतां आलें नाहीं. पितर व देव यांच्या लोकींहि खांडववनांतील अग्नीचा ताप जाऊन पोंचला. त्यामुळें त्यांचीं अंगें भाजूं लागलीं. अशाप्रकारें प्राण्यांचा नाश होऊं लागल्यामुळें ते सर्व दीन होऊन आक्रोश करूं लागले. हत्ती, हरिणें व तरसें मोठ्यानें ओरडूं लागलीं. त्यांचा शब्द ऐकून दूर असलेल्या गंगेंतील व सागरांतील जलचर, विद्याधर व त्या वनांतील प्राणीहि भयभीत झाले. परंतु अर्जुनाकडे किंवा कृष्णाकडे पहाण्यास कोणी समर्थ झाला नाहीं. मग त्यांच्यांशीं युद्ध करणें तर दूरच राहिलें !

तेथें कांहीं राक्षस, दानव व नाग संघानें रहात होते. ते सर्व एका संघानें त्यांच्यावर धावून आले, पण त्यांसहि वासुदेवानें आपल्या चक्रानें गतप्राण केलें. ज्यांचीं मस्तकें व देह चक्राच्या वेगानें छिन्न-भिन्न झालीं आहेत असे ते सर्व धिप्पाड राक्षसादि भयंकर प्राणी प्रदीप्त अग्नीमध्यें पडले.

याप्रमाणें मांस, रक्त व वसा यांच्या प्रवाहांनीं तृप्त झालेला तो अग्नि प्रदीप्त होऊन त्याच्या ज्वाला आकाशाला स्पर्श करूं लागल्या. तो धूमरहित झाला. प्रदीप्त झालेले त्याचे नेत्र, जिह्वा व मुख आरक्त दिसूं लागलीं. श्रीकृष्णार्जुनांनीं दिलेल्या भोजनानें तो हुताशन हृष्ट, तृप्त व शांत झाला.

इतक्यांत तक्षकाच्या गृहांतून 'मय'-नामक एक असुर पळून जात असलेला मधुसूदनानें पाहिला. तेव्हां त्याला जाळण्याची इच्छा करणाऱ्या अग्नीनें प्रज्वलित होऊन मेघाप्रमाणें शब्द करीत श्रीकृष्णाची प्रार्थना केली. त्या वेळीं हा दानवांचा श्रेष्ठ शिल्पी पळून जात आहे, हें जाणून वासुदेवानें आपलें चक्र उचलिलें. पण तें पाजळलेलें चक्र व दग्ध करण्यासाठीं प्रज्वलित झालेला अग्नि यांस पाहून तो मय अर्जुनाकडे धांवत गेला आणि 'माझें रक्षण कर' असें म्हणाला. तेव्हां दयाळु अर्जुनानें भ्यालेल्या मयाचें तें दीन वचन ऐकून त्याला 'भीऊं नकोस' असें अभय दिलें. याप्रमाणें त्या नमुचीच्या भ्रात्याला धनंजयानें अभय दिलें असतां कृष्णानें त्याला मारण्याची इच्छा केली नाहीं आणि अग्नीनेंहि त्याला जाळिलें नाहीं.

हे राजन्, अशाप्रकारें कृष्णार्जुनांनीं इंद्रापासून अग्नीचें रक्षण केलें असतां तो पंधरा दिवस तें वन दग्ध करीत होता. त्यामुळें त्या महा खांडववनांतील सर्व प्राण्यांचा संहार जरी झाला, तरी अश्वसेन, मयासुर व चार शार्ङ्गक पक्षी यांना मात्र अग्नीनें जाळलें नाहीं. १. १९. २२८.

---

## अध्याय २२९ वा.

[ १ शार्ङ्गकांचा वृत्तान्त. ]

( १ ) जनमेजय—हे विप्रश्रेष्ठा, अग्नीनें तें वन जाळलें असतां शार्ङ्गकांस कां दग्ध केलें नाहीं, हें मला सांग. अश्वसेन व मयासुर यांना न जाळण्याचें कारण तूं सांगितलेंस; पण हे ब्रह्मन्, शार्ङ्गकांस कां सोडिलें तें सांगितलें नाहींस. अग्नीच्या मुखांतून ते जिवंत सुटणें हें मोठें आश्चर्यच आहे. यास्तव अग्नीनें त्यांचा नाश कां केला नाहीं, तें मला यथार्थ सांग.

वैशंपायन—हे भारता, अग्नीनें शार्ङ्गकांस कां जाळलें नाहीं, त्याचा सर्व वृत्तान्त मी तुला सविस्तर सांगतों, ऐक. पूर्वीं 'मंदपाल'-नामक एक प्रख्यात महर्षि होता. तो धर्मज्ञांमध्यें श्रेष्ठ व तपस्वी असून तीव्र व्रतें आचरीत असे. ऊर्ध्वरेत्या ब्रह्मचारी ऋषींच्या मार्गाचा आश्रय करून तो स्वाध्याय, धर्माचरण, तप व ब्रह्मचर्य यांत तत्पर असे. त्यामुळें देहत्याग करून तो पितृलोकीं गेला. पण हे राजा, त्याला तेथें त्याच्या तपाचें फल मिळालें नाहीं.

तेव्हां आपण तपश्चर्येनें मिळविलेल्या लोकांचें फलहि आपणांस प्राप्त झालें नाहीं, हें पाहून त्यानें यमधर्मासमीप बसलेल्या देवतांना असा प्रश्न केला— "हे देवांनों, मी माझ्या तपानें संपादन केलेल्या लोकांतील दिव्य भोग मला कां मिळूं नयेत ? भूलोकांत मी असें कोणतें कर्म केलें नाहीं कीं, ज्यामुळें मला येथील भोग प्राप्त होऊं नयेत, तें मला सांगा. म्हणजे मी पुनः भूलोकीं जाऊन तें कर्म आचरीन. मीं केलेल्या तपाचें कोणतें फल आहे, तेंहि मला सांगा."

देव—हे मुनिश्रेष्ठा, मानव कोणत्या ऋणांनीं बद्ध होतात, तें ऐक. मनुष्य-प्राणी क्रिया, ब्रह्मचर्य व प्रजा या तीन ऋणांनीं युक्त असतो. तो यज्ञ, तप व पुत्र यांच्या योगें त्या तीन ऋणांतून मुक्त होतो. तूं यांतील तीव्र तपश्चर्या व यज्ञ केले आहेस; परंतु तुला संतति नसल्यामुळें पुण्यलोकींचे भोग प्राप्त झाले नाहींत. यास्तव तूं अपत्य उत्पन्न कर, म्हणजे तुला श्रेष्ठ लोकांची प्राप्ति होईल. 'पुत्र आपल्या पितरांना 'पुन्नामक'-नरकापासून मुक्त करितो' अशी श्रुति आहे. यास्तव तूं संतानवृद्धीसाठीं यत्न कर.

हे पारिक्षिता, देवांचें हें वचन ऐकून तो मंदपाल ऋषि 'कोणत्या योनींत अल्पावधींत पुष्कळ संतति उत्पन्न होईल बरें !' याचा विचार करूं लागला. तेव्हां पक्ष्यांना विपुल संतति असते, हें त्याच्या लक्षांत आलें. म्हणून तो शार्ङ्गक पक्षी झाला व त्यानें 'जरिता'-शार्ङ्गिकेच्या समागमानें चार पुत्र उत्पन्न केले. ते चौघेहि पुत्र ब्रह्मवेत्ते होते. ते चारहि बालक अंडावस्थेंत असतांनाच त्यांना त्यांच्या मातेसह त्या वनांत सोडून तो मुनि 'लपिता'-नामक दुसऱ्या भार्येकडे निघून गेला.

हे भारता, ऋषि आपणास सोडून गेला, हें पहातांच त्या साध्वी जरितेला अतिशय खेद झाला. अंडावस्थेंत असलेल्या बालकांना वनांत एकटें टाकून जाणें मुनीला अयोग्य होतें, तरी तो निघून गेला; परंतु शोकार्त झालेली जरिता अपत्यस्नेहामुळें त्याच्या मागोमाग गेली नाहीं. त्या अंड्यांतून पिलें बाहेर पडतांच तिनें चारा आणून मोठ्या वात्सल्यानें त्यांचें रक्षण केलें.

त्यानंतर कांहीं कालानें तो ऋषि मंदपाल लपितेसह त्या वनांत संचार करीत असतां, खांडववन जाळण्यासाठीं येत असलेल्या अग्नीला त्यानें पाहिलें. अग्नीचा संकल्प कळतांच त्याला आपल्या बालकांचें स्मरण झालें व त्यांचा नाश होऊं

नये म्हणून त्या अतिशय सामर्थ्यवान् लोकपाल अग्नीला त्या ब्राह्मणश्रेष्ठानें स्तुतीनें संतुष्ट केलें.

तो म्हणाला—हे पावका, तूं सर्व लोकांचें मुख आहेस. जीवरूपानें तूं भोक्ता आहेस. तूं यज्ञांतील हव्याला देवांकडे पोंचविणारा हव्यवाट् आहेस. तूं सर्व भूतांच्या अंतःकरणांत ब्रह्मरूपानें गूढ रहातोस. म्हणजे तूं इंद्रियादिकांचा विषय होत नाहींस. विद्वान् लोक तुला एक म्हणतात व कोणी 'दिव्य, भौम व औदर्य असा तूं त्रिविध आहेस,' असें सांगतात. यज्ञामध्यें तूं पंचभूतें, चंद्र, सूर्य व यजमान असा आठ प्रकारचा होऊन यज्ञाचें संपादन करितोस, असेंहि कित्येक म्हणतात. तूंच या विश्वाला उत्पन्न केलेंस, असें श्रेष्ठ ऋषि सांगतात.

हे अग्ने, सद्रूप असलेल्या तुझ्यावांचून हें सर्व जगत् तत्काल नाश पावेल. ब्राह्मण तुला वदंन करूनच पत्नी व पुत्र यांसह स्वकर्मानें संपादन केलेल्या शाश्वत गतीला प्राप्त होतात. आकाशामध्यें संचार करणारे विद्युद्युक्त मेघहि तूंच आहेस. तुझ्यापासून निघालेल्या ज्वाला सर्व भूतांना जाळतात.

हे तेजस्विन्, तूंच हें सर्व विश्व उत्पन्न केलें आहेस. कर्मांचें विधान करणारा वेद हें तुझेंच वाक्य आहे. सर्व चराचर भूतें तूंच आहेस. तूंच सद्रूप ईश्वरानें आकाशादि पंचमहाभूतें उत्पन्न केलींस व हें सर्व जगत् तुझ्याच आधारानें स्थित आहे. हव्य-कव्यादि सर्व देव-पितृकार्यें तुझ्या ठिकाणींच प्रतिष्ठित आहेत. त्यांचा भोक्ता व फलदाताहि तूंच आहेस. हे देवा, तूंच अग्नि, धाता, बृहस्पति, अश्विनिकुमार, यम, मित्र, सोम व वायु आहेस.

राजा, त्या मंदपाल मुनीनें अशी स्तुति केली असतां अग्नि त्या अति तेजस्वी मुनीवर प्रसन्न झाला व 'हे मुने, मी तुझें कोणतें इष्ट करूं तें सांग' असें बोलला. तेव्हां मंदपाल मुनि हात जोडून—'भगवन्, खांडववनाला जाळीत असतांना तूं माझ्या पुत्रांचे प्राण वांचीव' असें त्यास म्हणाला. तें ऐकून 'ठीक आहे' असें बोलून अग्नीनें खांडववनाला जाळते वेळीं या शार्ङ्गकांना दग्ध केलें नाहीं. १. १९. २२९.

---

## अध्याय २३० वा.

[ १ जरिता व शार्ङ्क यांचा प्राणरक्षणोपायाविषयीं संवाद. ]

(१) **वैशंपायन**—राजा परिक्षित्पुत्रा, त्यानंतर खांडववन दग्ध करण्यासाठीं अग्नि जेव्हां तेथें प्रज्वलित झाला, तेव्हां त्या वनांत रहाणारे ते चौघे शार्ङ्क अतिशय दुःखित झाले. त्यांना कोणीच त्राता दिसेना. त्यांची तपस्विनी जरिता-माता शोकविह्वल होऊन विलाप करूं लागली.

ती म्हणाली—हा प्रज्वलित झालेला भीषण अग्नि या वनाला जाळीत इकडेच येत आहे. सर्व जगाला दीप्त करणारा हा देव माझें दुःख वाढवीत आहे. कारण माझीं हीं अर्भकें अद्यापि मूढ आहेत. त्यांना अजून पंख व पाय फुटले नाहींत. हीं अपत्यें आमच्या पूर्वजांचा आधार आहेत. हे माझे पुत्र आमच्या पितरांचें नरकापासून रक्षण करणारे आहेत. पण हा भगवान् अग्नि मोठमोठ्या वृक्षांना दग्ध करीत इकडेच येत आहे. आतां या माझ्या पुत्रांची काय गति होईल! खरोखर पुत्रस्नेह मला व्याकुळ करीत आहे व हा अग्नि तर समर्थ जीवांच्याहि मनास उद्विग्न करीत आहे. माझ्या पुत्रांना पंख आले नसल्यामुळें ते माझ्या मागून येण्यास समर्थ नाहींत. यांना उचलून न्यावें तर माझ्यामध्यें तेवढें सामर्थ्य नाहीं व या माझ्या प्रिय बालकांना येथें सोडून जाण्याचेंहि धैर्य होत नाहीं. खरोखर माझ्या मनाला अतिशय क्लेश होत आहेत. मला प्रिय असलेल्या या चार पुत्रांतील मी कोणाला टाकूं व कोणाला घेऊन जाऊं!

बाळांनो, तुम्ही तरी मला कांहीं उपाय सुचवा. मीं काय केलें असतां तुमचें रक्षण व माझें समाधान होईल! या अग्नीच्या मुखांतून तुम्हांला सोडविण्याचा मीं पुष्कळ विचार केला, पण मला कांहीं उपाय सुचत नाहीं. आतां तुम्हांला आपल्या पंखाखालीं झांकून घेऊन मी तुमच्या बरोबरच मरून जाईन.

वत्सांनो, तुम्ही अंड्यांतून बाहेर येण्यापूर्वींच 'तुमच्यांतील ज्येष्ठ भ्राता जो जरितारि त्याच्यावर हें कुल अवलंबून राहील. दुसरा सारिसृक्क संतति उत्पन्न करून पितृकुलाची वृद्धि करील. तिसरा स्तंबमित्र तपाचरण करील व चौथा द्रोण श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता होईल' असें सांगून तुमचा निष्ठुर पिता निघून गेला. आतां या संकटांतून कसें बरें पार पडावें! काय केलें असतां मी कृतकार्य होईन!

हे राजा, असें म्हणून ती जरिता अतिशय विह्वल झाली. तिला आपल्या पुत्रांना अग्नीपासून मुक्त करण्याचा कांहीं उपाय सूचेना. तेव्हां असें बोलून व्याकुल झालेल्या आपल्या मातेला शार्ङ्गक म्हणाले—"हे माते, तूं आतां आमच्यावरील स्नेह सोडून दे व जेथें अग्नि नसेल तेथें जा. कारण आमचा जरी नाश झाला तरी तुला दुसरे पुत्र होतील. परंतु तूं नष्ट झालीस तर आमच्या कुलाचाच विच्छेद होईल. यास्तव या दोन्ही गोष्टींचा विचार करून ज्यायोगें आपल्या कुलाचा क्षय होणार नाहीं असें कर. सर्व कुलाचा विनाश होण्याचा प्रसंग आला असतां पुत्रस्नेह धरूं नकोस. आमच्या पित्यानें संततीसाठीं केलेला स्त्रीपरिग्रह व्यर्थ न होवो."

पुत्रांचें हें भाषण ऐकून जरिता म्हणाली—बाळांनों, या वृक्षाच्या समीप भूमीमध्यें उंदराचें एक बिळ आहे. त्यांत तुम्हीं सत्वर प्रवेश करा. तेथें तुम्हांला वह्नीचें भय नाहीं. तुम्हीं आंत गेलांत म्हणजे मी तें बिळ धुळीनें झांकून टाकीन व अग्नीपासून तुमचें रक्षण होईल आणि अग्नि निवृत्त झाल्यावर मी त्या बिळा-वरील मातीची रास दूर करून तुम्हाला बाहेर काढीन. वत्सांनो, अग्नीपासून मुक्त होण्याचा हा उपाय तुम्हांला रुचतो का ?

यावर शार्ङ्गक म्हणाले—हे जननि, आम्हांला अद्यापि पंख फुटले नाहींत. आम्ही केवळ मांसाचे गोळे आहोंत. तेव्हां कच्चें मांस खाणारे उंदिर आम्हांला भक्षण करतील, यांत संशयच नाहीं. हें भय प्रत्यक्ष पहात असतां त्या बिळांत प्रवेश करण्यास आमचें मन धजत नाहीं.

हे माते, अग्नीनें आम्हांला जाळूं नये म्हणून काय करावें ? उंदीर आमचा नाश करणार नाहींत, असा कोणता उपाय योजावा ? आमच्या पित्याचा हेतु निष्फल न होण्यास काय युक्ति करावी ? कोणत्या मार्गानें आमच्या मातेचें जीवित वांचवितां येईल, हा मोठा विचार पडला आहे. बिळांत प्रवेश केला तर उंदीर आमचा नाश करतील व बाहेर राहिलों तर अग्नि दग्ध करील. या दोन संकटांचा विचार केला असतां दग्ध होऊन मरणेंच अधिक बरें. दुसऱ्याचें भक्ष्य होणें योग्य नव्हे. उंदराच्या बिळांत शिरल्यास त्याच्या भक्ष्यस्थानीं पडून निंद्य मरण येईल. त्यापेक्षां अग्नीमध्यें देहत्याग करणें अधिक श्रेयस्कर आहे. १. १९. २३०.

## अध्याय २३१ वा.

[ १ पुत्रांच्या आग्रहानें जरितेचें खांडववनांतून गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, याप्रमाणें त्या शार्ङ्गकांचें भाषण ऐकून जरिता म्हणाली—" बाळांनों, या बिळांत रहाणारा उंदीर बाहेर आला असतां, त्यावर श्येनपक्ष्यानें झडप घातली व त्या क्षुद्र प्राण्याला आपल्या पायांत धरून तो उडून गेला. तेव्हां तुम्हांला आतां त्या बिळांत उंदराचें भय बाळगण्याचें कारण नाहीं. "

**शार्ङ्गक म्हणाले**—हे माते, श्येनानें उंदीर नेल्याचें आम्हांला माहीत नाहीं आणि जरी त्यानें एक उंदीर नेला असला, तरी त्या बिळांत दुसरे उंदीर असतील. त्यांच्यापासून आम्हांला भय आहेच. शिवाय अग्नि येथपर्यंत वनाला जाळीत येईल किंवा नाहीं, याचा संशयच आहे; कारण वायूमुळें अग्नि निवृत्त होत असतो, हें प्रसिद्धच आहे. पण आम्ही बिळांत शिरलों तर मात्र तेथील प्राण्यांकडून आम्हांला निःसंशय मृत्यु येईल. यास्तव हे माते, निश्चित मृत्यु येण्याच्या स्थानापेक्षां मृत्यूविषयीं संशयित असलेलें स्थान अधिक श्रेष्ठ असल्यामुळें आम्हीं येथेंच रहातों व तूं आकाशांत उडून जा. तुला आमच्याहूनहि उत्तम पुत्र होतील.

**जरिता**—हे वत्सांनो, तो बलाढ्य श्येनपक्षी त्या बिळांतील उंदराला वेगानें घेऊन जात असतांना मीं प्रत्यक्ष पाहिलें आणि तो मोठ्या वेगानें उडत असतां मी त्याच्या मागोमाग गेलें व बिळांतून उंदीराला उचलून नेणाऱ्या त्याला असा आशीर्वाद दिला—" हे श्येनराज, तूं आमच्या शत्रूला उचलून नेत आहेस, यास्तव तूं देवलोकीं स्थिर होऊन शत्रुरहित व दिव्य देह धारण करणारा हो. "

त्यानंतर श्येनपक्ष्यानें जेव्हां त्या उंदराला पूर्णपणें भक्षण केलें तेव्हांच मी त्याची आज्ञा घेऊन पुनः स्वगृहीं परत आलें. यास्तव, हे पुत्रांनो, तुम्ही निःशंकपणें या बिळांत शिरा. तुम्हांला येथें कोणाचेंहि भय नाहीं. महात्म्या श्येनानें माझ्या डोळ्यांदेखत यांतील उंदराला आकाशांत नेऊन भक्षण केलें आहे.

**शार्ङ्गक म्हणाले**—हे जननि, श्येनानें यांतील उंदराला येथून नेल्याचें आम्हांला विदित नाहीं व त्याविषयीं मनांत संशय असतांना आम्ही या भूछिद्रांत प्रवेश करण्यास समर्थ नाहीं.

जरिता—पुत्रांनो, श्येनानें यांतील मूषिकाला भक्षण केलेलें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. त्यामुळें तुम्हांला येथें मुळींच भय नाहीं. बाळांनों, माझें हें वचन तुम्ही मान्य करा.

शार्ङ्गक—माते, आम्हांला सोडून जाण्याची तुझी इच्छा आहे; पण अशा मिथ्या उपचारानें आम्हांला भयापासून सोडविण्याची युक्ति तूं योजूं नकोस. बिळामध्यें प्रवेश करणें हा संदिग्ध उपाय आहे. तो केल्यास आम्हीं बुद्धिमानांसारखें आचरण केलें, असें कधींहि होणार नाहीं. कारण या बिळामध्यें आमचा शत्रु असण्याचा संभव आहे, अशी शंका असतांना त्यांत प्रवेश करणें सर्वथा अयुक्त आहे. असलें साहस आम्ही कधींहि करणार नाहीं. आम्ही तुझ्यावर यापूर्वीं कांहीं उपकार केलेले नाहींत व पुढेंहि ते करूंच असाहि निश्चय नाहीं. असें असतांना आम्हांकडून पीडिली जाणारी तूं आमचें रक्षण कशाला करतेस! आम्ही तुझे कोण व तूं तरी आमची कोण! हा आपला संबंध भ्रांतिमूलक आहे.

हे जननि, तूं तरुण, सुंदर व पतीचा मनोरथ पूर्ण करण्यास समर्थ आहेस. यास्तव तूं आपल्या पतीकडे जा. तुला आणखीहि सुंदर पुत्र होतील. आम्ही अग्नीमध्यें प्रवेश करून उत्तम लोकास प्राप्त होऊं. कदाचित् अग्नीनें आम्हांला नच जाळल्यास तूं पुनरपि आम्हांकडे ये.

वैशंपायन—राजा, पुत्रांनीं असा उपदेश केला असतां जरिता आपल्या चारी पुत्रांना खांडववनांत सोडून जेथें अग्नीची पीडा होणार नाहीं अशा निर्भय स्थानीं त्वरेनें गेली. त्यानंतर ज्याच्या ज्वाला अतिशय तीक्ष्ण आहेत, असा अग्नि मंदपाल-ऋषीचे शार्ङ्गपुत्र जेथें होते, तेथें सत्वर आला. तो भगवान् हव्यवाहन प्रज्वलित झाला आहे, असें पाहून ते चारी पक्षी भयभीत झाले. पण त्यांतील ज्येष्ठ भ्राता जरितारी अग्नीची स्तुति करूं लागला. १. १९. २३१.

---

## अध्याय २३२ वा.

[ १ जरितारिप्रभृति शार्ङ्गकांनीं केलेली अग्नीची स्तुति. २ प्रसन्न झालेल्या अग्नीनें केलेलें त्यांचें रक्षण. ]

( १ ) जरितारि—बुद्धिमान् पुरुष संकटकाल प्राप्त होणाच्या पूर्वींच दक्ष असतो. तो मरणकालापूर्वींच ज्ञानासाठीं यत्न करितो, त्यामुळें मरणकाल प्राप्त

---

१ महामोहरूपी अग्नीनें व्यापिलेल्या या संसारमहारण्यांत माता, पिता इत्यादि

झाला असतां तो व्यथा पावत नाहीं. ज्ञानी पुरुषाला मरणाची व्यथा कधींच होत नाहीं. पण याच्या उलट जो पुरुष आपल्या चित्ताला स्वाधीन ठेवीत नाहीं त्याला मरणकाल आपल्या पाठीमागें लागला आहे, हें कळत नाहीं. त्यामुळें तो मरणप्रसंग ओढवला असतां दुःखानें व्याकुळ होतो व कर्माधीन झालेल्या त्याला मोक्षाख्य परम श्रेय कधींच प्राप्त होत नाहीं.

**सारिसृक्क** म्हणाला—हे भ्रात्या, सत्संगामुळेंच मरणव्यथा निवृत्त होते. तूं योगी व ज्ञानी आहेस. तूं ध्यान करितोस व ऊहापोह करण्यांतहि कुशल आहेस. आम्हांवर हें प्राणसंकट ओढवलें आहे. तूं आम्हां सर्वांपेक्षां प्राज्ञ व शूरहि आहेस. यास्तव तूंच आमचें रक्षण कर.

**स्तंबमित्र** म्हणाला—हे जरितारे, तुझ्या अनुग्रहावांचून आम्हांला तरणोपाय नाहीं. कारण ज्येष्ठ भ्राता हा पिताच आहे. जो ज्येष्ठ असतो, तो संकटापासून स्वतः मुक्त होतो. पण ज्येष्ठच जर संकटांतून कसें मुक्त व्हावें हें जाणत नसेल तर कनिष्ठभ्राता काय करील !

**द्रोण** म्हणाला—हा अग्नि प्रदीप्त होऊन मोठ्या त्वरेनें आमच्या घरट्याकडे येत आहे. कालि, करालि, मनोजवा इत्यादि त्याच्या सात जिह्वा असून त्यांच्या योगानें तो सर्व पदार्थांना दग्ध करीत इकडेच येत आहे. तो कदाचित् आम्हांलाहि ग्राशील. यास्तव स्वतःच्या रक्षणासाठीं स्वतःच यत्न केला पाहिजे.

हे राजा, मंदपालाचे ते चौघे पुत्र परस्परांशीं असें भाषण करून शुद्धचित्तानें अग्नीची स्तुति करूं लागले. त्यांतील ज्येष्ठभ्राता जरितारि म्हणाला—हे अग्ने, तूं सूत्रात्म्या वायूचेंहि स्वरूप आहेस. तूं ओषधि-वनस्पतींचें शरीर आहेस.

---

कोणीहि आप्त रक्षण करण्यास समर्थ नाहींत. ते सर्व स्वार्थी असतात. केवल एक ब्रह्मिष्ठच सर्वांचें रक्षण करण्यास समर्थ आहे. हाच या सर्व अध्यायाचा सारभूत अर्थ आहे. ‘ ज्यानें आपल्या कामादि सर्व शत्रुगणांचा नाश केला आहे तोच जरितारि ’ असा या नांवाचा अक्षरार्थ आहे.

१ या श्लोकाचा अध्यात्मपर अर्थ—‘हिरण्यरेताः’–हरण करणारें हिरण्य म्हणजे विषयवासना, तेंच ज्याचें बीज आहे, तो ‘ हिरण्यरेताः ’ म्ह० मरणकालीन मोह आमच्या शरीररूपी गृहाकडे नेत आहे. त्याचें मुख म्ह० भोगसाधन पंच ज्ञानेंद्रियें, बुद्धि व मन या सात जिह्वांनीं युक्त असून त्यांच्या योगानें त्यानें आम्हांला ग्रासून टाकिलें आहे. यास्तव आम्हांलाच आमच्या मोक्षासाठीं यत्न केला पाहिजे.

म्हणजे तूं विराडात्मा आहेस. ओषधि-वनस्पतींची योनि जी पृथ्वी व जल तें तुझें शुक्र म्ह० बीज आहे व तें तुजपासून झालें आहे. जलाचेंहि तूं कारण आहेस. हे महावीर्यवाना, तुझ्या ज्वाला सूर्याच्या किरणांप्रमाणें तुझ्या सभोंवार चार दिशांमध्यें पसरतात.

राजा, जरितारीनें याप्रमाणें मुख्य ब्रह्मविद्येच्या अधिकारासाठीं समष्टि-उपासना सांगितली असतां त्या उपासनेचा अनधिकारी व बाह्यभोगासक्त असलेला सारिसृक्क म्हणाला—"हे अग्ने, आमची माता कोठें निघून गेली. आमचा पिता कोण हें आम्हांला ठाऊक नाहीं व आम्हांला अद्यापि पंखहि फुटले नाहींत. तुजवांचून आमचा त्राता कोणी नाहीं. यास्तव हे वह्ने, तूं आम्हां बालकांचें रक्षण कर. तुझें जें शांत व लोकहितावह रूप आहे व तुझ्या ज्या सात जिह्वा आहेत त्यांच्या योगानें तूं आर्त व शरणार्थी असलेल्या आम्हां बालकांचें रक्षण कर. हे जातवेदा, तूंच एक सर्वांना ताप देतोस. हे देवा, सूर्यकिरणांमध्येंहि तुजवांचून दुसरा कोणी ताप देणारा नाहीं. म्हणजे सूर्यहि तूंच आहेस. आम्हां ऋषिबालकांचें तूं रक्षण कर व हे अग्ने आम्हांपासून तूं दूर जा."

राजा त्यानंतर व्यष्टि-उपासनेनें शुद्ध झालेल्या अधिकाऱ्याला छांदोग्योपनिषदांत प्रसिद्ध असलेली शांडिल्यविद्यादिरूप सार्वात्म्योपासना स्तंबमित्र म्ह० सर्व प्राणिसमूहाचा मित्र सांगूं लागला. तो म्हणाला—"हे अग्ने, तूंच एक हें सर्व आहेस. हें जगत् तुझ्यामध्येंच स्थित आहे. तूं सर्व भूतांना व भुवनांना धारण करितोस. सुवर्णामध्यें सर्व अलंकार जसे त्रिकालीं स्थित असतात, त्याप्रमाणें तुझ्यामध्यें हें सर्व जगत् उत्पत्ति, स्थिति व नाश या त्रिकालीं स्थित आहे. तूंच अग्नि, तूंच देवांकडे हव्य वाहून नेणारा व परम हवि आहेस. विद्वान् लोक तुला कार्यरूपानें बहुविध व कारणरूपानें एकरूप जाणतात. हे वह्ने, तूं या ब्रह्मांडाला उत्पन्न करून, प्रलयकाल प्राप्त झाला असतां तमोगुणानें अतिशय वृद्धि पावून त्याचा नाश करितोस. तूंच या भुवनांचें उत्पत्तिस्थान आहेस व हे अग्ने, तूंच त्याचें लयस्थानहि आहेस.

---

१ छान्दोग्योपनिषद् अ० ३. खं० १४ यांत 'सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शांत उपासीत' अशी शांडिल्यविद्या पठित आहे. २ हें वर्णन मांडूक्योपनिषदांतील 'एष योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् ।' ६. या श्रुतीच्या आधारानें केलें आहे.

राजा जनमेजया, त्यानंतर द्रोण ('नान्तःप्रज्ञं०'-इत्यादि मांडूक्य श्रुति मंत्र ४ यांत वर्णिलेल्या ) निर्विशेष तुरीयब्रह्मरूपानें अग्नीची स्तुति करूं लागला— "हे अग्ने, तूं प्राणोपासकांनीं भक्षण केलेलें अन्न आहेस. म्हणजे ते स्थूल जगाचा सूक्ष्मभूतांमध्यें लय करितात. तूं भूतांमध्यें राहतोस, म्ह० सूत्रात्म्याच्या शरीराचा आरंभ करणारीं अपंचीकृत पंचभूतें तुझ्यामध्यें अंतर्भूत झालीं आहेत. नित्य प्रवृद्ध झालेला तूं सर्वांना आपल्यामध्यें लीन करितोस. त्यामुळें तूं भूतांचें लयस्थानहि आहेस. म्ह० ब्रह्मोपासक सूक्ष्म सृष्टीचा कारणामध्यें लय करितात. त्यामुळेंच तूं सर्व स्थूल-सूक्ष्म कार्यांचा पति आहेस. तूं सृष्टि व संहार करण्यास स्वतंत्र आहेस. अति शुद्ध असलेल्या तुझ्या ठिकाणीं हें सर्व कार्य-कारणात्मक जगत् रज्जूंतील सर्पादिकांप्रमाणें स्थित आहे.

हे निरुपाधिक ईश्वरा, तूं सूर्य होऊन आपल्या किरणांनीं पृथ्वीवरील सर्व रसांचें ग्रहण करितोस व पुनरपि योग्य कालीं वृष्टिरूपानें तें पृथ्वीवर पाडतोस. भूमि, जल, इत्यादिकांतील सर्व सत्त्वांचा संहार करून कारणरूप होतोस. प्रलयकालीं बीजरूपानें स्थित होऊन पुनः सृष्टिकालीं सर्व ब्रह्मांडाला आपली चित्सत्ता देऊन उत्पन्न करितोस. तुझ्यापासूनच ज्यांवर हिरवीं पानें आहेत, अशा या सर्व वेली उत्पन्न होतात. या सर्व पुष्करिणी व महासागर तुझ्यापासूनच होतात. हे दिसणारे सर्व जड पदार्थ तुझ्याच सत्तेनें सत्तायुक्त झाले आहेत. प्रखर तेज धारण करणाऱ्या अग्ने, रसनेंद्रियाचा अधिपति जो वरुण, त्याचें हें शरीर परम आलंबन आहे. कारण पक्षिदेहानें सर्व रसांचा आस्वाद घेतां येतो. यास्तव, तूं अंतरात्माच आमचा रक्षक हो व आज आमचा नाश करूं नकोस. हे पिंगाक्षा, हे लोहितग्रीव, हे कृष्णवर्त्मन्, हे हुताशन, नद्यांप्रमाणें आम्हांला सोडून तूं दूर जा."

राजा जनमेजया, ब्रह्मवादी द्रोणानें अशी स्तुति केली असतां अग्नि प्रसन्नचित्त झाला व मंदपाल ऋषीला दिलेलें वचन आठवून आणि त्याच्या पुत्रांची ही स्तुति ऐकून तो द्रोणास म्हणाला—

"हे मंदपालपुत्रा, तूं द्रोणऋषि आहेस. तूं माझ्या स्तुतीच्या मिषानें हें ब्रह्मच सांगितलें आहेस. मी तुझा इष्ट मनोरथ पूर्ण करीन. तुला मजपासून मुळींच भय नाहीं. तुम्ही येथें अहांत, हें मंदपालानें मला पूर्वींच सांगून ठेविलें आहे. 'खांडववन दग्ध करीत असतांना तूं माझ्या पुत्रांचें रक्षण कर' असें

त्यानें मला सांगितलें आहे. हे द्रोणा, त्याचें तें वचन व तुझें हें भाषण हीं दोन्ही मला मान्य आहेत. यास्तव हे ब्राह्मणा, मी तुझें कोणतें प्रिय करूं, तें सांग. हे श्रेष्ठा, मी तुझ्या स्तोत्रानें अतिशय प्रसन्न झालों आहें."

त्यावर द्रोण म्हणाला—हे अग्ने, हीं रानमांजरें आम्हांला नित्य भिववीत असतात. यास्तव तूं सर्व परिवारासह त्यांना दग्ध कर. राजा जनमेजया, त्या अग्नीनें द्रोणाच्या इच्छेप्रमाणें सर्व मांजरांना जाळून टाकिलें व त्या शार्ङ्गकांची अनुज्ञा घेऊन त्यानें बाकीचें खांडववनहि दग्ध केलें. १. १९. २३२.

## अध्याय २३३ वा.

[ १ मंदपालाची पुत्रांविषयीं चिंता. २ लपितेनें केलेली त्याची निंदा. ३ जरिता व पुत्र यांचें त्यानें केलेलें समाधान. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, खांडववनांत असा प्रकार घडत असतां इकडे मंदपाल ऋषि आपल्या पुत्रांविषयीं चिंता करूं लागला. त्यानें जरी 'माझ्या पुत्रांना दग्ध करूं नकोस' अशी अग्नीची प्रार्थना केली होती, तरी त्याच्या मनाला स्वस्थता वाटेना.

पुत्रांसाठीं चिंतेनें व्याकुल झालेला तो मुनि लपितेला म्हणाला—हे लपिते, घरट्यांत असलेले माझे पुत्र अग्नि प्रदीप्त झाला असतां व वायु वेगानें वहात असतां त्यांतून सुटण्यास कसे समर्थ होतील ! त्यांची तपस्विनी माता त्यांचें रक्षण करण्यास असमर्थ असल्यामुळें ती काय बरें करील ! पुत्रांचें रक्षण आपल्या हातून होणें शक्य नाहीं, असें पाहून ती बिचारी शोकार्त होऊन बसेल. ते माझे बालक आकाशांत उंच उड्डाण करण्यास समर्थ नसल्यामुळें त्यांची माता रडत व विलाप करीत इकडे तिकडे धांवत असेल. अरेरे, तो माझा पुत्र जरितारि, सारिसृक्क, स्तंबमित्र व द्रोण यांची काय अवस्था होईल ! आतां जरिता काय करील !

(२) भारता, याप्रमाणें तो मंदपाल ऋषि विलाप करीत असतां लपिता त्यास जणुकाय असूयेनेंच म्हणाली—"भगवन्, तुला आपल्या पुत्रांविषयीं चिंता करावयास नको; कारण 'माझे पुत्र तेजस्वी व वीर्यवान् ऋषि आहेत' असें तूं नेहमीं म्हणत असतोस. तेव्हां त्यांना अग्नीपासून कांहीं भय नाहीं. शिवाय

तूं माझ्यासमक्षच अग्नीची प्रार्थना करून त्यांस त्यांचें रक्षण करण्याविषयीं सांगितलें आहेस व महात्म्या अग्नीनें ती विनंति मान्य केली आहे. तेव्हां तो लोकपाल आपला शब्द मिथ्या करील असें मुळींच संभवत नाहीं.

यास्तव हे वंचका, तुझें मन पुत्रांचें रक्षण करण्यामध्यें आसक्त झालें नसून माझी सवत जी जरिता तिच्या चिंतेनें तूं इतका व्याकुल होत आहेस, खरोखर तुझें तिच्यावर जसें प्रेम होतें, तसें कांहीं मजवर नाहीं. सहायसंपन्न असलेल्या अति प्रेमळ व समर्थ सुहृदानें आपल्या पुत्र-स्त्रीरूप आत्म्याला पीडा होत असतांना निर्दयपणें त्यांची उपेक्षा करणें सर्वथा युक्त नाहीं. यास्तव जिच्यासाठीं तूं इतका शोकसंतप्त होत आहेस, त्या जरितेकडेच जा. एखाद्या हीन पुरुषाच्या स्त्रीप्रमाणें मी एकटीच काल कंठीन.

( ३ ) लपितेचें हें मत्सरयुक्त भाषण ऐकून मंदपाल म्हणाला—हे लपिते, तूं समजतेस तसा मी कामासक्त होऊन वागत नाहीं. मी जगामध्यें केवल संततीसाठींच संचार करीत आहें. सांप्रत जरितेच्या अपत्यांवरच संकट ओढवलें आहे. असलेल्या अपत्यांची उपेक्षा करून पुढें तुला संतति होईल ही आशा करणें खरोखर मूर्खपणाचें आहे. अशा मूढाचा लोक अवमान करितात. या उप्पर तुला जसें योग्य वाटेल तसें कर. मोठाल्या वृक्षांनाहि जाळून भस्म करणारा हा प्रज्वलित अग्नि माझ्या अंतःकरणांत अनेक अशुभ विचार उत्पन्न करीत आहे.

राजा, त्या दोघांचा असा संवाद चालला आहे, तोंच त्या चार शार्ङ्गकांच्या प्रार्थनेनें प्रसन्न झालेला अग्नि त्या प्रदेशांतून दूर गेला. तेव्हां पुत्रस्नेहानें व्याकुल झालेली जरिता त्यांच्यापाशीं परत आली व आपले सर्व पुत्र अग्नीच्या मुखांतून सुटून कुशल आहेत असें पाहून तिनें आनंदाश्रु ढाळले व पुनः पुनः त्या रडणाऱ्या पण उपद्रवरहित असलेल्या पुत्रांना डोळे भरून पाहिलें. आक्रोश करणारी ती जरिता एकेका पुत्रास भेटली.

हे भारता, इतक्यांत तेथें मंदपाल मुनिहि अकस्मात् आला; परंतु त्या चार पुत्रांतील कोणी एकानेंहि त्याचें स्वागत केलें नाहीं. तो ऋषि प्रत्येक पुत्राशीं व जरितेशीं पुनः पुनः बोलत असतांहि त्याला कोणीं बरें किंवा वाईट उत्तर दिलें नाहीं.

तेव्हां तो मंदपाल करुण वाणीनें बोलला—हे साध्वि, मी दुःखार्त होऊन 'या माझ्या बालकांतील ज्येष्ठ कोणता, त्याच्या पाठचा कोणता, मधला कोणता

व सर्वांत कनिष्ठ पुत्र कोणता,' हें पुनःपुनः विचारीत असतां तूं माझ्याशीं भाषण कां बरें करीत नाहींस ! मी पूर्वी तुझा त्याग करून जरी गेलों, तरी माझ्या मनाला शांति मुळींच प्राप्त झाली नाहीं.

जरिता म्हणाली—हे महाभाग, तुला ज्येष्ठ पुत्राशीं काय करावयाचें आहे व दुसरा, मध्यम व कनिष्ठ कोणता हें तरी समजून घेण्याचें काय कारण आहे ! मला अशा संकटावस्थेंत सोडून तूं पूर्वी ज्या हास्यमुखी लपितेकडे गेला होतास, त्याच तरुणीकडे आतां जा.

मंदपाल—हे कल्याणि, स्त्रियांच्या परलोकप्राप्तीचें विघातक, असें व्यभिचार व सापत्नभाव या दोहोंवांचून तिसरें कारण कांहीं नाहीं. या दोन्ही गोष्टी स्त्री-पुरुषांच्या मनांत वैराग्नि प्रदीप्त करून त्यांना उद्विग्न करणाऱ्या आहेत. हे पतिव्रते, सर्व लोकांमध्यें प्रसिद्ध असलेली भगवती अरुंधतीहि एकदा महात्म्या वसिष्ठाविषयीं साशंक झाली होती आणि सप्तर्षींमध्यें बसलेल्या त्या सदाचारसंपन्न निष्पाप मुनीचा तिनें अपमान केला. पतीविषयीं मनांत संशय येतांच ती असूयेनें निस्तेज झाली व वेष पालटून कधीं गुप्त, तर कधीं प्रकट होऊन पतीच्या वर्तनाकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागली. त्या अरुंधतीप्रमाणें तूं आज, अपत्यस्नेहानें व्याकुळ होऊन येथें आलेल्या मजकडे संशयित मनानें पहात आहेस आणि ती लपिताहि तुजकडे असूयेनें पहात आहे. पुरुषानें 'ही माझी भार्या' असा विश्वास खरोखर कधींहि धरूं नये. स्त्री एकदा पुत्रवती झाली कीं मग तर ती पतिसेवेकडेहि दुर्लक्ष करिते.

राजा, याप्रमाणें तो मंदपाल बोलला असतां त्याचे चौघे पुत्र व भार्या त्याच्या शुश्रूषेंत तत्पर झाली व तोहि आपल्या अपत्यांचें असें समाधान करूं लागला. १. १९. २३३.

---

१ न हि भार्येति विश्वासः कार्यः पुंसा कथंचन ।
न हि कार्यमनुध्याति नारी पुत्रवती सती ॥

## अध्याय २३४ वा.

[ १ मंदपालानें केलेलें पुत्रांचें सान्त्वन. २ अग्नीची प्रसन्नता व वरदानपूर्वक कृष्णार्जुनांचें विसर्जन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, त्यानंतर तो मंदपाल आपल्या पुत्रांना म्हणाला—" वत्सांनो, अग्नीनें खांडववन दग्ध करण्यापूर्वींच मीं त्याची तुम्हांला वांचविण्याविषयीं प्रार्थना केली व त्या महात्म्यानेंहि 'ठीक आहे' असें म्हणून माझी विनंति मान्य केली. त्या अग्नीच्या वचनावर माझा विश्वास होता. तुमची माताहि तुमच्यासंबंधामुळें धर्मज्ञ आहे व तुम्हीहि सामर्थ्यवान् आहांत. अशी माझी खात्री असल्यामुळें मी यापूर्वींच येथें आलों नाहीं. यास्तव बाळांनो, तुम्ही मजविषयीं मनांत संतप्त होऊं नका. तुम्ही ब्रह्मवेत्ते ऋषि आहां, हें अग्नीला ठाऊक आहे."

राजा, याप्रमाणें तो मंदपालमुनि आपल्या पुत्रांचें समाधान करून जरितेसह अन्य प्रदेशीं निघून गेला.

हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें प्रदीप्त झालेल्या भगवान् अग्नीनें कृष्णार्जुनांच्या साह्यानें दुष्ट प्राण्यांचा नाश करून जगाचें हित करण्यासाठीं सर्व खांडववन दग्ध केलें. वसा व मेद इत्यादिकांचे प्रवाह प्राशन करून तृप्त झालेला तो अग्नि अर्जुनापुढें प्रकट झाला. इतक्यांत देवगणांनीं परिवेष्टित असलेला इंद्रहि अंतरिक्षांतून खालीं उतरला आणि पार्थ व केशव यांस म्हणाला—" हे वीरहो, देवांनाहि दुष्कर, असें हें तुमचें महत्कृत्य पाहून मी संतुष्ट झालों आहें. तरी तुम्ही या लोकीं पुरुषाला दुर्लभ असलेला वर मागा." हें वचन ऐकून पार्थानें इंद्रापाशीं सर्व अस्त्रें मागितलीं.

तेव्हां तेजस्वी इंद्र म्हणाला—हे धनंजया, योग्य काल येतांच तुला तीं सर्व अस्त्रें प्राप्त होतील. जेव्हां भगवान् महादेव तुजवर प्रसन्न होईल, तेव्हां हे पांडवा, मी सर्व अस्त्रें तुला देईन. तो काल केव्हां प्राप्त होईल तें मीच जाणतों. हे पार्था, तूं केलेल्या महत्तपामुळें तुला अग्न्यस्त्रें, वायव्यास्त्रें व माझीं सर्व अस्त्रें मिळतील.

राजा, इंद्रानें पार्थाला असा वर दिला असतां वासुदेवानें 'पार्थावर माझें निरंतर प्रेम रहावें' असा वर मागितला. तेव्हां त्या सुरपति इंद्रानेंहि तो

बुद्धिमान् कृष्णाला दिला. नंतर अग्नीची अनुज्ञा घेऊन अमरेंद्र सर्व देवगणां-सह देवलोकीं परत गेला.

अग्नीनें तें खांडववन पशु-पक्ष्यांसह दग्ध करून सहा दिवस विश्रांति घेतली. अनेक प्रकारचें मांस, रक्त व मेदादि यांचें प्राशन करून तृप्त झालेला महात्मा अग्नि परमप्रीतीनें कृष्णार्जुनांस बोलला—"तुम्हीं पुरुषश्रेष्ठांनीं मला यथेच्छ तृप्त केलें. आतां मी तुम्हांला जाण्याची अनुज्ञा देतों. तुमची जेथें जाण्याची इच्छा असेल, तेथें तुम्हीं खुशाल जा. तुम्हांला कोठेंहि प्रतिबंध होणार नाहीं."

हे भरतश्रेष्ठा, अग्नीचें हें वचन ऐकून वासुदेव, पार्थ व दानव मय हे तिघेहि हुताशनाला प्रदक्षिणा करून यमुनानदीच्या रमणीय तीरावर जाऊन एकत्र बसले. १. १९. २३४.

येथें एकोणिसावें मयदर्शन उपपर्व व पहिलें आदिपर्वहि समाप्त झालें.

---

यापुढें सभापर्व येईल. त्याचा हा पहिला श्लोक आहे.—

वैशंपायन उवाच—

ततो ब्रवीन्मयः पार्थं वासुदेवस्य संनिधौ ।
प्रांजलिः श्लक्ष्णया वाचा पूजयित्वा पुनः पुनः ॥



# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## २ सभापर्व.



## सभाक्रियापर्व १.



**नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।**
**देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥**

### अध्याय १ ला.

[ १ मयसभेचा संकेत व सभास्थाननिर्णय. ]

( १ ) **वैशंपायन** म्हणाला—राजा जनमेजया, त्यानंतर मयासुर वासुदेवासंनिध पार्थाचा पुनः पुनः सत्कार करून व हात जोडून नम्रपणें बोलला—

---

१ आदिपर्वाच्या शेवटीं शार्ङ्गक ज्ञानबलानेंच अग्निमुखांतून मुक्त झाले, असें सांगितलें. पण तें ज्ञान भगवद्भक्तिबलानेंच प्राप्त होतें, असें प्रतिपादन करण्यासाठीं हें दुसरें सभापर्व प्रवृत्त झालें आहे. या पर्वांत भगवद्भक्तीविषयीं रुचि उत्पन्न व्हावी म्हणून भक्तिबलानेंच पांडवांना दिव्य सभेचा लाभ व ऐश्वर्यादिकांची प्राप्ति झाली, असें सांगितलें आहे; भगवानाचें ध्यान द्वेषानें जरी केलें, तरी भगवत्सायुज्यप्राप्ति होते, हें ध्यानमाहात्म्य सुचविण्यासाठीं शिशुपालाचें निर्याण कथन केलें आहे. निरपराध पांडवांविषयींहि अभक्त दुर्योधनादिकांचा द्वेष अभिव्यक्त केला आहे. द्युतामध्यें द्रौपदीच्या रक्षणानें भगवानाचें भक्तपक्षपातित्व दर्शविलें आहे; समर्थ असलेल्या पांडवांचा अपकार करणाऱ्या दुर्योधनादिकांविषयींहि तितिक्षा हा भक्तगुण व्यक्त करून

" हे कौंतेया, तूं माझें या क्रुद्ध झालेल्या चक्रधर कृष्णापासून व जाळणाऱ्या अग्नीपासून रक्षण केलेंस, यास्तव मी तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग."

मयासुराचें हें कृतज्ञताप्रचुर भाषण ऐकून अर्जुन त्यास म्हणाला—हे महासुरा, तुझें कल्याण असो. तूं माझें सर्व प्रिय केलें आहेस. आतां तूं मजवर शाश्वत स्नेह ठेव. आम्हांलाहि तूं नित्य प्रिय आहेस.

त्यावर मय म्हणाला—हे प्रभो पुरुषश्रेष्ठा, तूं जें म्हटलेंस, तें तुला योग्यच आहे. पण हे भारता, तुझ्यासाठीं प्रेमानें कांहीं तरी करावें अशी माझी इच्छा आहे. मी दानवांचा अतिशय कुशल शिल्पी आहें. यास्तव हे पांडवा, तुझ्याप्रीत्यर्थ माझ्या या विद्येचा कांहीं तरी उपयोग व्हावा, अशी माझी मनीषा आहे.

राजा जनमेजया, मयाची अशी तीव्र उत्कंठा पाहून अर्जुन म्हणाला—" हे दानवा, मीं तुझे प्राण वांचविले, असें समजून तूं ज्याअर्थी त्या उपकाराची फेड करण्याची इच्छा करीत आहेस, त्याअर्थी मी तुझ्याकडून यत्किंचित्हि कार्य करवून घेणार नाहीं. परंतु तुझी निराशा करावी, अशीहि माझी इच्छा नाहीं. यास्तव तूं श्रीकृष्णाचा विचार घे आणि तो सांगेल त्याप्रमाणें केल्यानें मजवरच प्रत्युपकार केल्यासारखें होईल."

हे राजेंद्रा, अर्जुनाचें हें वचन ऐकून मयानें वासुदेवाचें मत विचारलें. तेव्हां 'याला काय बरें सांगावें' असा क्षणभर विचार करून त्या लोकनाथ श्रीकृष्णानें म्हटलें—" हे मयासुरा, ज्याअर्थी तूं श्रेष्ठ शिल्पी आहेस, त्याअर्थी धर्मराजासाठीं अशी एक अलौकिक सभा निर्माण कर कीं, जिला पाहून कोणीहि मानव तशी सभा अन्यत्र निर्माण करण्यास समर्थ होणार नाहीं. शिवाय तूं त्या सभेंत मनुष्य, असुर, देव, इत्यादिकांचीं स्वाभाविक मनोविकारयुक्त चित्रें व प्रतिमा अशाप्रकारें निर्माण कर कीं, ज्यांना पाहून ब्रह्मांडांतील सर्व वस्तुजात पाहिल्यासारखें होईल."

वासुदेवाचें हें भाषण ऐकून मय अतिशय संतुष्ट झाला व त्यानें पांडवांसाठीं विमानासारखी शुभ सभा तयार करण्याचा संकल्प केला; तेव्हां कृष्णार्जुनांनीं हा सर्व वृत्तान्त युधिष्ठिराला निवेदन करून मयासुराची भेट करविली.

---

उपकार करणारावर प्रत्युपकार अवश्य करावा, हें दाखविण्यासाठीं अग्नीपासून रक्षण केलेल्या मयासुरानें पांडवांसाठीं अभूतपूर्व सभा केली, असें सुचविलें आहे.

हे कुरुश्रेष्ठा, त्या वेळीं धर्मराजानें मयाचा योग्य सत्कार केला. मयानेंहि त्याचा प्रीतिपूर्वक स्वीकार करून पांडुपुत्रांना आपला पूर्वज जो वृषपर्वा दानव त्याचें चरित्र व त्यानें बिंदुसरोवरावर केलेला यज्ञ इत्यादि वृत्तान्त कथन केला.

त्यानंतर मयासुरानें किंचित्काल विश्रांति घेतली व चित्त स्वस्थ झाल्यावर तो महात्म्या पांडवांसाठीं उत्तम सभा तयार करण्याच्या उद्योगास लागला. महात्म्या कृष्णाच्या व पार्थाच्या मतानें त्यानें शुभमुहूर्तावर स्वस्ति-पुण्याहवाचन करविलें. हजारों ब्राह्मणांना पायसान्नानें तृप्त केलें. त्यांना विपुल धन दिलें. नंतर त्या पराक्रमी दानवानें सर्व ऋतूंतील गुणांनीं युक्त असलेला रमणीय भूप्रदेश पाहून, तेथें दहा हजार चौरस हात जागा सभेसाठीं मापून घेतली. २. १. १.

---

## अध्याय २ रा.

### [ १ श्रीकृष्णाचें द्वारकेस गमन. ]

( १ ) वैशंपायन—हे कुरुनंदना, पांडवांनीं केलेल्या सत्काराचा स्वीकार करीत जनार्दन दीर्घकाल खांडवप्रस्थांत राहिला. त्यानंतर फार दिवस झाल्यामुळें पित्याला भेटण्याच्या इच्छेनें त्यानें द्वारकेस परत जाण्याचा विचार केला. तेव्हां हे राजा, वासुदेवानें प्रथम धर्मराजाचा निरोप घेतला. नंतर आपली पितृभगिनी जी कुंती तिच्या चरणांवर मस्तक ठेविलें. तेव्हां तिनें त्या जगद्वंद्य भगवान् कृष्णाच्या मस्तकाचें अवघ्राण करून त्याला प्रेमानें आलिंगन दिलें.

त्यानंतर महायशस्वी केशवानें आपली भगिनी जी सुभद्रा तिची भेट घेतली. तिला पहातांच बंधुप्रेमानें त्याचे नेत्र भरून आले आणि त्यानें शुभ भाषण करणाऱ्या सुभद्रेला अर्थपूर्ण, सत्य, संक्षिप्त व युक्तियुक्त असा उपदेश केला. तिनेंहि आपल्या प्रिय भ्रात्याला अनेकदा शिरसा अभिवादन केलें, त्याचा मोठा सत्कार केला व माहेरच्या प्रिय आप्तांना अनेक निरोप सांगितले. तेव्हां तिचें अभिनंदन करून व अनुज्ञा घेऊन वृष्णिकुलोत्पन्न कृष्ण द्रुपदकन्या कृष्णेला व धौम्यमुनीलाहि भेटला. त्या पुरुषोत्तमानें पांडवपुरोहित धौम्याला यथाविधि वंदन केलें. द्रौपदीचें सान्त्वन करून तिचा निरोप घेतला. तो विद्वान् आपल्या पांडव भ्रात्यांना पृथक् पृथक् भेटला आणि अर्जुनासह तो बलाढ्य वार्ष्णेय जादयास निघाला.

त्यानंतर भगवान् पार्थासह युधिष्ठिरापाशीं गेला. तेव्हां त्या पांच भ्रात्यांनीं परिवेष्टित झालेला कृष्ण देवांसह असलेल्या इंद्रासारखा शोभला. हे राजन्, गरुडध्वज श्रीकृष्णानें प्रयाणकालीं करावयास योग्य असलेलीं सर्व कर्में करण्याच्या इच्छेनें स्नान करून, शुचिर्भूत होऊन, योग्य वस्त्रालंकार धारण केले. नंतर त्या यदुश्रेष्ठानें देव व द्विज यांचें पुष्पमाला, नमस्कार, गंधपुष्प इत्यादिकांच्या योगें पूजन करून त्यांस वंदन केलें. याप्रमाणें सर्व विहित कर्में करून तो सनातन यदुश्रेष्ठ नगराच्या महाद्वारांतून बाहेर पडला. योग्य ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करवून व त्यांना दधिपात्र, फल, अक्षता यांसह धन देऊन, त्यानें त्या विप्रांस प्रदक्षिणा केली आणि शुभतिथि, नक्षत्र व मुहूर्त यांचें आनुकूल्य पाहून, तो भगवान् आपल्या सत्वर गमन करणाऱ्या गदा, चक्र, खड्ग, शार्ङ्ग इत्यादि आयुधांनीं युक्त असलेल्या, शैब्य व सुग्रीव हे दोन अश्व जोडलेल्या, गरुडध्वज सुवर्णरथावर आरूढ होऊन निघाला.

हे राजा, श्रीकृष्णाच्या मागोमाग युधिष्ठिरहि त्याच रथावर चढला व सारथ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला जो दारुक त्याला दूर व्हावयास सांगून त्या कुरुपतीनें अश्वांचे रश्मी स्वतः आपल्या हातांत घेतले. पार्थहि त्याच्या मागोमाग रथावर चढून सुवर्णाच्या दांडीनें युक्त असलेलें शुभ्र चामर डावीकडून उजवीकडे वारूं लागला. बलाढ्य भीमसेनहि नकुल-सहदेव, ऋत्विक् व पौरजन यांसह कृष्णाच्या मागोमाग चालूं लागला. तो शत्रुनाशक केशव सर्व भ्रात्यांसह याप्रमाणें गमन करूं लागला असतां ज्याच्या मागून प्रिय शिष्य चालले आहेत, अशा गुरूप्रमाणें शोभला.

याप्रमाणें नगरापासून अर्ध योजन दूर गेल्यावर गोविंदानें दृढ आलिंगन देऊन अर्जुनाचा निरोप घेतला आणि युधिष्ठिर व भीम यांची पूजा केली; तेव्हां त्यांनीं त्याला आलिंगन दिलें. नकुल-सहदेवांनीं अभिवादन केलें असतां श्रीकृष्णानें त्यांना शुभ आशीर्वाद दिले व युधिष्ठिराचा निरोप घेऊन 'हे राजा, तूं आतां आपल्या राजधानीस परत जा.' असें म्हटलें व त्या धर्मज्ञ गोविंदानें त्यास पुनः वंदन करून त्याचे दोन्ही पाय घट्ट धरिले.

तेव्हां धर्मराजानें त्यास उठवून त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें व 'यादवश्रेष्ठा कमलनयना कृष्णा, तूं द्वारकेस जा. पण आमचें स्मरण असूं दे' असें सद्गदित कंठानें बोलून त्यास निरोप दिला. तेव्हां 'मी पुनः लवकरच

परत येईन' असें सत्यवचन देऊन व मोठ्या कष्टानें मागोमाग येणाऱ्या पांडवांस परतवून इंद्र जसा अमरावतीस जातो, तसा तो हृष्ट झालेला केशव आपल्या द्वारावतीस गेला.

त्या भगवानाचा रथ जोंवर दिसत होता, तोंवर ते पांडव आपल्या दृष्टींनीं त्याला अनुसरले व रथ दृष्टि-आड झाला असतां ते वीर प्रीतियुक्त मनानें त्याच्या मागोमाग गेले. कृष्णाच्या दीर्घकाल सहवासानेंहि त्याच्या दर्शना-विषयींची त्याची लालसा तृप्त झाली नाहीं. पांडवांच्या नेत्रांना आल्हाद देणारा तो शौरी थोड्याच वेळांत दिसेनासा झाला असतां ज्यांचें मन गोविंदामध्यें आसक्त झालें आहे असे ते पृथापुत्र मोठ्या कष्टानें परत फिरून सत्वर आपल्या खांडवप्रस्थ नगरास प्राप्त झाले.

तिकडे कृष्णहि वेगवान् रथानें लवकरच द्वारकेस जाऊन पोंचला. त्यावेळीं सात्वतवीर सात्यकि त्याच्या मागोमाग चालला होता व दारुक सारथि त्याचा वेगवान् रथ हांकीत होता. त्या दोघांसह देवकीपुत्र वासुदेव वेगवान् गरुडा-प्रमाणें द्वारकेंत शिरला.

राजा जनमेजया, याप्रमाणें वासुदेवाला निरोप दिल्यावर युधिष्ठिर आपल्या भ्रात्यांसह परत फिरला व त्यानें सर्व सुहृज्जनांसह नगरांत प्रवेश केला. नंतर धर्मराजानें सर्व भ्राते व आप्त-इष्ट यांस निरोप देऊन द्रौपदीच्या सहवासांत आनंदानें काल घालविला.

इकडे केशवानेंहि मोठ्या संतुष्ट चित्तानें आपल्या उत्तम नगरींत प्रवेश केला. तेव्हां उग्रसेनादि यादवांनीं त्याचें सत्कारपूर्वक स्वागत केलें. कमलनयन गोविंदानें पितामह आहुक, पिता वसुदेव, माता देवकी व भ्राता बलराम, यांस वंदन केलें व तो त्यांच्या समीप उभा राहिला. त्यानंतर प्रद्युम्न, सांब, निशठ, चारुदेष्ण, गद, अनिरुद्ध व भानु यांना वासुदेवानें प्रेमानें आलिंगन दिलें आणि गुरुजनांचा निरोप घेऊन तो रुक्मिणीच्या मंदिरांत गेला.

हे भारता, इकडे महाभाग मयासुरानेंहि धर्मराजासाठीं सर्व रत्नांनीं भूषित अशी दिव्य सभा यथाविधि रचण्याची योजना केली. २. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ मयासुराचें बिंदुसरोवरास प्रयाण व सभानिर्माण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे कुरुनंदना, तो मयासुर विजयी अर्जुनाला म्हणाला—" हे वीरा, मी तुझा निरोप घेऊन आतां कैलासपर्वताच्या उत्तरेस असलेल्या मैनाकपर्वतावर जाऊन येतों. पूर्वी दानवांना याग करण्याची इच्छा झाली असतां मीं बिंदुसरोवरावर सत्यप्रतिज्ञ वृषपर्व्याची सभा निर्माण केली. त्यावेळीं मीं जें विचित्र रत्नमय मूलद्रव्य तयार केलें होतें, तें अद्यापि तेथें असल्यास घेऊन येतों व त्याच्या योगानेंच धर्मराजाची ही यशस्विनी, मनाला आल्हाद देणारी, विचित्र व सर्वरत्नविभूषित सभा निर्माण करीन.

राजा, वृषपर्व्यानें शत्रूंना रणांत मारून बिंदुसरोवरावर ठेवलेली उग्र गदा अद्यापि तेथेंच आहे, असें मला वाटतें. कारण त्या वीराच्या मागून ती उचलण्यास योग्य असा पुरुष भीमसेनावांचून दुसरा कोणीहि अद्यापि निपजलाच नाहीं. ती सुवर्णबिंदूंनीं चित्रविचित्र, इतर गदांचे प्रहार सहन करणारी व त्यामुळेंच अति दृढ आहे. ती एकच गदा शत्रूंचा घात करणाऱ्या एक लक्ष गदांच्या बरोबर आहे. हे पार्था, तुला जसें गांडीव धनुष्य तशीच भीमाला ती गदा अनुरूप आहे. त्याचप्रमाणें वरुणाचा 'देवदत्त'–नांवाचा महा घोष करणारा शंखहि मी तुला देईन. यांत मुळींच संशय नाहीं."

राजा, अर्जुनाला असें बोलून तो असुर ईशान्य दिशेकडे निघाला व कैलासपर्वताच्या उत्तरेस मैनाकपर्वतावर जाऊन पोंचला. तो प्रचंड रत्नमय पर्वत सुवर्णशिखरांनीं युक्त आहे. त्याच्या समीपच बिंदुसरोवर आहे. या सरोवरावरच पूर्वी भगीरथ-राजा भागीरथी-गंगेच्या दर्शनासाठीं असंख्य वर्षे राहिला होता. याच प्रदेशीं सर्व भूतांचा ईश्वर जो महात्मा ब्रह्मदेव त्यानें शंभर अश्वमेध यज्ञ केले. हे भरतर्षभा, तेथें शोभेसाठीं रत्नजडित पशुस्तंभ व सुवर्ण चैत्य केले होते. ते शास्त्रसिद्धांतासाठीं केलेले नव्हते. त्या ठिकाणीं शचिपति इंद्रानें याग करून सिद्धि मिळविली.

भगवान् भूतनाथ शंकर सर्व लोकांना उत्पन्न केल्यानंतर हजारों भूतगणांसह येथेंच राहिला होता. सर्व भूतें येथें असलेल्या त्या तेजस्वी देवाची उपासना करितात. येथें नर, नारायण, ब्रह्मदेव, यम व रुद्र या पांची देवता सहस्र युगपर्यंत सत्र करीत असतात. त्याचप्रमाणें भगवान् वासुदेवानें सतत धर्मप्रवृत्तिच

चालण्यासाठीं अनेक वर्षें येथेंच श्रद्धापूर्वक याग केला. त्याप्रसंगीं भगवानानें याच स्थलीं सुवर्णमालांनीं युक्त असलेले हजारों यूप व देदीप्यमान चैत्य ही दक्षिणा दिली.

हे भारता, मयासुरानें अशा त्या रम्य प्रदेशीं जाऊन तेथें असलेली ती विशाल गदा, अप्रतिम शंख व वृषपर्व्याच्या सभाद्रव्यांतील उरलेलीं नाना-प्रकारचीं व विविध रंगाचीं रत्न-चूर्णें आणि इतर अमूल्य द्रव्यें आणलीं. त्या ठिकाणीं राक्षस व किंकर या महद्धनाचें रक्षण करीत असल्यामुळें मयाला तें सर्व द्रव्य जसें ठेवलें होतें तसेंच सांपडलें. त्या कुशल असुरानें तें सर्व द्रव्य आणून धर्मराजासाठीं त्रिभुवनांत प्रसिद्ध असलेली दिव्य रत्नमय अलौकिक सभा निर्माण केली. ती उत्कृष्ट गदा वृकोदराला दिली व तो श्रेष्ठ अप्रतिम देवदत्त शंख पार्थाला अर्पण केला. त्या शंखाच्या नादानें सर्व भूतें कंपित झालीं.

हे महाराज, सुवर्णाच्या वृक्षांनीं युक्त असलेल्या त्या सभेचा विस्तार दहा हजार चौरस हात होता. अग्नि, सूर्य किंवा सोम यांच्या देदीप्यमान सभां-सारखी ही अपूर्व सभा आपल्या आकारानें शोभत होती. ती आपल्या प्रभेनें जणुकाय सूर्याच्या तेजस्वी किरणांचा पराभवच करीत होती व आपल्या दिव्य तेजानें प्रदीप्त झाल्यासारखी दिसत होती. चित्तामध्यें विविधभाव उत्पन्न कर-णाऱ्या शृंगारादि रसांचा ज्यामध्यें अभिनय करून दाखविला आहे, अशा चित्रांनीं सुशोभित झालेली ती सभा आकाशाला व्यापून राहिली.

ती सभा दिव्य तेजानें संपन्न असल्यामुळें तेथें प्रवेश करणाराचें सर्व पाप व श्रम यांचा परिहार होत असे. विश्वकर्म्यानें त्रैलोक्यांतील उत्तम द्रव्यें जमवून ती सभा निर्माण केली होती. तिचें बाह्य महाद्वार रत्नखचित होतें. विश्वकर्म्या मयासुरानें अमूल्य द्रव्यें योजून निर्माण केलेल्या या विचित्र सभेसारखी बलि-बाणप्रभृति भगवद्भक्तांची सभा किंवा देवांची सुधर्मा सभा किंवा ब्रह्मदेवाची सभाहि नव्हती.

मयासुरानें त्या दिव्य सभेचें रक्षण करण्याकरितां 'किंकर'-नांवाचे आठ हजार बलाढ्य राक्षस नेमले होते. अंतरिक्षांत संचार करणाऱ्या त्या भयंकर व धिप्पाड राक्षसांतील कित्येकांचे नेत्र आरक्त व कित्येकांचे पिंगट होते. त्यांचे कान शंखाच्या आकाराचे होते. ते किंकर कोणत्याहि पदार्थांवर प्रहार करण्यास समर्थ होते. ते ती विमानासारखी सभा एका स्थलाहून दुसऱ्या स्थलीं सहज नेऊं शकत.

राजा, मयासुरानें त्या अप्रतिम सभेंत एक अपूर्व सरोवर निर्माण केलें होतें. त्यांत असंख्य सुवर्णकमलें असून, त्यांचीं पानें इंद्रनील मण्याचीं होतीं. त्या पद्मरागमण्यांनीं युक्त असलेल्या कमलांचे देंठ इतर मूल्यवान् रत्नांचे असून, त्या कमलाभोंवतीं विविध पक्षी बसले होते. रत्नमय कमलांनीं युक्त असलेल्या त्या सरोवरांत कृत्रिम सोनेरी कांसव व मांसे संचार करीत होते. त्या पुष्करणींत उतरण्यास विचित्र स्फटिकांच्या पायऱ्या होत्या. त्यांतील जल निर्मल व शुभ्र होतें. त्यामुळें वास्तविक तेथें जल असूनहि त्याच्या अतिशय स्वच्छतेमुळें प्रेक्षकांस तें स्थल असल्यासारखेंच भासत असे. तेथें वहाणाऱ्या मंद व शीतल वायूच्या योगानें त्या जलाचे जे तुषार वर उडत, ते मौक्तिकबिंदूंसारखेच भासत. त्या जलाशयाचा चतुष्कोण शिलाबद्ध घाट रत्नमय असून आंतील कमलें, त्यांचे देंठ व पानें हीं सर्व विविध रत्नांचींच असल्यामुळें त्या सरोवराच्या तीरावर आलेले प्रेक्षक ही रत्नमय भूमीच आहे असें भ्रांतीनें समजून पुढें पाऊल टाकीत व त्या जलाशयांत पडत.

हे नृपश्रेष्ठा, त्या सभेच्या सभोंवार पुष्पांनीं सतत प्रफुल्लित झालेले अनेक प्रकारचे वृक्ष होते. त्यांची शीतल व रम्य छाया सर्वत्र पसरली होती. त्या सभेंत ठिकठिकाणीं सुगंधी उपवनें असून हंस व कारंडव यांनीं युक्त आणि चक्रवाकांनीं सुशोभित झालेल्या अनेक पुष्करणी होत्या. तेथील भूमीवरील व जलावरील नानाविध कमलांचा सुवास वाहणारा वायु पांडवांची नित्य सेवा करीत असे. अशा प्रकारची ही अलौकिक सभा मयासुरानें चौदा महिन्यांहून कांहीं अधिक कालांत निर्माण केली व 'हे राजा, तुझी ही अपूर्व सभा आतां तयार झाली आहे' असें युधिष्ठिरास निवेदन केलें. २. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १ पांडवांचा सभाप्रवेश व युधिष्ठिराच्या ऐश्वर्याचें वर्णन. ]

(१) वैशंपायन—राजा परिक्षिता, त्यानंतर धर्मराजानें त्या सभेंत प्रवेश केला. त्याप्रसंगीं त्या राजेंद्रानें दहा हजार ब्राह्मणांना भोजन घातलें. त्यानें घृत, मध व दूध यांनीं युक्त असलेले सर्व प्रकारचे पदार्थ तयार करविले होते. विविध कंदमुळें, फळें, वराहाचें व हरणाचें मांस, खिचडीचे अनेक प्रकार, नानाविध भाज्या इत्यादि विविध पदार्थ त्या भोजनांत होते. त्याचप्रमाणें त्यानें

चोष्य म्हणजे चोखण्याचे पदार्थ व अनेक प्रकारचीं पेयें यांनीं ब्राह्मणांना तृप्त केलें. त्या सर्व विप्रश्रेष्ठांना नवीन वस्त्रें व पुष्पमाला अर्पण करून त्या राजानें प्रत्येकाला अनेक, अशा हजारों गायींचें दान केलें.

हे भारता, त्या वेळीं ब्राह्मणांनीं धर्मराजाला दिलेल्या शुभ आशीर्वादांचा इतका प्रचंड घोष झाला कीं तो स्वर्गाला जाऊन भिडला. त्यानंतर तेथें मंगल वाद्यांचा गजर झाला असतां युधिष्ठिरानें देवतांची स्थापना करून त्यांची सुवासिक दिव्य द्रव्यांनीं पूजा केली. त्या प्रसंगीं मल्ल, नट, लाठी खेळणारे, सूत, वैतालिक इत्यादि राजसेवक आपापल्या जातिनियमाप्रमाणें महात्म्या धर्मपुत्र युधिष्ठिराची उपासना करीत होते. देवतांची पूजा केल्यावर इंद्र जसा अमरावतींत रममाण होतो, तसा युधिष्ठिर भ्रात्यांसह त्या रम्य सभेंत रममाण झाला. तेथें पांडवांसह अनेक ऋषि व नाना देशांतून आलेले भूपतिहि बसले होते.

हे कुरुश्रेष्ठा, त्या ऋषिसमुदायांत असित, देवल, सत्य, सर्पिर्मालि, महाशिरा, अर्वावसु, सुमित्र, मैत्रेय, शुनक, बलि, बक, दाल्भ्य, स्थूलशिरा, शुक, सुमंतु, जैमिनि व कृष्णद्वैपायन इत्यादि प्रसिद्ध मुनि व पैल आणि या व्यासशिष्यांत मी वैशंपायनहि होतों. तसेच तित्तिरि, याज्ञवल्क्य, पुत्रांसह लोमहर्षण, अप्सुहोम्य, धौम्य, अणीमांडव्य, कौशिक दामोष्णीष, त्रैबलि, पर्णाद, घटजानुक, वायुभक्ष, मौंजायन, पाराशर्य, सारिक, बलीवाक, सिनीवाक, सत्यपाल, कृतश्रम, जातूकर्ण, शिखावान्, आलंब, पारिजातक, महाभाग पर्वत, मार्कंडेय महामुनि, पवित्रपाणि सावर्ण, भालुकि, गालव, जंघाबंधु, रैभ्य, कोपवेग, भृगु, हरिबभ्रु, कौंडिन्य, बभ्रुमाली, सनातन, काक्षीवान्, औशिज, नाचिकेत, गौतम, पैङ्य, वराह, शुनक, शांडिल्य, कुक्कुर, वेणुजंघ, कालाप, कठ, हे व आणखीहि पुष्कळ वेद-वेदांगपारंगत, जितेंद्रिय व धर्मवेत्ते ऋषि त्या सभेंत बसले होते. ते धर्मराजाला अनेक पुण्यप्रद कथा कथन करीत असत.

त्याचप्रमाणें श्रीमान् धर्मात्मा मुंजकेतु, महात्मा विवर्धन, संग्रामजित् इत्यादि पूर्वोक्त[1] अनेक बलाढ्य क्षत्रियश्रेष्ठहि धर्मराजाची उपासना करीत होते. कित्येक बलाढ्य राजपुत्र कृष्णाजिनें परिधान करून अर्जुनापाशीं धनुर्वेद शिकत होते. हे राजा, त्यांच्याच बरोबर वृष्णिकुमार, रुक्मिणीपुत्र सांब, युयुधान सात्यकि,

---

१ द्रौपदीस्वयंवरास जमलेले कौरवाखेरीज बहुतेक सर्व भूपाल या सभेंत आले होते. त्यांचीं सविस्तर नांवें आदिपर्व अ. १८६. पृ. ५१ वर दिलीं आहेत.

सुधर्मा, अनिरुद्ध, नरश्रेष्ठ शैब्य इत्यादि यादव व दुसरेहि अनेक राजे यांस पार्थानें अस्त्रविद्या शिकविली. पार्थाचा सखा तुंबुरु तेथें निरंतर रहात होता. यांशिवाय सत्तावीस गंधर्वगण धर्मराजाच्या सेवेंत तत्पर होते.

अमात्यांसह चित्रसेन व अप्सरा त्या सभेंत नृत्य-गायन करीत असत. तेथें गायन-वादनकुशल, ताल धरण्यांत प्रवीण व मधुर लय, स्थान, प्रमाण यांत विशारद असे अनेक किन्नर होते. गंधर्वांसह ते सर्व तुंबुरूच्या आज्ञेवरून दिव्य ताना घेऊन त्या सभेंत बसलेल्या पांडवांचें व ऋषीश्वरांचें रंजन करीत होते. तात्पर्य स्वर्गांत इंद्रादि देव भगवान् चतुर्मुखाची जशी उपासना करितात, त्याप्रमाणें त्या अप्रतिम मयसभेंत बसलेले ते सर्व सत्यनिष्ठ व सुव्रत महात्मे युधिष्ठिराची सेवा करीत असत. २. १. ४.

---

# लोकपालसभाख्यानपर्व २.



## अध्याय ५ वा.

[ १ मयसभेंत देवर्षि नारदाचें आगमन व त्याचा सत्कार. २. प्रश्नद्वारा नारदानें केलेलें राजधर्मानुशासन. ]

(१) **वैशंपायन**—हे भारता, त्या सभेमध्यें महात्मे पांडव व इतर श्रेष्ठ गंधर्वादि बसले असतां देवगणांना पूज्य असलेला, ऋगादि वेद व चारे प्रकारच्या रहस्यविद्या यांस जाणणारा; इतिहास व पुराण यांचा अभिज्ञ, पुरा कल्पाचा म्हणजे 'देवासुराः संयत्ताः आसन्' इत्यादि वेदोक्त अनेककर्तृक अन्वाख्यानें व एककर्तृक परिकृत्याख्य विशेष, यांस जाणणारा; विषय, संशय, पूर्वपक्ष, उत्तरपक्ष व

---

१ 'उषा वा अश्वस्य मेध्यस्य शिरः' बृ. अ. ३ ब्रा. २. इत्यादि शास्त्रविहित अश्वादि कर्मांगांमध्यें विराड्दृष्टि करणें, यांसारख्या कर्मांगावबद्ध उपासना; 'अन्नं ब्रह्मेत्युपासीत । आदित्यो ब्रह्मेत्यादेशः ।' इत्यादि अन्न, आदित्य, यांसारख्या मूर्तीमध्यें ब्रह्मदृष्टि करणें या प्रतीकोपासना; 'त्वं वा अहमस्मि भगवो देवते अहं वै त्वमसि' अशाप्रकारें आत्मा व देवता यांचें अभेदचिंतन, या अहंग्रहोपासना व 'प्रज्ञानं ब्रह्म' इत्यादि ब्रह्मात्मानुभव इत्यादि चार रहस्यविद्या असून त्यांनाच उपनिषदें म्हणतात.

संगति या पांच अंगांनीं युक्त असलेल्या पूर्वोत्तर मीमांसांच्या अधिकरणांचा तत्त्वज्ञ; मन्वादि प्रणीत धर्मशास्त्रांचें तत्त्व ओळखणारा; शिक्षा-कल्पादि षडंगवेत्ता, मीमांसेंतील अंगवाक्यांचें महावाक्यांशीं ऐक्य; संयोगपृथक्त्व म्ह॰ एका कर्मांमध्यें अनेक धर्मांचा सन्निपात इत्यादिकांमध्यें विशारद असलेला, सर्वश्रेष्ठ, केवल ज्ञाताच नव्हे तर प्रगल्भ वक्ता; ऊहापोह करण्यामध्यें कुशल; अधीत शास्त्राला कधींहि न विसरणारा; दायविभागादि व्यवहार जाणणारा; त्रिकालज्ञानी, शिष्यांना ज्ञानकांड व कर्मकांड यांचें यथाधिकार समर्पण करणारा; ज्यानें प्रत्यक्षादि लौकिक व अलौकिक प्रमाणांचा पूर्णपणें निश्चय केलेला आहे असा; प्रतिज्ञा, हेतु, उदाहरण, इत्यादि पंच-अवयवांनीं युक्त असलेल्या अनुमानवाक्यांतील गुणदोष जाणणारा; बृहस्पतीशीं संभाषण करतांनाहि त्याच्याशीं उत्तरोत्तर प्रतिपक्ष करणारा; धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांविषयीं ज्यानें यथार्थ निश्चय केला आहे असा, त्याचप्रमाणें सर्व त्रिभुवनामध्यें महा मतिमान्, सर्व लोकांतील उच्चनीच वस्तूंना प्रत्यक्ष पहाणारा; वेदान्तविचार व चित्तवृत्तिनिरोधरूप योग, यांतील श्रवणादि व यमनियमादि विभागांस जाणणारा; सुर व असुर यांच्या हिताहितांचा विचार करणारा; संधि आणि विग्रह यांतील तत्त्व जाणणारा व संधीला योग्य असलेल्यांचा संधि व विग्रहास योग्य असलेल्यांचा विग्रह घडवून आणणारा आपली व दुसऱ्याची शक्ति किती आहे, हें जाणून त्यांच्या बलाबलांचा निश्चय करणारा, शत्रूंच्या अमात्यादिकांना धनादि देऊन शत्रुपक्षांत भेद कसा उत्पन्न

---

१ संधि व विग्रह हे शब्द सामादि चार उपायांमध्यें आणि संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधिभाव व समाश्रय या सहा गुणांमध्येंहि येतात. उपायांतील संधि म्हणजे साम व विग्रह म्हणजे दंड; पण गुणांतील संधि व विग्रह दोन दोन प्रकारचे आहेत. दोन शत्रूंचा परस्पर समभूमीवर युद्धाचा प्रसंग आला असतां त्यांतील प्रबल शत्रु दंडानेंच विग्रहाची इच्छा करितो व दुर्बल शत्रु दानानें संधीची इच्छा करितो. परंतु त्यांतील दुर्बल शत्रु, अभेद्य दुर्गाचा आश्रय करून जर रहात असला, तर तो बलवान् शत्रूशींहि विग्रहाची इच्छा करितो व प्रबल शत्रु थोडी खंडणी घेऊनहि त्याच्याशीं संधीचीच इच्छा करितो. त्यामुळें संधि-विग्रह दुर्बल व प्रबल शत्रूंच्या द्वारा दोन दोन प्रकारचे होतात. म्हणून उपायांतील व गुणांतील संधि-विग्रह भिन्न भिन्न आहेत.

करावा, हें जाणणारा; संधि, विग्रह, यान म्ह० शत्रूवर चाल करून जाणें, आसन म्ह० शक्तीला प्रतिबंध झाला असतां शत्रूच्या दुर्गाला वेढा देऊन त्याला प्रतिबंध करीत राहणें, द्वैधीभाव म्ह० बलाढ्य शत्रूंशीं वाङ्मात्र संधि करून मनांतून त्याप्रमाणें न वागण्याचा निश्चय व समाश्रय म्ह० पराभव झाला असतां अभेद्य दुर्ग किंवा बलाढ्य राजा, यांचा आश्रय करून रहाणें, या सहा गुणांचा उपयोग केव्हां करावा, हें जाणणारा; सर्वशास्त्रविशारद; ज्याला युद्ध व गायन-वादनादि प्रिय आहे असा, सर्व कर्मे व विद्या यांमध्यें अकुंठित व असंगत्व, कारुण्य इत्यादि असंख्य गुणांनीं युक्त असलेला, महा तेजस्वी नारदमुनि सर्व लोकांतून संचार करीत ऋषींसह धर्मराजाच्या सभेंत आला. त्या वेळीं पारिजात, बुद्धिमान् पर्वत व प्रियदर्शन सुमुख, हे देवर्षिहि त्याच्या-बरोबर होते.

हे राजा, तो मनाप्रमाणें वेगवान् असलेला अति तेजस्वी नारद मोठ्या प्रेमानें सभास्थ पांडवांना भेटावयास आला व जयाशीर्वादांनीं स्तुति केल्या जाणाऱ्या धर्मराजाचा त्यानें मोठा सत्कार केला. सर्व धर्मज्ञ नारदमुनि अकस्मात् आला आहे, असें पाहून पांडवश्रेष्ठ युधिष्ठिर आपल्या अनुजांसह आसनावरून एकदम उठला व विनयानें नम्र झालेल्या त्यानें मोठ्या प्रीतीनें त्या मुनीला अभिवादन केलें. त्या देवर्षीला योग्य आसन देऊन अर्घ्य, गाय, मधुपर्क इत्यादि यथाविधि समर्पण केलें व त्या धर्मज्ञ पांडवानें त्याला रत्नें व सर्व सुखसाधनें देऊन त्याची पूजा केली. युधिष्ठिरापासून त्या पूजेचें यथाविधि ग्रहण करून मुनीला परम संतोष झाला. राजा, सर्व पांडवांनीं मोठ्या आदरानें त्या वेदज्ञ महर्षीची अशी पूजा केली असतां त्यानें युधिष्ठिराला धर्म, अर्थ व काम यांविषयीं असे प्रश्न केले—

( २ ) हे धर्मराजा, तुझे अर्थ याग, दान, कुटुंबभरण इत्यादि स्वकार्य करण्यास समर्थ आहेतना ! तुझें मन धर्मामध्येंच रत आहे ना ! तूं प्राप्त सुखांचा निर्विकार चित्तानें उपभोग घेतोस ना ! अंतरात्म्यामध्यें स्थिर केलें जाणारें तुझें चित्त दुसऱ्या वृत्तींनीं प्रतिबद्ध होत नाहीं ना !

हे नरश्रेष्ठा, तुझ्या पूर्व पितामहांनीं जसें आचरण केलें त्याचप्रमाणें तूं आचरण करतोस ना ! ऋत्विक्, पुरोहित इत्यादिकांचे ठिकाणीं तुझी धर्मयुक्त वृत्ति असून दंडास योग्य असलेल्या द्वेष्य, शत्रु इत्यादिकांमध्यें अर्थयुक्त वर्तन

करितोस ना! त्याचप्रमाणें पालन व षड्भागाचें ग्रहण यांच्या योगानें तूं प्रजांमध्यें धर्म-अर्थयुक्त वृत्ति ठेवितोस ना!

राजा, जे हीन प्रकृतीचे लोक असतात, ते धनाच्या लोभानें धर्माचा बाध करितात, विरक्त धर्मलोभानें अर्थाचा बाध करितात व कामुक विषयलोभानें धर्म व अर्थ या दोहोंचा बाध करितात. त्यामुळें नीचत्व, विरक्तत्व व कामुकत्व हे दोष राजकार्याचे विघातक आहेत. यास्तव ते तुझ्या ठिकाणीं नसावे, अशी माझी इच्छा आहे.

हे राजा, तूं अर्थानें धर्माचा, धर्मानें अर्थाचा व तात्कालिक सुखाच्या लोभानें धर्मार्थांचा बाध करीत नाहींस ना! परस्पर विरोधी असलेल्या धर्मार्थकामांचें एका मनुष्याला एकाच वेळीं अनुष्ठान करितां येत नाहीं, हें खरें; तथापि कालभेदानें प्रत्यहीं त्यांचें अनुष्ठान संभवतें. पूर्वाह्णीं धर्माचरण करावें, मध्याह्नीं धनार्जन करावें व सायाह्नीं कामाचरण करावें, अशी वैदिक श्रुति आहे. तिला अनुसरून हे कालज्ञ विजयी राजा, तूं धर्मादि त्रिवर्गाचें कालविभागानें सेवन करितोसना! हे वरदा, परानुग्रहरूप धर्म मात्र सर्वदा करावा, त्याविषयीं कालनियम नाहीं.

हे राजा, चार, अमात्य इत्यादि अधिकाऱ्यांना यथायोग्य कार्योपदेश करण्याचें कौशल्य, शत्रुदमनादिकांमध्यें उत्कर्षप्रदर्शन, तर्ककुशलता, उत्तम स्मरणशक्ति, भूत व भविष्यत् गोष्टींचा उत्तम विचार व नीतिशास्त्रज्ञता, या सहा राजगुणांनीं तूं सामादि चार आणि मंत्र, औषध व इंद्रजाल, मिळून सात उपाय, शत्रूचें व आपलें बलाबल व राजाचे चौदा[1] दोष यांची चांगली परीक्षा करितोस ना!

---

१ परलोक नाहींच असें मानणें हें नास्तिक्य, मिथ्याभाषण, क्रोध, कर्तव्याकडे दुर्लक्ष करणें हा प्रमाद, अल्पावधींत होणाऱ्या कामाला दीर्घकाल लावणें ही दीर्घसूत्रता, ज्ञानी लोकांचा सहवास न करणें, आलस्य, इंद्रियाधीन होणें, प्रयोजनाचें एकटेंच बसून चिंतन करणें, विपरीतदर्शी लोकांबरोबर गुप्त मंत्र करणें, निश्चित अर्थाचा आरंभ न करणें, आपला संकेत गुप्त न ठेवणें, उत्सव, देवपूजा इत्यादिकांचें अनुष्ठान न करणें व एकाच वेळीं सर्व शत्रूंवर चाल करणें, हे चवदा दोष आहेत.

हे धर्मराजा, तूं अघरहित आहेस ना ! येथें अघ म्हणजे पराजयाचें मूळ. तें वीस प्रकारचें सांगितलें आहे. १ बाल, २ वृद्ध, ३ दीर्घ रोगी, ४ ज्ञातिबहिष्कृत, ५ भीरु, ६ ज्याचे अमात्यादि भीरु आहेत असा, ७ लोभी, ८ ज्याचे अमात्यादि लोभी आहेत असा, ९ ज्याची प्रजा व अमात्यादि अनुरक्त नाहींत असा, १० विषयासक्त, ११ ज्याचें चित्त चंचल व संकेत अनिश्चित आहे असा, १२ देव व ब्राह्मण यांची निंदा करणारा, १३ दुर्दैवी, १४ दैवाचेंच चिंतन करणारा, १५ दुर्भिक्ष व व्यसनें यांनीं युक्त, १६ ज्याचें सैन्य राजकार्याविषयीं विरक्त झालें आहे असा, १७ प्रतिकूल प्रदेशीं स्थित असलेला, १८ ज्याला अनेक शत्रु आहेत असा, १९ ज्याला काल अनुकूल नाहीं असा आणि २० सत्य व धर्म यांनीं रहित, अशा वीस प्रकारच्या अघयुक्त शत्रूंशीं संधि केव्हांहि करूं नये, तर युद्धच करावें.

आपल्या विशाल बुद्धीनें 'या शत्रूंशीं संधि करावा कीं नाहीं ! तो करूं लागल्यास सिद्ध होईल किंवा नाहीं ! जरी सिद्ध झाला तरी परिणामीं हितकर होईल कीं नाहीं, ' यांचा चांगला विचार करूनच संधि करण्यास प्रवृत्त व्हावें. आपले चार शत्रूच्या राष्ट्रांत पाठवून त्याचें व आपलें साम्य आहे, कीं तो आपल्याहून हीन आहे कीं आपण त्याहून हीन आहों, याचा विचार करावा.

शत्रूचा व आपला १ देश, २ दुर्ग, ३ रथ, ४ हत्ती, ५ अश्व, ६ शूर योद्धे, ७ देशपाल, ८ दुर्गपाल, व ९ सेनापति असे तीन अधिकारी, १० अंतःपुर, ११ अन्न, अश्व, रथ व धनादि यांची संख्या, १२ जमा व खर्च, यांच्या निर्णयासाठीं त्यांचें लेखन, १३ धन पुरेसें आहे कीं अपुरें आहे, याचा विचार व १४ मद्याप्रमाणें अपकार करणारे गुप्त शत्रु, यांचा नित्य विचार करावा.

यास्तव हे राजा, तूं आपलें प्राबल्य व शत्रूंचें दौर्बल्य यांचें चांगलें परीक्षण करूनच राज्य चालवितोस ना ! व त्यांत कांहीं न्यूनत्व भासल्यास सर्व जयाचें मूळ जो कोश त्याच्या वृद्धीसाठीं शत्रूशीं साम करून १ कृषि, २ वाणिज्य, ३ दुर्ग, ४ सेतु, ५ हत्तींचा विभाग, ६ रत्नादिकांच्या खाणी, ७ सुवर्णादिकांचे आकर, ८ शून्यप्रदेश वसविणें, हे आठ उपाय योजितोस ना ! हत्ती हा प्राणी बहुभक्षक असल्यामुळें त्यास भिन्न भिन्न ग्रामाध्यक्षांकडे विभागून द्यावें व प्रत्येक ग्रामानें आपल्या ऐपतीप्रमाणें एक, दोन, दहा इत्यादि हत्तींचें पोषण करावें. यालाच कुंजरबंधन म्हणतात.

कृष्यादिकांनीं कोशाची वृद्धि होते, हें प्रसिद्धच आहे. १ स्वामी, २ अमात्य, ३ सुहृद्, ४ कोश, ५ राष्ट्र, ६ दुर्ग व ७ सैन्य हीं सात राज्यांगें, याच सात प्रकृति आहेत. त्यांतील १ दुर्गाध्यक्ष, २ चतुरंग सैन्याला आहारादि देऊन त्याचें पालन करणारा बलाध्यक्ष, ३ धर्माध्यक्ष, ४ समरांगणांत सैन्य नेणारा चमूपति, ५ पुरोहित, ६ वैद्य व ७ ज्योतिषी, अशी सातप्रकारची स्वामिरूप प्रकृति आहे. यांतील अमात्य म्हणजे मंत्री व सुहृद् म्हणजे न्याय व अन्याय यांचा विभाग करणारा न्यायाधीश.

हे राजा, ही तुझी सात प्रकारची प्रकृति शत्रूंनीं मोहित तर केली नाहींना! कारण यांतील जर कोणी एखादाहि लोभानें शत्रूला अनुकूल झाला तर त्याच्या अधीन असलेल्या दुर्गादिकांचा नाश होतो. किंवा ते अतिशय आढ्य संपन्नाभिमानी झाल्यास द्यूत, पान इत्यादि व्यसनांत आसक्त होतात. धन, मान इत्यादिकांनीं हृष्ट झालेला दृप्त होतो. दृप्त पुरुष धर्माचें अतिक्रमण करितो व धर्माचें उल्लंघन केल्यामुळें पाप करितो, असा नियम[1] आहे. यास्तव तुझ्या प्रकृतींतील कोणीहि स्वतःला आढ्य समजत नाहींना! कारण त्यामुळेंहि कोशादिकांची वृद्धि होणार नाहीं. युधिष्ठिरा, ही साती प्रकारची प्रकृति राजावर अत्यंत अनुरक्त व स्वामिकार्याविषयीं दक्ष असावी.

युधिष्ठिरा, दुर्गाध्यक्षादि स्वामिप्रकृतीला शत्रूनें धन-दानादि उपायांनीं स्वाधीन करून घेतल्यास ते आपल्या स्वामीच्या विरुद्ध वर्तन करूं लागतात व त्यामुळें राज्याच्या नाशाला कारण होतात, हें प्रसिद्धच आहे. पण अमात्य व सुहृद् हे लोभी झाल्यास राजकार्याचा नाश कसा होतो म्हणून विचारशील तर सांगतों— ते मंत्रभेद करून राजकार्याचा विघात करितात. यास्तव हे नृपाला, ज्यांच्याविषयीं तुझ्या मनांत कधीं शंकाहि येत नाहीं, अशा बाह्यतः सुहृदांप्रमाणें दिसणाऱ्या पण आंतून शत्रूला मिळालेल्या दूतांकडून तुझा मंत्र शत्रूला कळविला जात नाहींना! कारण हे अशाप्रकारचे दूत स्वामी व त्याचा शत्रु या दोघांकडून वेतन घेतात व स्वामिकार्याचा नाश करितात.

तसेंच, तूं स्वतः कृत्रिम मित्राला आपला मंत्र सांगून त्याच्या भेदाला कारण होत नाहींस ना? तुझे कृतक अमात्य तुझा मंत्रभेद करीत नाहींत ना? मित्र, उदासीन व शत्रु यांचें चिकिर्षित कर्तव्य तूं बरोबर जाणतोस ना? मित्राची योग्य

१ हृष्टो दृप्यति, दृप्तो धर्ममतिक्रामति। धर्मातिक्रमात्पापं करोति॥

परीक्षा करून त्याच्याशीं संकेत करावा व त्याच्या संमतीनें बलवान् शत्रूशीं मैत्री आणि दुर्बलाशीं विग्रह करावा. मध्यम, उभयतांकडून वेतन घेणारा व उदासीन राजांशीं साम्यानें वर्तन करावें. तूं तसेंच करतोस ना? हे वीरा, तूं आपल्या सारखेच शुद्ध आचारानें युक्त, कुलीन, अनुभवी, प्रेमळ व संकेत करण्यास योग्य असेच मंत्री नियत केले आहेस ना? कारण राजाचा विजय उत्तम मंत्र्या-वर अवलंबून असतो.

बा युधिष्ठिरा, शास्त्रज्ञ व सर्व मंत्र गुप्त ठेवणाऱ्या अमात्यांनीं उत्तम रीतीनें रक्षण केलेल्या तुझ्या राष्ट्रांत शत्रु कधीं क्षोभ उत्पन्न करीत नाहींत ना! तूं निद्रावश होऊन अकालीं शयन करीत नाहींस ना! रात्रीं विहितकालीं शयन करून पहाटे ब्राह्म मुहूर्तावर उठून आदल्या दिवशीं अमात्यादिकांशीं केलेल्या संकेताचा पुनः विचार करतोस ना! कारण त्या वेळीं विचारपूर्वक केलेला निर्णय निश्चित फल देतो.

राजा, तूं एकटाच बसून किंवा अनेकांसह कांहीं संकेत करीत नाहींस ना! कारण कोणताहि गुप्त संकेत दोघांनीं मिळून करावा अशी नीति आहे. तूं आप्त मंत्र्याबरोबर केलेला मंत्र षट्कर्णी होऊन तो राष्ट्रभर पसरत नाहीं ना! अल्प व्ययानें विपुल फल देणाऱ्या अर्थप्राप्तीच्या उपायांचा निश्चय करून तूं तत्काल त्यांचा आरंभ करितोस ना!

कृषि, वाणिज्य, इत्यादि करणाऱ्या लोकांना कधीं विघ्न करीत नाहींस ना! कारण त्यांच्या पासूनहि कराच्या रूपानें कोशवृद्धि होत असते. कृष्यादि कर्मानें बद्ध झालेले कृषीवलादि तुला अज्ञात नसतात ना! तसेच ते विश्वासार्ह आहेत ना! त्यांना पुनः पुनः सोडून पुनः पुनः त्यांचा संग्रह करीत नाहींस ना! कारण फार दिवसांपासून वहिवाटलेले व त्यामुळेंच विश्वास व स्नेह यांस पात्र झालेले कृषीवलादिकच महाफल देणाऱ्या कर्मसिद्धीचें कारण होतात. यास्तव अशाच लोकांचा संग्रह करावा. कृषीवलादि धनोत्पादक लोक आप्त, परंपरागत व अलोभी असावे. तुझे सर्व कर्मकर तसेच आहेत ना!

राजानें आपला मंत्र गुप्त ठेवणें जितकें अवश्य आहे, तितकेंच त्याचें कर्महि गुप्त राहिलें पाहिजे. यास्तव हे वीर राजा, तूं आरंभिलेलीं कार्यें सिद्ध झाल्या-वरच किंवा निदान जवळ जवळ सिद्ध झाल्यावरच लोकांना कळतात ना? तुझें कोणतेंहि कर्म आरंभापूर्वींच कोणाला कळत नाहींना? धर्म व सर्व शास्त्रें

यांमध्यें विशारद असलेले कृप-द्रोणांसारखे आचार्य तुझ्या कुमारांना व मुख्य योद्ध्यांना शिक्षण देऊन सर्व प्रकारें समर्थ करितात ना? तूं प्रसंगीं हजारों मूर्खांचा त्याग करून एका पंडिताचा संग्रह करितोस ना? कारण अर्थनाशाचा प्रसंग आला असतां पंडित परम कल्याण करूं शकतो.

हे राजा, तुझे सर्व दुर्ग धन, धान्य, आयुधें, उदक, यंत्रें, शिल्पी व धनुर्धर यांनीं परिपूर्ण आहेत ना? बुद्धिमान्, शूर, जितेंद्रिय व विद्वान् असलेला एक अमात्यहि राजाला किंवा राजपुत्राला फार मोठें ऐश्वर्य प्राप्त करून देऊं शकतो. हे पांडवा, शत्रूंतील मंत्रिप्रभृति अठरा तीर्थें व स्वपक्षांतील पंधरा तीर्थें यांमध्यें एकमेकांना न ओळखणाऱ्या तीन तीन चारांनीं प्रवेश करून त्यांची वार्ता जाणतोस ना? मंत्री, पुरोहित, युवराज, सेनापति, द्वारपाल, अंतःपुराधिकारी, कारागृहाधिकारी, धनसंचय करणारा, कार्य व अकार्य यांमध्यें द्रव्याचा विनियोग करणारा, धर्मार्थकामांचा उपदेश करणारा, नगराध्यक्ष, नवीन कार्य उत्पन्न करणारा, धर्माध्यक्ष, सभाध्यक्ष, दंडपाल, दुर्गपाल, सीमापाल व वनपाल, हीं शत्रूंकडील अठरा तीर्थें असून यांतून मंत्री, युवराज व पुरोहित हे वगळले असतां आपल्याकडील पंधरा तीर्थें होतात.

युधिष्ठिरा, अशा शत्रुपक्षीय व स्वपक्षीय अधिकाऱ्यांचा भेद काढण्यासाठीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें पाखंडादि वेष धारण करून योजिलेल्या तीन्ही हेरांनीं एकसारखीच वार्ता सांगितल्यास ती खरी आहे, असें जाणावें आणि स्वप्रजांचें अनुरंजन करून व शत्रूच्या दुःखी प्रजेचें अभयदानादि उपायांनीं आनुकूल्य संपादन करून आपल्या राष्ट्राची वृद्धि करावी, असें नीतिशास्त्रज्ञांनीं सांगितलें आहे.

राजा, शत्रूच्या हेरांना तूं आपलीं छिद्रें कळूं देत नाहींस ना? सावधान चित्तानें सदा दक्ष राहून व सतत उद्योग करून तूं शत्रूंचीं सर्व रंध्रें सूक्ष्म दृष्टीनें जाणतोस ना?

हे पांडुपुत्रा, तुझा पुरोहित विनयसंपन्न, सत्कुलीन, बहुश्रुत, परगुणांमध्यें दोषारोप न करणारा, शिक्षित, शास्त्राची चर्चा करण्यांत कुशल व सर्वांच्या सत्कारास पात्र झालेला आहे ना? तो सरळ स्वभावाचा असून अग्निकार्यामध्यें

१ कच्चित्सहस्रैर्मूर्खाणामेकं क्रीणासि पंडितम् ।
पंडितो ह्यर्थकृच्छ्रेषु कुर्यान्निःश्रेयसं परम् ॥

तत्पर व विधिज्ञ आहे ना! हे राजा, अग्निकार्यामध्यें नियुक्त केलेला तुझा पुरोहित वेळोवेळीं केलेलें व करावयाचें हवन तुला निवेदन करितो ना?

तुझा दैवज्ञ—ज्योतिषी सामुद्रिक शास्त्रामध्यें सांगितल्याप्रमाणें अंगांची परीक्षा करण्यांत निष्णात आणि धूमकेतु, भूकंप व वामनेत्रस्फुरण इत्यादि दिव्य, भौम व शारीर असे सर्व भावी अशुभसूचक उत्पात जाणणारा आहे ना?

हे नृपते, सैन्यापत्यासारख्या महत्त्वाच्या कार्यामध्यें मुख्य भृत्यांची, आकर, कोश इत्यादिकांचें रक्षण करणें, यांसारख्या मध्यम कार्यामध्यें मध्यम भृत्यांची व कृष्यादिकांचें अवलोकन करणें, यांसारख्या गौण कार्यामध्यें हीन भृत्यांची योजना करितोस ना? युधिष्ठिरा, निष्कपट, पितृ-पितामहांच्या परंपरेनें प्राप्त झालेले, शुचि व श्रेष्ठ अमात्यांची मंत्रकार्यासारख्या श्रेष्ठ कार्यामध्यें योजना करितोस ना!

प्रजेला पीडा देऊन व तिला उग्र दंड करून धनादि संपादन करणें हें हिंस्र कर्म होय. त्याच्या योगानें सर्व प्रजा उद्विग्न होते. यास्तव तुझे मंत्री उग्र शासनानें सर्व राष्ट्राला पीडा देत नाहींत ना? ते प्रजेचें अनुशासन दयाळु अंतःकरणानें करितात ना? याज्ञिक पतिताची जशी अवज्ञा करितात, किंवा स्त्रिया स्वैराचरण करणाऱ्या भ्रष्ट पतीची अवज्ञा करितात, त्याप्रमाणें प्रजा उग्र दंड करणाऱ्या तुझी अवज्ञा करीत नाहीं ना?

तुझा सेनापति धन-मानादिकांनीं संतुष्ट, शूर, मतिमान्, धीर, शुचि, कुलीन, अनुरक्त व स्वकार्यामध्यें दक्ष आहे ना? तुझ्या सैन्याचे नेते सर्व युद्धांमध्यें विशारद, धीट, निष्कपट व पराक्रमी असून तूं त्यांचा सत्कारपूर्वक सन्मान करितोस ना? राजा, तूं आपल्या सैन्यांतील लोकांना प्रत्यहीं उचित भोजन व योग्य वेतन वेळच्या वेळीं देतोस ना? अन्नाची व वेतनाची नियत वेळ टळूं देत नाहींस ना? कारण योग्य वेळीं अन्न व वेतन न मिळाल्यास राजभृत्य दारिद्र्यामुळें स्वामीचा द्वेष करूं लागतात व भृत्यांच्या अप्रीतीमुळें फार मोठा अनर्थ उद्भवतो.

हे कौंतेया, मंत्र्यापासून पुढील सर्वेहि अधिकारी तुजवर अनुरक्त आहेत ना? ते सर्व कुलीन असून तुझ्या कार्यासाठीं प्रसंगीं प्राण देण्यासहि तयार आहेत ना? राजा, कामस्वभाव व त्यामुळेंच प्रसंगीं राजशासनाचेंहि उल्लंघन करणारा

असा एखादाच पुरुष संग्रामाला हितावह असलेले शूर, गजारोह, अश्वारोह व रथारोह, त्याचप्रमाणें पदाति, यांच्या कार्यांचें आपल्या इच्छेप्रमाणेंच अनुशासन करीत नाहीं ना? कारण या सर्वांचें आधिपत्य एकालाच दिल्यास तो एकटा शत्रूला मिळाला असतां सर्व नाश होण्याचा प्रसंग येतो. एखाद्या पुरुषानें मोठ्या पुरुषार्थानें महत्कार्य केल्यास त्याचा तूं सत्कार करितोस ना? व अशा भृत्याचें वेतन वाढवितोस ना? कारण राजानें नेहमीं कृतज्ञ असावें, असें नीतिशास्त्र सांगतें.

विद्याविनीत व ज्ञानविशारद लोकांचा दानादिकांच्या योगानें तू योग्य सत्कार करतोस ना? कारण राजानें गुणज्ञ असावें व ज्ञानदान करणाऱ्या श्रेष्ठांचा सत्कार करावा, अशी शास्त्राज्ञा आहे. भरतश्रेष्ठा, तुझ्या कार्यासाठीं समरांगणांत मरण पावलेल्या शूरांच्या स्त्री-पुत्रादिकांचें तूं भरण-पोषण करितोस ना? कारण त्यायोगें जीवंत असलेल्या वीरांचा राजावर विश्वास बसतो व तेहि प्रसंगीं राजकार्यासाठीं प्राण देण्यास तयार होतात. हे राजा, तूं भयानें शरण आलेल्या प्रत्येक मनुष्याचें किंवा क्षीण होऊन शरण आलेल्या व युद्धांत पराभूत झालेल्या शत्रूंचेंहि पुत्राप्रमाणें रक्षण करतोस ना?

युधिष्ठिरा, राजानें सर्व प्रजांची अनुकूलता संपादन करावी. कारण प्रजेची प्रीति हें एक विजयाचें मोठेंच साधन आहे. यास्तव माता व पिता सर्व अपत्यांवर जसें सारखें प्रेम करितात त्याप्रमाणें हे पृथ्वीपते, तूं पृथ्वींतील सर्व प्रजेवर समदृष्टि ठेवितोस ना? आपल्याविषयीं कोणाला शंका येईल असें वर्तन करीत नाहींस ना?

धर्मा, स्त्री, द्यूत, मृगया, मद्य, नृत्य, गीत, वृथा अटन, वाद्य, निंदा, व दिवानिद्रा हीं पुरुषाचीं दहा व्यसनें आहेत. राजा, आपला शत्रु यांतील अनेक व्यसनांनीं युक्त आहे, असें पाहून आणि मंत्र, कोश व भृत्य हें त्रिविध बल व प्रभुशक्ति, मंत्रशक्ति व उत्साहशक्ति अशा तीन शक्ति यांचा विचार करून तूं त्यावर वेगानें चाल करून जातोस ना? हे राजा, पार्ष्णिमूल, कृत्यनिश्चय व पराजय

---

१. पार्ष्णिग्राह म्ह० पृष्ठरक्षक; त्याच्यापासून बारा प्रकारचें मंडल मानलेलें आहे. विजयेच्छु राजाच्या अमात्य, राष्ट्र, दुर्ग, कोश व दंड-सैन्य, या पांच प्रकृति आहेत. जो या पांच प्रकृतींनीं युक्त, मोठ्या उत्साहानें व पराक्रमानें संपन्न, युद्धकलेंत अतिशय निष्णात व विजयेच्छु असतो, त्याला-विजिगीषु असें

**यांचें दैवज्ञादिकांच्या द्वारा विशेषतः ज्ञान करून घेऊन तूं योग्य कालीं शत्रूवर चाल करून जातोस ना?**

**हे महाराज, तूं सर्वांच्या पूर्वी आपल्या सैनिकांना वेतन देऊन परराष्ट्रांतील सेनापतींना, शत्रूंना न कळेल अशा गुप्त रीतीनें, त्यांच्या योग्यतेप्रमाणें उत्कृष्ट वस्तु देऊन अनुकूल करून घेतोस ना? हे पृथातनया, तूं अगोदर स्वतःलाच जिंकून व जितेंद्रिय होऊन अवधानशून्य व अजितेंद्रिय शत्रूंना जिंकण्याची इच्छा करितोस ना? राजा, शत्रूंवर चाल करून जाण्यापूर्वी तूं साम, दान व**

---

म्हणतात. विजिगीषु व शत्रु, त्या दोघांचे दोन मित्र व त्या मित्रांचे दोन मित्र, अशा या तीन जोड्या होतात. त्या क्रमानें पुढें असणें व विजिगीषूच्या मागें पृष्ठरक्षक, त्याला प्रोत्साहन देणारा आक्रंद व त्यांच्यावर अनुग्रह करणारे दोन आसार, असे शत्रू व विजिगीषु यांच्या मागें असलेले चौघे, मिळून दहा पुरुष होतात. विजिगीषु व शत्रु यांच्या बाजूला मध्यम असतो व या सर्वांच्या बाजूला उदासीन असतो. याप्रमाणें विजिगीषु १, शत्रु २, त्यांचे दोन मित्र ४, त्या मित्रांचे दोन मित्र ६, विजिगीषूच्या मागें असलेले पार्ष्णिग्राह व आक्रंद ८, त्यांवर अनुग्रह करणारे दोन आसार १०, मध्यम ११ व उदासीन १२, अशा बारा पुरुषांचें एक मंडल असून, त्या सर्वांस पार्ष्णिमूल असें म्हणतात.

२. ज्याला वेतन मिळालेलें नाहीं, पण जो लुब्ध आहे, मानी असून ज्याचा अवमान झाला आहे, जो स्वभावतःच क्रुद्ध असून निष्कारण कोपिवला गेला आहे व भीरु असून भिवविला गेला आहे, अशा शत्रुपक्षांतील चार प्रकारच्या लोकांचा त्यांचे इष्ट मनोरथ पूर्ण करून भेद करावा व आपल्या पक्षांतील अशा लोकांचें रक्षण करावें. नीतिशास्त्रांत हें राजाचें कृत्य म्ह० कर्तव्य सांगितलें आहे. यालाच कृत्यनिश्चय म्हणतात.

३. पूर्वोक्त स्त्री-द्यूतादि व्यसनें हीं पराजयाचीं कारणें आहेत. तीं परपक्षांत आहेत व स्वपक्षांत नाहींत, अशी विजिगीषूनें खात्री करून घ्यावी. यालाच मुळांत पराजय म्हटलें आहे. याशिवाय अग्नि, जल, व्याधि, दुर्भिक्ष व महामारी हें पांच प्रकारचें दैव व्यसन आणि अनियंत्रित लोक, चोर, शत्रु, राजाला प्रिय असलेले भृत्यादि व राजाचा लोभ या पांच कारणांनीं प्रजेला वाटणारें पांच प्रकारचें भय, हें पांच प्रकारचें मानुष व्यसन आहे. या व्यसनांचाहि शत्रुपक्ष व स्वपक्ष यांतील भाव व अभाव जाणून शत्रूवर चाल करावी.

भेद हे तीन उपाय चांगल्या पुरुषांच्या द्वारा यथाविधि योजून मगच दंडाला प्रवृत्त होतोस ना? कारण राजनीतींत पूर्वी सामादि गुणांचा यथाविधि उपयोग करून दंड या (चवथ्या) उपायावांचून शत्रु साध्य होण्यासारखा नाहीं, असा निश्चय झाल्यावर मग मात्र त्याची उपेक्षा करणें योग्य नाहीं, असें नीतिवेत्त्यांनीं सांगितलें आहे. चतुर्थ उपायसाध्य रिपूंशीं सान्त्ववृत्ति धारण करणें ही अनीति आहे.

हे प्रजापते, तूं स्वराज्यामध्यें अति विश्वसनीय व शूर सैनिकांना स्थापून व तें शत्रूला असाध्य करून मगच दंडाला प्रवृत्त होतोस ना? आणि एकदा दंड उचलल्यावर त्याला जिंकण्याची पराकाष्ठा करून त्याला जिंकतोस ना? राजा, शत्रूला जिंकल्यावर त्याचा समूल नाश न करितां दयार्द्र चित्तानें त्याचें रक्षण करावें अशी नीति आहे, तिला तूं अनुसरतोस ना? १ रथ, २ गज, ३ अश्व, ४ योद्धे, ५ पायदळ, ६ हेर, ७ युद्धप्रसंगीं पडेल तें काम करणारे भृत्य व ८ देशांतील मुख्य लोक हीं सैन्यांचीं आठ अंगें आहेत. १ अमात्य, सेनापति इत्यादि मूलभूत सैन्य, २ मित्राचें सैन्य, ३ भृत्यरूप सैन्य, व ४ अरण्यांत रहाणाऱ्या भिल्लादिकांचें सैन्य असें चार प्रकारचें सैन्य आहे. त्या सर्व सैन्यांसह तुझे सेनापति शत्रूचा उच्छेद करण्यास समर्थ आहेत ना? तुझ्या सेनापतींनीं पूर्वोक्त सर्व सैन्याला शत्रूशीं प्रतिकूल वर्तन कसें करावें, याचें शिक्षण दिलें आहे ना? राजा, परराष्ट्रांतील क्षेत्रामध्यें विपुल धान्य पिकलें असतां आपल्या सैन्याला अन्न अनायासानें मिळतें. अशा वेळीं शत्रूला सहज जिंकतां येतें, त्याचप्रमाणें परराष्ट्रांत जेव्हां दुष्काळ पडलेला असतो व लोक राजान्नावरच उपजीविका करितात तेव्हांहि शत्रु सुजय असतो. यास्तव अशा दोन्ही कालांकडे दुर्लक्ष न करितां तूं शत्रूंना युद्धांत पराभूत करितोस ना?

स्वराष्ट्राप्रमाणें परराष्ट्रांतहि तुझे अनेक विश्वासु अधिकारी ठिकठिकाणीं स्थित होऊन प्रजेला वश करणें, कर घेणें इत्यादि तुझीं कार्यें दक्षतेनें करितात ना व एकमेकांना अनुकूल होऊन परराष्ट्रांतून आलेल्या सेनापतिप्रभृति अधिकाऱ्यांचा पराभव करून स्वराष्ट्राचें व स्वतःचें रक्षण करितात ना? ते देशांतरीं उत्पन्न झालेले भक्ष्य पदार्थ, वस्त्रादि भोग्य पदार्थ, चंदन, अगरु, केशर, कस्तुरी इत्यादि अंगलेपनाचे पदार्थ व उत्तम धूपादि आघ्रेय पदार्थ तुझ्यासाठीं राखून ठेवितात ना?

राजा, तुझे अनन्य भक्त असलेले सेवक धनागार, धान्यागार, अश्वादिकांच्या पागा, नगरादिकांचीं द्वारें, आयुधागार व उत्पन्न यांची व्यवस्था उत्तम रीतीनें

ठेवितात ना? पाचकादि आंतर व सेनापत्यादि बाह्य भृत्यांपासून व पुत्र-अमात्यादि स्वकीयांपासून तूं अगोदर आपलें रक्षण करून मग त्यांचें परस्परांपासून रक्षण करितोस ना? राजा, तूं पूर्वाह्णसमयीं धर्माचरण करीत असतांना तुझे अधिकारी भृत्य तुझें पान, द्यूत, क्रीडा व स्त्रिया या व्यसनांमध्यें खर्च केलेल्या धनाचें निवेदन तुला करीत नाहींत ना? कारण त्यावेळीं तुझ्याजवळ शिष्ट पुरोहितादि असतात, त्यांच्या समक्ष तुझ्या अधिकाऱ्यांनीं त्याचें निवेदन केलें असतां तूं दुर्व्यसनांत आसक्त आहेस असें ते समजतील व तुझा त्याग करतील.

राजा, जेव्हां धान्याची समृद्धि असते, तेव्हां आपला कोश उत्पन्नाच्या तृतीयांशानें वाढवावा, जेव्हां मध्यम स्थिति असते, तेव्हां उत्पन्नाच्या द्वितीयांशानें व जेव्हां दुर्भिक्ष असते, तेव्हां उत्पन्नाच्या चतुर्थांशानें तो वाढवावा. कांहीं झालें तरी सतत कोशवृद्धि करावी. हे राजा, दैववशात् दारिद्र्य भोगीत असलेले आपले ज्ञातिबांधव, गुरु, वृद्ध, वैश्य, शिल्पी व आश्रित यांच्यावर तूं धन-धान्यांनीं वारंवार अनुग्रह करितोस ना?

हे भूपते, आय व व्यय लिहिण्यासाठीं नेमलेले तुझे सर्व गणक व लेखक प्रतिदिवशीं पूर्वाह्णीं तुझा जमा-खर्च तुला निवेदन करितात ना? आपल्या भिन्न भिन्न कार्यांमध्यें नेमलेल्या जुन्या, तुझें हित करण्याची इच्छा करणाऱ्या व त्यामुळेंच तुला प्रिय झालेल्या अधिकाऱ्यांना तूं त्यांचा अक्षम्य अपराध पाहिल्यावांचून कामावरून दूर करीत नाहींस ना? हे भारता, उत्तम, मध्यम व अधम पुरुषांना ओळखूनच मग तूं त्यांना अनुरूप कार्यांमध्यें नियुक्त करितोस ना ?

हे युधिष्ठिरा, तुझ्या कार्यांमध्यें लोभी, चोर, वैरी व अप्रौढ लोकांचा प्रवेश झालेला नाहीं ना? तुझा कोणताहि व्यवहार अशा लोकांच्या हातीं नाहीं ना? पांडुपुत्रा, चोर, लोभी, कुमार, स्त्रीप्राबल्य व स्वःत तूं, यांपासून तुझ्या राष्ट्राला पीडा होत नाहीं ना? तुझ्या देशांतील शेतकरी संतुष्ट आहेत ना?

हे भरतश्रेष्ठा, तुझ्या राष्ट्रांतील तळीं विस्तीर्ण व जलानें तुडुंब भरलेलीं असतात ना व तीं निरनिराळ्या भागांमध्यें आहेत ना? तुझ्या राष्ट्रांतील शेतकी केवळ वृष्टीवर अवलंबून नाहीं ना? शेतकऱ्यांचें अन्न व बीं-बियाणें कधीं नाहींसें होत नाहीं ना? तूं लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं त्यांना शेकडा एकोत्रा[1] व्याजानें

१ दरमहा दर शेंकडा एक रुपया व्याज देणें याला एकोत्रा म्हणतात.

ऋण देतोस ना? शेकडा दोन-तीनपासून दाम दुप्पटीपर्यंत ऋणकोपासून व्याज घेणें हा अधार्मिक धनकोचा व्यवसाय आहे. यास्तव तसें कधींहि करूं नये.

कृषि, वाणिज्य, पशुपालन व व्याजबट्टा अशी चार प्रकारची वार्ता आहे. तुझ्या राष्ट्रांतील चांगले लोकच ती करितात ना? कारण या चतुर्विध वार्तावृत्तीचा आश्रय करून राहिलेले लोक सुखी होतात. हे राजा, प्रत्येक गांवामध्यें सत्कर्में करणारे पांच पांच अधिकारी नेमावे. त्यांतील १ सर्व ग्रामाचा प्रशास्ता, २ प्रजांपासून राजांशभूत द्रव्य वसूल करून तें सर्व राजाला पोंचतें करणारा समाहर्ता, ३ प्रजा व समहर्ता यांची एकवाक्यता घडवून आणणारा संविधाता, ४ लेखक ५ साक्षी. हे पांची अधिकारी मोठे शूर व व्यवहारज्ञ असावे.

हे राजा, असे हे प्रतिग्रामांतील पांच पांच अधिकारी एकमतानें तुझें हित करितात ना? व तूं आपल्या देशांत अशीच व्यवस्था केली आहेस ना? तूं नगराच्या रक्षणासाठीं ग्राम नगराप्रमाणेंच शूर पुरुषांनीं अधिष्ठित केले आहेस ना? नगरें असंख्य शूर पुरुषांनीं युक्त आहेत ना? राजधानीला 'पुर' म्हणतात. त्यांत सर्वांपेक्षां अधिक शूर पुरुष आहेत ना?

राजा, जेथें शूद्रांची संख्या जास्त असते त्याला ग्राम, ज्या गांवांत बाजार असतो त्याला नगर व अरण्याच्या हद्दीवरील गांवांना प्रांत म्हणतात. असे सर्व ग्राम, नगरें व प्रांत सर्व धन-धान्यांचें निवेदन तुलाच करितात ना? प्रांताधिपानें आपल्या प्रांतांतील करादिकांचा वसूल घेऊन तो ग्रामाधिपाकडे पाठवावा. त्यानें सर्व ग्रामांच्या वसूलासह तो नगराधिपाकडे पाठवावा. त्यानें सर्व नगराधिपांच्या वसुलासह तो देशाधिपतीकडे पाठवावा व त्यानें देशाच्या वसूलासह तो सर्व साक्षात् राजाला निवेदन करावा, अशी नीति आहे.

समप्रदेशीं व दुर्गादि विषम प्रदेशीं असलेल्या नगरांमध्यें लुटालूट व मारहाण करीत फिरणाऱ्या चोरांना दंड करण्यासाठीं तुझा नगराध्यक्ष सैन्यासह त्यांचा पाठलाग करितो ना? तुझ्या राज्यांत चोर-व्याघ्रादि मानुष व अतिवृष्ट्यादि दैवी आपत्ति उद्भवून प्रजेला पीडा होत नाहीं ना?

तूं स्त्रियांचें सांत्वन व उत्तमप्रकारें रक्षण करितोस ना? त्यांच्या वचनावर विश्वास ठेवीत नाहींस ना? किंवा त्यांच्या पुढें आपला गुप्तसंकेत प्रकट करीत

---

१ कच्चित्स्त्रियः सांत्वयसि कच्चित्ताश्च सुरक्षिताः ।
कच्चिन्न श्रद्दधास्यासां कच्चिद्गुह्यं न भाषसे ॥

नाहींस ना ? राजा, एखादी अहितावह वार्ता ऐकून व तिच्या निवारणाचा पुष्कळसा विचार करूनहि तूं आपल्या अंतःपुरांतच विषयोपभोग घेत सुखानें शयन करीत नाहींस ना ?

नृपते, रात्रींच्या चार प्रहरांतील दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरीं शयन करून व चवथ्या प्रहरीं उठून तूं धर्म व अर्थ यांचें चिंतन करितोस ना ? हे युधिष्ठिरा, तूं प्रतिदिवशीं स्नानादि नित्य कर्मे आटोपून, गंधालंकारादिकांनीं भूषित होऊन सुंदर वेष धारण करून, मगच परक्या लोकांना भेटतोस ना ? योग्य कालीं उठून कालज्ञ मंत्र्यांबरोबर कर्तव्याचा संकेत करतोस ना ? हे शत्रुनाशका, रक्तवस्त्र परिधान करणारे व उत्तम प्रकारें अलंकृत झालेले सशस्त्र शूर लोक तुझ्या रक्षणासाठीं तुझ्या सभोंवार नेहमीं रहातात ना ?

हे प्रजानाथ, याचप्रमाणें तूं दंड्यलोकांशीं क्रूरतेनें व पूज्य लोकांशीं नम्रतेनें वागतोस ना ? प्रिय व अप्रिय यांना चांगल्या प्रकारें ओळखूनच त्यांच्याशीं व्यवहार करतोस ना ? हे पृथातनया, तूं आपल्या शारीर व्याधींचें औषधें व पथ्य भोजन यांनीं निवारण करितोस ना ! त्याचप्रमाणें मानस आधींचा वृद्धांच्या सहावासानें नित्य प्रतिकार करितोस ना ? हे भूपाला, तुझे वैद्य अष्टांगचिकित्सेंत विशारद, सुहृद् व अनुरक्त असून तुझ्या आरोग्याविषयीं सदा चिंता वहातात ना !

राजा, लोभानें, मोहानें किंवा मानानें तुझ्याकडे आलेले याचक, वृत्तिबंधामुळें क्षुब्धचित्त झालेले व शत्रु, यांची भेट घेण्याचें तूं कधीं टाळीत नाहींस ना ? कारण कांहीं राजे याचकांना कांहीं द्यावें लागेल म्हणून लोभानें त्यांना भेटत नाहींत; परंपरागत वृत्तीला प्रतिबंध झाल्यामुळें जे क्षुब्धचित्त होऊन आलेले असतात, त्यांना भेटल्यास त्यांची वृत्ति पुनः सुरू करावी लागेल या मोहानें त्यांस भेटत नाहींत व शत्रूला अभिमानानें भेटत नाहींत. पण तुझ्यासारख्या श्रेष्ठ राजानें तसें करूं नये. त्या सर्वांची भेट घेऊन त्यांचा मनोरथ पूर्ण करावा.

युधिष्ठिरा, लोभानें, मोहानें, विश्वासानें किंवा प्रणयानें तूं आपल्या आश्रितांच्या वृत्तीचा छेद करीत नाहींस ना ? तुझ्या शत्रूंनीं धन देऊन ज्यांचा भेद केला आहे, असे तुझ्या नगरांतील व राष्ट्रांतील लोक एकमत होऊन तुझ्याशीं विरोध करीत नाहींत ना ? ज्या दुर्बल शत्रूला तूं पूर्वी स्वबलानें अतिशय पीडिलें

आहेस, पण त्याचा नाश केला नाहींस, तोच कालांतरीं मंत्रानें किंवा मंत्र व बल यांनीं बलवान् होत नाहीं ना?

हे धर्मराजा, सर्व मुख्य मुख्य भूपाल तुजवर अनुरक्त आहेत ना! दान व मान यांच्या योगानें अनुकूल करून घेतलेले ते सर्व तुझ्या कार्यासाठीं प्राण देण्यास तयार असतात ना? विद्वान् ब्राह्मण व साधु यांच्या गुणांना अनुसरून तूं त्यांची शुभ व हितावह पूजा करितोस ना? अशा विद्वानांना तूं सतत स्वर्ग व मोक्ष देणारी विपुल दक्षिणा देतोस ना? पूर्वीच्या लोकांनीं आचरिलेल्या वेदमूलक धर्मामध्यें तूं नित्य तत्पर रहातोस ना? त्यांनीं ज्या वैदिक कर्माचें जसें अनुष्ठान केलें तसेंच तूंहि करतोस ना? म्हणजे परंपरेनें प्राप्त झालेलें धर्म-कार्य तूं कधीं टाळीत नाहींस ना? स्वाध्याय, सदाचार इत्यादि गुणांनीं युक्त असलेले ब्राह्मण तुझ्या गृहांत, तुझ्या समक्ष, दक्षिणेसह उत्तम प्रतीचें मिष्टान्न सेवन करितात ना?

हे राजा, तूं सावधान चित्तानें वाजपेय, पुंडरीक, इत्यादि सर्व ऋतु मोठ्या यत्नानें करितोस ना? युधिष्ठिरा, तुझ्या ज्ञातीचे लोक, गुरु, वृद्ध, देवता, तापस, पार वांधलेले ग्रामसूचक वृक्ष व विद्वान् ब्राह्मण, यांस तूं नमस्कार करितोस ना? हे निष्पाप राजा, तूं नीचांचा संताप व श्रेष्ठांचा क्रोध उत्पन्न करीत नाहींस ना? मंगल देणारा मंत्रादिवेत्ता पुरोहितादि तुझ्या समीप राहून नेहमीं स्वस्त्य-यन करतो ना? राजा, यावेळीं जी तुझी बुद्धि व वृत्ति आहे, तीच सर्वदा स्थिर असते ना? कारण ही बुद्धि व वृत्ति आयुष्य व यश वाढविणारी आणि धर्मार्थ-कामांचें यथार्थ ज्ञान करून देणारी आहे. या बुद्धीनें वागणाऱ्या राजाचें राष्ट्र दुःखी होत नाहीं, उलट तो राजा सर्व पृथ्वीला जिंकून परम सुखाचा अनुभव घेतो.

युधिष्ठिरा, एखाद्या श्रेष्ठ व विशुद्धचित्त पुरुषाकडून कांहीं निंद्य कर्म घड-ल्यास त्याच्या सर्व धन-धान्यादिकांचें हरण करावें अशी नीति आहे. कारण राजानें दंड केला असतां अपराधी निर्दोष होतो, असें शास्त्रवचन आहे. पण अशा रीतीनें ज्याला एकदा दंड केला आहे, अशा पुरुषाला तुझे मूर्ख अमात्य अधिक धनाच्या लोभानें पुनः दंड करीत नाहींत ना?

एखादा मनुष्य स्वभावतःच दुष्ट आहे व त्यानें चौर्यादि कर्म केलें, तर चोरादिकांचा शोध लावणाऱ्या तुझ्या भृत्यांनीं त्याला त्या चोरलेल्या द्रव्यासह धरलें असतां तुझे भृत्य द्रव्यलोभानें त्याला सोडीत नाहींत ना? एखाद्या

श्रीमान् किंवा धनहीन पुरुषाला दैववशात् ‘ बीजें कणिश-’न्यायानें अल्पावधींत विपुल संपत्ति मिळाल्यास तुझे अमात्य ‘ यानें चौर्यादि अमार्गानें हें धन मिळविलें आहे,’ असें नीच लोकांच्या सांण्यावरून समजत नाहींं ना ? कारण लोभी लोक परधनाच्या इच्छेनें त्यांच्यावर दोषारोप करून त्यांचें वित्त हरण करण्याची इच्छा करितात, हें प्रसिद्ध आहे.

राजा, पूर्वी मीं नास्तिक्यादि चौदा राजदोष सांगितले आहेत; त्यांना तूं नित्य वर्ज्य करतोस ना ? कारण दृढमूल झालेलेहि राजे या दोषांनीं नाश पावतात. तुझे वेद, धन, पत्नी व शास्त्राध्ययन सफल आहे ना ?

युधिष्ठिर—हे भगवन्, वेद सफल कसे होतात ? धन, भार्या आणि शास्त्राध्ययन हीं सफल कशीं होतात ?

नारद—हे राजा, अग्निहोत्र हें वेदाध्ययनाचें फल आहे. दान व भोग हें धनाचें फल आहे. विषयप्रीति व पुत्र हें भार्येचें फल आहे. शील व वृत्त हें शास्त्राध्ययनाचें फल आहे.

राजा जनमेजया, युधिष्ठिराच्या प्रश्नांचें असें उत्तर देऊन महातपस्वी नारदमुनि त्या धर्मात्म्याला पुनः विचारूं लागला. पांडवा, तुझे अधिकारी दूर देशाहून क्रय-विक्रयानें धन मिळविण्यासाठीं आलेल्या वैश्यांपासून विहित कर वसूल करितात ना ?

युधिष्ठिरा, तुझ्या नगरांतील व राष्ट्रांतील सन्मान्य पुरुष परदेशांतील वस्तु योग्य दरानें आणून त्यांचा तुझ्या राष्ट्रांत क्रय-विक्रय करितात ना ! ते दुसऱ्या व्यापाऱ्यांकडून फसले जाऊन तुझ्या राष्ट्रांतील लोकांना व तुलाहि दरामध्यें फसवीत नाहींत ना ? तूं वृद्धांचा धर्मार्थयुक्त उपदेश ऐकतोस ना ?

बा राजा, अर्थशास्त्रज्ञ व धर्मार्थवेत्ते यांच्याशीं नित्य संभाषण करावें व त्यांतील सर्व ग्राह्य अर्थाचें ग्रहण करावें. कृषीपासून उत्पन्न झालेलें आर्द्र व शुष्क धान्य, त्याचप्रमाणें गायींपासून उत्पन्न झालेलें दुग्ध व घृत तूं ब्राह्मणांना धर्मार्थ देतोस ना ? कारण अन्न व घृत यालाच मधु व सर्पी असें म्हणतात. तें

---

१ एका बीजापासून अनेक दाण्यांनीं युक्त असें कणीस उत्पन्न होतें, हें प्रसिद्ध आहे. याच न्यायानें एखाद्या भाग्यवानाला अकस्मात् विपुल धनादि प्राप्त होणेंहि शक्य आहे.

ब्राह्मणांचें प्रधान अन्न आहे. राजा, तूं शिल्पी लोकांना चार महिने पुरेल इतकें नियत अन्न व त्यांच्या धंद्याला उपयुक्त असलेली साधनसामग्री पुरवितोस ना?

हे प्रभो, तूं हत्ती, घोडे, रथ इत्यादिकांचें लक्षण, परीक्षा, चिकित्सा, औषध, उद्दीपन, मादन, इत्यादिकांचें प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथांतील सिद्धान्तभूत सूत्राख्य संक्षिप्त वाक्यांचा त्या त्या शास्त्रज्ञ आचार्यांपासून संग्रह करितोस ना! हे निष्पापा, तुझ्या मंदिरांत धनुर्वेदसूत्र, आग्नेयादि यंत्रसूत्र इत्यादिकांचें अध्ययन सतत चालतें ना? तुझे सर्व भृत्य नगराला हितावह होणारा व्यायामादि उद्यम सतत करितात ना? शत्रुनाशक मंत्रप्रयुक्त अस्त्रें, आभिचारिक विद्या व सर्व विषप्रयोग तुला विदित आहेत ना? तूं आपल्या सर्व राष्ट्राचें अग्नि, व्याघ्र, सर्प, रोग व राक्षस यांपासून रक्षण करितोस ना? अंध, मूक, पंगु, अंगहीन बांधव व जातिबहिष्कृत अन्नार्थी दीनजन यांचें पित्याप्रमाणें पालन-पोषण करितोस ना? हे धर्मज्ञा, तूं निद्रा, आलस्य, भय, क्रोध, मृदुत्व व दीर्घसूत्रता हे सहा अनर्थ वर्ज्य केले आहेस ना?

**वैशंपायन**—राजा जनमेजया, ब्राह्मणश्रेष्ठ नारदाचे हे सर्व प्रश्न शांतपणें ऐकून घेऊन कुरुकुलांतील श्रेष्ठ युधिष्ठिरराजा संतुष्ट झाला व त्या देवर्षीच्या चरणांवर मस्तक ठेवून त्यास म्हणाला—" हे ब्रह्मन्, तुझा हा प्रश्नरूप उपदेश ऐकून माझें ज्ञान फारच वाढलें आहे. मी यापुढें तुझ्या उपदेशाप्रमाणेंच आच-रण करीन."

हे पांडवेया, त्या देवर्षीला असें सांगून राजानें त्याच्या उपदेशाप्रमाणेंच वर्तन ठेविलें. त्यामुळें त्याला समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य प्राप्त झालें. शेवटीं नारद म्हणाला—" हे युधिष्ठिरा, जो राजा चातुवर्ण्याच्या रक्षणासाठीं असें वर्तन करितो, तो या लोकीं मोठ्या सुखानें कालक्रमण करून मरणोत्तर इंद्राच्या सलोकतेस प्राप्त होतो. २. २. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ राजाचा नारदाला ' असली सभा तूं कोठें पाहिली आहेस का?' असा प्रश्न. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, नारदाचें भाषण ऐकून धर्मराज युधिष्ठिरानें त्याचा सत्कार केला व त्याच्या आज्ञेनें त्यास म्हटलें—" हे भगवन्, तूं सांगि-तलेला धर्मनिश्चय न्याय्य व योग्य आहे. मी त्याप्रमाणें यथाशक्ति व यथा-

न्याय वागत आहें. परंतु पूर्वीच्या राजांनीं जसें आचरण केलें व जो सहेतुक व सफल न्याय्यमार्ग आखून दिला त्याचेंच अनुवर्तन करण्याची इच्छा करीत असूनहि आम्हीं त्या जितेंद्रिय महात्म्यांच्या सन्मार्गाला अनुसरण्यास समर्थ नाहीं."

जनमेजया, असें बोलून त्या धर्मात्म्या युधिष्ठिरानें देवर्षि नारदाच्या वचनाचें आदरानें ग्रहण केलें व क्षणभर विचार करून, सर्वलोकीं संचार करणाऱ्या नारद-मुनीस स्वस्थचित्तानें बसलेलें पाहून असा प्रश्न केला—"हे मुनिश्रेष्ठा, ब्रह्म-देवानें सृष्टीच्या पूर्वीं निर्मिलेल्या नानाविध अनेक लोकांत तूं मनोवेगानें सर्वदा संचार करीत असतोस, तेथें अशाप्रकारची किंवा याहून श्रेष्ठ सभा तूं पूर्वीं कोठें पाहिली आहेस का ? किंवा हे ब्रह्मन्, पुढें कोठें निर्माण होईल का, हें मला सांग."

हे राजन्, धर्मराजाचा हा प्रश्न ऐकून नारदानें हंसून मधुर वाणीनें त्याला म्हटलें—"हे युधिष्ठिरा, तुझ्या या रत्नमय सभेसारखी सभा या मानुषलोकीं मीं पूर्वीं कधीं पाहिली नव्हती व ऐकलीहि नव्हती. इतकेंच नव्हे तर बाबा, अशी अपूर्व सभा पुढेंहि कधीं होणार नाहीं. परंतु अशा दिव्य सभा देवलोकीं आहेत.

पितृराज यमाची, बुद्धिमान् वरुणाची, अमरेश्वर इंद्राची व कैलासनिवासी कुबेराची सभा मी तुला निवेदन करीन. त्याचप्रमाणें ब्रह्मदेवाच्या दिव्य सभेंत तर अविद्यादि क्लेश तन्निवासी जनांना पीडा देत नाहींत. यास्तव मी तुला त्या सभेचेंहि कथन करीन. त्या सभेंत सर्व लोकांतील विषयांची प्राप्ति केवळ संक-ल्पानें होते. कारण तेथें रंभा, उर्वशी, इत्यादि दिव्य व पितृ-मात्रादि मानुष भोगसाधनें संकल्पानेंच साध्य होतात. त्यामुळें ती सभा तेथें गेलेल्या उपास-कांच्या संकल्पाप्रमाणें नाना रूपें धारण करिते. ती सभा देव, पितृगण, साध्य, इंद्रियनिग्रही, यजन करणारे, विपुल दक्षिणा देऊन यज्ञ करणारे व स्वाध्याय-यज्ञ करणारे शांत मुनि यांनीं युक्त आहे. तुझी जर ऐकण्याची इच्छा असेल, तर मी त्या सर्व सभांचें वर्णन करीन."

हे भरतर्षभा, नारदाचें हें भाषण ऐकून बुद्धिमान् धर्मराज सर्व द्विजश्रेष्ठ व भ्राते यांसह हात जोडून म्हणाला—"हे देवर्षे, त्या सर्व सभांचें वर्णन ऐक-ण्याची आमची इच्छा आहे. त्या सभांचें द्रव्य कशा प्रकारचें आहे ? त्यांच

विस्तार व प्रमाण केवढें आहे? त्या सभांमध्यें पितामहाची उपासना कोण करितात? तसेंच, वरुण, यमराज, इंद्र व कुबेर यांच्या सभांमध्यें त्यांच्या परिचर्येंत कोण कोण असतात? हे ब्रह्मन्, तुझ्या मुखानें हें सर्व यथार्थ ऐकण्याची आमची उत्कट इच्छा आहे. त्याविषयीं आम्हांला अतिशय जिज्ञासा वाटत आहे, तरी तें सविस्तर कथन कर."

धर्मराजानें अशी विनंति केली असतां नारद म्हणाला—हे युधिष्ठिरा, त्या दिव्य सभांचें मी क्रमानें वर्णन करतों, तें तुम्ही ऐका. २. २. ६.

---

## अध्याय ७ वा.

### [ १ इंद्रसभेचें वर्णन. ]

( १ ) नारद—हे कुंतीपुत्रा, प्रथम मी इंद्रसभेचें वर्णन करितों, तें ऐक. विश्वकर्म्यानें मोठ्या यत्नानें निर्माण केलेली व सूर्यप्रभेप्रमाणें देदीप्यमान असलेली ती दिव्य सभा स्वतः शक्रानें त्याच्यापासून जिंकून घेतली. त्या सभेची लांबी दीडशें योजनें व रुंदी शंभर योजनें आहे. ती विमानाप्रमाणें आकाशगामिनी असून तिची उंची पांच योजनें आहे. ती जरा, शोक, अविद्यादि क्लेश व भय यांनीं रहित, शांत जनांनीं युक्त व कल्याणकारक आहे. ती विचित्र गृहें व सिंहासनें यांनीं युक्त, रम्य व दिव्य कल्पवृक्षांनीं सुशोभित झालेली आहे.

अहो पांडवांनो, अशा त्या रम्य सभेंतील श्रेष्ठ आसनावर महेंद्राणी शची, शोभा व लक्ष्मी यांसह तो अमरेंद्र विराजमान होतो. त्याचें अलौकिक शरीर दिव्य मुकुट व आरक्त बाहुभूषणें यांनीं शोभत असतें. त्यानें निर्मल वस्त्रें व चित्र-विचित्र माला धारण केलेल्या असतात. तो विनय, यश व कीर्ति यांनीं युक्त आहे. त्या महात्म्या देवराज शतक्रतूची गृहस्थ, देव, सिद्ध, देवर्षि, साध्य, देवगण व चकाकणारे मेघसमूह आपापल्या अनुचरांसह दिव्य रूप व अमूल्य अलंकार धारण करून नित्य उपासना करीत असतात.

त्याचप्रमाणें सर्व देवर्षिहि त्या सभेंत शक्राचा सत्कार करितात. ते सर्व ऋषि विकाररहित, निष्पाप व अग्नीसारखे तेजस्वी आहेत. हे धर्मराजा, त्यांतील कांहींजणांचीं नांवें मी सांगतों. तेजस्वी, सुखी व सोमयाग करणारे पराशर, पर्वत, सावर्ण गालव, शंख, लिखित, गौरशिरामुनि, क्रोधी दुर्वास, श्येन, दीर्घ-

तमामुनि, पवित्रपाणि, सावर्णि, याज्ञवल्क्य, भालुकि, उद्दालक, श्वेतकेतु, तांड्य व भांडायनि, हे महर्षि तेथें प्रामुख्यानें असतात. तसेंच हविष्मान्, गरिष्ठ, हरिश्चंद्रराजा, हृद्य, उदरशांडिल्य, पाराशर्य, कृषीवल, वातस्कंध, विशाख, विधाता, काल, करालदंत, त्वष्टा, विश्वकर्मा, तुंबुरु, आणि वायु व हुताशन भक्षण करणारे अयोनिज व योनिज अनेक महर्षि त्या लोकेशाच्या समीप बसलेले असतात.

सहदेव, सुनीथ, महातपस्वी वाल्मीकि, सत्यवक्ता शमीक, सत्यप्रतिज्ञ प्रचेता, मेधातिथि, वामदेव, पुलस्त्य, पुलह, क्रतु, मरुत्त, मरीचि, महातपस्वी स्थाणु, कक्षीवान्, गौतम, तार्क्ष्य, वैश्वानर, कालकवृक्षीय, आश्राव्य, हिरण्मय, संवर्त, देवहव्य, वीर्यवान्, विष्वक्सेन, कण्व, कात्यायन गार्ग्य, कौशिक, इत्यादि महात्मे आणि दिव्य जल, ओषधि, श्रद्धा, मेधा, सरस्वती, धर्म, अर्थ व काम यांच्या अभिमानी देवता, विद्युत्, जलवाही मेघ, गर्जना करणारे मेघ, पूर्व दिशा, यज्ञवाहक सत्तावीस अग्नि[1], अग्निषोम, इंद्राग्नि, मित्र, सविता, अर्यमा, भग, विश्वेदेव, साध्य, गुरु, शुक्र, विश्वावसु, चित्रसेन, सुमन, तरुण, यज्ञ, दक्षिणा, ग्रह, स्तोभ व यज्ञसंबंधीं मंत्र या सभेंत सशरीर अधिष्ठित आहेत.

त्याचप्रमाणें सुंदर अप्सरा व मनोहर गंधर्व नृत्य, गायन, वादन व विविध प्रकारचा हास्यविनोद, मंगलकारक स्तुति व पराक्रमाच्या कृत्यांचीं वर्णनें, यांच्या योगें त्या वृत्रासुरमर्दन शतक्रतु देवाराजाचें रंजन करीत असतात. तसेंच अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेले अनेक ब्रह्मर्षि, राजर्षि व देवर्षि पुष्पमालांनीं भूषित होऊन व विविध दिव्य विमानांत बसून ती सभा पहाण्यासाठीं जात-येत असतात. बृहस्पति व शुक्र हे तर नित्य तेथेंच राहतात. दुसरेहि अनेक दृढव्रत धारण करणारे, साक्षात् ब्रह्मदेवाप्रमाणें सामर्थ्यवान् व सुधाकराप्रमाणें प्रसन्न असलेले महात्मे भृगु व सप्तर्षि चंद्रासारख्या आह्लादकारक विमानांत बसून या सभेंत येत असतात. हे धर्मराजा, इंद्राची 'पुष्करमालिनी'-नांवाची सभा अशा प्रकारची आहे. आतां मी यमसभेचें वर्णन करितों, तें ऐक. २.२.७.

---

१ अंगिरा, दक्षिणाग्नि, गार्हपत्य, आहवनीय, निर्मथ्य, वैद्युत, शूर, संवर्त, लौकिक, जाटर, विषग, क्रव्याद, क्षेमवान्, वैष्णव, दस्युमान्, बलद, शांत, पुष्ट, विभावसु, ज्योतिष्मान्, भरत, भद्र, स्विष्टकृत, वसुमान्, क्रतु, सोम व पितृमान् हे सत्तावीस अग्नि आहेत.

## अध्याय ८ वा.

[ १ यमराजाच्या सभेचें वर्णन. ]

( १ ) नारद्—हे पृथापुत्रा, मी आतां वैवस्वत यमराजाच्या सभेचें वर्णन करणार आहें. ती सभा विश्वकर्म्यानें निर्माण केली आहे. त्या सभेचा विस्तार शंभर चौरस योजनें आहे. ती इंद्रसभेहूनहि अधिक तेजस्वी आहे. ती सूर्याप्रमाणें सर्वतः प्रकाशत असते. तेथें केवळ संकल्पानेंच सर्व वस्तु प्राप्त होतात. ती अति उष्ण नाहीं किंवा अति शीतहि नाहीं. ती मनाला प्रसन्न करणारी आहे. ती शोक, जरा, क्षुधा, पिपासा, दैन्य, ग्लानि इत्यादि सर्व अप्रिय विकारांनीं रहित आहे. तेथें कसलीहि प्रतिकूलता नाहीं. दिव्य व मानुष सर्व इष्ट विषय तेथें प्राप्त होतात. भक्ष्य, भोज्य, सुरस, मधुर, रुचकर, लेह्य व चोष्य पदार्थ, स्वादिष्ट पेयें, इत्यादि सर्व पदार्थ तेथें विपुल आहेत. यमसभेंतील कल्पवृक्ष इच्छिलेलें फळ देतात. तेथें मधुर उदकाचे उष्ण व शीतल जलाशय आहेत. त्या सभेंत पुण्यवान् राजर्षि व निष्पाप ब्रह्मर्षि वैवस्वत यमाची संतोषानें उपासना करीत असतात.

त्या सभेंत ययाति, नहुष, पूरु, मांधाता, सोमक, नृग, त्रसदस्यु, कृतवीर्य, श्रुतश्रवा, अरिष्टनेमि, सिद्ध, कृतवेग, कृति, निमि, प्रतर्दन, शिबि, मत्स्य, पृथुलाक्ष, बृहद्रथ, वार्त्त, मरुत्त, कुशिक, सांकाश्य, सांकृति ध्रुव, चतुरश्व, सदस्य, अर्मि, कार्तवीर्य, भरत, सुरथ, वसुनीथ, निशठ, नल, दिवोदास, सुमना, अंबरीप, भगीरथ, व्यश्व, सदश्व, वध्र्यश्व, पृथुवेग, पृथुश्रवा, पृषदश्व, वसुमना, क्षुप, रुपद्रु, वृषसेन, पुरुकुत्स, आर्ष्टिषेण, दिलीप, उशीनर, आशीनरि, पुंडरीक, शर्याति, शरभ, शुचि, अंग, अरिष्ट, वेन, दुष्यंत, सृंजय, जय, भांगासुरि, सुनीथ, निषध, वहीनर, करंधम, बाल्हिक, सुद्युम्न, मधु, एल, मरुत्त, कपोतरोमा, तृणक, सहदेव, अर्जुन, व्यश्व, साश्व, कृशाश्व, शशबिंदु, दाशरथि राम, लक्ष्मण, प्रतर्दन, अलर्क, कक्षसेन, गय, गौराश्व, जामदग्न्य परशुराम, नाभाग, सगर, भूरिद्युम्न, महाश्व, पृथ्वश्व, जनक, वैन्य, वारिसेन पुरुजित्, जनमेजय, ब्रह्मदत्त, त्रिगर्ति, उपरिचर, इंद्रद्युम्न, भीमजानु, गौरपृष्ठ, लय, पद्म, मुचकुंद, भूरिद्युम्न, प्रसेनजित्, अरिष्टनेमि, सुद्युम्न, पृथुलाश्व, अष्टक, शंभर शंभर मत्स्य, नीप व हय; एकशें एक धृतराष्ट्र, ऐंशी जनमेजय; शंभर शंभर ब्रह्मदत्त, वीरि व ईरि; दोनशें भीष्म, शंभर भीम व प्रतिविंध्य; गज, अश्व,

पलाशादिकांच्या अभिमानी देवता प्रत्येकीं शंभर आहेत. शांतनुराजा, हे युधिष्ठिरा, तुझा पिता पांडु, उशंगव, शतरथ, देवराज, जयद्रथ, मंत्र्यांसह राजर्षि वृषदर्भ आणि विपुल दक्षिणायुक्त अनेक अश्वमेध करून स्वर्गी गेलेले सहस्रावधि शशबिंदुप्रभृति पुण्यवान्, कीर्तिमान् व प्रख्यात असलेले असंख्य राजर्षि वैवस्वत यमाची उपासना करीत आहेत.

त्याचप्रमाणें अगस्त्य, मतंग, काल, मृत्यु, यज्ञ व योगसाधनें यांनीं सिद्ध होऊन परलोकीं गेलेले लोक, अग्निष्वात्त, फेनप, उष्मप, सुधावान्, बर्हिषद व इतर मूर्तिमंत पितर, संवत्सराद्यभिमानिनी देवता, भगवान् हव्यवाहन, विद्याविहीन कर्म करणारे व दक्षिणायनांत मृत्यु पावलेले मानव, प्राण्यांना यमलोकीं नेणारे दूत, शिंशप, पालाश, काश व कुश या यज्ञीय द्रव्यांच्या अभिमानिनी देवता, हीं सर्व मूर्तिमंत त्या यमधर्माच्या सभेंत असतात. हे व आणखीहि असंख्य सभासद त्या पितृराजाच्या सभेंत आहेत. त्या सर्वांचीं नांवें व कर्मे वर्णितां येणें शक्य नाहीं.

ती सभा पीडारहित व इच्छेप्रमाणें गमन करणारी आहे. विश्वकर्म्यानें दीर्घ काल तपश्चर्या करून ती सभा निर्माण केली. त्या सभेंत उग्रतपस्वी, व्रतस्थ, सत्यवक्ते, निष्काम कर्म करणारे शांत योगी, पुण्यकर्में करून शुद्ध व पावनचित्त झालेले, अशा पुण्यवानांचाच प्रवेश होतो. हे युधिष्ठिरा, त्या सर्व सभासदांच्या देहांची दिव्य कांति झळकत असते. ते निर्मल वस्त्रें परिधान करितात. त्यांच्या देहांवर चित्र-विचित्र बाहुभूषणें असून ते सुवासिक पुष्पमाला धारण करितात. त्यांच्या कानांत दिव्य कुंडलें असून ते पुण्यकर्माच्या बलानें रत्नजडित मुकुटांनीं भूषित झालेले असतात.

हे राजा, महात्म्या गंधर्वांचे संघ व अप्सरांचे गण गायन, वादन, नृत्य व हास्यविनोदादिक यांच्या योगें त्या यमराजाचें रंजन करितात. त्या सभेंत पवित्र सुगंध व मधुर ध्वनि सर्वत्र पसरलेला असतो. दिव्य पुष्पमाला तेथील सभासदांना आल्हाद देत असतात. तेथें असंख्य धर्मात्मे दिव्य देह धारण करून प्रसन्न चित्तानें धर्मराजाची परिचर्या करीत असतात. हे पांडुपुत्रा, महात्म्या यमराजाची सभा अशा प्रकारची आहे. आतां मी वरुणाच्या 'पुष्पमालिनी-' संज्ञक सभेचें वर्णन करितों, तें ऐक. २. २. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ वरुणाच्या सभेचें वर्णन. ]

( १ ) नारद्—हे कुंतीपुत्रा युधिष्ठिरा, वरुणाच्या दिव्य सभेची प्रभा अवर्णनीय आहे. ती यमसभेइतकीच विस्तीर्ण असून शुभ प्राकार व तोरणें यांनीं युक्त आहे. विश्वकर्म्यानें तिच्या अंतर्भागीं जलाचा संचय करून ती सभा निर्माण केली आहे. त्यामुळें तेथील दिव्य रत्नमय वृक्ष विपुल फलपुष्पें देत असतात. त्यांतील प्रदेश नील, पीत, शुभ्र, श्याम व रक्तवर्ण मंजिरीसमूह धारण करणाऱ्या व छत्राप्रमाणें वृक्षांच्या स्वरूपाला आच्छादित करणाऱ्या लतांनीं सुशोभित झाले आहेत. त्याचप्रमाणें त्या सभेंत अनेक प्रकारचे मंजुळ ध्वनि करणारे व चित्रविचित्र देह धारण करणारे असंख्य पक्षी वास करितात. ती वरुणाची आह्लादकारक सभा अति शीत नाहीं व अति उष्ण नाहीं. त्या सभेंत रम्य मंदिरें आहेत. तेथें दिव्य रत्नें, वस्त्रें व आभरणें यांनीं भूषित होऊन माध्वीसह वरुण अलौकिक सिंहासनावर विराजमान होतो.

हे धर्मराजा, त्या सभेंत द्वादश आदित्य दिव्य माला धारण करून व सुगंधी द्रव्यांची उटी लावून जलेश्वर वरुणाची उपासना करीत असतात. तसेच वासुकि, तक्षक, ऐरावत, कृष्ण, लोहित, पद्मचित्र, कंबल, अश्वतर, धृतराष्ट्र, बलाहक, मणिमान्, कुंडक, कर्कोटक, धनंजय, पाणिमान्, कुंडधार, प्रल्हाद, मुषिकाद, जनमेजय, पताकी, मंडली, फणावान् हे व दुसरेहि अनेक सर्प क्लेशरहित होऊन त्या महात्म्या वरुणाच्या सेवेंत तत्पर असतात.

हे कौंतेया, त्याचप्रमाणें तेथें विरोचनाचा पुत्र बलि, पृथ्वीला जिंकणारा नरकासुर, संऱ्हाद, विप्रचित्ति, कालखंज, सुहनु, दुर्मुख, शंख, सुमना, सुमति, घटोदर, महापार्श्व, क्रथन, पिठर, विश्वरूप, स्वरूप, विरूप, महाशिरा, दशग्रीव, वाली, मेघवासा, दशावर, टिट्टिभ, विटभूत, इंद्रतापन हे सर्व दैत्य व दानवांचे संघ कानांत तेजस्वी कुंडलें, मस्तकांवर रत्नजडित मुकुट व गळयांत सुंदर पुष्पमाला धारण करून व उंची वस्त्रांनीं भूषित होऊन पाशधर वरुणदेवाची परिचर्या करीत असतात. त्या सर्वांना वर मिळालेले असल्यामुळें ते शूर दानव मृत्युरहित होऊन दृढ व्रत आचरितात.

हे पांडुनंदना, याशिवाय त्या सभेंत चार समुद्र, भागीरथी, कालिंदी, विदिशा, वेणा, वेगवाहिनी, नर्मदा, विपाशा, शतद्रु, चंद्रभागा, सरस्वती,

इरावती, वितस्ता, सिंधु, देवनदी, गोदावरी, कृष्णवेणा, कावेरी, किंपुना, विशल्या, वैतरणी, तृतीया, ज्येष्ठिला, महानद शोणं, चर्मण्वती, महानदी पर्णाशा, सरयु, वारवत्या, सरिद्वरा लांगली, करतोया, आत्रेयी, महानद लौहित्य, लंघती, गोमती, संध्या, त्रिस्रोतसी या व आणखीहि पुष्कळ प्रसिद्ध नद्या, सरोवरें, तीर्थें, कूप, झरे, डबकीं, तळीं, दिशा, पृथ्वी व पर्वत देह धारण करून वरुणाच्या समीप असतात.

सर्व जलचर त्या जलाधीशाची सेवा करीत असतात. गंधर्व व अप्सरांचे गण गायन-वादनादिकांच्या योगें वरुणाची स्तुति करीत असतात. मूर्तिमंत रत्नमय पर्वत व रस त्या सभेंत बसून रम्य कथा सांगत असतात. वरुणाचा मंत्री सुनाभ आपल्या पुत्र-पौत्रांसमवेत व 'गो'-नांवाच्या नागासह त्या महात्म्याची उपासना करीत असतो. त्या सभेंत हे सर्व देह धारण करून त्या जलाधिपतीचें रंजन करितात. अशी ही वरुणाची रम्य सभा मीं पूर्वीं जात येत असतां पाहिली आहे. आतां कुबेराच्या सभेचें वर्णन ऐक. २. २. ९.

---

## अध्याय १० वा.

[ १ कुबेराच्या सभेचें वर्णन. ]

(१) नारद—हे राजश्रेष्ठा धर्मा, वैश्रवणाच्या या सभेची लांबी शंभर योजनें व रुंदी सत्तर योजनें आहे. तिची प्रभा धवल आहे. कुबेरानें स्वतः आपल्या तपःसामर्थ्यानें ही सभा जिंकून घेतली. कैलासशिखराप्रमाणें शुभ्र असलेल्या या सभेच्या तेजापुढें चंद्रप्रभाहि फिकी पडते. गुह्यक या सभेला उचलून नेऊं लागले म्हणजे ती आकाशाशीं जणुंकाय संलग्नच झाली आहे कीं काय असें भासतें. त्या सभेंतील दिव्य व उंच सुवर्ण प्रासाद चित्र-विचित्र अमूल्य रत्नांनीं युक्त आहेत. तेथें मनोरम सुगंध पसरलेला असतो, शुभ्र मेघांप्रमाणें असणारीं शिखरें अंतरिक्षांत तरंगत असल्याप्रमाणें भासतात. तेथें काढलेलीं सोनेरी दिव्य चित्रें विद्युल्लतेप्रमाणें शोभतात.

भारतांनो, अशा त्या अपूर्व सभेंत विचित्र वस्त्रें व भूषणें परिधान करून व तेजस्वी कुंडलें धारण करून श्रीमान् राजा कुबेर आपल्या सहस्र स्त्रियांसह श्रेष्ठ आसनावर विराजमान होतो. तें सिंहासन सूर्याप्रमाणें तेजस्वी असून दिव्य वस्त्रानें आच्छादिलेलें आहे व त्याच्या पायऱ्या मऊ व उंची उश्यांनीं युक्त

आहेत. मंदार वृक्षांच्या श्रेष्ठ उपवनांना हलविणारा व सौगंधिक वनांतील सुगंध घेऊन येणारा वायु त्या सभेंत सर्वत्र वहातो. ‘अलका’-नांवाच्या नलिनीचा व नंदनवनाचा चित्ताकर्षक सुगंध वाहून आणणारा शीत व आल्हादक वायु त्या कुबेराची नित्य सेवा करितो. तेथें अप्सरा व गंधर्व यांच्या समूहासह देव दिव्य ताना घेऊन गात असतात.

मिश्रकेशी, रंभा, शुचिस्मिता, चित्रसेना, घृताची, मेनका, पुंजिकस्थला, विश्वाची, सहजन्या, प्रम्लोचा, उर्वशी, इरा, वर्गा, सौरभेयी, समीची, बुद्बुदा, लता इत्यादि गायन-वादनविशारद असंख्य अप्सरा व गंधर्व त्या सभेंत कुबेराची उपासना करीत असतात. गंधर्व व अप्सरा यांचीं अश्रुतपूर्व वाद्यें, नृत्य व गीत यांनीं गजबजलेली ती धनाध्यक्ष कुबेराची सभा सर्वदा रमणीय दिसते. तेथें ‘किन्नर’ व ‘नर’-नांवाचे गंधर्व, मणिभद्र, धनद, श्वेतभद्र, गुह्यक, कशेरक, गंडकंडु, प्रद्योत, कुस्तुंबरु, पिशाच, गजकर्ण, विशालक, वराहकर्ण, ताम्रौष्ठ, फलकक्ष, फलोदक, हंसचूड, शिखावर्त, हेमनेत्र, बिभीषण, पुष्पानन, पिंगलक, शोणितोद, प्रवालक, वृक्षवास्यनिकेत, चीरवास, इत्यादि सहस्रावधि यक्ष असतात.

हे राजेंद्रा, भगवती लक्ष्मी त्या सभेंत सदैव वास करीत असते व कुबेरपुत्र नलकुबेरहि तेथें निरंतर रहातो. मी व माझ्यासारखे अनेक देवर्षि व ब्रह्मर्षि त्या सभेंत असतात. तसेच क्रव्याद असुर व महाबलाढ्य गंधर्व त्या महात्म्या धनेश्वराची सेवा करीत असतात.

हे धर्मा, त्या सभेंत भगवान् पशुपति अविद्यादि क्लेशरहित देवी उमेसह आपला मित्र जो धनाधिप कुबेर त्याच्या समीप बसलेला असतो. त्या महादेवाच्या सभोंवार त्याचे ठेंगु, उंच, भयंकर शब्द करणारे, मेद-मांसभक्षक, नानाप्रकारचीं शस्त्रें धारण करणारे सहस्रावधि भूतगण बसलेले असतात. त्याचप्रमाणें असंख्य गंधर्वपति आपापल्या परिवारासह तेथें रहातात. विश्वावसु, हाहा, हूहू, तुंबुरु, पर्वत, शैलूष, गीतज्ञ चित्रसेन, चित्ररथ व दुसरेहि अनेक गंधर्व धनेश्वराची परिचर्या करीत असतात. विद्याधराधिप चक्रधर्मा आपल्या अनुजांसह त्या प्रभूची सेवा करीत असतो. तसेच भगदत्तादि राजे, किन्नराधिपति द्रुम, राक्षसाधिपति महेंद्र, गंधमाधन व यक्ष, गंधर्व, राक्षस, यांसह बिभीषण आपला भ्राता जो कुबेर त्याची उपासना करीत असतो.

हे धर्मज्ञा, याशिवाय सशरीर हिमवान्, पारियात्र, विंध्य, कैलास, मंदर, मलय, दर्दुर, इंद्रकील, सुनाभ हे दिव्य पर्वत व मेरुपर्वतासह इतर सर्व नगराज महात्म्या, कुबेराच्या सेवेंत तत्पर असतात. त्याचप्रमाणें भगवान् नंदीश्वर, महाकाल, शंकुकर्णादि सर्व दिव्य पार्षद, व काष्ठ, कुटीमुख, दंती, तपोनिष्ठ विजय, डुरकण्या फोडणारा बलाढ्य श्वेत वृषभ, इतर राक्षस व पिशाच त्या सभेंत धनदाची उपासना करितात.

जेव्हां आपल्या पार्षदांसह भगवान् शंकर कुबेराच्या सभेंत येतो, तेव्हां कुबेरहि त्याला शिरसा प्रणाम करून त्या उमापतीच्या आज्ञेनें त्याच्या सन्निध बसतो. सर्व निधींमध्यें श्रेष्ठ असलेले शंख व पद्म इतर सर्व निधि बरोबर घेऊन त्या धनेश्वराची उपासना करितात. हे युधिष्ठिरा, अशा प्रकारची ही रमणीय सभा मीं अंतरिक्षांतून जात असतांना पाहिली. आतां पितामहाच्या सभेचें वर्णन करितों तें ऐक. २. २. १०.

---

## अध्याय ११ वा.

[ १ ब्रह्मदेवाच्या सभेचें वर्णन. ]

( १ ) नारद्—युधिष्ठिरा, मी आतां ब्रह्मसभेचें कथन करितों, तें ऐक. 'ती सभा अमुक एक प्रकारची आहे,' असें तिचें वर्णन करितां येणें शक्य नाहीं. पूर्वीं कृतयुगांत एकदा भगवान् आदित्य मानुषलोक पहाण्याच्या इच्छेनें मनुष्यरूप धारण करून स्वर्गांतून भूलोकीं येत असतां त्यानें मार्गांत पितामहाची ही सभा पाहिली. तेव्हां तिचें यथार्थ स्वरूप त्यानें मला सांगितलें. तो म्हणाला—"त्या दिव्य मानस सभेचें यथार्थ ज्ञान कोणालाहि होणें शक्य नाहीं. सर्व भूतांना मनोहर वाटणाऱ्या त्या सभेचा प्रभाव किती आहे, हें सांगतां येणें शक्य नाहीं."

हे धर्मराजा, त्या सभेचें असें अवर्णनीय स्वरूप ऐकून तिच्या दर्शनाच्या इच्छेनें मी त्या आदित्याला म्हणालों—"हे भगवन्, पितामहाची ती शुभ सभा पहावी, अशी मला उत्कट इच्छा झाली आहे. पण ती कोणत्या उपायानें पूर्ण होईल तें मला सांग. ज्या तपानें, कर्मानें किंवा औषधीनें, पापाचा नाश करणारी ही दिव्य सभा माझ्या दृष्टीं पडेल, तें साधन मला सांग."

राजा, माझें हें भाषण ऐकून तो सहस्ररश्मि दिवाकर म्हणाला—" हे ब्रह्मन्, तूं जितेंद्रिय होऊन सहस्र वर्षें हृदयस्थ ब्रह्माची उपासना जर करशील तर तुला त्या दिव्य सभेचें दर्शन घडेल." असें बोलून आदित्यानें मला तें सहस्र वार्षिक ब्रह्मव्रत सांगितलें. तेव्हां मीं हिमालयाच्या पृष्ठभागीं जाऊन तें महाव्रत आरंभिलें. एक सहस्र वर्षांनंतर महा सामर्थ्यवान् भगवान् आदित्य मला त्या ब्राह्मी सभेंत घेऊन गेला. त्या सभेंत प्रवेश करण्याचें द्वार शरीरांतील इडा या नांवाची सूर्यनाडी व देवांतील प्रत्यक्ष सूर्यच आहे. यास्तव त्यानें मला इडानाडीच्या व सूर्यमंडळाच्या द्वारा तेथें नेलें.

हे राजेंद्रा, ती सभा अमुक एका स्वरूपाची आहे, असा तिचा निर्देश करितां येणें शक्यच नाहीं. अंधकारांत पडलेली रज्जु जशी क्षणांत पुष्पमाला, क्षणांत सर्प तर लगेच दंड किंवा जलधारा असल्याप्रमाणें भासते, तशी ही सभा क्षणांत कैलास, तर क्षणांत वैकुंठ याप्रमाणें आपलें स्वरूप पालटत असलेली भासते. त्या सभेचा आकार किंवा विस्तारहि निश्चयानें सांगतां येत नाहीं.

खरोखर अशा प्रकारचें गूढ स्वरूप मीं पूर्वी कधींहि पाहिलें नव्हतें. तेथें अति उष्ण किंवा अति शीत नाहीं. ती सदैव सर्व सुखांनीं युक्त असून तेथें राहणारांस क्षुधा व तृषा यांची पीडा होत नाहीं व ग्लानिहि येत नाहीं. ती नाना आकाराची स्तंभरहित सभा चित्र-विचित्र रत्नांनीं बनविलेली आहे. ती अक्षय सभा अनेक देदीप्यमान पदार्थांनीं युक्त असल्यामुळें तिच्या स्वयंप्रकाशापुढें चंद्र, सूर्य व अग्नि यांचेंहि तेज दिपून जातें. तिची प्रभा स्वर्गलोकापर्यंत पसरत असल्यामुळें भास्कराचे प्रखर किरणहि निस्तेज दिसूं लागतात.

हे राजा, अशा त्या सभेंत बसून सर्व ऐश्वर्यसंपन्न ब्रह्मदेव आपल्या देवमायेच्या योगानें सर्वदा सृष्टि निर्माण करीत असतो. त्या प्रभूच्या सेवेंत दक्ष, प्रचेता, पुलह, मरीचि, कश्यप, भृगु, अत्रि, वसिष्ठ, गौतम, अंगिरा, पुलस्त्य, क्रतु, प्रऱ्हाद व कर्दम, हे प्रजापति तत्पर असतात. तसेंच अंगिरस, वालखिल्य, मरीचिप, मन, अंतरिक्ष, विद्या, वायु, तेज, जल, मही, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, प्रकृति, विकार व इतर काल, अदृष्ट इत्यादि भूमीचीं कारणें, अगस्त्य, मार्कंडेय, जमदग्नि, भरद्वाज, संवर्त, च्यवन, दुर्वास, ऋष्यशृंग, महातपस्वी योगाचार्य भगवान् सनत्कुमार, असित देवल, जैगीषव्य, ऋषभ, मणि, अष्टांग आयुर्वेद, नक्षत्रगणासह चंद्र, आदित्य, वायु, क्रतु, संकल्प व प्राण हे व दुसरेहि अनेक महाव्रतपरायण महात्मे त्या सभेंत मूर्तिमंत असतात. तेथें धर्म, अर्थ,

काम, हर्ष, द्वेष, तप व दम, गंधर्व व अप्सरा यांच्या समूहांसह येत असतात. सत्तावीस नक्षत्रें व सर्व लोकपाल ब्रह्मदेवाची उपासना करीत असतात.

त्याचप्रमाणें शुक्र, बृहस्पति, बुध, मंगळ, शनि, राहु, इत्यादि ग्रह, मंत्र, रथंतर साम, हरिमान् व वसुमान् इंद्र, आदित्य, इंद्रासह अग्नीषोम व इंद्राग्नि, मरुद्गण, विश्वकर्मा, अष्टावसु, सर्व पितृगण, हविर्द्रव्यें, ऋग्वेदादि चार वेद, सर्व शास्त्रें, इतिहास, आयुर्वेदादि उपवेद, वेदांगें, ग्रह, यज्ञ, सोम, सर्व देवता, सावित्री, अकार-उकारादि सप्तविध प्रणव, मेधा, धृति, श्रुति, प्रज्ञा, बुद्धि, यश, क्षमा, साममंत्र, स्तोत्रें, शस्त्रें, विविध गाथा, तर्कयुक्त भाष्यें, नानाप्रकारचीं नाटकें, काव्यें, कथा व आख्यायिका सांगणारे व इतरहि संकृत-प्राकृत विचित्र गद्यरूप वाङ्मय कथन करणारे आणि गुरूची उपासना करणारे पुण्यवान् पुरुष तेथें निरंतर रहातात.

तसेंच क्षण, लव, मुहूर्त, दिवस, रात्र, पक्ष, मास, सहा ऋतु, साठ संवत्सर, बारा पंचयुगें, दैव, पैत्र, ब्राह्म व मानुष असे चतुर्विध अहोरात्र, द्वादश राशिरूप दिव्य, नित्य, अक्षय व अव्यय कालचक्र आणि धर्मचक्र, अदिति, दिति, दनु, सुरसा, विनता, इरा, कालिका, सुरभी, देवी, सरमा, गौतमी, प्रभा, कद्रू, देवमाता, रुद्राणी, श्री, लक्ष्मी, भद्रा, षष्ठी, भूलोकीं आलेली पृथ्वीदेवी, ऱ्ही, स्वाहा, कीर्ति, सुरा, शची, पुष्टि, अरुंधती, संवृत्ति, आशा, नियति, सृष्टि, रति या व दुसऱ्याहि कित्येक देवी त्या प्रजापतीच्या समीप असतात.

आदित्य, वसु, रुद्र, मरुद्गण, अश्विनिकुमार, विश्वेदेव, साध्य, मनोवेगानें जाणारे पितर, वैराज व सप्त पितृगण, त्यांतील अग्निष्वात्त, गार्हपत्य व नाकचर हे तीन आणि सोमप, एकश्रृंग, चतुर्वेद व कल हे चारी वर्णांस पूज्य असलेले चौघे, मिळून या सात पितृगणांस तृप्त केलें असतां चंद्राची वृद्धि होते, असे हे सर्व त्या अलौकिक तेजस्वी ब्रह्मदेवाची मोठ्या संतोषानें उपासना करीत असतात.

तसेच राक्षस, पिशाच, दानव, गुह्यक, नाग, पक्षी, पशु, स्थावर-जंगम भूतें, अमरेश्वर पुरंदर, वरुण, कुबेर, यम व उमेसह महादेव हे सर्वदा तेथें येत असतात. महासेन षडानन सदैव पितामहाच्या सन्निध असतो. नारायण म्हणजे शुद्ध आत्माहि तेथेंच प्राप्त होतो. देवर्षि वालखिल्य, योनिज व अयोनिज मुनि त्या सभेंत असतात. हे धर्मराजा, या त्रिभुवनांत जेवढ्या स्थावर-जंगम वस्तु दृष्टीं पडतात, तेवढ्या सर्व त्या ब्रह्मसभेंत मीं सशरीर पाहिल्या. हे पांडवा, स्वर्गांत राहणारे ऐशीं हजार ऊर्ध्वरेते ऋषि व पन्नास हजार प्रजावान्

ऋषि इच्छेस येईल त्या वेळीं त्या सभेंत येऊन पितामहाला शिरसा वंदन करितात व परत जातात.

तेथें देव, दैत्य, नाग, विप्र, यक्ष, पक्षी, कालेय, गंधर्व अप्सरा, इत्यादि जे महाभाग अतिथि येतात, त्या सर्वांचा तो सर्व भूतांवर अनुग्रह करणारा, महाबुद्धिमान् लोकपितामह भगवान् ब्रह्मदेव यथायोग्य सत्कार करून त्यांना भोग्य पदार्थांनीं संतुष्ट करितो. याप्रमाणें त्या सभेंत सतत ये-जा चालत असल्यामुळें ती सदा सर्वकाळ गजबजलेली असते. ती ब्रह्मर्षींनीं युक्त असलेली दिव्य सभा अतिशय सुखप्रद आहे. ब्रह्मदेवाच्या श्रीनें म्हणजे शम, दम, तप, शौच इत्यादि संपत्तीनें देदीप्यमान होणारी ती क्लेशरहित सभा सदैव आपल्या तेजानें झळकत असते. बाबा धर्मा, तुझी ही सभा जशी मनुष्यलोकीं दुर्लभ आहे, तशीच पितामहाची ती सभा त्रैलोक्यांत दुर्लभ आहे. हे राजश्रेष्ठा, पूर्वी मीं देवलोकीं पाहिलेल्या सभा अशा अलौकिक आहेत, परंतु तुझी ही अपूर्व सभा मनुष्यलोकीं अतिशय श्रेष्ठ आहे, यांत शंका नाहीं. २. २. ११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ हरिश्चंद्राच्या इंद्रलोकनिवासाचें कारण. २ राजसूयासाठीं युधिष्ठिराला नारदाचें प्रोत्साहन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, याप्रमाणें देवर्षि नारदानें केलेलें त्या दिव्य सभांचें वर्णन ऐकल्यावर युधिष्ठिरानें त्याला असा प्रश्न केला—"भगवन्, वैवस्वताच्या सभेंत बहुतेक भूपाल असलेले तूं सांगितलेस. वरुणाच्या सभेंत प्रामुख्यानें नाग, दैत्य, नद्या व समुद्रादिक यांचेंच वर्णन केलेंस. कुबेराच्या सभेंत गुह्यक, राक्षस, गंधर्व, अप्सरा व वृषध्वज महादेव यांचा नामनिर्देश केलास, पितामहाच्या सभेंत महर्षि, देवांचा समूह व मूर्तिमंत शास्त्रें असतात, असें कथन केलेंस आणि इंद्रसभेंतील पार्षदांत विविध गंधर्वांसमवेत एकट्या राजा हरिश्चंद्राचाच उल्लेख केलास. यास्तव हे प्रभो, त्या राजश्रेष्ठानें कोणतें व्रत आचरिलें होतें कीं ज्याच्या बलानें तो सत्यप्रतिज्ञ यशस्वी राजा इंद्राशीं स्पर्धा करण्यास समर्थ झाला! हे महाभागा, पितृलोकीं गेलेला माझा पिता पांडु तूं तेथें पाहिलास! तो कशा स्थितींत आहे? तो तुझ्याशीं कांहीं बोलला काय? हे सुव्रता, तुझ्या मुखानें हें सर्व ऐकण्याची मला उत्कंठा लागली आहे, तरी मला तो समग्र वृत्तान्त निवेदन कर."

हे पारिक्षिता, हजार वर्षें तपश्चर्या केल्यानंतर प्राप्त होणाऱ्या ब्रह्मदेवाच्या सभेची उपेक्षा करून हरिश्चंद्रराजाला प्राप्त झालेल्या इंद्रसभेंत आपल्याला प्रवेश करतां येणें शक्य आहे, अशा हेतूनें युधिष्ठिर त्याचें साधन विचारीत आहे, हें जाणून नारदमुनीनें प्रथम हरिश्चंद्राचें वृत्त सांगण्यास आरंभ केला. तो म्हणाला—“हे राजेंद्रा, तूं हरिश्चंद्राविषयीं जें विचारीत आहेस तेंच मी तुला सांगतों. त्या बुद्धिमान् राजाचें माहात्म्य ऐक. सम्राट् हरिश्चंद्र महाबलाढ्य व अखिल पृथ्वीचा प्रभु होता. इतर सर्व नृपाल त्याच्या आज्ञेंत स्थित होते. त्यानें आपल्या एकाच सुवर्णभूषित विजयी रथांत बसून स्वतःच्या शस्त्रप्रतापानें जंबूद्वीप, कुशद्वीप, शाक, क्रौंच, शाल्मलि, गोमेद व पुष्कर हीं सात द्वीपें जिंकलीं आणि पर्वत व वनें यांसह समग्र पृथ्वी जिंकल्यावर त्यानें ‘राजसूय’-संज्ञक महायज्ञ आरंभिला. तेव्हां त्यानें आज्ञा करितांच सर्व भूपालांनीं त्यास विपुल धन दिलें व त्या यज्ञांत ते सर्व नृपाल ब्राह्मणांचे वाढपी झाले.

तो धर्मात्मा राजा याचक जेवढें धन मागत, त्याच्या पांचपटीनें अधिक द्रव्य त्यांना मोठ्या प्रीतीनें देत असे. चारी दिशांतील अनेक राष्ट्रांतून आलेले ब्राह्मण यज्ञसमाप्तीनंतर परत जाऊं लागले असतां त्यानें त्या सर्वांना नानाप्रकारचें धन व अनेक प्रकारचे भक्ष्य-भोज्य पदार्थ यांनीं तृप्त केलें. अमूल्य रत्नांच्या राशींनीं संतुष्ट झालेल्या ब्राह्मणांनीं त्यास ‘हा नृपश्रेष्ठ सर्व राजांहून अधिक तेजस्वी व यशस्वी आहे’ असे शुभ आशीर्वाद दिले. राजा युधिष्ठिरा, या कारणानें हजारों राजांपेक्षां हरिश्चंद्रराजा श्रेष्ठ आहे. त्या महाप्रतापी हरिश्चंद्राचा रायसूय महायज्ञ समाप्त झाल्यावर त्याला जेव्हां सार्वभौमपदावर अभिषिक्त केलें तेव्हां तो सम्राट् साम्राज्यावर अतिशय शोभला.

---

१ या पुढील सर्व अध्यायाचें परम तात्पर्य ‘इंद्रलोक प्राप्त करून देणारा राजसूय अति यत्नसाध्य असून तो सिद्ध झाल्यास मोठ्या अनर्थाला कारण होतो. यास्तव ब्रह्मसभा प्राप्त करून देणारें पूर्वोक्त ब्रह्मव्रतच करावें’ असें आहे व अवांतर तात्पर्य ‘भूमीचा भार हरण करण्यासाठीं ब्रह्मदेवाच्या प्रेरणेनें नारद सर्वसंहाराला कारण होणारा राजसूय यज्ञ युधिष्ठिराकडून करविण्याच्या हेतूनें धर्मराज व कृष्ण यांस उद्युक्त करितो,’ हें आहे.

२ येनेष्टं राजसूयेन मंडलस्येश्वरश्च यः । शास्ति यश्चाज्ञया राज्ञः स सम्राडिति शब्द्यते ॥ अर्थ—ज्यानें राजसूय यज्ञ केला आहे, जो मंडलेश्वर आहे व जो आपल्या आज्ञेंत सर्व राजांना वागवितो, तो सम्राट् होय.

हे पांडवा, जे भूपाल राजसूय महाक्रतूचें यजन करितात, ते सर्व नराधिप मरणोत्तर इंद्रलोकीं जाऊन तेथें इंद्राबरोबर सुखोपभोग घेत रहातात. राजा, जे वीर समरांगणांतून पळून न जातां धारातीर्थीं देह ठेवितात तेहि शूर योद्धे इंद्रलोकींचें सुख अनुभवितात. तीव्र तपश्चर्या करून देह सोडणारे तपस्वी महात्मेहि दिव्य तेजानें युक्त होऊन निरंतर इंद्रसभेंत झळकत असतात.

(२) राजा युधिष्ठिरा, हरिश्चंद्रराजाचें तें अलौकिक ऐश्वर्य पाहून तुझा पिता पांडुनृपति विस्मित झाला व मी मानुषलोकीं जाण्यास निघालों आहें, हें जाणून विनयपूर्वक मला म्हणाला—" हे देवर्षे, तूं भूलोकीं जात आहेस. तेथें युधिष्ठिराला सांग कीं, ' तूं पृथ्वी जिंकण्यास समर्थ आहेस व तुझे सर्व भ्राते तुझ्या अधीन आहेत. यास्तव तूं श्रेष्ठ राजसूय यज्ञ कर. तूं हा यज्ञ केल्यास मी तत्काल हरिश्चंद्राप्रमाणें या इंद्रसभेंत दीर्घकाल अतुल सुखाचा अनुभव घेईन. "

युधिष्ठिरा, पांडुराजाचें हें वचन ऐकून ' ठीक आहे, मी जेव्हां भूलोकीं जाईन तेव्हां तुझ्या पुत्राला हा संदेश अवश्य सांगेन ' असें मीं त्यास म्हटलें. यास्तव हे धर्मराजा, तूं आतां पित्याच्या आज्ञेप्रमाणें वागण्याचा संकल्प कर. त्यायोगें तूं आपल्या सर्व पूर्वजांसह इंद्राच्या सालोक्यास प्राप्त होशील. परंतु हे नृपश्रेष्ठ युधिष्ठिरा, या महाक्रतूमध्यें अनेक विघ्नें येत असतात. यज्ञाचा विध्वंस करणारे ब्रह्मराक्षस त्यांत सारखीं छिद्रें शोधीत असतात. या यज्ञनिमित्तानें युद्धें उद्भवतात व त्यांत क्षत्रिय व पृथ्वी यांचा क्षय होतो. किंवा इतर कांहीं तरी कारण घडून भयंकर नाश होतो. यास्तव हे राजेंद्रा, या सर्व गोष्टींचा चांगला विचार करून जें सर्वांना हितावह असेल तेंच कर.

राजा, तूं चातुर्वर्ण्याचें रक्षण करण्यांत निरंतर दक्ष रहा. आपल्या उत्कर्षासाठीं प्रयत्न करून ब्राह्मणांना धनादिकांनीं संतुष्ट कर. बा धर्मा, तूं विचारलेलें सर्व मीं तुला सविस्तर निवेदन केलें आहे. आतां मी तुझा निरोप घेऊन द्वारकेस जातों.

राजा, जनमेजया, याप्रमाणें नारदमुनि पांडवांना उपदेश करून आपल्या बरोबरच्या ऋषिगणांसह निघून गेला. देवर्षि नारदानें प्रयाण केल्यावर पृथापुत्र युधिष्ठिर त्या श्रेष्ठ राजसूय महायज्ञाविषयीं आपल्या भ्रात्यांसह विचार करूं लागला. २. २. १२.

येथें दुसरें लोकपालसभाख्यानपर्व समाप्त झालें.

---

# राजसूयारंभपर्व. ३.



## अध्याय १३ वा.

[ १ धर्मराजाच्या सुराज्याचें वर्णन. २ त्याचा राजसूयाविषयीं सुहृदांशीं संकेत. ३ जनार्दनाचें आगमन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतर्षभा, देवर्षीचें वचन ऐकून युधिष्ठिरानें एक दीर्घ निःश्वास सोडिला. राजसूय यज्ञाच्या विचारानें त्याच्या मनाला स्वास्थ्य मिळेना. महात्म्या राजर्षीचा तो महिमा ऐकून व त्यांनीं केलेल्या श्रेष्ठ क्रतूंच्या योगें त्यांस पुण्यलोकप्राप्ति झालेली पाहून आणि विशेषतः हरिश्चंद्रराजाचें अलौकिक वैभव लक्षांत आणून युधिष्ठिरानें राजसूय यज्ञ करण्याचें मनांत योजिलें. नंतर त्यानें सर्व सभासदांचा सत्कार केला असतां त्या सर्वांनीं धर्मराजाचा प्रतिसन्मान केला.

तेव्हां त्या कुरुश्रेष्ठ पुरुषर्षभानें राजसूय क्रतूविषयीं पुनः पुनः विचार करून तो श्रेष्ठ यज्ञ करण्याचा पूर्ण निश्चय केला. त्या बलाढ्य व वीर्यवान् युधिष्ठिरानें ज्यायोगें सर्व लोकांचें हित होईल अशा रीतीनें धर्माचाच पुनः विचार केला. त्या धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ युधिष्ठिरानें सर्व प्रजेवर अनुग्रह करून सर्वांचें पूर्णपणें हित केलें. त्यानें सर्वांना देणग्या दिल्या व कोप आणि मद यांचा त्याग केला. त्यावेळीं सर्वत्र 'धन्य धन्य धर्मराज' यावांचून दुसरा शब्द ऐकूं येत नव्हता. धर्मराजाच्या या उदार वृत्तीमुळें सर्व प्रजा त्यावर पित्याप्रमाणें विश्वास ठेवूं लागली. त्याला कोणीहि द्वेष्टा नसल्यामुळें त्यास 'अजातशत्रु' हें नांव प्राप्त झालें.

युधिष्ठिराचें प्रजावात्सल्य, भीमसेनाचें परिपालन, सव्यसाची अर्जुनाचा शत्रुनिग्रह, बुद्धिमान् सहदेवाचें धर्मशासन व नकुलाचें सर्वांविषयीं स्वाभाविक सौजन्य, या पांडवांच्या नैसर्गिक गुणांनीं त्यांचें राष्ट्र कलहशून्य झालें. प्रजा भयरहित होऊन आपल्या कर्तव्यांत सदैव तत्पर राहूं लागली.

त्याच्या राष्ट्रांत योग्य वेळीं पर्जन्य पडूं लागला. त्यामुळें सर्व देश संपन्न झाला. राजाच्या आनुकूल्यामुळें व्याजबट्टा, यज्ञिय पशु, शेती, व्यापार, इत्यादिकांची वृद्धि विशेष प्रकारें झाली. धर्मनिष्ठ पांडुपुत्र राज्य करीत असतां प्रजेच्या

दारिद्र्यामुळें करादिकांची थकलेली बाकी ऋण म्हणून लादणें, कराच्या वसुलीसाठीं प्रजेला पीडा देणें, रोग, अग्नि इत्यादि अनर्थ त्याच्या राष्ट्रांत केव्हांहि उद्भवले नाहींत. चोर, वंचक, राजांचा परस्परविरोध व राजाच्या मर्जींतील लोक यांपासून तेथें कोणतेंहि संकट उद्भवलें नाहीं.

राजाचें प्रिय करण्यास, धर्मकार्यांत त्याला साह्य करण्यास, राजद्रव्य वेळच्या वेळीं राजाला पोंचविण्यास, संधि-विग्रहादि सहाहि कर्मांमध्यें त्याचें सहकार्य करण्यास त्याचा समर्थ प्रजाजन नेहमीं तत्पर असे. फार काय, पण हे राजा जनमेजया, तुझा धार्मिक प्रपितामह राज्य करीत असतांना त्यास करभार देणारे इतर राजेहि त्याच्याशीं विरोध करीत नसत. त्यामुळें तो देश अतिशय उत्कर्ष पावला. तो राजा सर्वांवर समदृष्टि ठेवीत असल्यामुळें व सर्व गुणांनीं संपन्न आणि क्षमाशील असल्यामुळें दिव्य अन्न, वस्त्र, विहार, क्रीडा इत्यादिकांचा यथेच्छ उपभोग घेणाऱ्या लोकांनीं तें राष्ट्र अतिशय संपन्न झालें. यशस्वी युधिष्ठिरराजा नीतिशिक्षणादि पितृकार्य व वात्सल्यादि मातृकार्य संपादन करीत असल्यामुळें दश-दिशांतील ब्राह्मणादि सर्व बाळगोपाळ प्रजा त्यावर अनुरक्त झाली.

(२) हे जनमेजया, त्यानंतर धर्मराजानें आपले मंत्री व बंधु यांना बोलावून राजसूययज्ञाविषयीं त्यांचा पुनः पुनः विचार घेतला. तेव्हां ते सर्व मंत्री यज्ञ करण्याची इच्छा करणाऱ्या महाबुद्धिमान् युधिष्ठिराला म्हणाले—"हे राजश्रेष्ठा, राज्याभिषेकानें ज्याला वारुणगुण प्राप्त झाले आहेत तो राजा सर्व सम्राड्गुणांचीहि इच्छा करूं लागतो. तूं सम्राड्गुणांनीं युक्त आहेस. त्यामुळें आतां तुझ्या राजसूयाचा समय प्राप्त झाला आहे, असें आम्हां सर्व सुहृदांना वाटतें. ज्या यज्ञांत व्रतस्थ होत्यांकडून सामपंत्रांनीं अग्निस्थापनार्थ सहा स्थंडिलें स्थापिलीं जातात, त्या यज्ञास अवश्य असलेल्या क्षत्रियसंपत्तीनें तूं युक्त आहेस. तो याग अग्निहोत्रादि इष्टि, पशु, सोम या सर्व यागांस व्यापितो. कारण राजसूय याग सर्व यागांचा समुदायच आहे. या यागाच्या शेवटीं जें अवभृथस्नान विहित आहे, त्याचें 'सर्वजित्व' हें फल सांगितलें आहे, यास्तव या राजसूयाला 'सर्वजित्' असेंहि म्हणतात. हे महाबाहो, तूं हा यज्ञ करण्यास समर्थ आहेस व आम्ही सर्व तुला अनुकूल आहों. तुझा राजसूय तुला सत्वर सफल होईल. यास्तव आतां अधिक विचार न करितां या श्रेष्ठ यज्ञाचा संकल्प कर."

याप्रमाणें त्याच्या सर्व सुहृदांनीं त्याला एकत्र व पृथक् पृथक् सांगितलें. हे राजा, त्यांचें हें धर्म्य, प्रगल्भ, इष्ट व श्रेष्ठ वचन ऐकून धर्मराजानें त्याचा बराच विचार केला. सुहृदांचें हें वचन आपल्याला अनुकूल आहे व आपणहि राजसूय याग करण्यास समर्थ आहों, असें जाणून त्या पृथ्वीपतीनें आपल्या मनांत राजसूयाचा निश्चय केला आणि तो कसा घडवून आणावा, याविषयीं आपले भ्राते, महात्मे ऋत्विज, मंत्री, धौम्य, द्वैपायन इत्यादि ऋषि यांसह संकेत करावयास आरंभ केला. तो मंत्रवेत्ता बुद्धिमान् युधिष्ठिर त्यांस म्हणाला— "सम्राट्पदाची पात्रता देणाऱ्या श्रेष्ठ राजसूययज्ञाची मला उत्कट इच्छा झाली आहे. माझा आपल्यावर पूर्ण विश्वास आहे, यास्तव माझी इच्छा पूर्ण कशी होईल तें मला सांगा."

हे कमलनयनराजा, युधिष्ठिरानें असा प्रश्न केला असतां महात्मे ऋत्विज व ऋषि त्यास म्हणाले—"हे धर्मज्ञा, तूं राजसूय महाक्रतु करण्यास सर्वथा योग्य आहेस. तूं तो याग अवश्य संपादन कर."

तें ऐकून राजाचे मंत्री व भ्राते यांनींहि त्यांच्या म्हणण्यास सत्कारपूर्वक अनुमोदन दिलें. त्यामुळें ज्याचा उत्साह वाढला आहे, अशा बुद्धिमान् व जितेंद्रिय युधिष्ठिरानें लोकहिताच्या दृष्टीनें स्वतःशींच आणखी विचार केला. भ्रात्यांच्या साहाय्यानें सर्व पृथ्वीला जिंकण्याचें आपलें सामर्थ्य, आय-व्यय व देशकाल, यांचा चांगला विचार केला. कारण आपल्या विवेकबुद्धीनें या सर्वांचा विचार करणारा बुद्धिमान् केव्हांहि पश्चात्ताप पावत नाहीं, हें त्याला अवगत होतें. यज्ञसमारंभ केवल आपल्या एकट्याच्याच निश्चयानें पार पडत नसतो, हें जाणून यत्नतः कार्य आरंभण्यापूर्वीं जनार्दन श्रीकृष्णाच्या विचारानें निश्चय केला पाहिजे, असें जाणून युधिष्ठिरानें सर्व लोकांत श्रेष्ठ असलेल्या हरीचें मनानें चिंतन केलें.

त्या भगवानानें पूर्वीं देवांना संमत असलेलीं जीं अद्भुत कर्में केलीं होतीं, त्यांवरून 'हा अज, विभु व अप्रमेय परमात्माच मनुष्यांमध्यें महा पराक्रमी कृष्ण अवतरला आहे,' असें त्यानें तर्कानें जाणलें होतें. त्यानें स्वेच्छेनेंच हा मनुष्यदेह धारण केला आहे, त्यामुळें त्याला अज्ञात किंवा असाध्य असें कांहींच नाहीं, अशी त्याची दृढ समजूत होती. हा यादवेंद्र अशक्य गोष्टहि घडवून आणण्यास समर्थ आहे, असा युधिष्ठिराचा दृढ निश्चय असल्यामुळें त्यानें आपल्या गुरुप्रमाणें पूज्य असलेल्या त्या भूतगुरूला आणण्यासाठीं आपला दूत पाठविला.

(३) तो धर्मराजाचा विश्वासु दूत शीघ्र गमन करणाऱ्या रथानें यादवांच्या द्वारकानगरींत येऊन पोंचला व द्वारकानिवासी श्रीकृष्णाचें दर्शन घेऊन धर्मराजाचा संदेश त्यास निवेदन केला. 'पृथापुत्र युधिष्ठिराला आपल्या दर्शनाची अपेक्षा आहे,' हें ऐकतांच अच्युतहि युधिष्ठिराच्या दर्शनाकांक्षेनें त्या इंद्रसेन दूताबरोबरच इंद्रप्रस्थास यावयास निघाला. शीघ्र गमन करणाऱ्या रथांत बसून त्वरावान् जनार्दन थोड्याच अवकाशांत इंद्रप्रस्थास येऊन पोंचला व आपल्या दर्शनाविषयीं उत्सुक झालेल्या धर्माला भेटला.

तेव्हां भ्रात्या धर्मराजानें त्याचा सत्कार केला असतां कृष्णानेंहि पूज्य पित्याप्रमाणें त्याचा बहुमान केला. त्याच्या मागोमाग भीमाचा आदर करून मधुसूदन कुंतीला जाऊन भेटला. तिचा आशीर्वाद घेऊन प्रसन्नचित्त झालेल्या त्या यदुश्रेष्ठानें आपल्या प्रिय सुहृद् अर्जुनाला दृढ आलिंगन दिलें. नकुल-सहदेवांनीं त्याची गुरूप्रमाणें उपासना केली. नंतर तो द्वारकाधीश अर्जुनाच्या मंदिरांत कांहीं काल सुखानें राहिला. वासुदेव विश्रांति घेऊन स्वस्थचित्त झाला आहे, असें पाहून व समर्थ अच्युताला भेटण्यास हा योग्य अवसर आहे, असें जाणून युधिष्ठिर स्वतः त्याच्याकडे गेला व त्यानें आपलें प्रयोजन त्यास निवेदन केलें.

तो म्हणाला—हे जनार्दना, राजसूय यज्ञ करावा, अशी माझी इच्छा आहे. पण तो केवळ इच्छेनें साध्य होणें शक्य नाहीं. तो कसा साध्य होईल, हें तुला पूर्णपणें अवगत आहे. ज्याच्या ठिकाणीं ऐश्वर्यादि सर्व संभवतें, जो सर्वत्र पूज्य व सर्वेश्वर राजा आहे, तोच राजसूय यज्ञ करूं शकतो. माझे सर्व सुहृद् एकमतानें मला तो करावयास सांगत आहेत. पण तुझ्या समतीवांचून मला पूर्ण निश्चय करितां येत नाहीं.

हे कृष्णा, कांहीं लोक केवल प्रीतीमुळेंच एखाद्या कार्यांतील दोष सांगत नाहींत. दुसरे कित्येक स्वार्थासाठींच प्रिय बोलतात. कोणी ज्यांत आपलें हित असेल तेंच प्रिय आहे, असें समजून आपलें इष्ट साधितात. तात्पर्य कोणत्याहि महत्त्वाच्या कार्यांत असे विविध जनवाद प्रत्ययास येतात. पण तूं रागद्वेषरहित आहेस. मनांत स्वार्थबुद्धि ठेवून कांहीं सांगशील हें संभवतच नाहीं. वास्तव या लोकीं मला जें परम हितावह असेल तेंच तूं तत्त्वतः सांग. २. ३. १३.

---

१ केचिद्धि सौहृदादेव न दोषं परिचक्षते। स्वार्थहेतोस्तथैवान्ये प्रियमेव वदन्त्युत॥ प्रियमेव परीप्सन्ते केचिदात्मनि यद्धितम्। एवं प्रायाश्च दृश्यन्ते जनवादाः प्रयोजने॥

## अध्याय १४ वा.

[ १ कृष्णवचन. ]

( १ ) श्रीकृष्ण—हे युधिष्ठिरा, तूं यज्ञकर्त्याला अवश्य असलेल्या सर्व गुणांनीं युक्त आहेस. यास्तव तूं राजसूय याग अवश्य कर. सर्व राजांना जिंकलें असतां राजसूय यज्ञ करण्याचा अधिकार प्राप्त होतो. यास्तव [1]प्रधानमल्लनिबर्हणन्यायानें केवल एका बलाढ्य जरासंधराजाला जिंकल्यास सर्व राजे जिंकल्यासारखे होतील. धर्मा, तूं हें सर्व जाणतोसच. तथापि मी तुला कांहीं सांगतों, तें ऐक.

हे पांडवा, पूर्वी जामदग्न्य परशुरामानें पृथ्वी निःक्षत्रिय करण्यासाठीं क्षत्रियांचा जेव्हां संहार केला, तेव्हां कांहीं क्षत्रिय पळून गेले व प्राणसंरक्षणासाठीं लपून राहिले. त्यामुळें पुढें त्यांच्या वंशजांच्या अंगीं तीव्र क्षात्रतेज उरलें नाहीं. ते नाममात्र क्षत्रिय राहिले. क्षत्रियांचें शौर्यादियुक्त कम करण्यास ते असमर्थ झाले. त्यामुळें हे वसुधाधिपा धर्मा, या सर्व दुर्बल राजांनीं 'जो पराक्रमी राजा आम्हां सर्व क्षत्रियांस जिंकील तो आम्हां सर्व राजांचा सम्राट् होईल.' असा संकल्प केला व तेव्हांपासून ते सर्व क्षत्रिय परतंत्र होऊन राहिले आहेत, हें तुला पूर्वजांच्या परंपरेनें ठाऊकच आहे.

राजा युधिष्ठिरा, पृथ्वीवरील हे सर्व राजे सांप्रत ऐल व इक्ष्वाकु या दोन प्रसिद्ध सोम व चंद्र-वंशांतील राजांचे मांडलिक होऊन, प्रजा जशी राजाला कर देते तसे त्यांस खंडणी देत असतात. बैल जसे दाव्यांनीं बांधावे तसे कांहीं भूपाल त्या सार्वभौमराजांच्या आज्ञेंत बद्ध होऊन राहिले आहेत.

हे अजातशत्रो, ऐल व इक्ष्वाकु यांच्या वंशाचीं शंभर कुलें झालीं. राजा ययाति हा ऐलांचाच वंशज होय. महा गुणवान् भोजराजेहि याच कुलांत झाले. ते ऐश्वर्यसंपन्न राजे चारी दिशेंत पसरले असून इतर नृपति त्यांच्या संपत्तीची इच्छा करीत असतात. पण अशाहि त्या भोजराजांना जरासंधानें स्वसामर्थ्यानें जिंकून त्यांची सर्व संपत्ति हरण केली आहे. त्या पराभूत झालेल्या सर्व क्षत्रियांनीं जरासंधाचें सार्वभौमत्व मान्य करून त्यास साम्राज्याभिषेक केला. राजा युधिष्ठिरा, जरासंधाच्या भीतीनें आम्ही मथुरा सोडून गेलों व द्वारका

---

१ मुख्य मल्लाला जिंकिलें असतां इतर सर्व मल्ल सहजच जिंकल्यासारखे होतात. हा प्रधानमल्लनिबर्हणन्याय होय.

वसविली. अद्यापिहि तो आम्हां सर्व श्रेष्ठ राजांना जिंकून स्वतःला सम्राट् मानीत आहे व आमच्याशीं वृथा वैर करीत आहे.

युधिष्ठिरा, जो नृप समर्थ असतो, तोच एक सर्व पृथ्वीला वश करून घेतो व साम्राज्य पदाला प्राप्त होतो. हे कौंतेया, शिशुपाल एवढा प्रतापी राजा! पण तोहि आज जरासंधाचा आश्रय करून त्याचा सेनापति झाला आहे! तसाच, मायेनें शत्रूला जिंकणारा महा बलाढ्य करूपाधिपति वक्र शिष्याप्रमाणें जरासंधाच्या आज्ञेंत रहात आहे.

त्याचप्रमाणें महा पराक्रमी महात्मे हंस व डिंभक हे दोघेहि त्याच्याच आश्रयानें राहिले होते. दंतवक्र, करूप, करभ, मस्तकावर अद्भुत दिव्यमणि धारण करणारा मेघवाहन, हे सर्व महापराक्रमी भूपाल जरासंधाच्या आज्ञेंत रहातात. पश्चिम दिशेंतील मुरु व नरक या दोन देशांवर वरुणाप्रमाणें अधिकार चालविणारा बलाढ्य यवनाधिपहि जरासंधाच्या अधीन होऊन राहिला आहे. हे धर्मा, तुझ्या पित्याचा परम मित्र वृद्ध भगदत्त तर वाणीनें व विशेषतः कर्मानेंहि जरासंधाचा शब्द झेलीत असतो.

युधिष्ठिरा, पृथ्वीच्या पश्चिम व दक्षिण भागांचा अधिपति, तुझ्यावर पित्याप्रमाणें लोभ व मनःपूर्वक स्नेह करणारा तुझा मातुल कुंतिभोज शूर पुरुजित्, हा एकच राजा काय तो तुझ्या पक्षाचा आहे. चेदिदेशांत 'पुरुषोत्तम' या नांवानें प्रसिद्ध असलेला पौंड्रकराजाहि जरासंधाच्याच पक्षाचा आहे. त्या दुर्बुद्धि पौंड्रकाला मीं पूर्वी मुद्दामच मारिलें नाहीं. तो माझीं सर्व चिह्नें धारण करून स्वतःला पुरुषोत्तम म्हणवितो आणि वंग, पुंड्र व किरात यांचा बलाढ्य राजा होऊन राहिला आहे. तो या लोकीं वासुदेव या नांवानेंच प्रसिद्ध आहे.

हे महाराज, या पृथ्वीच्या चौथ्या भागाचा राजा व इंद्राचा मित्र असा बलाढ्य भीष्मकहि जरासंधाच्या पक्षास मिळाला आहे. त्यानें आपली विद्या व बल यांच्या साह्यानें पांड्य व कृथकैशिक यांस जिंकलें आहे. त्याचा भ्राता आकृति हा जामदग्न्य रामासारखा शूर आहे. तथापि तो आपल्या सर्व परिवारासह जरासंधाच्या अंकित होऊन राहिला आहे. वस्तुतः तो आमचा श्वशुर आहे; तथापि प्रिय आचरण करणाऱ्या, नम्र, संबंधी व भक्त अशाहि आम्हांला प्रतिकूल होऊन तो नेहमीं आमचें अप्रिय करितो. आपलें कुल व बल यांचा विचार न करतां, जरासंधाच्या दीप्त यशाला भुलून तो त्या दुष्टाला जाऊन

मिळाला आहे. युधिष्ठिरा, उत्तर भोजांचीं अठरा कुळें या दुष्ट जरासंधाच्या भीतीनेंच पश्चिम दिशेंत जाऊन राहिलीं आहेत. शूरसेन, भद्रकार, बोध, शाल्व, पटच्चर, सुस्थल, सुकुट्ट, कुंतीसह कुलिंद, भ्राते व अनुचर यांसह शाल्वायन राजे, दक्षिण पंचाल, पूर्व कुंतिकोसल, मत्स्य व संन्यस्तपाद हे राजे जरासंधाच्या भीतीनें उत्तर दिशा सोडून दक्षिण दिशेचा आश्रय करून राहिले आहेत. तसेच सर्व पांचाल भीतीनें स्वराज्याचा त्याग करून दश-दिशांमध्यें मार्ग फुटेल तिकडे पळून गेले आहेत.

हे राजा, कांहीं दिवसांपूर्वीं कंसानें यादवांचा पराभव केला व त्या मूर्खानें बृहद्रथपुत्र जरासंधाच्या 'अस्ति' व 'प्राप्ति' या नांवांच्या दोन कन्यांशीं विवाह केला. त्या दोघी अबला सहदेवाच्या कनिष्ठ भगिनी होत. दुष्ट कंसानें स्वबलानें आपल्या आप्तांचा पराभव करून श्रेष्ठत्व संपादन केलें. त्यानें हा फारच मोठा अन्याय केला! तेव्हां दुरात्म्या कंसाकडून पीडिल्या जाणाऱ्या भोजवृद्धांनीं आपल्या ज्ञातीच्या रक्षणासाठीं आहुकाची सुंदर कन्या अक्रूराला देऊन आमच्या हातून कंसाचा वध व्हावा, अशी तीव्र इच्छा केली. पुढें संकर्षणाच्या साह्यानें मीं तें ज्ञातिकार्य केलें. आम्हीं दोघांनीं कंस व सुनामा या दोघांचा वध केला व त्यामुळें यादवांचें भय निवृत्त झालें.

युधिष्ठिरा, आम्हीं कंसाचा वध केल्यामुळें भोज निर्भय झाले हें खरें; पण इतक्यांत तिकडे जरासंध आमच्या विरुद्ध उठला. तेव्हां आतां आपण काय करावें, असा आम्हीं अठराहि राजकुलांना एकत्र जमवून विचार केला. त्यांत आम्हांला असें दिसून आलें कीं, आम्ही शत्रुनाशक महा-अस्त्रांनीं तीनशें वर्षांप्रमाणें दीर्घ वाटणारीं तीन वर्षे जरी शत्रूशीं युद्ध करीत राहिलों तरी त्याच्या सैन्याचा पूर्णपणें नाश करूं शकणार नाहीं. कारण देवांसारखे बलाढ्य, शस्त्रानें न मरणारे व एक सारखेच पराक्रमी असे त्याचे हंस व डिंभक या नांवाचे दोन मंत्री असून स्वतः जरासंधहि तितकाच वीर्यवान् आहे. हे तिघे तिन्ही लोकांना भारी आहेत, असें माझें व इतर शूर राजांचें ठाम मत होतें.

हे बुद्धिमानांतील श्रेष्ठ युधिष्ठिरा, पूर्वीं एकदा आमचीं अठराहि कुळें त्यांच्याशीं युद्ध करीत असतां जरासंधाच्यां सैन्यांत ' हंस ' या नांवाचा कोणी एक प्रख्यात राजा होता, तोच डिंभकाचा परम मित्र होय. त्याला बलरामानें त्या संग्रामांत मूर्छित केलें. तेव्हां तो मृत झाला असें समजून कोणी एका

विश्वासु मनुष्यानें ' बलरामाच्या हातून हंस मेला, ' असें डिंभकाला जाऊन सांगितलें. ती वार्ता ऐकतांच मित्रस्नेहानें व्याकुल झालेल्या डिंभकानें ' हंसावांचून मी या लोकीं जिवंत राहूं इच्छीत नाहीं ' असें म्हणून यमुनेंत उडी घेतली व तो मरून गेला. इकडे मूर्छित होऊन पडलेला हंस दीर्घकालानें सावध झाल्यावर त्याला डिंभकाच्या मृत्यूची वार्ता कळली. तेव्हां त्यानेंहि तत्क्षणीं यमुनाजलांत आपल्या देहाचें विसर्जन केलें. आपले महावीर व परम मित्र मंत्री अशा चमत्कारानें मरण पावल्याचें ऐकून जरासंधाला अतिशय दुःख झालें व तो शून्यमनानें आपल्या राजधानीस निघून गेला.

हे शत्रुनाशका भरतश्रेष्ठा, याप्रमाणें तो दुष्ट जरासंध परत गेला असतां आम्ही सर्व भोज व यादव मथुरेमध्यें राहूं लागलों. पण मागध जरासंधराजाची कन्या कंसभार्या पतीच्या मरणानें व्यथित होऊन पित्याकडे आली व ' हे तात, माझ्या पतीला मारणाऱ्या कृष्णाचा तूं वध कर ' असें त्याला पुनः पुनः सांगूं लागली.

तेव्हां आम्हीं अठरा राजकुलांनीं एकत्र बसून पूर्वीं सांगितलेला विचार आरंभिला. आम्हांला मथुरा सोडून जाणें आवडेना, पण पुढील अनर्थांकडे लक्ष देऊन हे महाराजा, आम्ही आपली फार मोठी संपत्ति घेऊन निरनिराळ्या मार्गांनीं पुत्र, मित्र, कलत्र व ज्ञातिबांधव यांसह जरासंधाच्या भीतीनें पळून गेलों. सर्वांनीं मिळून न जातां पृथक् पृथक् जावें, असा आम्हीं पूर्वींच संकेत केला होता. त्याप्रमाणें आम्ही सर्व पश्चिम दिशेकडे निघालों.

पश्चिम समुद्राच्या तीरावर रैवतपर्वतानें सुशोभित झालेली रम्य कुशस्थली नगरी आम्हीं पाहिली. हे राजा, आम्हीं त्या नगरींत वास केला व देवांनाहि अभेद्य असा दुर्ग तेथें निर्माण केला. तो इतका दृढ होता कीं, त्याचा आश्रय करून यादवांच्या स्त्रियाहि शत्रूंशीं युद्ध करतील, मग वृष्णिकुलोद्भव महारथांविषयीं काय बोलावें ! युधिष्ठिरा, आम्ही त्या पुराण नगरींत आतां निर्भयपणें रहात आहों.

राजवरा, रैवतकासारखा श्रेष्ठ पर्वत व ती नगरी, यांस पाहून व मागधराजापासून प्राप्त होणाऱ्या भीतीचेंहि निवारण झालें आहे, असें जाणून सर्व मधुकुलोत्पन्न यादव अतिशय संतुष्ट झाले. त्यामुळें कंसादिकांचा वध करून जरासंधाचा अपराध केला असतांहि आम्हीं तेथें निर्भयपणें राहूं लागलों. वस्तुतः

जरासंधाला मारणें आम्हांला अशक्य नव्हतें. तथापि तो आमचा आप्त आहे, यास्तव आमच्या हातून त्याचा नाश होऊं नये, या सद्बुद्धीनेंच जातिवंत विपुल गायींनीं युक्त असलेल्या रैवतपर्वताचा आम्हीं आश्रय केला.

हे वीरा, आम्ही तेथें गेल्यावर पुराण कुशस्थलीच्या जागीं जी द्वारका वसविली ती तीन योजनें लांब व एक योजन रुंद आहे. तिचे एकेक योजन लांबीचे तीन विभाग केले आहेत. प्रत्येक योजनावर शंभर शंभर द्वारें असून त्यावर वीरांच्या पराक्रमाचीं सूचक तोरणें उभारलीं आहेत. युद्धामध्यें प्रवीण असलेले अठरा क्षत्रियसमूह त्या द्वारकेंत शत्रूचा पराभव करण्यास अहर्निश सज्ज असतात.

आमच्या कुलांत अठरा हजार भ्राते आहेत. आहुकाचे शंभर पुत्र असून त्यांतील प्रत्येक देवतुल्य पराक्रमी आहे. भ्रात्यांसह चारुदेष्ण, चक्रदेव, सात्यकि, बलराम, सांब, प्रद्युम्न व मी श्रीकृष्ण असे आम्ही सात रथी आहोंत. कृतवर्मा, अनाधृष्टि, समीक, समितिंजय, कंक, शंकु व कुंति हे सात आणि वृद्ध अंधक-भोज व त्याचे दोन पुत्र मिळून एकंदर दहा महारथ आहेत. युधिष्ठिरा, वज्रा-सारखे दृढ देह धारण करणारे बलाढ्य यादववीर सांप्रत वृष्णींबरोबर द्वारकेंत जरी रहात आहेत, तरी त्यांना मथुरेचें स्मरण वारंवार होतें.

हे भरतर्षभा धर्मा, तूं सम्राटाच्या सर्व गुणांनीं युक्त आहेस. यास्तव तूं सर्व क्षत्रियांचा सार्वभौम राजा होण्यास योग्य आहेस. परंतु महाबलाढ्य जरासंध जिवंत असतांना तुझा राजसूय याग सिद्धीस जाणें शक्य नाहीं, असें माझें निश्चित मत आहे. हे राजा, मृगेंद्रानें बलाढ्य गजांना हिमालयाच्या गुहेंत जसें कोंडून ठेवावें, तसें या जरासंधानें सर्व थोर थोर भूपालांना गिरिव्रजांत बंदींत टाकिलें आहे व त्या सर्वांचा आतां लवकरच महादेवाला बलि अर्पण करण्याचा निश्चय केला आहे. त्या क्रूर नृपानें उग्र तपश्चर्येनें महात्म्या उमापतीला प्रसन्न करून घेतल्यामुळें त्याच्या प्रसादानेंच त्याला इतकें अतुल सामर्थ्य प्राप्त झालें आहे. त्यानें सैन्यांतील राजांना वारंवार जिंकून व आपल्या राजधानीस आणून, पशूच्या दावणीप्रमाणें, त्या क्षत्रियांची एक दावणच बांधून ठेविली आहे.

हे महाराज, आम्हीं त्या वेळीं जरासंधाच्या भयानें मथुरा सोडून द्वारकेचा आश्रय केला, म्हणूनच सुरक्षित राहिलों. यास्तव हे धर्मराजा, हा राजसूय यज्ञ करण्याची तुझी जर इच्छा असेल, तर तूं प्रथम जरासंधाच्या वधाचा व त्यानें

बंदींत टाकलेल्या सर्व क्षत्रियांना मुक्त करण्याचा निश्चय कर. हे बुद्धिमानांतील श्रेष्ठ पांडवा, हें कार्य केल्यावांचून तुझा राजसूय निर्विघ्नपणें पार पडणें शक्य नाहीं. हे निष्पापा, माझें मत हें असें आहे. यावर तुला जें कांहीं योग्य वाटत असेल तसा निश्चय करून मला सांग. २. ३. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ युधिष्ठिराची राजसूयाविषयीं निराशा. २ भीम व कृष्ण यांचें प्रोत्साहनपर भाषण. ]

( १ ) युधिष्ठिर—हे वासुदेवा, तूं मोठा बुद्धिमान् आहेस. तूं जें मला आज सांगितलेंस तें सांगण्यास दुसरा कोणीहि समर्थ नाहीं. हे मधुसूदना, या भूलोकीं तुजवांचून संशयाचा छेद करणारा दुसरा कोणीहि मला दिसत नाहीं. ठिकठिकाणीं अनेक राजे आहेत व ते आपापलें प्रियहि करीत असतात. पण त्यांतील एकहि साम्राज्याला प्राप्त झाला नाहीं. कारण 'सम्राट्' हा शब्द प्राप्त होणें फार कठिण आहे. दुसऱ्यांचा प्रभाव जाणणारा स्वतःची प्रशंसा करण्यास कसा समर्थ होईल ! जो दुसऱ्यांशीं संबद्ध होऊन, त्यानंतर प्रशंसनीय ठरतो, तोच पूज्य होतो.

हे कृष्णा, मनुष्याची भूमीप्रमाणें स्थिर असलेली चित्तवृत्ति 'मी हें करीन, मी तें करीन' इत्यादि अनेक संकल्पांनीं अनेक प्रकारची होते. प्रतिबंधशून्य असलेली ती दुष्प्राप्य ब्रह्मलोकाचीहि इच्छा करिते. असंख्य उत्तमोत्तम वासनांनीं व्याप्त असते. त्यामुळेंच मनुष्य आपलें बलाबल जाणत नाहीं. पण तो जेव्हां प्रत्यगात्मरूप बुद्धीच्या पराकाष्ठेला जाऊन पोंचतो, तेव्हांच त्याला मोक्षाख्य श्रेय प्राप्त होतें. त्यावांचून तें प्राप्त होत नाहीं. कारण मनुष्याचें चित्त स्वभावतःच असंख्य दुष्प्राप्य विषयांत आसक्त होतें[1].

---

१ "विशाला बहुला भूमिर्बहुरत्नसमाचिता । दूरं गत्वा विजानाति श्रेयो वृष्णिकुलोद्भव ॥" असा हा मूळ श्लोक असून प्राचीन टीकाकारांनीं तो मंत्रपर लाविलेला आहे. तो असा—यांतील 'भूमि' हा शब्द राजकारणांतील मंत्र या अर्थी आहे. मंत्ररूप भूमि पुरुषांच्या भिन्न भिन्न बुद्धीमुळें ती विशाल म्ह० विस्तीर्ण आहे. अनेक उपाय स्फुरत असल्यामुळें ती बहुल आहे. म्हणूनच कोणताहि मंत्र अनेक

हे देवकीनंदना, मीं राजसूय यज्ञाला जरी आरंभ केला, तरी त्याचें पारमेष्ठ्य म्ह० परमेष्ठि पितामहाचें तादात्म्य हें फल मिळणें अशक्य आहे. कारण आम्ही असमर्थ आहों. यास्तव कर्मनिवृत्तिच श्रेयस्कर आहे. त्यापासूनच माझें परम श्रेय होईल, असें मी समजतों. हे आमचे भीमादि मानी सभासद आम्ही सर्वांना जिंकण्यास समर्थ आहों, असें समजतात. ते महाकुलामध्यें उत्पन्न झाले आहेत, ही गोष्ट खरी; पण त्यांतील एखादा तरी जरासंधासारख्याला जिंकण्यास समर्थ होईल असें मला वाटत नाहीं. आम्हांमध्यें तर असा कोणी दिसत नाहींच; पण हे महाभाग जनार्दना, तुलाहि जरासंधाची भीति वाटते. त्यामुळें त्या दुरात्म्याविषयीं आम्ही सर्व साशंक झालों आहों.

हे प्रभो, मी तुझ्या भुजबलाचा आश्रय करून राहिलों आहें. मी स्वतःला बलवान् समजत नाहीं. पण हे गोविंदा, तूंहि त्या जरासंधाविषयीं साशंक आहेस. त्यामुळें हे महाबाहो, स्वतः तूं, बलराम, भीमसेन किंवा अर्जुन यांपैकीं एकाच्या तरी हातून त्याचा वध होणें शक्य आहे कीं नाहीं, याविषयीं मी पुनः पुनः विचार करीत आहें. कारण तुम्हां चौघांचेंहि सामर्थ्य अतुल आहे, हें मी जाणतों. पण माझ्या मनाचा निश्चय होत नाहीं. हे केशवा, सर्व कार्यांमध्यें तूं मला प्रमाणभूत आहेस; यास्तव तूं जें सांगशील त्याप्रमाणें वागण्यास मी तयार आहें.

( २ ) युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून वाक्यविशारद भीम त्यास म्हणाला—कर्तव्यशून्य राजा वारुळांतील सर्पाप्रमाणें नाश पावतो. त्याचप्रमाणें जो स्वतः दुर्बल असतो व उपायांची योजना न करितां बलवानांशीं विरोध करूं लागतो, तोहि तसाच नाश पावतो. पण जो दुर्बल असूनहि निरलस होतो, तो योग्य उपायांची योजना व नीति यांच्या योगानें प्रायः बलाढ्य रिपूला व आपल्या इष्ट मनोरथांनाहि साधितो. हे राजा, कृष्णामध्यें नीति, मजमध्यें बल व धनं-

---

मंत्रज्ञांबरोबर केला जातो. ती मंत्ररूप भूमि, भू, हिरण्य, हस्ति, अश्व, रथ, मित्र व स्त्री इत्यादि अनेक रत्नांनीं युक्त आहे. या भूमीमध्यें प्रवेश करूं लागलें असतां अंगपंचक, षड्गुण, शक्तित्रय, सिद्धित्रय, सप्तोपाय इत्यादि समस्त नीतिभूमींमध्यें संचार करूनच पुरुष आपलें हित कशांत आहे हें जाणतो. यास्तव हे वृष्णिकुलोत्पन्ना, तूंच सर्वज्ञ व आमचा हितचिंतक आहेस. तूंच कार्याकार्यांचा निश्चय करण्यास समर्थ आहेस.

जय पार्थामध्यें जय नित्य निवास करितो. यास्तव तीन अग्नि जसे इष्टि साधितात, तसे आम्ही मागधाला साधण्यास समर्थ होऊं.

भीमाचें हें वचन ऐकून त्याच्या मनांत कोप उत्पन्न करण्यासाठीं कृष्ण म्हणाला—अज्ञ मनुष्य कार्याचा आरंभ करितो, पण त्याच्या परिणामाकडे दृष्टि देत नाहीं. त्यामुळें विद्वान् लोक आपल्या कार्यामध्यें तत्पर असलेल्या अज्ञ शत्रूचा विचार करीत नाहींत. मांधाता जिंकण्यास योग्य असलेल्या बाह्य व आंतर शत्रूंना जिंकून, भगीरथ प्रजांचें पालन करून, कार्तवीर्य तपोबल संपादून, भरत स्वसामर्थ्याचा उपयोग करून व मरुत्त विपुल ऐश्वर्य मिळवून [illegible] ट् झाला.

हे राजा, याप्रमाणें हे मांधाताप्रभृति पांच नृपाल जय, पालन, तपोबल, नीतिबल व ऋद्धि या साम्राज्याच्या पांच साधनांनीं साम्राट् झाले, असें मीं ऐकिलें आहे. तथापि त्यांना हें पद एकेका गुणानेंच मिळालें व साम्राज्याची इच्छा करणारा तूं या पांची गुणांनीं तें मिळवूं पहात आहेस. निग्रहाला योग्य असलेल्या शत्रूंचा पराभव केला असतां ते जिंकलेले शत्रूच त्या विजयी सम्राटाचा ध्वज होतात. अर्थात् विजयानें साम्राज्यप्राप्ति करून घेणें हा मुख्य पक्ष आहे व यौवनाश्वि मांधात्याच्या ठिकाणीं तो होता.

पालन हें दुसऱ्या प्रतीचें साम्राज्यलक्षण आहे. भगीरथाच्या ठिकाणीं धर्मादि इतर लक्षणांसह तें होतें. कार्तवीर्यामध्यें धर्म व योग होता. मरुत्तामध्यें ऐश्वर्य होतें व भरताच्या ठिकाणीं नीतिबल होतें. बृहद्रथाचा पुत्र जरासंध विजय-लक्षण साम्राज्याला प्राप्त झाला आहे. तो या वेळीं आपल्या सामर्थ्यानें साम्रा-ज्याचा उपभोग घेत आहे. पण क्षत्रियांचीं शंभर कुलें त्याला प्रतिकूल आहेत. त्यानें आपल्या सामर्थ्यानें जरी त्यांना जिंकिलें असलें तरी ते राजे मनांतून त्याचा द्वेषच करीत आहेत.

हे राजा, तूं धर्म, प्रजापालन, नीतिबल, ऐश्वर्य व विजय या पांची लक्षणांचा आश्रय करून साम्राज्याची इच्छा करीत आहेस. पण जरासंधा-सारखा दुरात्मा तुझा मोठा प्रतिस्पर्धी आहे, हें तूं लक्षांत ठेव. तो धर्मादि इतर गुणांनीं युक्त असता तर आम्हांला त्यांत कांहींच वैषम्य वाटलें नसतें. पण तो दुरात्मा प्रजेला पीडा देतो. विविध रत्नांनीं युक्त असलेले राजे त्या जरासंधाची अनेक रत्नांनीं उपासना करितात. पण तो नीतिभ्रष्ट मूढ तेवढ्यानें

संतुष्ट होत नाहीं. त्या दुरात्म्याचा मुख्य प्रधान मूर्धाभिषिक्त राजांना बलात्कारानें आपल्या अधीन करून घेतो. त्यामुळें त्याच्या अधीन नसलेला एकहि मूर्धाभिषिक्त राजा आम्हीं पाहिलेला नाहीं.

युधिष्ठिरा, या क्रमानें त्यानें आजपर्यंत जवळ जवळ शंभर राजांना आपल्या वश करून घेतलें आहे. तेव्हां हे पृथापुत्रा, एखादा दुर्बल राजा त्याचा प्रतिपक्ष होऊन त्याच्या समोर कसा उभा राहील ! त्या जरासंधानें जिंकलेल्या सर्व राजांना आपल्या उपास्य पशुपतीच्या गृहांत बांधून ठेविलें असून त्या रुद्रदेवतेला उद्देशून त्यांतील प्रत्येक राजाचा पशूंप्रमाणें बलि देण्याचा निश्चय केला आहे. तेव्हां त्या बिचाऱ्यांची आपल्या जीवितावर काय प्रीति असणार !

राजन्, रणांगणांत शस्त्रधारारूप तीर्थांत मरण पावल्यास क्षत्रियाचा स्वर्गलोकीं मोठा सत्कार होतो. यास्तव आपण अगोदर त्या मागधराजाला युद्धांत मारण्याचाच यत्न करूं या. त्या निर्दय जरासंधानें आजपर्यंत शहायशी राजे पराभूत करून आणिले आहेत, आणखीं चौदा राजे अद्यापि आणावयाचे आहेत. ते आणल्यावर तो पूर्वोक्त बलिदानाचें क्रूर कर्म करणार आहे. यास्तव जो वीर त्याच्या या क्रूर कर्मांत विघ्न आणील त्याचें त्रिभुवनांत निर्मल यश पसरेल. जो जरासंधाला जिंकील तो निःसंशय सम्राट् होईल. यास्तव आपल्याला प्रथम त्यालाच जिंकिलें पाहिजे. २. ३. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ अर्जुनाचें प्रोत्साहनपर भाषण. ]

( १ ) **युधिष्ठिर**—हे केशवा, सम्राट्-पदाच्या इच्छेनें स्वार्थपरायण होऊन मी तुम्हांला केवळ साहसानें जरासंधाकडे कसा बरें पाठवूं ! हे जनार्दना, तूं माझें मन असून हे दोघे भीमार्जुन माझे नेत्र आहेत, असें मी समजतों. तेव्हां मन व चक्षु यांवांचून मीं जिवंत रहाणें कसें शक्य आहे ! जरासंधाच्या भयंकर पराक्रमी व दुर्जय सैन्याला जिंकण्यास जेथें यमहि समर्थ नाहीं, तेथें तुमचा काय पाड ! अशा विपरीत कार्यास प्रवृत्त होणारा पुरुष अनर्थालाच प्राप्त होतो. यास्तव राजसूय यागाचा माझा हा विचार युक्त नाहीं, असें मला वाटतें. ज्याची सिद्धि अशक्य आहे त्या राजसूयाविषयीं माझें मन विरक्त झालें आहे. हे जनार्दना, ज्या कर्माचें फल अगदीं विपरीत आहे, अशा कर्मांमध्यें

प्रवृत्त झालेल्या पुरुषाला अनर्थप्राप्ति होते, असा नियम आहे. यास्तव मी स्वतः काय विचार केला आहे तें तूं ऐक. मीं आतां केवळ राजसूयाचाच नव्हे तर सर्व कर्मांचा त्याग करावा हेंच उचित होय.

वैशंपायन—राजा जनमेजया, युधिष्ठिर उद्विग्न चित्तानें असें भाषण करीत आहे तोंच धनंजयानें आपलें श्रेष्ठ धनुष्य, अक्षय बाण, भाते, रथ, ध्वज व ती सभा यांकडे एकदा अवलोकन केलें आणि युधिष्ठिराला म्हटलें—"हे महाराज, धनुष्य, शस्त्र, बाण, उत्साह स्वतः वासुदेव, मंत्रपूर्वक कार्यनिश्चय, यश व शारीर-सेनादिरूप सामर्थ्य या सर्व इष्ट व दुष्प्राप्य वस्तु मला अनुकूल आहेत. विद्वान् लोक सत्कुलांतील जन्माची प्रशंसा करितात. परंतु मला उत्साहावांचून कोणतीच गोष्ट श्रेयस्कर वाटत नाहीं. एखादा निर्वीर्य पुरुष कृतवीर्याच्या उत्तम कुलांत उत्पन्न झालेला असला तरी तो काय करूं शकणार! त्यापेक्षां अप्रसिद्ध कुलांत जन्म घेऊन उत्साहानें पराक्रम करणारा मनुष्यच श्रेष्ठ होय.

हे राजन्, क्षत्रियाची वृत्ति सर्वदा शत्रूला जिंकण्याचीच असली पाहिजे. असा वीर इतर सर्व गुणांनीं हीन जरी असला तरी तो वीर्यवान् असल्यामुळें शत्रूचा नाश केल्यावांचून रहाणार नाहीं. याच्या उलट उत्साहहीन मनुष्य सर्वगुणसंपन्न जरी असला तरी त्याच्या हातून कसला पराक्रम होणार! गुणवान् मनुष्याचे सर्व गुण त्याच्या पराक्रमांत अंतर्भूत होतात.

हे धर्मज्ञा, जयप्राप्तीला उत्साह व अनुकूल दैव या दोन साधनांचा मुख्य आधार आहे. परंतु एखादा बलाढ्य पुरुष केव्हां केव्हां हीं दोन्ही साधनें अनुकूल असूनहि अनवधानामुळें त्यांचा उपयोग करीत नाहीं व त्या प्रमादाच्या द्वारा स्वतः बलाढ्य असूनहि शत्रूच्या हातून नाश पावतो. दैन्य व मोह यांच्या योगानेंहि बलवानाचा पराभव होतो. यास्तव जयाची इच्छा करणाऱ्या राजानें त्या दोन्ही विनाशहेतूंचा त्याग करावा.

राजा, तुझ्या आज्ञेनें मीं राजसूय यागासाठीं जरासंधाचा वध व बंदींत पडलेल्या राजांचें रक्षण, एवढें कार्य जर केलें तर त्याहून आणखी परम कर्तव्य तें काय राहिलें! हे धर्मराजा, आपण जर कार्याला आरंभच केला नाहीं, तर आपणांपाशीं पूर्वोक्त धनुष्यादि साधनें नाहींत, असाच शत्रूचा निश्चय होईल.

---

१ कृतवीर्यकुले जातो निर्वीर्यः कीं करिष्यति।
निर्वीर्ये तु कुले जातो वीर्यवांस्तु विशिष्यते॥

परतु आपणांस वासुदेवासारखा लोकोत्तर दुर्लभ मंत्री व गांडीव धनुष्यादि असाधारण साधनें अनुकूल असतांना शत्रुनाशाचा प्रयत्न व्यर्थ होईल, असें तूं कां मानितोस ! हे राजा, शत्रूचा पराभव करण्यास आपण असमर्थ आहों, असें निश्चित झाल्यावर भगवीं वस्त्रें परिधान करून संन्यास घेणें, फारसें अवघड नाहीं. यास्तव आतां अगोदर आपल्याला साम्राज्य मिळविणें शक्य आहे कीं नाहीं, हेंच पाहण्यासाठीं आपण शत्रूशीं युद्ध करूं या." २. ३. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १ वासुदेवाचें प्रोत्साहन. २ जरासंधाच्या उत्पत्तीचा वृत्तांत. ]

( १ ) वासुदेव—हे **युधिष्ठिरा,** अर्जुनानें भारतकुलोत्पन्न कुंतीपुत्राला शोभण्यासारखेच हे विचार प्रकट केले आहेत. हे राजा, आपणास मृत्यु रात्रीं येईल किंवा दिवसां, हें जसें कोणालाहि निश्चयानें सांगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें युद्ध न केल्यामुळें कोणी अमर झाला आहे, असेंहि आपण कधीं ऐकलें नाहीं. यास्तव पुरुषानें यथाशास्त्र नीतीचा आश्रय करून शत्रूंना जिंकण्याचा उपक्रम करणें, एवढेंच हृदयाला संतोष देणारें कार्य करावें. देवादिकांचें प्रातिकूल्य नसतांना चांगल्या प्रकारें निश्चित केलेल्या मंत्राची प्राप्ति झाली असतां उत्कृष्ट कार्याला आरंभ केल्यास तें सिद्ध होतें. दैवांचें आनुकूल्य व सुमंत्र यांचें ज्या पक्षाला साह्य असतें, त्याचा निश्चयानें उत्कर्ष होतो आणि दोन्ही पक्षीं त्या दोहोंचें साम्य असल्यास उत्कर्ष अनिश्चित असतो. पण युद्धावांचून असामर्थ्याचा निश्चय केव्हांहि होत नाहीं. म्हणून आम्ही असमर्थ आहों, या शंकेनें शत्रूंशीं युद्ध न आरंभितां स्वस्थ बसणें हेंच पराभवाचें मुख्य कारण आहे.

हे पांडवश्रेष्ठा, अनीति व अनुपाय यांनीं युक्त असलेल्या पुरुषाचा संग्रामांत भयंकर क्षय होतो. आपला शत्रुपक्षहि सुनय व दैवाचें आनुकूल्य यांनीं युक्त असला तर दोन्ही पक्षांना परस्पराची भीति वाटते व कोणाचाच जय होत नाहीं. दोघेहि तटस्थ रहातात. त्यामुळें त्यांतील कोणाचा पराभवहि होत नाहीं. जरासंधाच्या व आपल्या पक्षाचें साम्य आहे, म्हणून आपण त्याच्याशीं वैर आरंभिणें व्यर्थ आहे, असें तुला वाटत असेल; पण यावेळीं आपल्या पक्षाचा उत्कर्ष झालेला आहे. यास्तव आपण उत्तम नयाचा आश्रय करून शत्रूच्या देहापर्यंत जाऊन पोंचलों, म्हणजे मग नदीचा वेग जसा वृक्षांचा विध्वंस करितो, त्याप्रमाणें आम्हीहि शत्रूंचा नाश केल्यावांचून राहणार नाहीं.

राजन्, आपलीं छिद्रें गुप्त राखण्याविषयीं तत्पर राहून पररंध्रावरच जर आम्हीं प्रहार केला तर आपल्या कार्याची सिद्धि निश्चयानें होईल. शत्रु अति बलाढ्य असून तो आपल्या सैन्यासह सज्ज होऊन राहिला असेल तर त्याच्याशीं युद्ध करूं नये, ही बुद्धिमानांची नीति मलाहि मान्य आहे. पण आम्ही गुप्तपणें व सर्व दोषरहित होऊन शत्रूच्या गृहांत शिरलों, म्हणजे त्याच्या देहाचेंच आक्रमण करून आपला मनोरथ सिद्धीस नेऊं. एकच पुरुषश्रेष्ठ भूतांच्या अंतरात्म्याप्रमाणें शाश्वत राजलक्ष्मीला धारण करितो, असा सिद्धांत आहे. अशा उपायानें कार्य आरंभिल्यास आमचा क्षय न होतां शत्रूचाच नाश होईल, असें मला निश्चयानें वाटतें. उलटपक्षीं जरासंधाशीं युद्ध आरंभून त्यानें बद्ध करून ठेविलेल्या अनेक क्षत्रियांचें रक्षण करीत असतांना आम्हांला त्याच्या हातून मृत्यु जरी आला तरी आम्ही स्वर्गांतील उत्तम सुखाला प्राप्त होऊं.

( २ ) युधिष्ठिर—हे गोविंदा, हा जरासंध कोण ! त्याचें सामर्थ्य व पराक्रम कशाप्रकारचा आहे ! तुझ्या अग्नितुल्य शरीराला स्पर्श करूनहि तो तृणवत् असलेला जरासंध दग्ध कसा झाला नाहीं, हें मला सांग. धर्माचा हा प्रश्न ऐकून श्रीकृष्ण म्हणाला—हे धर्मराजा, जरासंधाचें वीर्य, पराक्रम व त्यानें आम्हांला अनेक प्रकारें पीडा दिली असतांहि आम्हीं त्याची केलेली उपेक्षा, या सर्वांचें मी वर्णन करितों, तें ऐक.

पूर्वी बृहद्रथ-नांवाचा मगधदेशाचा एक मोटा बलाढ्य राजा होऊन गेला. तो तीन अक्षौहिणी सैन्याचा अधिपति असून त्याला आपल्या समरांतील अजिंक्यत्वाचा फार अभिमान होता. तो रूपवान्, पराक्रमी, वीर्यवान् व ऐश्वर्यसंपन्न होता. त्याचें शरीर नित्य यज्ञचिह्नांनीं भूषित असल्यामुळें तो जणुकाय दुसरा शतक्रतुच आहे, असें भासत असे. त्याच्या ठिकाणीं सूर्यासारखें तेज, पृथ्वीसारखी क्षमा, यम व काळ यांच्यासारखा क्रोध व कुबेरासारखें ऐश्वर्य होतें. राजा, सूर्यकिरण जसे सर्व पृथ्वीला व्यापितात त्याप्रमाणें त्या राजाच्या सौजन्यादि गुणांनीं हें सर्व जगत् व्यापिलें होतें.

त्या पुरुषश्रेष्ठ बृहद्रथराजानें काशीराजाच्या दोघी लावण्यवती जुळया कन्यांबरोबर विवाह केला व त्या दोघींनाहि 'मी तुम्हांशीं समप्रेमानें वागेन, पक्षपात करणार नाहीं ' असें वचन देऊन त्याप्रमाणें सम वर्तन ठेविलें. दोन हत्तीणींसह गज जसा शोभतो, तसा त्या दोघी अनुरूप, प्रिय व सुशील राण्यांसह तो

वसुधाधिप बृहद्रथ शोभत असे. त्या दोघी साध्वी भार्यांमध्यें असलेला तो नरेंद्र जणुंकाय गंगा व यमुना यांच्यामध्यें असलेल्या मूर्तिमंत सागरासारखाच दिसत असे.

हे पांडवा, अशा त्या नृपतीचें सर्व तारुण्य विषयोपभोगांत गेलें. तथापि त्याला वंशविस्तार करणारें एकहि अपत्य झालें नाहीं. त्या राजानें पुत्रकामेष्टि यज्ञादि अनेक मंगलकारक यज्ञ-याग व होम केले. परंतु त्या नृपश्रेष्ठाला कुलाची वृद्धि करणाऱ्या पुत्राची प्राप्ति झाली नाहीं.

त्यानंतर एकदा महात्म्या काक्षीवान्-गौतमाचा महातपस्वी उदार पुत्र चंडकौशिक यदृच्छेनें तेथें आला. तो उपवनांत एका वृक्षाचा आश्रय करून राहिला आहे, हें वृत्त ऐकतांच बृहद्रथ राजा आपल्या दोघी भार्यांसह त्या वृक्षाखालीं बसलेल्या मुनीपाशीं गेला व त्यानें मुनीच्या आश्रमाला योग्य असलेले सर्व उत्कृष्ट पदार्थ अर्पण करून त्यास संतुष्ट केलें.

तेव्हां तो सत्यनिष्ठ व सत्यवक्ता श्रेष्ठ ऋषि राजाला म्हणाला—हे भूपाला, मी तुजवर प्रसन्न झालों आहें. इष्ट वर माग. या वेळीं तूं मागशील तो वर मी तुला देईन.

तेव्हां बृहद्रथानें दोघी भार्यांसह त्या मुनीला वंदन केलें व पुत्रप्राप्तीविषयीं निराश झालेला तो राजा सद्गदित वाणीनें त्यास म्हणाला—" हे भगवन्, मी राज्य सोडून तपोवनांत जावयास निघालों आहें. मज अभाग्याला वर मागून काय करावयाचें आहे व राज्याचा तरी मला काय उपयोग ! "

कृष्ण म्हणाला—राजा युधिष्ठिरा, बृहद्रथाचे ते निराशेचे उद्गार ऐकून मनांत क्षुब्ध झालेला तो मुनि त्याच आम्रवृक्षाखालीं क्षणभर ध्यान करीत बसला. तों त्याच्या मांडीवर शुकानें दंश न केलेलें एक रसाळ आम्रफल वरून पडलें. लागलेंच मुनिश्रेष्ठानें तें आपल्या हातांत उचलून घेतलें व मनानें त्याचें अभिमंत्रण करून पुत्रप्राप्तीला कारण होणारें तें अप्रतिम आम्रफल राजाला देऊन म्हटलें—" हे नराधिपा, तूं कृतार्थ झाला आहेस. आतां तूं आपल्या नगरीला परत जा."

हें मुनिवचन ऐकून तो महा बुद्धिमान् राजा मुनीच्या चरणांना शिरसा वंदन करून आपल्या राजधानीस परत आला. त्या नृपश्रेष्ठानें दोन्ही भार्यांशीं समतेनें वागण्याची पूर्वींच प्रतिज्ञा केलेली असल्यामुळें त्यानें तें एकच फल

दोघी स्त्रियांना दिलें. तेव्हां त्या एका आम्र फलाचीं दोन शकलें करून तीं त्या दोघींनीं भक्षण केलीं. त्या मुनीच्या सत्यवचनामुळें व तशीच भवितव्यता असल्यामुळें त्या दोघींनीं तें फल भक्षण करतांच त्यांना गर्भ राहिला व त्यामुळें त्या नृपतीला परम संतोष झाला.

पुढें योग्य काल निघून गेला असतां त्या दोघीहि राजस्त्रिया प्रसूत झाल्या व प्रत्येकीला पुरुष शरीराचें एकेक शकल झालें. एक नेत्र, एक हात, एक पाय, अर्धें उदर, अर्धें मुख, अर्धा कटिप्रदेश, अशा प्रकारचीं तीं शरीराचीं दोन शकलें पाहून त्या दोघीहि भयानें कांपूं लागल्या. नंतर उद्विग्न झालेल्या त्या दोघी भगिनींनीं एकमेकींशीं विचार करून अत्यंत खिन्न मनानें तीं दोन्ही सजीव प्राणिशकलें टाकून दिलीं. तेव्हां त्यांच्या दायांनीं तीं दोन्ही शकलें गर्भपाताप्रमाणें वस्त्रांत गुंडाळून अंतःपुरांतून बाहेर आणिलीं व द्वाराच्या बाहेर टाकून त्या निघून गेल्या.

इतक्यांत मांस व रक्त भक्षण करणारी 'जरा'-नांवाची एक राक्षसी तेथें आली. तिनें तीं दोन्ही शकलें उचललीं व तीं सहज नेतां यावीं म्हणून दैवप्रेरणेनेंच एकत्र जोडिलीं. तों काय चमत्कार सांगावा! हे पुरुषश्रेष्ठा, तिनें तीं शकलें एकत्र जोडतांच त्यांपासून पूर्ण शरीर धारण करणारा एक वीर कुमार उत्पन्न झाला.

तेव्हां ती आश्चर्यचकित झालेली राक्षसी हंसत त्या बालकाला नेण्याचा प्रयत्न करूं लागली. परंतु ती त्या वज्रतुल्य शिशूला जाग्यावरून हालविण्यासहि समर्थ झाली नाहीं. तो बालक आपल्या आरक्त हातांच्या मुठी वळून, त्या तोंडांत घालून, मेघगर्जनेसारखा आक्रोश करूं लागला. त्याचा तो रडण्याचा ध्वनि ऐकून राजाच्या अंतःपुरांतील सर्व लोक बृहद्रथराजासह त्वरेनें बाहेर आले. त्या दोघी खिन्न व पुत्रप्राप्तीविषयीं निराश झालेल्या राण्याहि पान्हा फुटून सर्वांबरोबर बाहेर आल्या.

सर्व परिवारासह राजा तेथें आला आहे असें पाहून व त्या बालकाचें असामान्य बल अवलोकन करून त्या राक्षसीनें 'मी या महात्म्या धार्मिक नृपाच्या राज्यांत दीर्घकाल सुखानें रहात आहें, यास्तव मला या पुत्रेच्छु राजाच्या बालकाचा नाश करणें योग्य नाहीं' असा आपल्या मनांत विचार करून मानुषरूप धारण केलें व सूर्यबिंबाला उचलून घेणाऱ्या मेघलेखेप्रमाणें ती 'जरा' राक्षसी

त्या अर्भकाला उचलून घेऊन वसुधाधिपाला म्हणाली—" हे बृहद्रथराजा, हा तुझा पुत्र मी तुला परत देत आहें, तो घे. ब्राह्मणाच्या वरानें तुझ्या दोन भार्यांच्या ठिकाणीं झालेल्या या बालकाला दायांनीं टाकून दिलें होतें. त्याचें मीं रक्षण केलें आहे."

राजा युधिष्ठिरा, राक्षसीचें हें वचन ऐकतांच काशीराजाच्या त्या दोघी साध्वी कन्यांनीं तत्काल तें बालक घेतलें व त्यास पयस्नानानें भिजवून टाकिलें. त्यानंतर संतुष्ट झालेल्या बृहद्रथराजानें मानुषशरीर धारण करणाऱ्या गौरवर्ण जरा राक्षसीला म्हटलें—" हे कल्याणि, माझा पुत्र आणून देणारी तूं कोण आहेस, तें मला सांग. इच्छेप्रमाणें विहार करणारी तूं कोणीं देवता असावीस असें मला वाटतें." २. ३. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ जरा राक्षसीचा वृत्तान्त व तिच्यापासून राजाला जरासंधाची प्राप्ति. ]

( १ ) राक्षसी—हे राजेंद्रा, तुझें कल्याण असो. इच्छेस येईल तें रूप धारण करणारी मी 'जरा'-नांवाची राक्षसी आहें. तुझ्या गृहांत माझी नित्य पूजा होत असल्यामुळें मी सुखानें रहात आहें. हे राजा, मी मानवांच्या प्रत्येक घरांतून वास करीत असतें. पूर्वीं ब्रह्मदेवानें मला उत्पन्न करून 'गृहदेवी' असें नांव ठेविलें व दिव्य रूप धारण करणाऱ्या माझी दानवांच्या विनाशाकडे योजना केली. जो कोणी मानव भक्तीनें भिंतीवर पुत्रांसह तारुण्ययुक्त असलेल्या माझें चित्र काढून त्याची पूजा करील त्याच्या गृहांत सर्व ऐश्वर्याची समृद्धि होईल व जो याप्रमाणें करणार नाहीं, त्याचा नाश होईल.

हे प्रभो, तुझ्या गृहांत माझी नित्य पूजा होत असते. तुझ्या या राजमंदिरांतील भिंतीवर बालकांच्या समुदायांनीं परिवेष्टित असलेल्या माझीं अनेक चित्रें काढलेलीं असून गंध, पुष्प, धूप, भक्ष्य, भोज्य इत्यादि पदार्थांनीं माझें नित्य पूजन होत असतें. याप्रमाणें तुझ्या कडून उपकृत झालेली मी अहर्निश तुझ्यावर प्रत्युपकार कसा करावा, याचाच विचार करीत होतें. हे महाराज, आज तुझ्या पुत्रशरीराचीं हीं दोन शकलें मीं जेव्हां पाहिलीं तेव्हां मीं तीं एकत्र केलीं व दैवयोगानें त्यांचा हा बालक झाला.

हे धर्मज्ञा, हा सर्व तुझ्या भाग्याचा प्रभाव आहे. मी केवल निमित्तमात्र झाल्यें. मी मेरु-पर्वतालाहि भक्षण करण्यास समर्थ आहें, मग तुझ्या या अर्भकाची काय कथा! परंतु तुझ्या राजगृहांत होत असलेल्या माझ्या पूजनानें संतुष्ट झालेली मी तुझा हा बालक तुला परत देत आहें.

श्रीकृष्ण—राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें बोलून ती राक्षसी तेथेंच अंतर्धान पावली व त्या बृहद्रथराजानें त्या कुमाराचा स्वीकार करून आपल्या मंदिरांत प्रवेश केला. नंतर त्या राजेंद्रानें त्या बालकाचे जातकर्मादि सर्व संस्कार केले व सर्व मगधदेशामध्यें 'जरा'-राक्षसीचा उत्सव सुरू करण्याची आज्ञा केली.

राजा, पितामहाप्रमाणें सामर्थ्यवान् असलेल्या बृहद्रथानें त्या बालकाला 'जरा'–राक्षसीनें सांधलें म्हणून त्याचें नांव 'जरासंध' असें ठेविलें. तो मागधाधिपाचा महातेजस्वी पुत्र जरासंध होमकुंडांतील आहुति दिलेल्या अग्नीप्रमाणें वाढत चालला. दिवसेंदिवस त्याचें बल व शरीर यांची वृद्धि होत जाऊन तो शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें मातापितरांस आल्हादकारक झाला. २. ३. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ जरासंधाला राज्यप्राप्ति व त्याचा पराक्रम. ]

( १ ) श्रीकृष्ण—हे धर्मा, त्यानंतर कांहीं कालानें तो महातपस्वी भगवान् चंडकौशिकमुनि पुनः मगधदेशांत आला. त्याच्या आगमनानें संतुष्ट झालेला राजा बृहद्रथ अमात्य, इतर परिवार, आपल्या भार्या व पुत्र यांसह त्या ऋषीला सामोरा गेला व अर्घ्य-पाद्यादिकांनीं त्याचा सत्कार करून त्यानें पुत्रासह आपलें राज्य त्यास अर्पण केलें.

तेव्हां राजाच्या पूजेचा स्वीकार करून तो भगवान् ऋषि प्रसन्न अंतःकरणानें म्हणाला—"हे राजन्, तुझ्या पुत्राचें भवितव्य मीं दिव्य दृष्टीनें जाणलें आहे, तें ऐक. हे राजा, हा तुझा रूप व बल यांनीं युक्त असलेला पुत्र पराक्रमी व ऐश्वर्यसंपन्न होईल, यांत संशय नाहीं. हा आपल्या सामर्थ्यानें सर्व वैभवाची प्राप्ति करून घेईल. ज्याप्रमाणें गरुडाच्या वेगाची बरोबरी कोणताहि पक्षी करूं शकत नाहीं, त्याप्रमाणें तुझ्या या वीर्यवान् पुत्राच्या सामर्थ्यापुढें कोणताहि राजा टिकाव धरणार नाहीं. याला पीडा देण्याचा प्रयत्न करणाऱ्या याच्या सर्व शत्रूंचा नाश होईल.

हे भूपाला, नदीच्या प्रवाहानें पर्वताला जसा यत्किंचित्हि उपद्रव होत नाहीं, तद्वत्च देवांनीं सोडलेल्या शस्त्रांनींहि याला कांहीं अपाय होणार नाहीं. सर्व मूर्धाभिषिक्त राजांच्या मस्तकावर हा तुझा पुत्र सूर्यासारखा तळपत राहील. सूर्य जसा सर्व नक्षत्रांची प्रभा हरण करितो, तसा हा सर्व राजांना निस्तेज करील. मोठ्या चतुरंग सैन्यानें युक्त असलेले महाबलाढ्य राजेहि याच्या समीप येतांच अग्नीसमीप येणाऱ्या पतंगांप्रमाणें नाश पावतील. वर्षा-ऋतूंत तुडुंब भरलेल्या नद्यांचें जल समुद्र जसें ग्रहण करितो, तसा हा वीर सर्व समृद्ध राजांची संपत्ति हरण करील. तृण-धान्यादिकांना उत्पन्न करणारी पृथ्वी जशी शुभ व अशुभ पदार्थांना धारण करिते, तद्वत्च हा तुझा बलाढ्य पुत्र चातुर्वर्ण्याचें सर्व प्रकारें रक्षण करील. सर्व भूतांना आत्मवत् प्रिय असलेला प्राण जसा शरीरांतील श्वासोच्छ्वासरूप वायूच्या अधीन असतो, तसेच सर्व भूपाल या तुझ्या समर्थ पुत्राला वश होतील व हा मागध सर्व लोकांमध्यें बलाढ्य होऊन याला त्रिपुरांतक महादेव रुद्राचें साक्षात् दर्शन घडेल."

युधिष्ठिरा, याप्रमाणें बोलून त्या मुनीनें दुसऱ्या कार्याकडे लक्ष लावण्याच्या निमित्तानें बृहद्रथराजाला निरोप दिला. तेव्हां तो राजा आपल्या सर्व परिवारासह राजधानीस परत आला व जरासंधाला राज्याभिषेक करून कृतार्थ झाला.

याप्रमाणें पुत्राला राज्य देऊन तो बृहद्रथ आपल्या दोन्ही भार्यांसह तपोवनांत निघून गेला. दोन्ही माता व पिता वनांत निघून गेलीं असतां जरासंधानें स्वपराक्रमानें सर्व राजे वश करून घेतले. हे नृपश्रेष्ठा जनमेजया, इकडे दीर्घकालानें तपोवनांत तपश्चर्या करीत असलेला तो राजा बृहद्रथ दोघी भार्यांसह स्वर्गीं गेला. त्यानंतर चंडकौशिकाच्या वचनाप्रमाणें सर्व ऐश्वर्याला प्राप्त झालेल्या जरासंधानें राज्याचें पालन केलें.

हे राजन्, पुढें मीं कंसाचा वध केला असतां माझ्याशीं जरासंधाचें शत्रुत्व उत्पन्न झालें. तेव्हां त्या बलाढ्य जरासंधानें गिरिव्रज नगरींतून आपली गदा नव्याण्णव वेळां गरगर फिरवून मथुरेंत रहाणाऱ्या व अद्भुत कर्में करणाऱ्या मजकडे भिरकावून दिली. तेव्हां ती नव्याण्णव योजनें दूर असलेल्या मथुरेच्या समीप येऊन पडली. त्यावेळीं मथुरावासी जनांनीं 'जरासंधाची गदा मथुरेच्या समीप पडली आहे' हें वृत्त चोहोंकडे प्रसिद्ध केलें.

त्या जरासंधाचे हंस व डिंभक या नांवाचे दोघे बलाढ्य सेनापति होते. त्यांना 'कोणत्याहि शस्त्रानें मृत्यु येणार नाहीं' असा वर होता. ते दोघेहि बुद्धिमानांमध्यें श्रेष्ठ, मंत्रविशारद व नीतिशास्त्रप्रवीण होते. मीं पूर्वीं त्या महा-बलाढ्य वीरांविषयीं तुला सांगितलेंच आहे.

हे भारता, जरासंधराजा व त्याचे हे दोघे मंत्री एवढे तिघेच सर्व त्रिभुवन जिंकण्यास पुरेसे होते, अशी माझी समजूत आहे. हे महाराज, कुकुर, अंधक व वृष्णि वीर जरी बलवान् आहेत, तरी जरासंधापुढें त्यांचें सामर्थ्य चालणें शक्य नाहीं, हें जाणूनच 'अधिक बलवानाशीं स्पर्धा करूं नये' या राजनीतीला अनुसरून त्यांनीं बलाढ्य जरासंधाची उपेक्षा केली. २. ३. १९.

येथें तिसरें राजसूयारंभपर्व समाप्त झालें.

---

# जरासंधवधपर्व ४.



## अध्याय २० वा.

[ १ भीमार्जुन व कृष्ण यांचें मगधदेशीं गमन. ]

( १ ) **वासुदेव**—हे धर्मराजा, हंस, डिंभक व सर्वपरिवारासह कंस यांचा नाश झालेला असल्यामुळें जरासंधाच्या वधाचा काल आतां प्राप्त झाला आहे. पण सर्व देव आणि दानवहि समरांगणांत जरासंधाला जिंकण्यास समर्थ नाहींत. त्याला केवळ द्वंद्वयुद्धांतच जिंकतां येईल, असें मला वाटतें. मी नीतिवेत्ता आहें, भीमसेन बलवान् आहे व आम्हां दोघांचेंहि रक्षण करण्यास अर्जुन समर्थ आहे. यास्तव इष्टीच्या तीन अग्नीप्रमाणें आम्ही तिघे जरासंधवधाचें कार्य साध्य करूं.

हे वीरा, आम्ही तिघांनीं त्या नराधिपाला निर्जन प्रदेशीं युद्धाचें आह्वान केलें असतां, तो निःसंशय तें अमान्य करणार नाहीं. कदाचित् स्वपराक्रमाच्या दर्पानें तो माझ्याशीं किंवा धनंजयाशीं युद्ध करण्यास तयार होणार नाहीं. कारण आमच्याशीं युद्ध करण्यांत तो आपला अपमान समजेल! तथापि महा-बाहु भीमाशीं तो बाहुयुद्ध करण्यास तत्काल तयार होईल आणि महाबलाढ्य भीमसेन त्या महाबाहूशीं युद्ध करण्यास समर्थ आहे. काल जसा या विस्तीर्ण

जगाचा नाश करितो, तसा भीमसेन त्या जरासंधाचा नाश करील. हे युधिष्ठिरा, तूं जर माझें हृदय जाणत असशील व तुझा जर मजवर विश्वास असेल, तर तूं या दोघां भीमार्जुनांस एखाद्या ठेवीप्रमाणें सत्वर माझ्या स्वाधीन कर.

राजा जनमेजया, भगवान् वासुदेवाचें हें भाषण ऐकून युधिष्ठिरानें उल्हासानें प्रसन्नवदन झालेल्या भीमार्जुनांकडे अवलोकन केलें व श्रीकृष्णाला म्हटलें— "हे शत्रूंचा नाश करणाऱ्या अच्युता, असें बोलूं नकोस. तूं आम्हां पांडवांचा नाथ असून आम्ही तुझे आश्रित आहों. हे गोविंदा, तूं जें म्हटलेंस तें सर्व योग्य आहे. ज्यांच्यापासून विजयश्री पराङ्मुख झाली आहे, त्यांचा तूं केव्हांहि पुढारी होणार नाहींस. हे जगन्नाथा, जरासंधाचा वध होऊन प्रतिबंधांत पडलेले भूपाल मुक्त झाले व माझा राजसूयहि पार पडला, असेंच तुझ्या आज्ञेंत रहाणाऱ्या मला वाटत आहे. यास्तव आतां विलंब करूं नको. ज्यायोगें हें कार्य सत्वर सिद्धीस जाईल तसें कर.

हे नरोत्तमा, रोगानें आर्त झालेला पुरुष धर्म, अर्थ व काम यांनीं रहित होऊन जसा दुःखी होतो, तसें तुम्हां तिघांवांचून माझें जीवित कष्टकर होईल. श्रीकृष्णावांचून पार्थ व धनंजयावांचून वासुदेव कधींच दृष्टीस पडत नाहीं. हे कृष्णा, या लोकीं तुम्हां दोघांना दुर्जय असें कांहींच नाहीं, अशी माझी दृढ मति आहे. तसाच हा बलवानांतील श्रेष्ठ महायशस्वी वृकोदर तुम्ही दोघे बरोबर असल्यावर कोणतें कार्य करूं शकणार नाहीं! सैन्याची योजना कुशलतेनें केली असतां महत्कार्य होतें. सैन्य स्वभावतःच आंधळें व जड आहे. पण बुद्धिमान् सेनापतीनें त्याची कुशलतेनें रचना केली असतां तें शत्रूचा पराजय करण्यास समर्थ होतें.

हे केशवा, जलप्रवाह दुसऱ्या प्रदेशीं न्यावयाचा झाल्यास तो सखलभूमीवरून न्यावा लागतो. किंवा ज्याप्रमाणें जलावर उपजीविका करणारे धीवर नदीतीरापासून पाट काढून त्यांतून नदीचें जल शेत, मळा इत्यादि इष्ट प्रदेशांत नेतात त्याप्रमाणें कुशल सेनापति, अनायासानें आक्रमण करण्यास योग्य असलेल्या इष्ट व निरुपद्रव प्रदेशीं सैन्य नेतात; महा बलाढ्य वीरापुढें नेऊन त्याला मृत्युमुखीं पाडीत नाहींत. सैन्यापेक्षां नीतिच श्रेष्ठ आहे. यास्तव आपण त्रैलोक्यांत प्रसिद्ध असलेल्या तुज नीतिविशारद सर्वज्ञ गोविंदाचाच आश्रय करून आपल्या कार्यसिद्धीसाठीं यत्न करावा, हें सर्वथा योग्य आहे. हे कृष्णा, मी आतां

बुद्धि, राजनीति, बल व कार्यसिद्धीचीं साधनें यांनीं युक्त असलेल्या तुलाच या कार्यसिद्धीसाठीं पुढाकार देतों.

हे यदुश्रेष्ठा, अर्जुनानें तुझ्या मतानें चालावें व भीमानें पार्थाला अनुसरावें. म्हणजे तुझी नीति, पार्थाचा विजय व भीमाचें बल या तीन अमोघ शक्तींनीं माझें कार्य सिद्ध होईल. ”

राजा, युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून भीमार्जुन व कृष्ण हे तीघे महा सामर्थ्यवान् भ्राते मगधदेशाकडे जावयास निघाले. त्यांनीं ब्रह्मनिष्ठ स्नातक ब्राह्मणांचा वेष घेतला व अजिन, दंड, कमंडलु, भगवीं वस्त्रें इत्यादि साधनांचा स्वीकार करून ते वीर आप्त-सुहृदांचीं अभिनंदनपर भाषणें ऐकत मोठ्या उत्साहानें मार्गस्थ झाले.

जरासंधाकडून भूपालांना होत असलेल्या पीडेचें स्मरण झाल्यामुळें ते तिघेहि क्रोधानें संतप्त झाले होते. त्यामुळें त्यांचीं शरीरें चंद्र, सूर्य व अग्नि यांप्रमाणें तेजानें दीप्त झालेलीं दिसत होतीं. सर्वांच्या पुढें चालणारा बलाढ्य भीमसेन व त्याच्या मागोमाग जाणारे विजयी कृष्णार्जुन, यांना पाहून युधिष्ठिर ‘जरासंध मरण पावला’ असेंच समजला. कारण हे पारिक्षिता, निमेषोन्मेषापासून महाप्रलयापर्यंत सर्व कार्यांचें नियंत्रण करणारे कृष्णार्जुन नर-नारायण असून लोकांना धर्म, अर्थ व काम यांत प्रवृत्त करणारेहि तेच आहेत, हें युधिष्ठिर जाणत होता.

हे राजा, कुरुदेशांतून निघालेले ते तिघे वीर कुरुजांगल प्रदेशांतून रम्य पद्मसरोवरावर गेले. तेथून त्यांनीं कालकूटपर्वताचें उल्लंघन केलें. पुढें पर्वतावरून वहाणाऱ्या गंडकी, महाशोणा व सदानीरा या नद्या तरून गेल्यावर त्यांना मार्गांत रमणीय सरयू नदी लागली. तिचें दर्शन घेऊन ते पूर्व कोसल-देशांत गेले. तेथून मिथिला व माला या प्रदेशांत जाऊन त्यांनीं चर्मण्वती, गंगा व शोणनद यांचें उल्लंघन केलें. नंतर ते पूर्व दिशेकडे वळले. तेथें वल्कलें व दर्भ धारण करून त्यांनीं मगध देशांत प्रवेश केला. तेथील विपुल वृक्ष व निर्मल जलाचे झरे यांनीं युक्त असलेल्या ‘गोरथ’-पर्वतावर निरंतर गायी चरत असत. त्या श्रेष्ठ पर्वतावर चढून तेथून त्या तिघांनीं मगधदेशाचें निरीक्षण केलें. २. ४. २०.

---

## अध्याय २१ वा.

[ १ कृष्ण व भीमार्जुन यांचें गिरिव्रजावलोकन. २ अमार्गानें नगरप्रवेश. ३ जरासंधाची भेट व प्रश्न. ४ श्रीकृष्णाचें उत्तर. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, त्या पर्वतावर आरोहण करून श्रीकृष्णानें दोघां पांडवांना मगधदेशाची माहिती सांगितली. तो म्हणाला—" हे कुंतीपुत्रहो, हा शुभ व विस्तीर्ण मगधदेश येथून किती रमणीय दिसत आहे पहा ! यामध्यें विविध पशु व निर्मल जल यांची समृद्धि असून हा प्रदेश सर्व उपद्रवरहित आहे. त्यांतील ही गिरिव्रज नगरी असंख्य सुंदर गृहांनीं युक्त असून तिची रचनाहि रम्य आहे. हिच्या सभोंवार असलेले वैहार, वराह, वृषभ, ऋषिगिरि व चैत्यक हे पांच शुभ पर्वत या नगरीचें चोहोंबाजूंनीं रक्षण करीत आहेत व त्यांचीं उंच शिखरें शीतल वृक्षांनीं युक्त आहेत. हे पर्वत त्यांवरील कामिजनांना प्रिय असलेल्या लोध्र वृक्षांच्या वनांनीं जणुं काय झांकून गेले आहेत. लोध्रवृक्षांचीं शाखाग्रें सुगंधित पुष्पांनीं वेष्टित झाल्यामुळें हीं वनेंहि अतिशय मनोहर दिसत आहेत.

हे पार्थहो, महात्म्या व्रतवान् गौतममुनीनें येथेंच औशीनरी शूद्रस्त्रीच्या ठिकाणीं काक्षीवान्-प्रभृति पुत्रांना उत्पन्न केलें. हे शूद्रीचे पुत्र असतांहि गौतम-मुनीच्या माहात्म्यानें मागधवंशाचे आश्रित झाले आहेत. त्या महात्म्या ऋषि-पुत्रांनीं मागधवंशाचा आश्रय केला, हा त्या ऋषीचा राजावर मोठाच अनुग्रह होय. अर्जुना, पूर्वी अंग-वंगादि बलाढ्य राजे या गौतम ऋषीच्या आश्रमांत येऊन क्रीडा करीत असत. हे वृकोदरा, पिप्पलवृक्षांची ही मनोरम वनराजी पहा.

अर्जुना, गौतममुनीच्या आश्रमापाशीं असलेल्या या लोध्रवृक्षांची शोभा किती रमणीय दिसत आहे, ती पाहिलीस का ! शत्रूंना ताप देणारा अर्बुद व शक्रवापी, हे दोन नाग येथेंच रहात असून स्वस्तिक व मणिनाग यांचें उत्तम गृहहि येथेंच आहे. मनूनें हे मागध देश मेघांना कधीं टाळतांच येऊं नयेत, अशी त्यांची रचना केली आहे. त्यामुळें या देशांत अवर्षण कधींच पडत नाहीं. कौशिक व मणिमान् यांनींहि या देशांवर मोठा अनुग्रह केला आहे. अशा-प्रकारच्या या रम्य व सर्वतः सुरक्षित नगरीला प्राप्त होऊन दुरात्मा जरासंध

आपल्याला ही अनुपम अर्थसिद्धि प्राप्त झाली आहे, असा मोठा अभिमान बाळगितो. पण आपण आतां अल्पकालांतच त्याचा तो सर्व दर्प हरण करूं."

राजा जनमेजया, इतकें बोलून वार्ष्णेय कृष्ण व पांडव भीमार्जुन, असे ते महापराक्रमी तीन भ्राते मागधपुराकडे जावयास निघाले. तें नगर चातुर्वर्ण्याच्या हृष्ट व पुष्ट जनांनीं युक्त होतें. त्या गिरिव्रजांत सर्वदा उत्सव होत असून त्या पर्वतवेष्टित नगरीला जिंकणें कोणालाहि शक्य नव्हतें. हे तिघेहि वीर त्या नगरीच्या समीप आल्यावर पर्वताप्रमाणें उंच असलेल्या तिच्या महाद्वाराकडे न जातां बृहद्रथाच्या वंशजांना आणि नागरिकांना पूज्य व प्रिय असलेल्या चैत्यकबुरुजाकडे वळले.

राजा, पूर्वी तेथें एक वृषभाच्या आकाराचा मांसाहारी दैत्य होता. बृहद्रथराजानें त्याचा वध करून त्याच्या कातड्याचे तीन नगारे तयार करविले. ते एकदा वाजविले असतां त्यांचा ध्वनि महिनाभर घुमत राही. असे ते अपूर्व नगारे त्या राक्षसाच्याच शिरांच्या दोऱ्या वळून त्यांनीं आंवळले होते. त्या राजानें दिव्य पुष्पांनीं व सुगंधी द्रव्यांनीं त्यांचें पूजन करून त्यांची आपल्या नगरीच्या प्रवेशद्वारावर स्थापना केली होती. तेथें ते नगारे नित्य वाजत असत. पण त्या तिन्ही नगाऱ्यांचा भंग करून हे तिघे वीर दुसऱ्या दगडी कोटाकडे चालले. तेव्हां द्वाररक्षक अनेक आयुधें घेऊन त्यांच्या अंगावर धावून आले. तथापि त्यांच्या प्रतिबंधाला न जुमानतां गिरिव्रजनगरीच्या रम्य तटावर ते त्वरेनें चढले व जरासंधाला मारण्याची इच्छा करणाऱ्या त्यांनीं, जणुंकाय त्याच्या मस्तकावरच लत्ताप्रहार करून, त्या चैत्यकप्राकाराचें फार मोठें प्राचीन व दृढ शिखर आपल्या बाहुप्रहारांनीं फोडून भूमीवर पाडविलें. तें शिखर मागधांना मोठें प्रिय व पूज्य होतें. त्यानंतर त्याच मार्गानें ते गिरिव्रजनगरांत शिरले.

(२) इकडे हा प्रकार चालला असतां नगरींतील वेदपारग ब्राह्मणांनीं दुश्चिन्हें होत असलेलीं पाहून तीं जरासंधास निवेदन केलीं. राजपुरोहितांनीं अरिष्टनिवारणार्थ गजारूढ झालेल्या प्रतापवान् जरासंधाच्या भोंवतीं प्रज्वलित अग्नि फिरवून यज्ञिय पशूप्रमाणें त्याचें पर्यग्निकरण केलें व दीक्षा घेतलेला जरासंध व्रतस्थ राहून उपवास करूं लागला.

इतक्यांत बाह्य शस्त्ररहित, पण बाहू हेंच ज्यांचें शस्त्र आहे, असे जरासंधाशीं द्वंद्वयुद्ध करण्याची इच्छा करणारे ते तीन वीर स्नातकवेषानें गिरिव्रजनगरींत गेले. तेथें त्यांनीं भक्ष्य व सुगंधि माल्यादि पदार्थांनीं युक्त असलेलीं अनेक दुकानें पाहिलीं. त्या विस्तीर्ण नगरीचें ऐश्वर्य व सर्व पदार्थांची समृद्धि पहात ते नरश्रेष्ठ चालले होते.

भीमार्जुन व कृष्ण या तिघांनीं राजमार्गानें जात असतां वाटेंत एका माळ्याकडून बलात्कारानें तीन पुष्पमाला घेऊन त्या आपल्या गळयांत घातल्या. याप्रमाणें विचित्र वस्त्रें परिधान करून आणि गळयांत पुष्पमाला व कानांत तेजस्वी कुंडलें घालून ते महावीर हिमालयांतील सिंह जसे गायींचें निवासस्थान शोधीत जातात, त्याप्रमाणें जरासंधाचा शोध करीत त्याच्या राजमंदिराकडे चालले. त्या तिघांचेहि बाहु शालवृक्षासारखे दीर्घ व पुष्ट आणि वक्षःस्थल विशाल होतें. त्यांनीं चंदन व अगुरु यांची सुवासिक उटी लावली होती. हत्तीप्रमाणें उंच व पुष्ट असलेल्या त्यांस पाहून त्या नगरींतील लोकांना मोठा विस्मय वाटला.

परिक्षिता, राजमंदिरांत येऊन पोंचल्यावर ते वीर लोकांनीं गजबजलेले तीन चौक ओलांडून निर्भयपणें व मोठ्या अभिमानानें राजाजवळ गेले. तेव्हां त्यांस पाहून जरासंध मोठ्या आदरानें उठून उभा राहिला आणि पाद्य, मधुपर्क, गायी व सत्कार यांस पात्र असलेल्या त्यांचें यथाविधि आतिथ्य करण्यास प्रवृत्त झाला. तो म्हणाला—'भगवन्, तुमचें स्वागत असो.' पण हे राजा, जरासंधाच्या त्या स्वागताचा सत्कार न करितां भीमार्जुन मौन धारण करून बसले. तेव्हां महाबुद्धिमान् श्रीकृष्णानें त्यास म्हटलें, 'हे राजा, हे दोघे या वेळीं मौनव्रतांत स्थित आहेत. मध्यरात्र उलटून गेल्यावर ते भाषण करतील.' श्रीकृष्णाचें हें वचन ऐकून राजानें त्या तिघांची यज्ञशाळेंत रहाण्याची व्यवस्था करून तो आपल्या मंदिरांत गेला.

( ३ ) राजा जनमेजया, मध्यरात्रीनंतर जरासंधराजा त्यांच्यापाशीं आला. कारण स्नातक ब्राह्मण मध्यरात्रीं जरी आपल्या येथें आले तरी त्यावेळीं त्यांचें स्वागत करण्याचा त्या राजाचा नियम होता. त्याला अनुसरून तो मागधराज अग्निगृहांत त्यांस भेटावयास आला. पण त्या तिघांना पूर्वीच्याच वेषांत पाहून जरासंधाला विस्मय वाटला. जरासंध यज्ञशाळेंत येतांच ते तिघे पुरुषव्याघ्र आसनावरून उठून व 'हे राजा, तुझें कुशल असो' असें बोलून परस्परांकडे

पहात उभे राहिले. श्रीकृष्णासमक्ष मरण पावणाऱ्या मनुष्यास अवश्य मोक्ष-प्राप्ति होते. यास्तव जरासंधहि मुक्तच होईल, असा त्यांच्या 'कुशल' या शब्दांत गूढ अर्थ होता.

राजा, त्यानंतर जरासंधानें त्या तिघां स्नातकवेष धारण करणाऱ्या यादव-पांडवांस 'आपण बसावें' अशी विनंति केली. तिला मान देऊन महायज्ञांतील त्रेताग्नीप्रमाणें आपल्या स्वाभाविक तेजानें देदीप्यमान असलेले ते तिघे पुरुषश्रेष्ठ आसनांवर बसले. तेव्हां सत्यनिष्ठ जरासंधनृपानें त्या कपट वेषधारी द्विजांची निंदा करीत त्यांस म्हटलें—"हे विप्रहो, या मनुष्यलोकीं कोणीहि स्नातकव्रत धारण करणारे ब्राह्मण समावर्तनादि निमित्तावांचून पुष्पमाला, चंदनाची उटी इत्यादि मंगल चिन्हें धारण करीत नाहींत, हें मला निश्चित ठाऊक आहे. असें असतां पुष्पमाला धारण करणारे तुम्ही कोण आहां ?

तुमच्या भुजांवर धनुष्याच्या प्रत्यंचेचे घट्टे स्पष्ट दिसत आहेत. यावरून तुम्ही क्षत्रिय असून ब्राह्मणांचा बाह्य वेष धारण केला आहे, यांत संशय नाहीं. यास्तव विचित्र वस्त्रें व गंध-माल्यादि मंगलें, यांनीं युक्त असलेले तुम्ही कोण आहां हें मला सत्य सांगा. राजापुढें सत्य भाषण करणेंच उचित आहे. यास्तव चैत्यकपर्वताचें शिखर फोडून अमार्गानें व अशा कपटवेषानें तुम्ही येथें कां आलां तें सांगा. राजाचा अपराध करितांना तुम्हांला भीति कशी वाटली नाहीं ! ब्राह्मणांचें सर्व सामर्थ्य त्यांच्या वाणींत आहे, कृतींत नाहीं. परंतु तुमचें हें कर्म तुमच्या या वेषाच्या विरुद्ध आहे. तुम्हीं आपल्या मनांत आज काय करण्याचें योजिलें आहे ? शिवाय माझ्या घरीं आलेल्या तुमचा मीं अर्घ्य-पाद्यादिकांनीं सत्कार केला असतां, त्याचा स्वीकार करून तुम्हीं मजवर अनुग्रहहि केला नाहीं. तेव्हां तुमचें येथें येण्याचें प्रयोजन तरी काय आहे, हें मला निवेदन करा."

(४) जरासंधाचें हें भाषण ऐकून उदारबुद्धि, वाक्यविशारद श्रीकृष्ण मधुर व गंभीर वाणीनें म्हणाला—"हे राजा, आम्ही स्नातक ब्राह्मण म्हणजे ब्रह्मचिंतन करणारे आहोंत, असें तूं समज. हे जरासंधा, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तिघेहि स्नातक होऊं शकतात. त्यांतील कांहीं विशेष नियम धारण करितात व कांहीं सामान्य नियम धारण करितात. निमित्तावांचून माल्यादिक मंगल चिन्हें धारण करणारा क्षत्रिय ऐश्वर्यास प्राप्त होतो. जे पुष्प धारण करितात त्यांना निश्चित श्री प्राप्त होते. म्हणून आम्हीं पुष्पमाला धारण केल्या आहेत.

क्षत्रियांच्या[1] बाहूंमध्यें जसें सामर्थ्य असतें, तसें त्यांच्या वाणीमध्यें नसतें, हें खरें आहे. त्यामुळें हे बार्हद्रथा, क्षत्रियाचें वचन अप्रगल्भ नसतें. विधात्यानें आपलें वीर्य क्षत्रियाच्या बाहूंमध्यें स्थापिलें आहे. तें पहाण्याची जर तुझी इच्छा असेल, तर हे राजा, तूं तें आज निःसंशय पहाशील. धीर पुरुष मित्राच्या घरीं योग्य मार्गानें जातात व शत्रूच्या गृहांत अमार्गानें प्रवेश करितात. यास्तव आम्ही ज्या मार्गानें आलों तो आमचा धर्मविहित मार्गच आहे. आम्ही येथें कांहीं कार्योद्देशानें आलों आहों. त्यामुळें शत्रूपासून आम्ही सत्काराचा स्वीकार करणार नाहीं. आमचें हें नित्यव्रत आहे, असें तूं समज." २. ३. २१.

---

## अध्याय २२ वा.

[ १ श्रीकृष्ण-जरासंधसंवाद. ]

( १ ) जरासंध—हे विप्रहो, मीं तुमच्याशीं कधीं वैर केल्याचें मला स्मरत नाहीं किंवा तुम्हांला मीं कांहीं अपकार केल्याचेंहि माझ्या लक्षांत येत नाहीं. असें असतां निरपराध असलेल्या मला तुम्ही आपला शत्रु कसे मानितां, हें मला सांगा. हीच सत्यवचनाची मर्यादा आहे. जो दुसऱ्यावर व्यर्थ मिथ्या दोषारोप करितो, तो क्षत्रिय पुढें अनर्थांत पडतो, यांत संशय नाहीं. एखादा धर्मज्ञ महारथ असून जो अधर्माचरण करितो, तो कष्टकर गतीला प्राप्त होतो व परम कल्याणापासूनहि त्याचा भ्रंश होतो. स्वधर्माप्रमाणें आचरण करणाऱ्या क्षत्रियाचा क्षात्रधर्म त्रैलोक्यांत श्रेष्ठ आहे. धर्मज्ञ लोक दुसऱ्या कोणत्याहि धर्माची प्रशंसा करीत नाहींत. मी स्वधर्मामध्यें दृढ स्थित आहें. मीं सर्व दोषांपासून आपलें नियमन केलें आहे. मीं आपल्या प्रजेचा कोणताहि अपराध केलेला नाहीं. त्यामुळें तुम्ही केवळ अनवधानानें असें विपरीत भाषण करीत अहां, असें मला वाटतें.

श्रीकृष्ण—हे महाबाहो, कोणी एक क्षत्रियकुलश्रेष्ठ आपल्या कुलाचें महत्कार्य आपल्या मस्तकावर वहात आहे. त्याच्या आज्ञेनें आम्ही तुझ्याशीं वैर करावयास उद्युक्त झालों आहों. हे राजा, तूं त्या भूलोकांतील अनेक क्षत्रियांना जिंकून आणिलें आहेस व रुद्राला त्यांचा बलि अर्पण करणार आहेस. असला

---

१ क्षत्रियो बाहुवीर्यस्तु न तथा वाक्यवीर्यवान् ।



जरासंधाच्या वधासाठीं गेलेल्या भीमार्जुनांस श्रीकृष्ण पर्वतशिखरावरून मागधांची गिरिव्रज नगरी दाखवीत आहे. (पृष्ठ २३५)

क्रूरपणा व्यक्त करूनहि तूं आपल्याला निरपराध कसें मानितोस ? हे बृहद्रथ-पुत्रा, तूंहि इतर राजांप्रमाणें एक राजा असतांना इतर धर्मिष्ठ राजांना रुद्राला बलि देण्याची इच्छा करीत आहेस. यास्तव तुझ्या पाशांत न सांपडलेल्या कोणाहि क्षत्रियाला तूं वध्यच आहेस. राजा आम्हीं जर तुझी उपेक्षा केली, तर तूं केलेल्या राजहिंसेचें पाप आम्हांला लागेल.

हे राजा, आम्ही स्वतः धर्माचरण करणारे असून धर्मरक्षण करण्यासहि समर्थ आहों. कोणीं सत्क्षत्रियानें मनुष्यांचा बलि दिलेला आजपर्यंत कधीं कोणीं पाहिला किंवा ऐकलाहि नाहीं. असें असतांना तूं स्वधर्माचें उल्लंघन करून शंकराला मनुष्याच्या बलींनीं संतुष्ट करण्याची इच्छा कशी करितोस ? तूं स्वतः क्षत्रिय असून क्षत्रियांनाच यज्ञांतील पशु करीत आहेस ! हे जरासंधा, तुझ्या-सारखा इतका मूढबुद्धि दुसरा कोण असणार ! जो मनुष्य ज्या ज्या अवस्थेंत जें जें कर्म करितो, तो त्या त्या अवस्थेंत त्या सर्वांचें फल भोगितो. आम्ही आर्तांचें दुःख दूर करण्यासाठीं त्याच्याकडे धांवत जाणारे आहों. तूं आपल्याच ज्ञातीचा क्षय करावयास उद्युक्त झाला आहेस. यास्तव आपल्या ज्ञातीची वृद्धि व्हावी म्हणून तुझा वध करण्यासाठीं आम्ही आज येथें आलों आहों. या लोकीं आपला वध करील असा क्षत्रियांमध्यें कोणी नाहीं, असें जें तूं समजत आहेस, तो हे राजा, तुझा केवल भ्रम आहे. स्वधर्म जाणणारा व कुलाचार पाळण्यांत दक्ष असलेला कोणता क्षत्रिय संग्रामानंतर प्राप्त होणाऱ्या अक्षय व अतुल स्वर्गांत प्रवेश करणार नाहीं.

हे नरेंद्रा, जे क्षत्रिय स्वर्गाचाच आश्रय करून रणयज्ञाची दीक्षा घेतात ते या सर्व लोकांस जिंकतात, हें तूं निश्चयानें जाण. वेद, महद्यश, तप व रणांतील मृत्यु हा निश्चित सुखहेतु आहे, युद्धांतील मृत्यु हाच इंद्राचा वैजयंत प्रासाद आहे. कारण त्यामुळें त्याचा लाभ होत असतो. रणांतील मृत्यु अनेक गुणांनीं परिपूर्ण आहे. इंद्रानें समरांगणांतील मृत्यूनेंच वैजयंत प्रासादाची प्राप्ति करून घेऊन सर्व असुरांना जिंकिलें व आतां तो जगाचें पालन करीत आहे. तुझ्या महत्पुण्यामुळें स्वर्गमार्गासाठीं आमचें वैर जसें तुला हितावह होईल, तसें दुसऱ्या कोणाचेंहि होणार नाहीं. तूं मागधांच्या विपुल सैन्यामुळें आपल्याला अजिंक्य समजत आहेस व त्याच्या संख्याबलानेंच इतका उन्मत्त झाला आहेस.

पण हे राजा, तुझें बाहुबल तूं जितकें समजतोस तितकें नाहीं, हें निश्चयानें जाण. प्रत्येक मनुष्यामध्यें तुझ्या सारखेंच वीर्य व तेज असणें शक्य नाहीं,

तथापि तुझ्यापेक्षां अधिक तेजस्वी व वीर्यवान् असे पुरुष या जगांत नाहींतच, असें तूं समजूं नको. जोंवर ही गोष्ट तुझ्या प्रत्ययाला आली नाहीं, तोंवरच तुझा हा गर्व आहे. तुझें बल आम्ही सहज सहन करूं. यास्तव मी तुला काय सांगतों तें ऐक.

हे मागधा, तूं आपल्या स्वजातीयांविषयींचा अभिमान व दर्प टाकून दे. पुत्र, अमात्य व सैन्य यांसह तूं यमलोकीं जाऊं नकोस. दंभोद्भव, कार्तवीर्य व उत्तर बृहद्रथ हे तीन राजे आपल्याहून श्रेष्ठ असलेल्या पुरुषांचा अवमान करून नाश पावले, हें तुला माहितच आहे. तुझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा करणारे आम्ही खरोखर ब्राह्मण नाहीं. मी हृषीकेश शौरि आहें व हे दोघे नरवीर पांडव आहेत. मी यांचा मातुलपुत्र कृष्ण असून तुझा शत्रु आहें, असें तूं समज. हे मागधराजा, आम्ही तुला युद्धाचें आह्वान करितों. तूं स्वधर्मांत स्थित होऊन आमच्याशीं युद्ध कर. एक तर या राजांना सोडून दे, किंवा आमच्या हातून मरून यमलोकीं जा.

जरासंध—हे कृष्णा, मीं न जिंकलेल्या कोणाहि राजाला येथें आणिलेलें नाहीं. मीं न जिंकलेला, असा कोणता राजा माझ्या प्रतिबंधांत आहे, तें सांग पाहूं. हे वार्ष्णेया, पराक्रमानें शत्रूला आपल्या अधीन करून घेऊन आपल्या इच्छेप्रमाणें त्याच्याशीं आचरण करणें हेंच क्षत्रियांचें धर्म्य उपजीवन आहे, असें धर्मवेत्ते सांगतात. हे वासुदेवा, या राजांना रुद्रदेवतेला बळी देण्यासाठीं जिंकून आणल्यावर मी आतां भीतीनें त्यांना कसें सोडून देऊं ! क्षात्रव्रताला स्मरून मला हें अकार्य करितां येत नाहीं. यास्तव मी तुमच्या व्यूहबद्ध सैन्याशीं आपल्या व्यूहबद्ध सेनेनें किंवा तुम्हांतील एकेकाशीं, दोघांशीं किंवा तिघांशीं एकदाच किंवा पृथक् पृथक् युद्ध करीन.

हे राजा जनमेजया, यादवेंद्र कृष्णाला असें सांगून, त्या भयंकर कर्में करणाऱ्या यादव-पांडवांशीं युद्ध करण्याची इच्छा करणाऱ्या जरासंधानें आपल्या सहदेवपुत्राला राज्याभिषेक करण्याची आज्ञा केली. कृष्ण, अर्जुन व भीमसेन यांतील कोणाशीं तरी युद्ध करण्याचा प्रसंग आला असतां जरासंधराजाला आपल्या 'कौशिक' व 'चित्रसेन' या सेनापतींचीच आठवण झाली. हे राजा, त्या सेनापतींची 'हंस' व 'डिंभक' हीं लोकांच्या सत्कारास पात्र झालेलीं नांवें या लोकीं प्रसिद्ध होतीं व त्यांचा उल्लेख पूर्वीं आलाच आहे.

त्यानंतर पुरुषश्रेष्ठ शौरीनें सर्व बलवानांमध्यें श्रेष्ठ, सिंहाप्रमाणें पराक्रमी, सत्यप्रतिज्ञ व भूलोकीं भयंकर कर्में करणारा जो हा जरासंधराजा, त्याचा मृत्यु कोणाच्या हातीं आहे, त्याचा विचार केला. तेव्हां संग्रामांत यादवांच्या हातून याचा वध होणें शक्य नाहीं; विधात्यानें याचा मृत्यु दुसऱ्याच्याच हातून नियत केला आहे, हें जाणून त्या आत्मवेत्त्यांतील मुख्य मधुसूदनानें स्वतःच त्याच्याशीं युद्ध करण्याची इच्छा केली नाहीं. उलट त्या बलरामानुजानें ब्रह्मदेवाच्या आज्ञेला मान देऊन भीमाच्याच हातून याचा वध होणें उचित आहे, असा निश्चय केला. २. ४. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ भीम व जरासंध यांचें मल्लयुद्ध. ]

( १ ) वैशंपायन—हे भारता, त्यानंतर ज्यानें युद्धाचा दृढ निश्चय केला आहे, अशा जरासंधराजाला महावक्ता कृष्ण म्हणाला—" हे राजन्, आम्हां तिघांपैकीं कोणाबरोबर युद्ध करण्याची तुझी इच्छा आहे ? तुझ्याशीं युद्ध करावयास आमच्यांतील कोणीं सज्ज व्हावें ? "

यदुश्रेष्ठानें असा प्रश्न केला असतां महा तेजस्वी, युद्धदुर्मद जरासंधानें भीमसेनाशीं युद्ध करण्याची आपली इच्छा प्रकट केली. तेव्हां जरासंधाचा पुरोहित गोरोचन, पुष्पमाला, इतर मंगलकारक पदार्थ आणि दुःख व मूर्च्छा या कालीं सुख व संज्ञा देणारीं औषधें घेऊन युद्धेच्छु जरासंधापाशीं आला व त्या यशस्वी ब्राह्मणानें ज्याचें स्वस्त्ययन केलें आहे, असा राजा जरासंध क्षात्र धर्माला स्मरून युद्ध करावयास सज्ज झाला. मस्तकावरील किरीट काढून त्यानें आपले केंस घट्ट बांधिले व वेलेचें उल्लंघन करून जाणाऱ्या क्षुब्ध सागराप्रमाणें तो वेगानें उठला आणि भयंकर पराक्रम करणाऱ्या भीमाला म्हणाला—" हे पांडुपुत्रा, मी तुझ्याशीं युद्ध करीन. कारण जो सर्वांत श्रेष्ठ असेल, त्याच्या हातून पराभूत होणें किंवा त्याला जिंकणें हेंच वीराला खरें भूषण आहे."

राजा, असें बोलून बलासुर जसा शक्रावर धांवून जातो तसा तो तेजस्वी मागधराजा भीमसेनाच्या अंगावर धांवला. तेव्हां कृष्णानें ज्याचें स्वस्त्ययन केलें आहे, असा बलाढ्य भीमसेन कृष्णाची अनुज्ञा घेऊन, युद्धाच्या इच्छेनें

त्याच्या समीप आला. ते दोघेहि नरश्रेष्ठ महापराक्रमी असून त्यावेळीं त्यांच्यापाशीं बाहू हींच शस्त्रें होतीं. आपल्याला आज अनुरूप प्रतिस्पर्धी मिळाला, म्हणून त्या दोघांनाहि हर्ष झाला व ते एकमेकांस जिंकण्याची आकांक्षा करूं लागले.

त्यांनीं हस्तग्रहणपूर्वक परस्परांस अभिवादन केलें व मोठ्या ईर्षेनें आपले दंड थोपटले. त्यामुळें त्यांच्या बाहुभूषणांचे लोंबणारे बंद वेगानें हालूं लागले. त्यानंतर त्यांनीं परस्परांचे खांदे धरिले. त्यांवर ते वारंवार ठोसे मारूं लागले. त्यांनीं दोन हत्तींप्रमाणें एकमेकांस धडका दिल्या. परस्परांस घट्ट आवळण्याचा प्रयत्न केला. पण त्यांतून त्यांनीं एकमेकांस सोडवून घेतलें. विचित्र हातवारे करून पायांचे पेंच घातले. एकमेकांचे अवयव खाकेमध्यें धरून त्यांना चिरडण्याचा यत्न केला. गाल व गंडस्थल यांचे प्रहार केले. तेव्हां त्यांपासून विजेसारखीं किटाळें निघालीं.

राजा, त्या दोघां वीरांनीं परस्परांच्या गळ्यांत बाहुपाश घालून स्नायूंवर पादप्रहार केले. छातीवर भयंकर थपडा लगावल्या. मस्तकांवर ठोसे मारिले. परस्परांचे हात पिळवटून हत्तीप्रमाणें गर्जना केली. दोन मेघांप्रमाणें दिसणारे ते दोघे भयंकर सिंहनाद करीत परस्परांस पीडा देऊं लागले. हस्ततलाच्या प्रहारांनीं त्यांनीं परस्परांचीं अंगें तांबडीं लाल करून टाकिलीं. एकमेकांकडे डोळे वटारून पहाणारे ते दोघे सिंहाप्रमाणें क्रुद्ध झाले व एकमेकांस ओढूं लागले.

त्यांनीं आपलीं अंगें एकमेकांच्या अंगावर घांसलीं. परस्परांस बाहुपाशांत धरून चिरडून टाकण्याचा यत्न केला. त्या दोघांनींहि आपल्या दोन्ही बाहूंनीं परस्परांच्या उदरास विळखा घातला. कटिप्रदेश व बरगड्या यांवर जोरानें कोपरांचे प्रहार केले. ते दोघेहि मल्लविद्येंत अतिशय प्रवीण असल्यामुळें एकमेकांचे प्रहार मोठ्या चपलतेनें चुकवूं लागले. त्या दोघांनींहि परस्परांच्या कमरेला विळखा घालून व आपल्या प्रतिमल्लाला छातीपर्यंत वर उचलून वेगानें भूमीवर आपटिलें. त्यावेळीं त्यांनीं बाहुयुद्धांतील सर्व मर्यादेचें अतिक्रमण केलें होतें.

ते एकमेकांच्या पाठी भूमीला लावून त्यांवर कोपरे, गुडघे, इत्यादिकांचे प्रहार करीत होते. शत्रूचे हात, पाय, मान इत्यादि अवयव गवताप्रमाणें पिरगळूं लागले व परस्परांस हुलकावण्या दाखवून परस्परांचीं मर्मस्थानें फोडूं लागले. याप्रमाणें त्यांचें विचित्र युद्ध चाललें असतां, तें पहाण्यासाठीं नगरांतील हजारों

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व वृद्ध स्त्रियाहि तेथें जमल्या. प्रेक्षकांची मोठी गर्दी झाली.

त्यानंतर सभोंवार जमलेल्या सर्व लोकांच्या फार मोठ्या समुदायांत एकसारखें भयंकर युद्ध झालें. दोन्ही हातांनीं मान वांकवून शत्रूला अधोमुख करणें, त्याला उताणें पाडण्यासाठीं त्याचे पाय ओढणें इत्यादि प्रकार त्या उभयतांमध्यें वारंवार चालले होते. त्या उभयतांचा तो संघर्ष–झोंबी वज्र व पर्वत यांच्या संघर्षाप्रमाणेंच भासला. एकमेकांचें सामर्थ्य पाहून त्या दोन्ही बलाढ्य वीरांना परस्परांचें मोठें कौतुक वाटलें.

आपल्याला झुंजण्यास आज योग्य प्रतिमल्ल मिळाला म्हणून ते दोघेहि अतिशय हृष्ट झाले. परस्परांस जिंकण्याची इच्छा करणारे ते दोघे एकमेकांचें छिद्र पाहूं लागले. त्या युद्धभूमीमध्यें परस्परांचे बाहु आपल्या हातांनीं धरून परस्परांस मागें रेटीत असलेल्या त्या वीरांनीं तेथें जमलेल्या असंख्य लोकांना भयानें दूर सरावयास लाविलें.

राजा, वृत्रासुर व इंद्र यांप्रमाणें बलाढ्य असलेल्या त्या मागध-पांडवांनीं एकमेकांस पुढें ओढणें व मागें ढकलणें, मर्मांवर गुढघ्याचे प्रहार करणें, मोठ्या सिंहनादानें परस्परांस भीति दाखविणें, पाषाणांच्या प्रहारांसारखे भयंकर प्रहार करून परस्परांस पीडा देणें, इत्यादि उपायांनीं मल्लयुद्धाची पराकाष्ठा केली. ज्यांचें वक्षःस्थल विस्तीर्ण असून बाहू दीर्घ आहेत, अशा त्या दोघां युद्धकुशल वीरांनीं लोखंडी परिघांसारख्या आपल्या बाहूंनीं एकमेकांस आवळून धरिलें. राजा, कार्तिक महिन्याच्या प्रतिपदेस त्यांचें हें युद्ध सुरू झालें व त्रयोदशीपर्यंत एकसारखें अहोरात्र तें चाललें. त्यांतील कोणीहि मागें हटेना.

याप्रमाणें कांहीं एक न खातां तेरा दिवस युद्ध केल्यावर चतुर्दशीच्या दिवशीं रात्रीं जरासंध श्रांत झाला व युद्धापासून परावृत्त होतो कीं काय असें वाटलें. तेव्हां श्रीकृष्ण आपला शत्रु थकला आहे, असें पाहून शिष्टाचार प्रदर्शित करण्याच्या मिषानें भयंकर कर्मे करणाऱ्या भीमसेनास जणु काय शत्रुवधाचा काल प्राप्त झाला आहे, असें सुचवीतच म्हणाला—

“ अरे कौंतेया, श्रांत झालेल्या शत्रूला रणामध्यें फार पीडा देतां येत नाहीं, कारण त्याला जर फार पीडा देऊं लागलें तर तो आपल्या जीविताचाच पूर्णपणें त्याग करितो. यास्तव बा भीमा, तूं याला पीडूं नकोस. आपल्या बाहूंनीं याला सहन होईल अशा बेतानें तूं याच्याशीं युद्ध कर. ”

कृष्णानें असें सांगितलें असतां शत्रुनाशक पांडवानें जरासंधाचें तें क्लान्तरूप पाहिलें व हा आतां पूर्णपणें थकला आहे, असें जाणून त्याचा वध करण्याचा निश्चय केला. त्यानंतर आजपर्यंत कोणाच्या हातूनहि पराभूत न झालेल्या जरासंधाला जिंकण्यासाठीं बलाढ्य वृकोदरानें फार मोठा आवेश आणिला. २. ४. २३.

---

## अध्याय २४ वा.

[ १ जरासंधाचा वध. २ बंदींतील राजांची मुक्तता. ३ वासुदेवाचें द्वारकेला प्रयाण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, त्यानंतर भीम जरासंधाच्या वधाचा पूर्ण निश्चय करून यदुनंदन कृष्णास म्हणाला—" हे वासुदेवा, मी कटिबद्ध होऊन आपल्या सामर्थ्यानें याला मारण्याचा जरी निश्चय केला आहे, तरी या पापी जरासंधाचा मला वध करितां येईल, असें वाटत नाहीं. "

भीमसेनाचे हे शब्द कानीं पडतांच पुरुषश्रेष्ठ कृष्ण जरासंधाच्या वधाच्या इच्छेनें वृकोदराला त्वरा करीत म्हणाला—" हे भीमसेना, तुझें जें दैवी सामर्थ्य आहे व तुझ्या ठिकाणीं जें वायूचें बल आहे, तें आतां या जरासंधाच्या ठिकाणीं सत्वर प्रदर्शित कर. "

तें ऐकतांच आपलें अलौकिक सामर्थ्य प्रकट करून बलाढ्य भीमानें अति वीर्यवान् जरासंधाला वर उचलून शंभर वेळां गरगर फिरविलें व त्याला भूमीवर आपटून दोन्ही गुडघ्यांनीं पाटीचा कणा दुमडला आणि त्यास भूमीवर लोळविलें. नंतर त्याचा एक पाय हातांत धरून दुसऱ्या मांडीवर आपला पाय जोरानें टेंविला आणि त्याला मधोमध चिरिलें.

---

१ जरासंधवधप्रसंगीं भीमानें त्याला अनेकदा मधोमध चिरून टाकिलें असतां, त्याच्या शरीराचीं दोन छकलें पुनः पुनः सांधत व तो जिवंत होत असे. तेव्हां श्रीकृष्णानें हातांत एक 'नळाची' काठी घेऊन ती मध्यें चिरली व उजवा भाग डावीकडे व डावा उजवीकडे धरला. ही खूण पटतांच भीमानें जरासंधाचीं दोन शकलें करून तीं सांधणार नाहींत अशा उलट दिशेला टाकिलीं. तेव्हां त्याचा वध झाला. अशी आख्यायिका लोकांत रूढ आहे. व 'कुंभकोणम्' येथें छापलेल्या भारताच्या प्रतींत अशा अर्थाचे प्रक्षिप्त श्लोकहि आहेत. परंतु येथें मात्र या वर्णनाचा मुळींच उल्लेख नाहीं.

भीमाच्या हातून फाडल्या जाणाऱ्या जरासंधाच्या शरीरापासून फार मोठा ध्वनि उत्पन्न झाला व तें महत्कार्य करीत असतांना वृकोदरहि भयंकर गर्जना करूं लागला. तेव्हां सर्व प्राण्यांना भयंकर वाटणारा तो तुमुल नाद ऐकून सर्व मागध भयभीत झाले. भीमसेनाच्या व जरासंधाच्या त्या भीषण गर्जनेनें स्त्रिया गर्भगलित झाल्या. भीमसेनाचा सिंहनाद व जरासंधाचा मरणकालीन आक्रोश ऐकून हिमालयपर्वत विदीर्ण होत आहे कीं काय असा भास झाला. विशेषतः भीमसेनाच्या गर्जनेनें गिरिव्रजांतील सर्व मागध देहभान विसरले.

(२) हे राजा, त्यानंतर मृत जरासंधाला राजमंदिराच्या प्रवेशद्वारांत झोंपल्याप्रमाणें टाकून ते शत्रुनाशक कृष्ण-पांडव रातोरात तेथून निघाले. कृष्णानें जरासंधाचा ध्वजयुक्त रथ जोडून त्यांत त्या दोघां भ्रात्यांना बसविलें व जरासंधानें प्रतिबंधांत ठेविलेल्या आपल्या राजबंधूंस मुक्त केलें. तेव्हां त्या सर्व रत्नार्ह राजांनीं कृष्णाला अमूल्य रत्नें अर्पण केलीं व आपल्याला मरणासारख्या महद्भयापासून सोडविल्यामुळें त्या भूपालांनीं त्याचा मोठा सत्कार केला. तेव्हां ज्यानें एका बलाढ्य शत्रूला जिंकलें आहे, असा स्वतः अक्षत व शस्त्रसंपन्न असलेला तो वीर यदुनंदन त्या दिव्य रथावर आरूढ होऊन राजांसह गिरिव्रजांतून निघाला.

त्यावेळीं सर्व क्षत्रियांस दुर्जय असलेला, सुंदर, दोन्ही हातांनीं शरसंधान करणारा व शत्रूवर वारंवार आघात करणारा कृष्णसारथि अर्जुन आपल्या सोदर भ्रात्यासह जरासंधाच्या रथांत बसला होता व इतर राजे भिन्न भिन्न रथांवर आरूढ झाले होते. यादवेंद्र कृष्ण ज्याचा सारथि आहे आणि अलौकिक योद्धे भीमार्जुन ज्यांत बसले आहेत, असा तो सर्व धनुर्धरांना अजिंक्य असलेला श्रेष्ठ रथ त्या प्रसंगीं फारच शोभला. बृहस्पतीची भार्या जी तारा तिच्या निमित्तानें झालेल्या संग्रामांत इंद्र व विष्णु ज्या रथावर आरूढ झाले होते त्याच रथावर आरूढ होऊन श्रीकृष्ण खांडवप्रस्थाकडे जावयास निघाला.

तो रथ सुवर्णाप्रमाणें चमकत असून त्याला सुवर्णाच्याच घागऱ्या लावल्या होत्या. त्या विजयी रथाचा घोष मेघगर्जनेसारखा दूरवर ऐकूं येत असे. इंद्रानें ज्या रथांत बसून दानवांना नव्याण्णव वेळां मारिलें, तोच रथ प्राप्त झाल्यामुळें हे तिघेहि पुरुषश्रेष्ठ अतिशय हृष्ट झाले.

त्यानंतर महाबाहु कृष्ण आपल्या दोघां भ्रात्यांसह रथारूढ झाला आहे असें पाहून गिरिव्रजांतील मागध विस्मित झाले. दिव्य अश्वांनीं युक्त व वायूप्रमाणें

वेगवान् असलेला तो रथ कृष्णाकडून अधिष्ठित झाला असतां फारच शोभला. रथाला स्पर्श न करणारा व देवांनीं निर्माण केलेला अलौकिक ध्वज त्या रथावर उंच उभारिला असून तो इंद्रधनुष्याप्रमाणें असलेला अति तेजस्वी ध्वज चार कोसांच्या अंतरावरून दिसत असे.

इतक्यांत कृष्णानें गरुडाचें स्मरण केलें. त्याबरोबर तो भगवानापाशीं आला व त्याच्या रथावर बसला. त्यामुळें तो अपूर्व रथ एखाद्या ग्रामादिचिह्नभूत चैत्य वृक्षाप्रमाणें भासला. ज्यांनीं आपलीं मुखें पसरलीं आहेत व जीं भयंकर गर्जना करीत आहेत, अशा ध्वजावर आरूढ होणाऱ्या भूतांसह तो सर्पभक्षक गरुड भगवानाच्या त्या श्रेष्ठ रथावर बसला असतां हजारों किरणांनीं आच्छादित झालेल्या मध्याह्नकालीन सूर्याप्रमाणें तो रथ आपल्या तेजानें सर्व भूतांना दुर्निरीक्ष्य झाला.

हे राजा, त्यावरील तो दिव्य ध्वजश्रेष्ठ वृक्षामध्यें अडकून रहात नाहीं, शस्त्रानें तुटत नाहीं व सर्व लोकांना स्पष्ट दिसतो. मेघगर्जनेप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे, अशा त्या दिव्य रथावर आरूढ होऊन पुरुषश्रेष्ठ शौरी दोघां पांडुपुत्रांसह गिरिव्रजांतून बाहेर पडून एका समप्रदेशीं येऊन उभा राहिला. हा रथ इंद्रापासून वसुराजाला, वसूपासून बृहद्रथाला व बृहद्रथापासून क्रमानेंच जरासंधाला प्राप्त झाला होता.

जनमेजया, यशस्वी कृष्ण त्या दिव्य रथानें गिरिव्रजाच्या बाहेर येऊन समप्रदेशीं स्थित आहे, असें पाहून नगरांतील ब्राह्मणादि सर्व लोक मोठ्या आदरानें तेथें आले आणि त्यांनीं दोन पांडव व यादव कृष्ण यांची यथाविधि पूजा केली. जरासंधाच्या बंधांतून मुक्त केलेले राजेहि मधुसूदनापाशीं येऊन व त्याचें पूजन करून स्तुतिपूर्वक म्हणाले—" हे महाबाहो, भीमार्जुनांच्या बलानें युक्त असलेल्या तूं—देवकीनंदनानें धर्माचें परिपालन करावेंस यांत आश्चर्य नाहीं. जरासंधरूपी ह्रदांतील घोर दुःखपंकांत खितपत असलेल्या आम्हां राजांचा तूं आज उद्धार केलास, हे आम्हांवर तुझे केवढे उपकार आहेत.

हे विष्णो, आम्ही या भयंकर गिरिदुर्गामध्यें अतिशय क्लेश भोगीत होतों. त्यांतून तूं आम्हांला सोडविलेंस. त्यामुळें हे यदुनंदना, तुझें उज्ज्वल यश दशदिशांना व्यापून राहिलें आहे. हे पुरुषश्रेष्ठा, आम्ही तुजपुढें हात जोडून उभे आहोंत. आम्हीं तुझें कोणतें प्रिय करावें तें सांग. तूं सांगितलेलें कार्य किती जरी दुष्कर असलें तरी तें आम्हीं मोठ्या आनंदानें करूं."

राजांचें हें स्तुतिवचन ऐकून हृषीकेशानें प्रथम त्या राजांच्या चित्ताचें असें समाधान केलें–'तुम्हांला दुरात्म्या जरासंधानें फार क्लेश दिले. पण आतां यापुढें तुम्हांला असलें दुःख पुनः कधींहि भोगावें लागणार नाहीं.' असें आश्वासन देऊन त्या उदारात्म्यानें त्यांस पुनः म्हटलें—"हे वीरांनो, युधिष्ठिर राजा राजसूय यज्ञ करण्याची इच्छा करीत आहे. धर्मामध्यें प्रवृत्त झालेल्या व साम्राज्याची इच्छा करणाऱ्या त्या धर्मात्म्याचा उद्देश जाणून तुम्हीं सर्वांनीं त्याला साह्य करावें, अशी माझी इच्छा आहे."

राजा जनमेजया, कृष्णाचें हें भाषण ऐकून त्या सर्व राजांना परम संतोष वाटला. त्या सर्वांनीं 'ठीक आहे' असें म्हणून त्याचें वचन शिरसा मान्य केलें. त्या कृतज्ञ भूपालांनीं दाशार्ह कृष्णाला अनेक रत्नें अर्पण केलीं. पण 'प्राणसंकटांतून सोडविलेल्या राजांपासून धन ग्रहण केल्यास आपल्या यशाची हानि होईल' हें जाणून तो प्रथम तीं ग्रहण करीना; तेव्हां त्या राजांनीं गोविंदाची परोपरीनें प्रार्थना केली असतां केवल त्यांच्यावर अनुकंपा करण्यासाठीं त्यानें तीं मोठ्या अनिच्छेनें स्वीकारिलीं.

इतक्यांत जरासंधाचा पुत्र उदारबुद्धि सहदेव पुरोहिताला पुढें करून आपल्या नगरांतील पौरजन व अमात्य यांसह कृष्णापाशीं आला. त्यानें त्या वीराला साष्टांग प्रणाम करून त्याच्यापुढें असंख्य रत्नें ठेविलीं व तो हात जोडून त्याच्यापाशीं उभा राहिला. तेव्हां कृष्णानें भयभीत झालेल्या जरासंधपुत्राला अभय दिलें व त्यानें आणलेल्या मूल्यवान् रत्नांचा स्वीकार केला.

यदुनंदनानें जरासंधपुत्राला तेथेंच मोठ्या संतोषानें त्याच्या पितृपदावर अभिषेक केला. तेव्हां सहदेवानें त्याच्याशीं सख्य करून त्याच्या आज्ञेनें आपल्या नगरांत प्रवेश केला. तो परत निघाला असतां वृकोदर भीम, कृष्ण व पार्थ यांनीं क्रमानें त्याचा सत्कार केला. नंतर पुरुष श्रेष्ठ शौरी असंख्य रत्नें घेऊन, भीमार्जुनांसह, अलौकिक विजयश्रीनें युक्त होऊन तेथून निघाला.

अल्पावकाशांतच ते तिघेहि वीर इंद्रप्रस्थास येऊन पोंचले. धर्मराजाच्या मंदिरापाशीं येतांच वासुदेव मोठ्या त्वरेनें व संतोषानें त्याच्या पाशीं गेला व ह्मणाला—"हे धर्मराजा, मी तुला आनंदाची वार्ता सांगतों, ती ऐक. तुझ्या बलाढ्य भीमानें वीर्यवान् जरासंधाला समरांगणांत मारिलें व सर्व राजांना त्याच्या बंधनांतून सोडविलें. युधिष्ठिरा, तुझे दोघेहि प्रिय भ्राते भीमार्जुन कुशल असून अक्षत शरीरांनीं स्वनगरास परत आले आहेत."

कृष्णाचें हें भाषण ऐकून युधिष्ठिरानें त्याचा परम सत्कार केला. अति हृष्ट झालेल्या त्या राजानें आपल्या दोघां भ्रात्यांस दृढालिंगन दिलें. जरासंधासारख्या बलाढ्य शत्रूला मारून अक्षत शरीरांनीं परत आलेल्या आपल्या विजयी भ्रात्यांस पाहून तो अजातशत्रु संतुष्ट झाला. त्यानें वयाच्या अनुक्रमानें भीम, कृष्ण व अर्जुन यांस आलिंगन दिलें व त्यांच्या बरोबर आलेल्या राजांचाहि योग्य सत्कार व पूजा करून त्यांस आपापल्या राजधानीस जाण्याची अनुज्ञा दिली. उदार युधिष्ठिरानें जाण्याची अनुज्ञा दिली असतां हृष्ट झालेले ते सर्व राजे उच्च-नीच वाहनांतून आपापल्या देशांस निघून गेले.

(३) हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें बुद्धिमान् जनार्दनानें पांडवांच्या हातून जरासंधाचा घात बुद्धिपुरस्सर करविला आणि राजा युधिष्ठिर, पृथा, कृष्णा, सुभद्रा, भीमसेन, अर्जुन व नकुल-सहदेव यांची संमति आणि धौम्य पुरोहिताचा आशीर्वाद घेऊन तो महात्मा वासुदेव द्वारका-नगरीस निघून गेला. धर्मराजानें दिलेल्या त्याच जरासंधाच्या दिव्य व मनासारख्या वेगवान् रथांत बसून, त्याच्या ध्वनीनें सर्व दिशांना व्यापीत तो महात्मा जाऊं लागला असतां युधिष्ठिरादि पांडवांनीं शुभ कर्मे करणाऱ्या त्याला प्रदक्षिणा घातली. भगवान् कृष्ण स्वदेशास निघून गेला असतां पांडवांना कांहीं वेळ खेद झाला. तथापि ते सर्वहि पुरुषश्रेष्ठ विवेकी असल्यामुळें त्याच्या अधीन झाले नाहींत.

हे पारिक्षिता, याप्रमाणें फार मोठा विजय मिळवून व राजांना अभयदान देऊन पांडव कृष्णकृपेनें कृतकृत्य झाले. या अद्भुतकर्मानें त्यांचें यश अधिकच वाढलें. सर्व पांडवांची द्रौपदीवरील प्रीति उत्तरोत्तर वाढत गेली आणि त्या वेळीं राजा युधिष्ठिरानें धर्म, अर्थ व काम या तिन्ही पुरुषार्थांना हितावह होईल, असेंच वर्तन ठेवून धर्मतः प्रजेचें पालन केलें. २. ४. २४.

येथें जरासंधवध पर्व समाप्त झालें.

---

# दिग्विजयपर्व ५.



## अध्याय २५ वा.

[ १ पांडवांच्या दिग्विजयाचें संक्षिप्त वर्णन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, तें श्रेष्ठ धनुष्य, अक्षय्य भाते, दिव्य रथ, ध्वज व ती अलौकिक सभा प्राप्त झालेली पाहून पार्थ युधिष्ठिराला म्हणाला—"हे राजन्, आपल्याला अपेक्षित असलेलें हें धनुष्य, शस्त्रें, श्रीकृष्णासारखा शूर व पराक्रमी, मंत्री, दुर्ग, यश व बल हीं सर्व दुष्प्राप्य असलेलीं साधनें मीं प्राप्त करून घेतलीं आहेत. आतां आपल्या कोशाची वृद्धि करणें हें आपलें पहिलें कार्य आहे, असें मी समजतों. मी सर्व राजांना कर द्यावयास लावितों. त्यासाठीं मी आतां शुभ तिथि, मुहूर्त व नक्षत्र पाहून कुबेराच्या उत्तर दिशकडे विजयार्थ जातों."

राजा, धनंजयाचें हें भाषण ऐकून धर्मराजा मधुर व गंभीर वाणीनें त्यास बोलला—" अर्जुना, ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचनादि शुभ धार्मिक विधि करवून मग प्रयाण कर. दुष्टांना शासन व सज्जनांचें प्रिय करण्यासाठीं जाणाऱ्या तुझा विजय असो. पार्था, तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील."

याप्रमाणें धर्मराजानें अनुज्ञा दिली असतां अद्भुत कर्में करणारा अर्जुन अग्नीनें दिलेल्या दिव्य रथांत बसून प्रचंड सैन्यासह दिग्विजयार्थ निघाला. त्यानंतर महाबलवान् भीमसेन व पुरुषश्रेष्ठ नकुल-सहदेवहि धर्म राजाच्या आज्ञेनें सैन्यासह भिन्न भिन्न दिशांकडे विजयार्थ निघाले. धनंजयानें कुबेराच्या उत्तर दिशेंत जय मिळविला. वृकोदरानें पूर्व दिशा, सहदेवानें दक्षिण दिशा व अस्त्रवेत्त्या नकुलानें पश्चिम दिशा जिंकिली. याप्रमाणें त्या चारी पराक्रमी भ्रात्यांनीं दिग्विजय करून विपुल संपत्ति जिंकून आणली असतां खांडवप्रस्थाचा प्रभु युधिष्ठिर सर्व सहृज्जनांमध्यें परम ऐश्वर्यानें शोभूं लागला. २. ५. २५.

---

## अध्याय २६ वा.

[ १ धनंजयाचा दिग्विजय व भगदत्ताशीं पराभवपूर्वक सख्य. ]

**(१) जनमेजय—हे ब्रह्मन्, माझ्या पूर्वजांचें हें अपूर्व चरित्र ऐकत असतां माझी तृप्तिच होत नाहीं. यास्तव मला त्यांच्या दिग्विजयाचा सविस्तर वृत्तान्त सांग.**

वैशंपायन—हे राजा, ठीक आहे; वस्तुतः त्या चारी पांडुपुत्रांनीं सर्व पृथ्वीला जरी एकाच वेळीं जिंकलें तरी मी तुला अगोदर धनंजयाचा विजयवृत्तान्त कथन करितों. हे भरतर्षभा, त्या पराक्रमी धनंजयानें प्रथम कुलिंद देशांतील सर्व नृपतींना विशेष पराक्रमावांचूनच सहज वश करून घेतलें. नंतर त्यानें आनर्त्त व कालकूट हे देश जिंकून सैन्यासह सुमंडल-राजाचा पराभव केला आणि त्या सुमंडलासह, सव्यसाची शाकलद्वीप व प्रतिविंध्य-राजा यांवर चाल करून गेला. तेव्हां शाकलद्वीप व सप्तद्वीप यांतील सर्व भूपालांशीं अर्जुनाच्या सैन्याचें तुमुल युद्ध झालें. परंतु हे भारता, त्या महान् धनुर्धारी भूपतींनाहि पार्थानें जिंकिलें व या जिंकलेल्या सर्व नृपालांसह त्यानें प्राग्ज्योतिष देशावर चाल केली.

तेथें 'भगदत्त'-नांवाचा बलाढ्य राजा राज्य करीत होता. त्याच्याशीं महात्म्या अर्जुनानें भयंकर संग्राम केला. त्या प्राग्ज्योतिष देशांत किरात, चीन व इतर सागरतीरवासी अनेक योद्धे होते. त्यांच्या साह्यानें भगदत्तानें धनंजयाशीं सतत आठ दिवस घोर युद्ध केलें. परंतु अर्जुनाचा रणोत्साह कायम असलेला पाहून तो राजा जणुकाय हंसतच त्याला म्हणाला—"हे कुरुनंदना, तुझा हा अतुल पराक्रम इंद्रपुत्राला शोभण्यासारखाच आहे. हे धनंजया, मी महेंद्राचा सखा असून त्याच्यासारखाच अजिंक्य योद्धा आहें. परंतु हे धनुर्धरा, मी तुझ्यापुढें मात्र रणांत उभा रहाण्यास समर्थ नाहीं. हे पांडवा, तुझें शस्त्र-नैपुण्य पाहून मी संतुष्ट झालों आहें. आतां मी तुझें कोणतें प्रिय करूं तें सांग. हे वत्सा, तुझी जी इच्छा असेल ती मी पूर्ण करीन."

भगदत्तराजाचें हें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला—हे राजेंद्रा, कुरुवंशांतील धर्मज्ञ, सत्यनिष्ठ, यज्ञ करणारा व विपुल दक्षिणा देणारा श्रेष्ठ राजा धर्मपुत्र युधिष्ठिर सम्राट्पदप्राप्तीसाठीं राजसूय यज्ञ करणार आहे. यास्तव तूं त्याला खंडणी दे. हे राजा, तूं माझ्या पित्याचा सखा आहेस व मलाहि प्रिय आहेस, म्हणून तुला आज्ञा करणें मला योग्य वाटत नाहीं. तूं प्रेमानेंच आम्हांला कर द्यावास हें बरें.

भगदत्त म्हणाला—हे कौंतेया, तूं जसा मला प्रिय आहेस, तसाच युधिष्ठिरहि आहे. मी त्याला मोठ्या संतोषानें कर देईन. याशिवाय तुझें आणखी कोणतें प्रिय करूं तें सांग. २. ५. २६.

---

## अध्याय २७ वा.

[ १ धनंजयाचा नानादेशांतील विजय. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, भगदत्ताचें हें वचन ऐकून 'हे उदार राजा, तूं आम्हांला खंडणी देणार आहेस एवढ्यानेंच आमचें प्रिय कार्य झालें' असें अर्जुन बोलला व याप्रमाणें भगदत्ताला अंकित करून घेऊन कुबेरानें रक्षण केलेल्या उत्तर दिशेकडे तो वळला. तेथें त्यानें अंतर्गिरि, बहिर्गिरि व उपगिरि हे पर्वत जिंकून घेतले व त्या प्रदेशांतील सर्व नृपतींना वश करून त्यांच्यापासून धन मिळविलें. नंतर त्या सर्व भूपालांसह तो उलुक देशांतील 'बृहन्त'-राजावर चालून गेला. तो राजा मृदंगाच्या नादानें, रथचक्राच्या ध्वनीनें व मत्तगजांच्या चीत्कारानें सर्व पृथ्वीला कांपवीत असे. तो बलाढ्य राजा पार्थ आपल्या देशावर चाल करून आला आहे, असें पहातांच आपल्या चतुरंग सैन्यासह नगरांतून बाहेर पडला. धनंजयाशीं त्याचें भयंकर युद्ध झालें. पण हे राजा, त्या तुमुल रणसंग्रामांत पार्थाच्या अतुल पराक्रमापुढें बृहन्त टिकाव धरूं शकला नाहीं. तो अजिंक्य पर्वतेश्वर बृहन्त आपल्या रत्नभांडारासह सर्व प्रकारें पार्थाच्या स्वाधीन झाला. तेव्हां अर्जुनानें त्याचें राज्य त्याला परत देऊन त्याच्यासह सेनाबिंदूवर स्वारी केली व त्या राजाला सत्वर पदच्युत केलें.

त्यानंतर फाल्गुनानें प्रजेनें व्याप्त असलेलें मोदापूर, वामदेव, सुदामा व उत्तर उलूक या देशांच्या नृपांना एकत्र करून त्यांना धर्मराजाचें सार्वभौमत्व मान्य करावयास लाविलें. पुढें पार्थानें पंचगण देश जिंकला. तेथून तो सर्व भूपालांसह सेनाबिंदुराजाच्या देवप्रस्थनगरीस गेला व तेथें आपल्या चतुरंग-सेनेसह राहिला. नंतर तो धनुर्धर महातेजस्वी पार्थ जिंकलेल्या सर्व भूपतींसह पौरवांच्या विश्वगश्वनृपतींवर चालून गेला. पर्वतांत रहाणाऱ्या त्या सर्व शूर महारथांचा पराभव करून पौरवांनीं रक्षण केलेली नगरी त्याच्या सैन्यानें स्वाधीन करून घेतली.

त्या पर्वतांवर आणखी सात प्रकारचे रानटी लोक रहात असत. त्यांच्यांत दांपत्यव्यवस्था नसून पशूप्रमाणें स्त्री-पुरुषव्यवहार होत असे. त्या लुटारूंनाहि पांडवानें जिंकिलें.

हे राजा, तेथून तो क्षत्रियश्रेष्ठ काश्मीर देशास गेला. तेथील वीरांचा पराभव करून त्यानें त्या प्रांतांतील दहा क्षुद्र मांडलिकांसह लोहितराजास स्वाधीन करून घेतलें.

त्यानंतर त्रिगर्त, दार्व व कोकनद या देशांतील क्षत्रियांनीं अर्जुनाला विपुल धन दिलें. तेथून त्यानें अभिसारीनांवाची रम्य नगरी जिंकून घेतली व उरगवासी रोचमानाचा रणांत पराभव केला. त्यानंतर त्या कौंतेयानें चित्रायुधानें रक्षण केलेल्या रम्य सिंहपुराचा विध्वंस केला. तेथून तो कुरुनंदन सुह्म व चोल या देशांवर ससैन्य चालून गेला व त्या देशांना पादाक्रांत करून त्यानें मोठ्या पराक्रमानें तो दुर्जय बाल्हिकदेश वश करून घेतला. पुढें तो पांडुनंदन कांबोज व दरद देशांच्या अधिपतींस जिंकून ईशान्य दिशेकडे वळला. तेथील वनांत रहाणाऱ्या चोरांना पराभूत करून त्यानें लोह, परमकांबोज आणि उत्तर-ऋषिक देशांत प्रवेश केला व तेथें जमलेल्या सर्व नृपालांना जिंकिलें. त्यावेळीं देव-दानवांच्या संग्रामाप्रमाणें पार्थाचें व ऋषिकांचें भयंकर युद्ध झालें.

राजा, त्या संग्रामांत पार्थानें ऋषिकाला जिंकून त्याच्याकडून शुकोदरासारख्या रंगाचे आठ अश्व घेतले. त्याचप्रमाणें दुसऱ्या उत्तर ऋषिकांपासून मयूरांसारखे सुंदर व यदृच्छेनें चालण्यास समर्थ असलेले शीघ्रगामी अश्व करार्थ स्वीकारिले. त्यानंतर हिमवान् व निष्कूट पर्वतांवरील लोकांसहि जिंकून त्या सव्यसाची पार्थानें श्वेतपर्वतावर निवास केला. २. ५. २७.

---

## अध्याय २८ वा.

[ १ पार्थाचा उत्तरदिशेंतील दिग्विजय व स्वदेशीं प्रत्यागमन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, त्यानंतर त्या पराक्रमी वीरानें श्वेतपर्वताचें उल्लंघन करून द्रुमपुत्रानें रक्षण केलेल्या किंपुरुषावास-देशांत प्रवेश केला. तेथें युद्धामध्यें अनेक क्षत्रियांचा संहार करून त्यांच्या राजाचा पराभव केला व त्याच्यापासून कर घेतला. तेथून तो पांडवश्रेष्ठ गुह्यकांनीं रक्षिलेल्या हाटकदेशांत गेला व त्यानें गुह्यकांना सामोपचारानेंच वश करून घेतलें. त्यानंतर त्या कुरुनंदनानें उत्तम मानससरोवराकडे जात असतां मार्गांत ऋषींनीं मानससरोवरापासून निर्माण केलेले सर्व जलप्रवाह पाहिले. तेथून मानससरोवराला जाऊन हाटकाच्या समीप असलेला गंधर्वरक्षित प्रदेश जिंकला. तेथें त्याला तित्तिरिकल्मष व मंडूक या नांवाच्या उत्कृष्ट अश्वांची खंडणी मिळाली.

तेथून तो इंद्रनंदन उत्तरेकडील हरिवर्ष जिंकण्याच्या इच्छेनें त्या प्रदेशांत गेला. त्या नगरीचे द्वारपाल बलाढ्य व धिप्पाड होते. ते महापराक्रमी अर्जुना-

पाशीं येऊन मोठ्या संतोषानें म्हणाले—" हे पार्था, तुला ही नगरी जिंकतां येणें केव्हांहि शक्य नाहीं. यास्तव आपला दिग्विजय पुरा करून तूं परत फिर. जो पुरुष या नगरींत प्रवेश करितो, तो तत्काल मृत्यु पावतो. यास्तव हे वीरा, तुझा विजय येथेंच समाप्त होऊं दे. तूं आम्हांला अतिशय प्रिय आहेस, म्हणून आम्ही तुला हें हितवचन सांगत आहों. हे अर्जुना, येथें जिंकण्यास योग्य, किंवा प्रेक्षणीय असें कांहींच नाहीं. या उत्तर कुरुदेशांत केव्हांहि युद्ध संभवत नाहीं. हे कौंतेया, तूं जरी या नगरींत प्रवेश केलास तरी तुझ्या दृष्टीस कांहीं पडणार नाहीं. येथें मनुष्यदेहानें कोणतीहि वस्तु पहाणें शक्य नाहीं. यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, यावांचून तुझें दुसरें जर कांहीं कार्य असेल तर तें आम्हांला सांग. म्हणजे आम्हीं तत्काल तुझ्या इच्छेप्रमाणें करूं."

हे राजन्, त्यांचें हें भाषण ऐकून पार्थ जणुकाय हंसतच त्यांस म्हणाला—" हे द्वाररक्षकहो, तुमच्या देशांत मानवांचा प्रवेश होणें जर इष्ट नाहीं, तर मी या नगरींत येत नाहीं. परंतु तुम्ही कांहीं तरी खंडणी अर्पण करून धर्मराजाच्या सार्वभौमपदाला तुमची मान्यता द्या." तेव्हां त्या द्वारपालांनीं त्याची मागणी मान्य करून दिव्य रेशमी वस्त्रें, भूषणें, क्षौमें, अजिनें इत्यादि मूल्यवान् वस्तूंचा कर अर्जुनाला अर्पण केला.

हे भारता, याप्रमाणें त्या पुरुषव्याघ्रानें उत्तर दिशा जिंकून, अनेक क्षत्रिय व लुटारु यांच्याशीं अनेक संग्राम करून, युद्धांत त्यांचा पराभव केला. त्या सर्वांपासून कराच्या रूपानें विपुल धन, विविध रत्नें व पूर्वोक्त दिव्य अश्व घेतले आणि शेवटीं तो महापराक्रमी पार्थ आपल्या चतुरंग सेनेसह इंद्रप्रस्थास परत आला व जिंकून आणलेली विपुल संपत्ति धर्मराजाला अर्पण करून त्याच्या आज्ञेनें तो स्वमंदिरीं गेला. २. ५. २८.

---

## अध्याय २९ वा.

[ १ वृकोदराचा दिग्विजय. ]

( १ ) **वैशंपायन**—हे कुरुश्रेष्ठा, याप्रमाणें पार्थ दिग्विजय करीत असतां, त्याच वेळीं महाबलाढ्य भीमसेन धर्मराजाच्या आज्ञेनें पूर्व दिशेकडे गेला. तो शत्रूचा शोक वाढविणारा प्रतापी पांडव प्रथम अश्व, रथ, गज इत्यादिकांनीं परिपूर्ण व आयुधादिकांनीं सज्ज झालेल्या प्रचंड सैन्यासह विस्तीर्ण पांचाल-

देशांत गेला व त्यानें तेथील पांचालांना सामोपचाराच्या विविध उपायांनीं वश करून घेतलें. नंतर गंडक व विदेह या देशांवर जय मिळवून त्यानें अल्पावधींतच दाशार्णांसहि जिंकिलें. दाशार्णदेशाच्या सुधर्माराजानें भीमसेनाबरोबर अंगावर रोमांच उभे करणारें भयंकर बाहुयुद्ध केलें. त्या युद्धांत भीमसेनानें त्या राजाला जिंकलें व त्याचा अतुल पराक्रम पाहून त्याला आपल्या महान सैन्याच्या सर्व सेनापतींवर मुख्य अधिपति नेमिलें.

त्यानंतर तो बलाढ्य वृकोदर आपल्या फार मोठ्या सेनेसह जणुकाय सर्व पृथ्वीला कांपवितच पूर्व दिशेकडे निघाला व त्यानें अश्वमेध-देशाच्या रोचमान राजाला विशेष श्रमांवांचूनच युद्धांत जिंकिलें. याप्रमाणें पूर्वदिशा जिंकून बलवानांतील श्रेष्ठ वीर भीमसेन दक्षिणदिशेकडे चाल करून गेला. त्यानें तेथील पुलिंदनगरीच्या सुकुमार सुमित्रराजाला वश करून घेतलें. त्यानंतर हे राजा, तो नरव्याघ्र भीमसेन धर्मराजाच्या आज्ञेनें महापराक्रमी शिशुपालाच्या नगरीकडे वळला.

तेव्हां त्या चेदिराजानें पांडवांचा मनोदय ओळखला व नगराबाहेर येऊन वृकोदराचें स्वागत केलें. त्यावेळीं दोघांनीं एकमेकांस परस्परांचें व आप्तेष्टांचें कुशल विचारिलें. नंतर चेदिराजानें आपलें सर्व राज्य भीमसेनाला अर्पण केलें व हंसून म्हटलें—"हे निष्पापा, तूं हें काय आरंभिलें आहेस ?" तेव्हां भीमानें त्याला धर्मराजाचा उद्देश निवेदन केला. तो ऐकून शिशुपालानें त्याचें म्हणणें मान्य केलें व खंडणी अर्पण केली. पुढें तो वृकोदर शिशुपालानें केलेल्या सत्काराचा स्वीकार करीत तेरा दिवस तेथें राहिला व पुढील दिग्विजयासाठीं सैन्यासह निघाला. २. ५. २९.

---

## अध्याय ३० वा.

( १ भीमसेनाचा पूर्वदिशेंतील दिग्विजय. )

(१) **वैशंपायन**—हे कुरुनंदना, त्यानंतर शत्रूंचें दमन करणाऱ्या वृकोदरानें कुमारदेशाच्या श्रेणिमान् राजाला व कोसल देशाच्या बृहद्बल राजाला जिंकिलें. तेथून तो पांडवश्रेष्ठ अयोध्येला गेला व त्यानें तेथील महाबलवान् धर्मज्ञ दीर्घयज्ञराजास विशेष परिश्रम न करितां वश करून घेतलें. नंतर त्यानें गोपाळकक्ष व उत्तर कोसल या दोन देशांस जिंकून तेथील मल्लांच्या अधिपतीला व

राजाला स्वाधीन करून घेतलें. तेथून तो महापराक्रमी भीमसेन हिमालयाच्या समीप असलेल्या जलोद्भव-देशांत गेला व अल्पकालांतच त्यानें तो सर्व देश जिंकून घेतला.

याप्रमाणें अनेक देश जिंकल्यावर त्या वीरानें भल्लाट व शुक्तिमान् या पर्वतांच्या सभोंवारचा प्रदेश स्वाधीन करून घेतला. नंतर समरापासून कधींहि परावृत्त न होणाऱ्या काशीराज सुबाहूला भयंकर पराक्रम करणाऱ्या भीमानें वश करून घेतलें व तेथून तो सुपार्श्व-देशाकडे वळला. त्यानें तेथील बलाढ्य क्रथराजाचा युद्धांत पराभव करून तो देश जिंकून घेतला. त्यानंतर मत्स्य, मलद, अनघ, अभय व पशुभूमिप्रदेश यांस स्वाधीन करून घेऊन तो मदधारपर्वताकडे परत फिरला. तेथें सोमधेयांचा पराभव करून तो उत्तरेकडे वळला. तेथें त्यानें मोठ्या पराक्रमानें वत्सभूमि जिंकिली व भर्गांचा अधिपति, निषाधाधिपति व मणिमान् इत्यादि अनेक राजांना अधीन करून घेतलें.

हे राजा, त्यानंतर, दक्षिण मल्लांचा प्रदेश व भोगवान् पर्वत यांना त्यानें सहज स्वाधीन करून घेतलें. तेथून तो शमक, वर्मक व विदेहदेशाचा जनकराजा यांकडे गेला व त्यांच्याकडून सामोपचारानेंच कर वसूल केला. नंतर त्यानें शक व बर्बर यांस कपटानें वश करून घेतलें. त्या पांडवानें विदेहदेशांत असतांनाच इंद्रपर्वताच्या समीप असलेल्या सातहि किराताधिपतींना जिंकिलें. त्यानंतर त्यानें सुह्म, प्रसुह्म व तत्पक्षीय पराक्रमी वीर यांचा युद्धांत पराजय केला. भीमसेनानें मागधांचा पराभव पूर्वींच केलेला असल्यामुळें त्यानें त्यांना ‘कर द्या’ अशी अधिकारानें आज्ञा केली.

नंतर तो पराक्रमी पांडुपुत्र दंड व दंडधार या पृथ्वीपतींना जिंकून त्यांच्यासह गिरिव्रजाकडे वळला. तेथें जरासंधाचा पुत्र जो सहदेव त्याचें सांत्वन करून त्याच्यापासून खंडणी घेतली व त्या सर्व जिंकलेल्या नृपतींसह तो कौंतेय कर्णापासून कर घेण्यासाठीं गेला.

त्यावेळीं भीमसेनाच्या चतुरंगसेनेनें जणुकाय सर्व पृथ्वीचा थरकांप करून सोडला होता. पांडवश्रेष्ठ भीमानें शत्रुनाशक कर्णाशीं भयंकर युद्ध करून त्याला पराजित केलें व त्याच्यापासून कर घेतला.

त्यानंतर वृकोदरानें बलवान् पर्वतवासी राजे जिंकिले. मोदागिरीला जाऊन पराक्रमी भीमानें तेथील अतिशय बलाढ्य नृपालाचा युद्धांत वध केला. तेथून

त्यानें पुंड्राधिप महावीर वासुदेव व कौशिकीच्या तीरावरील सामर्थ्यवान् भूपाल यांवर चाल केली. ते दोघेहि महावीर व भयंकर पराक्रम करणारे असून बलाढ्यहि होते. भीमसेनानें त्यांचा पराभव करून वंगदेशांत प्रवेश केला.

तेथें समुद्रसेन, चंद्रसेन, ताम्रलिप्त, कर्कटाधिपति व सुह्म या सर्व सागरवासी नृपांना व सर्व म्लेच्छांना जिंकून तो वायुपुत्र भीमसेन अनेक देशांच्या अधिपतींकडून कर घेत लौहित्य-देशास गेला. तेथें त्यानें सागरवासी सर्व म्लेच्छ नृपतींपासून विविध रत्नें, चंदन, अगरु इत्यादि सुगंधि द्रव्यें, उंची वस्त्रें, अमूल्य रत्नें, पाणिदार मोत्यें, बहुमोल शालजोड्या, सुवर्ण, रुपें, पोंवळीं इत्यादि मूल्यवान् वस्तु करादाखल ग्रहण केल्या. या शिवाय त्या म्लेच्छराजांनीं पांडवावर अगणित धनाची वृष्टि केली. हे भारता, याप्रमाणें विजय मिळवून तो महा बलाढ्य वृकोदर इंद्रप्रस्थास परत आला आणि त्यानें जिंकून आणलेलें सर्व धन धर्मराजाला अर्पण केलें. २. ५. ३०.

---

## अध्याय ३१ वा.

[ १ सहदेवाचा दक्षिण दिशेंतील दिग्विजय. ]

( १ ) वैशंपायन—हे राजेंद्रा, भीमार्जुनांप्रमाणेंच सहदेवहि धर्मराजाची अनुज्ञा घेऊन फार मोठ्या सैन्यासह दक्षिण दिशेकडे निघाला. त्या वीरानें प्रथम शूरसेनाला पूर्णपणें जिंकलें. नंतर मत्स्य-राजाला आपल्या पराक्रमानें वश करून त्याच्यापासून कर घेतला. तेथून महाबलवान् दंतवक्राचा पराभव करून त्याला आपला मांडलिक केलें व त्याच्यापासून खंडणी घेतली. त्याच प्रमाणें सुकुमार सुमित्र-राजा, मत्स्य व चोरांचा प्रदेश, निषाद भूमि, गोशृंग पर्वत व श्रेणिमान्-राजा या सर्वांना त्या बुद्धिमानानें स्वाधीन करून घेतलें व नरराष्ट्राला जिंकून तो कुंतीभोजराजाकडे गेला.

तेव्हां त्या राजानें धर्मराजाची आज्ञा प्रीतिपूर्वक मान्य केली. तेथून तो चर्मण्वतीच्या तीरावरील प्रदेशाकडे वळला. तेथें वासुदेवानें अवशिष्ट ठेवलेला त्याचा पूर्व वैरी जो जंभकराजाचा पुत्र, त्याला सहदेवानें पाहिलें व त्याच्याशीं युद्ध आरंभिलें. त्या संग्रामांत सहदेवानें त्याचा पराभव केला व तो दक्षिण दिशेकडे निघाला. तेथें त्या वीरानें सेक व अपरसेक यांना जिंकून त्यांच्या पासून

विविध रत्नांचा कर घेतला आणि त्या राजांसह तो नर्मदेच्या समीप आला. तेथें अवंती-देशाधिपति विंद व अनुविंद हे दोघे नृपाल प्रचंड सेनेसह त्या माद्रीनंदनावर धांवून आले. तथापि त्या प्रतापवान् वीरानें युद्धांत त्यांचा पराभव करून त्यांच्यापासून अमूल्य रत्नें घेतलीं व तेथून भोजकट-नगरींत प्रवेश केला.

हे राजन्, त्या देशाच्या अजिंक्य भीष्मकराजानें सहदेवाशीं दोन दिवस एक सारखें युद्ध केलें. परंतु शेवटीं त्याचा पराजय होऊन त्यानें खंडणी दिली. त्या सर्व द्रव्याचा स्वीकार करून त्या पांडवानें कोसलदेशाधिपति व वेण्यातटाधिप या नृपांना जिंकलें. त्यानंतर त्या वीरानें क्रमानें कांतारक, प्राक्कोसल नाटकेय, हेरंबक, मारुध, रम्यग्राम, नाचीन व आनर्बुक या देशांच्या अधिपतींशीं युद्ध करून त्या सर्वांना पराजित केलें. नंतर त्या पांडुनंदनानें सर्व अरण्याधिपतींना जिंकून वाताधिप व पुलिंद या राजांशीं सख्य केलें व तो दक्षिण दिशेकडे वळला. तेथें पांड्यराजाशीं सबंध दिवसभर युद्ध करून त्याचा पराजय केल्यावर तो महाबाहु दक्षिणेकडील प्रसिद्ध 'किष्किंधा'-नांवाच्या गुहेकडे आला.

तेथें मैंद व द्विविद हे दोघे वानराधिप त्याच्याशीं सतत सात दिवस युद्ध करीत राहिले. पण सहदेव युद्धांत माघार घेत नाहीं, असें पाहून त्या संतुष्ट झालेल्या महात्म्या वानरश्रेष्ठांनीं प्रेमानें त्यास म्हटलें—"हे पांडववीरा, हीं सर्व रत्नें घेऊन जा. धर्मराजाचें कार्य निर्विघ्नपणें पार पडावें, अशी आमची इच्छा आहे." तेव्हां तो नरश्रेष्ठ तीं सर्व रत्नें घेऊन माहिष्मती-नगरीला परत आला. तेथें नीलराजाशीं त्या शत्रूंच्या वीरांचा नाश करणाऱ्या प्रतापवान् सहदेवाचें तुमुल युद्ध झालें. सैन्याचा संहार करणाऱ्या त्या भयंकर युद्धांत जीविताचाहि संशय वाटूं लागला. त्या नृपतीला अग्नीचें साह्य असल्यामुळें सहदेवाच्या सैन्यांतील रथ, अश्व, गज व चिलखतें धारण करणारे योद्धे प्रदीप्त अग्नीनें पोळून जाऊं लागले. तेव्हां तो कुरुनंदन सहदेव अतिशय चिंताक्रांत होऊन त्याच्या मुखांतून शब्द निघेनासा झाला.

जनमेजय—हे विप्रा, यज्ञासाठींच यत्न करणारा जो सहदेव त्याच्याशीं अग्नीनें युद्धांत शत्रुत्व कां केलें ?

वैशंपायन—माहिष्मतीनगरीमध्यें रहाणारा अग्नि नीलराजाच्या कन्येवर आसक्त झाल्यामुळें सर्वथा त्याच्या अधीन झाला होता. नीलराजाला एक अति

सुंदर कन्या होती. पिता हवन करण्यासाठीं होमशाळेंत गेला असतां ती त्याची कन्याहि अग्नीला प्रज्वलित करण्यासाठीं नित्य येत असे. वेळूच्या पंख्यानें किती जरी वारा घातला तरी त्या कन्येनें आपल्या तोंडानें फुंकर घातल्यावांचून तो कधीं प्रज्वलित होत नसे. कांहीं दिवस असा प्रकार चालला असतां भगवान् अग्नीच्या मनांत त्या सुंदर राजकन्येविषयीं अभिलाष उत्पन्न झाला. त्यानें मनुष्यरूप धारण करून त्या रूपवती कन्येला आपली इच्छा स्पष्ट शब्दांनीं कळविली. तेव्हां तिनेंहि ती मान्य केली. तिचें अनुमोदन मिळतांच ब्राह्मणरूपानें तो तिच्याशीं यथेष्ट रममाण होऊं लागला. कांहीं दिवसांनीं ही गोष्ट राजगृहांतील मुख्य माणसांना कळली.

एकदा त्यांनीं त्या ब्राह्मणरूपी अग्नीला राजापुढें नेलें असतां त्यानें ब्राह्मणाला यथाशास्त्र दंड केला. त्याबरोबर भगवान् अग्नि कोपानें प्रज्वलित झाला. तें पाहून विस्मित झालेल्या राजानें त्या ब्राह्मणापुढें नम्र होऊन साष्टांग नमस्कार घातला व हा अग्नीच ब्राह्मणरूपानें आपल्या कन्येशीं रत होत आहे, असें पाहून योग्य समयीं आपली कन्या त्या अग्निरूप ब्राह्मणाला अर्पण केली. त्या द्विजानेंहि मोठ्या संतोषानें त्या सुंदर राजकन्येचा स्वीकार केला व राजावर प्रसन्न होऊन, त्यास वर मागावयास सांगितलें. तेव्हां राजानें 'आपल्या सैन्याला शत्रूपासून नित्य अभय असावें' असा वर मागितला.

हे जनमेजया, तेव्हांपासून जे कोणी राजे अज्ञानानें त्या नगरीला बलात्कारानें जिंकण्याची इच्छा करितात, त्यांस अग्नि जाळून टाकितो. हे कुरूद्वहा, त्या माहिष्मती-नगरींतील सर्व स्त्रियांचा अग्नीनें परिग्रह केल्यामुळें त्या कोणालाहि स्वेच्छेनें दुष्प्राप्य झाल्या. स्त्रियांच्या इच्छेविरुद्ध वर्तन करण्यास तेथें कोणीहि समर्थ नव्हता. आपला भर्ता किंवा अन्य पुरुष यांच्या शरीरांत प्रवेश करून अग्नीच आपला उपभोग घेवो, अशा निश्चयामुळें त्या स्वैरिणी व यथेष्ट विहार करणाऱ्या झाल्या.

हे भरतश्रेष्ठा, या कारणानें सर्व राजे अग्नीच्या भयानें त्या नगरीला सर्वदा वर्ज्य करीत असत. पण धर्मात्मा सहदेव आपल्या सैन्याला अग्नीनें व्यापिल्यामुळें तें भयभीत झालें आहे, असें पाहूनहि मनांत डगमगला नाहीं, तर पर्वतासारखा अचल उभा राहिला. या प्रसंगीं काय उपाय योजावा, असा विचार करून, त्यानें हस्त-पादप्रक्षालनपूर्वक आचमन केलें व शुचिर्भूत होऊन तो अग्नीस म्हणाला—

" हे अग्ने, तुला नमस्कार असो. आमचा हा सर्व उद्यम तुझ्या साठीं आहे. तूं देवांचें मुख आहेस, तूं यज्ञ आहेस. सर्वांना पावन करीत असल्यामुळें तूं 'पावक' आहेस. देवांकडे हव्य पोंचवीत असल्यामुळें तूं 'हव्यवाहन' आहेस. वेद तुझ्यासाठींच उत्पन्न झाले, म्हणून तूं 'जातवेद' आहेस. तुझे किरण विचित्र असल्यामुळें तूं 'चित्रभानु' आहेस. तूं देवांचा ईश म्हणजे सुरेश आहेस. तुझी तृप्ति कधींच होत नाहीं, म्हणून तुला 'अनल' म्हणतात. प्रभा हेंच तुझें धन आहे. हे विभावसो, तूं स्वर्गद्वाराला स्पर्श करितोस. तुझ्या मध्यें समर्पण केलेल्या घृतादि हुतांचें तूं भक्षण करितोस, म्हणून तूं 'हुताश,' प्रज्वलित होतोस म्हणून 'ज्वलन,' शिखा म्हणजे ज्वाला, त्यांनीं युक्त असल्यामुळें 'शिखी,' तूं सर्वात्मक असल्यामुळें 'वैश्वानर,' पिंकटवर्ण असल्यामुळें 'पिंगेश,' आपल्या विपुल तेजानें सर्वांना प्रकाशित करीत असल्यामुळें 'प्लवंग,' कार्तिकस्वामीला आपल्या उदरांत धारण केल्यामुळें 'कुमारसू,' रुद्राच्या उदरामध्यें असल्यामुळें 'रुद्रगर्भ' व सुवर्ण हें तुझें वीर्य असल्यामुळें तूं 'हिरण्यकृत्' आहेस."

" भगवान् अग्नि मला तेज देवो, वायु प्राण देवो, पृथ्वी माझ्यामध्यें बलाचें आधान करो व आप मला सुख देवो. जलाच्या उदरामध्यें रहाणाऱ्या हे महाबलाढ्य जातवेदा, हे सुरेश्वरा, तूं देवांचें मुख आहेस. हे अग्ने, तूं सत्यानें मला पावन कर. ऋषि, ब्राह्मण, देव व असुर यांच्याकडून तूं यज्ञामध्यें उत्तमप्रकारें तृप्त केला जातोस. सत्यानें तूं मला पावन कर. धूम हा तुझा ध्वज असल्यामुळें तुला 'धूमकेतु' म्हणतात. हे शिखिन्, वायूच्या साह्यानें तूं वृद्धि पावतोस. तूं शिखावान् व सर्व पापांचा नाश करणारा आहेस. सर्व प्राण्यांमध्यें तूं नित्य स्थित आहेस. यास्तव सत्यानें तूं मला निष्पाप कर. हे भगवन्, मी शुचिर्भूत होऊन संतुष्ट चित्तानें तुझी अशी स्तुति केली आहे. यास्तव तूं मला संतोष, पुष्टि, ज्ञान व प्रीति दे."

राजा, जो कोणी पुरुष अग्नीच्या या श्लोकरूप स्वाहान्त आठ मंत्रांनीं पायसादिकांनीं अग्नींत हवन करितो, तो सर्वदा ऋद्धिमान् व दमनशील होऊन सर्व पापांपासून मुक्त होतो. जनमेजया, त्यानंतर 'हे हव्यवाहना, युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञास विघ्न करणें तुला योग्य नाहीं,' असें बोलून त्या माद्रीपुत्रानें भूमीवर दर्भ अंथरिलें व तो महात्मा अग्नीचें यथाविधि चिंतन करीत भयानें उद्विग्न झालेल्या आपल्या सैन्याच्या अग्रभागीं बसला.

तेव्हां ज्याप्रमाणें महासागर आपल्या मर्यादेचें उल्लंघन करीत नाहीं, त्याप्रमाणें अग्नीनें सहदेवाचें अतिक्रमण करून त्याच्या सैन्यांत प्रवेश केला नाहीं. तो महात्मा वह्नि हळू हळू नरश्रेष्ठ सहदेवापाशीं येऊन त्याचें सान्त्वन करीत म्हणाला—" हे कौरव्या, ऊठ, ऊठ. मीं तुझी नुस्ती परीक्षा पाहिली. तुझा व धर्मराजाचा सर्व आशय मी जाणतों. हे नकुलानुजा, पण कांहीं झालें तरी जोंपर्यंत नीलराजाच्या कुलांतील पुरुप अस्तित्वांत आहेत, तोंपर्यंत मला या नगरीचें रक्षण केलेंच पाहिजे. तथापि हे पांडवा, तुझा मनोरथ मी पूर्ण करीन. तूं कांहीं चिंता करूं नको."

अग्नीचें हें वचन ऐकून सहदेवाला संतोप झाला. तो स्वस्थानावरून उठून हात जोडून शिरसा नम्र झाला व त्या माद्रीपुत्रानें अग्नीची मोठ्या भक्तीनें पूजा केली. त्यानंतर अग्नि समरांगणांतून निघून गेला असतां त्याच्याच आज्ञेनें राजा नील सहदेवापाशीं आला व त्यानें त्या वीरश्रेष्ठ सहदेवाची सत्कार-पूर्वक पूजा केली. तेव्हां तिचा स्वीकार करून व नीलराजापासून कर घेऊन विजयी माद्रीपुत्र दक्षिण दिशेकडे गेला. पराक्रमी त्रैपुर व पौरवेश्वर यांचा निग्रह करून कौशिक ज्याचा आचार्य आहे, अशा सुराष्ट्राधिपति आकृतीलाहि त्यानें मोठ्या यत्नानें स्वाधीन करून घेतलें.

नंतर सुराष्ट्रदेशांत राहूनच त्यानें इंद्राचा सखा जो भीप्मक त्याच्याकडे आपला एक अधिकारी कर मागण्यासाठीं पाठविला. तो भोजकटदेशाचा राजा मोठा बुद्धिमान् व शूर असून रुक्मी हा त्याचा पुत्र होय. भीप्मकानें आपला जामात जो वासुदेव, त्याच्याकडे पाहून सहदेवाची आज्ञा स्नेहपूर्वक मान्य केली. त्याच्यापासून मिळालेलीं रत्नें घेऊन तो विजयी सहदेव पुढें निघाला.

शूर्पारक व तालकट, यांस वश करून घेऊन समुद्राच्या द्वीपांत रहाणाऱ्या दंडक व निषाद या म्लेच्छराजांस आणि पुरुपाद व कर्णप्रावरण या 'कालमुख-' नांवाच्या राक्षसांस त्यानें जिंकलें. सर्व कोल्लपर्वत, सुरभिपट्टण, ताम्रद्वीप, रामक-पर्वत व तिमिंगलराजा यांना आपल्या स्वाधीन करून घेतलें. एकपादपुरुष, वनवासी केरल, संजयंती नगरी व पाखंडी करहाटक यांच्याकडे दूत पाठवूनच त्यानें त्यांच्यापासून कर आणविला. पांड्य, द्रविड, उंड्र, केरल, आंध्र, ताल-वन, कलिंग, उष्ट्रकर्णिक, रम्य आटवी पुरी व यवनांची नगरी यांसहि त्यानें दूतांच्या द्वाराच वश करून घेतलें.

त्यानंतर दक्षिण समुद्राच्या तीरावर राहून त्या धर्मात्म्यानें महात्म्या पुलस्त्य-पुत्र बिभीषणाकडे प्रीतिपूर्वक दूत पाठविले. त्यानेंहि स्नेहानेंच त्याची आज्ञा मान्य केली. त्या बुद्धिमान् बिभीषणानें 'या वेळीं युधिष्ठिर जें करीत आहे, तें अगदीं प्रसंगानुरूप आहे,' असें मानून आपल्या शौर्यादिकांचा अभिमान सोडला व विविध रत्नें, चंदन, अगरु यांचीं काष्ठें, दिव्य आभरणें, उंची वस्त्रें व मूल्यवान् मणी सहदेवाकडे पाठविले. राजा जनमेजया, याप्रमाणें माद्रीपुत्र सहदेव प्रसंगानुसार शौर्य, सान्त्व व विजय यांचा आश्रय करून, दक्षिण-दिशेला पूर्णपणें जिंकून, राजांना करद करून, इंद्रप्रस्थास परत आला व त्यानें जिंकून आणलेलें सर्व वित्त धर्मराजाला निवेदन केलें. जनमेजया, याप्रमाणें कृतकार्य होऊन तो माद्रीपुत्र खांडवप्रस्थांत सुखानें राहिला. २. ५. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

[ १ नकुलाचा पश्चिम दिग्विजय. ]

(१) **वैशंपायन**—हे कुरुश्रेष्ठा, मी आतां तुला नकुलाच्या पराक्रमाचीं कर्में व त्यानें मिळविलेला विजय यांचें कथन करितों, तें ऐक. त्याचप्रमाणें वासुदेवानें जिंकलेली पश्चिम दिशा त्यानें कशी जिंकून घेतली, त्याचेंहि वर्णन मी करितों. हे राजा, तो बुद्धिमान् नकुल पश्चिम दिशा जिंकण्याच्या उद्देशानें मोठ्या सैन्या-सह खांडवप्रस्थांतून बाहेर पडला. तो सैन्याचा सिंहनाद, योद्ध्यांची रणगर्जना व रथचक्रांचा गंभीर ध्वनि यांच्या योगानें भूमंडलास जणुकाय कांपवितच निघाला.

पहिल्यानें तो पांडुपुत्र धनधान्यसंपन्न, गायींनीं युक्त व कार्तिकेयाला प्रिय असलेल्या रम्य रोहित पर्वताकडे वळला. तेथें त्याचें मत्तमयूर-नांवाच्या शूर क्षत्रियांशीं तुमुल युद्ध झालें. त्यांत त्यांचा पराभव करून महाबुद्धिमान् नकु-लानें सर्व मरुभूमि, बहुधान्यक, शैरीषक व मेहत्थ हे देश जिंकून घेतले. त्यानंतर त्या पांडुनंदनानें 'आक्रोश-'राजर्षीबरोबर फार मोठें युद्ध करून त्याला पराजित केलें व दशार्णदेश स्वाधीन करून घेतला. तेथून तो शिबी, त्रिगर्त अंबष्ठ, मालव, पंचकर्पट, मध्यमकेय, वाटधान व द्विज या देशांना जिंकून पुनः परत फिरला व त्या पुरुषश्रेष्ठानें पुष्करारण्यांत रहाणाऱ्या व पशुतुल्य व्यवहार करणाऱ्या रानटी लोकांचें संघ वश करून घेतले.

नंतर त्यानें सिंधुनदीच्या तीरावरील प्रदेशांत रहाणारे महा बलवान् ग्रामणीय, सरस्वतीच्या तीरावर वास करणारे शूद्र, आभीर, मत्स्योपजीवी, पर्वतनिवासी जन, सर्व पंचनद व अमरपर्वतावरील रहिवासी, उत्तर ज्योतिष, दिव्य कंटपुर व द्वारपाल या सर्वांचा पराभव केला. त्याचप्रमाणें रामठ, हारहूण, व पश्चिमेकडील इतर सर्व नृप त्या पांडवानें धर्मराजाच्या आज्ञेनेंच वश करून घेतले.

हे जनमेजया, तेथूनच त्या बुद्धिमान् माद्रीसुतानें वासुदेवाकडे खंडणीसाठीं दूत रवाना केला. तेव्हां श्रीकृष्णानें धर्मराजाची आज्ञा मान्य केली. त्यानंतर नकुलानें मद्रदेशांतील शाकल देशांत जाऊन आपला मातुल जो शल्य त्याला प्रेमानें वश करून घेतलें. तेव्हां त्या राजानें नकुलाचा सत्कार करून त्याला विपुल रत्नें अर्पण केलीं. त्यांचा स्वीकार करून त्या वीरानें समुद्रतीरावर रहाणारे परम दारुण पह्लव, बर्बर, किरात, यवन, शक इत्यादि म्लेच्छ राजांचा पराभव करून, त्यांच्यापासून रत्नें घेतलीं.

हे राजा, याप्रमाणें पश्चिम दिशा जिंकून तो विचित्र मार्गवेत्ता नकुल जिंकलेलें धन दहा हजार उंटांवर लादून इंद्रप्रस्थास परत आला आणि त्या श्रेष्ठ माद्रीपुत्रानें ती सर्व विपुल संपत्ति धर्मराजाच्या स्वाधीन केली. राजा याप्रमाणें पराक्रमी नकुलानें वरुणानें रक्षण केलेल्या व श्रीकृष्णानें जिंकलेल्या पश्चिम दिशेंत दिग्विजय केला. २. ५. ३२.

येथें पांचवें दिग्विजयपर्व समाप्त झालें.

---

# राजसूयपर्व ६.



## अध्याय ३३ वा.

[ १ कृष्णागमन, त्याच्या आज्ञेनें यज्ञसामग्रीसंपादन. २ द्वैपायनाच्या आज्ञेनें ऋत्विजांचें आगमन. ३ ब्राह्मण-क्षत्रियादिकांच्या निमंत्रणासाठीं दूतप्रेषण व दीक्षाग्रहण. ४ धृतराष्ट्रादिकांना आणण्यासाठीं नकुलगमन. ]

( १ ) **वैशंपायन—**हे जनमेजया, सत्याचें परिपालन करून धर्मराज राज्य करीत असतां त्याच्या राष्ट्रांत चोरादिकांचें भय राहिलें नव्हतें. सर्व प्रजा स्वक-

मांत तत्पर होती. तो प्रजेकडून योग्य तेवढाच कर घेत असे व धर्मशास्त्रानुसार राज्यव्यवस्था पहात असे. त्याच्या राज्यांत योग्य समयीं विपुल पर्जन्यवृष्टि होत असल्यामुळें तृण-धान्यांची पूर्ण समृद्धि होती. गोरक्षण, कृषि, आणि वाणिज्य हे सर्व व्यवहार स्वतःला व परक्यांनाहि हितावह होतील, असेच चालत असत; क्रूरपणानें होत नसत. धर्मराजाच्या पुण्यामुळेंच ही सर्व सुव्यवस्था राहिली होती.

हे राजन्, त्या धर्मात्म्या युधिष्ठिराच्या राष्ट्रांत चोर, धूर्तलोक किंवा राजाच्या प्रीतींतील जन या कोणाच्याच मुखांतून कधीं मिथ्याभाषण ऐकूं येत नसे. सर्वहि प्रजाजन धर्मराजासारखेच सत्यवक्ते होते. चोरहि परस्परांना कधीं फसवीत नसत किंवा स्वभावतः दुष्ट असलेले इतर लोकहि असत्याचरण करीत नसत. अतिवृष्टि, अनावृष्टि, रोग व अग्निप्रलय इत्यादि दैवी आपत्तींचा त्या राष्ट्रांत सर्वथा अभाव झाला होता. धर्मराजाचें प्रिय करण्यासाठीं, सत्कार करण्यासाठीं व नियत कर पोंचविण्यासाठींच इतर राजे त्याच्याकडे येत असत. त्याला जिंकण्यासाठीं किंवा त्याच्या राष्ट्रांत भेदादि नीतीचा प्रयोग करण्यासाठीं कधीं कोणी येत नसे.

राजा परिक्षिता, धर्म्य धनप्राप्तीनें त्याचा कोश अतिशय वाढला. शंभर वर्षे सतत जरी व्यय करीत राहिलें तरी तो क्षीण होण्याची भीती नव्हती. आपल्या कोशाचें व वस्त्र-धान्यादि इतर वस्तूंचें हें परिमाण जाणून कुंतीपुत्रानें राजसूययज्ञ करण्याचा निश्चय केला. त्याचे सर्व सुहृद्हि पृथक् पृथक् व एकत्र जमून 'हे प्रभो, तुझ्या इष्ट यज्ञाचा काल प्राप्त झाला आहे. तेव्हां आतां तुला या वेळीं जें करणें उचित दिसेल तें सत्वर कर.' असा आग्रह करूं लागले.

इतक्यांत नारायणाख्य पुराण-ऋषि, वेदात्मा, विद्वानांचा प्रत्यगात्माच असल्यामुळें अदृश्य, पण अविद्वानांना कार्य-कारणरूपानें दृश्य होणारा, चराचर भूतांची सृष्टि व प्रलय यांचा श्रेष्ठ आधार, भूत, भविष्यत् व वर्तमान कालांतील सर्व प्राण्यांचा नाथ, सर्व वृष्णींचा रक्षक, आपत्तीमध्यें अभय देणारा, शत्रुनाशक, केशीनिषूदन केशव सेनापतीच्या अधिकारावर आनकदुंदुभीची स्थापना करून फार मोठ्या सैन्यासह विपुल धन घेऊन धर्मराजाकडे आला. त्यानें आणलेला तो धनाचा ओघ अपरिमित व सागरासारखा अक्षय होता. त्यामुळें हें धन नसून हा रत्नमय सागरच आहे असा भास झाला.

तो महावीर यदुनंदन आपल्या रथघोषानें दश-दिशांना दुमदुमून सोडीत धर्मराजाच्या खांडवप्रस्थ नगरींत प्रविष्ट झाला. तें नगर इतर राजांनीं अगोदरच भरून गेलें होतें. पण हा शत्रूंना ताप देणारा यदुकुलोत्पन्न माधव आल्यानें त्या नगराला विशेष शोभा आली. गाढ अंधकारांतील पुरुषाला सूर्यदर्शन झालें असतां, किंवा ग्रीष्म ऋतूंत निवात प्रदेशीं असलेल्या मनुष्यांच्या अंगावर वाऱ्याची आल्हादकारक झुळूक आली असतां जसा हर्ष होतो, त्याप्रमाणें कृष्ण खांडवप्रस्थास आला असतां धर्मराजाला पराकाष्ठेचा आनंद झाला. तो मोठ्या संतोषानें त्याला सामोरा गेला व त्यास कुशल प्रश्न विचारून त्यानें त्याचा यथाविधि सत्कार केला.

त्यानंतर तो वासुदेव आपल्या आसनावर सुखानें बसला आहे, असें पाहून धौम्य-द्वैपायनादि ऋत्विक् व भीमादि चारी भ्राते यांच्या समक्ष युधिष्ठिर त्यास म्हणाला—"हे कृष्णा, तुझ्या कृपेनें ही सर्व पृथ्वी आज माझ्या अधीन झाली आहे. हे वार्ष्णेया, तुझ्याच अनुग्रहानें मला विपुल धनहि मिळालें आहे. यास्तव हे माधवा, त्या धनाच्या योगानें मी श्रेष्ठ ब्राह्मण व अग्नि यांस तृप्त करण्याची इच्छा करितों. हे दाशार्हा, स्वतः तूं व हे माझे भ्राते यांच्या साह्यानें राजसूय महायज्ञ संपादन करावा, अशी माझी इच्छा आहे. तूं मला अनुज्ञा दे. हे गोविंदा, एक तर तूं स्वतःच या यज्ञाची दीक्षा घे. तूं हा याग केलास म्हणजे मी निष्पाप होईन. किंवा या माझ्या अनुजांसह तूं मला दीक्षा घेण्याची अनुज्ञा दे. कारण हे कृष्णा, तूं मला अनुज्ञा दिलीस म्हणजे मी या उत्तम क्रतूस प्राप्त होईन."

राजा, युधिष्ठिराचें हें विनययुक्त भाषण ऐकून कृष्णानें त्याच्या गुणांची अतिशय प्रशंसा केली व तो वासुदेव त्यास म्हणाला—"हे राजश्रेष्ठा, तूंच सम्राट् होण्यास योग्य आहेस. यास्तव तूंच हा महाक्रतु संपादन कर. तुला त्याचें फल प्राप्त झालें म्हणजे आम्ही सर्व धन्य झालों. हे वीरा, मी तुझें सर्व प्रकारें हित करण्यास सिद्ध आहें. यास्तव तूंच हा अत्यंत अभीष्ट असलेला यज्ञ संपादन कर. तूं मला वाटेल त्या कार्यामध्यें नियुक्त कर. मी तें तुझें सर्व कार्य निःसंशय पार पाडीन."

श्रीकृष्णाचें हें वचन ऐकून युधिष्ठिर सद्गदित कंठानें म्हणाला—"हे केशवा, ज्या माझें प्रिय करण्यासाठीं तूं सिद्ध आहेस त्या माझा सर्व संकल्प सफल झाला आहे व मला निश्चयानें सिद्धि मिळाली आहे, असेंच मी समजतों."

राजा जनमेजया, याप्रमाणें कृष्णानें ज्याला अनुज्ञा दिली आहे असा युधिष्ठिर भ्रात्यांसह राजसूय याग करण्यासाठीं साधनें संपादन करूं लागला. शत्रुनाशक युधिष्ठिरानें सहदेव व आपले सर्व मंत्री यांस 'या यज्ञामध्यें लागणारीं सर्व उपकरणें व मंगलें तुह्मी ब्राह्मणांच्या आज्ञेनें सत्वर संपादन करा' अशी आज्ञा केली.

तो म्हणाला,—"सहदेवा, घृत, पशु इत्यादि यज्ञांत लागणारे सर्व संभार धौम्याच्या आज्ञेनें भृत्यांकडून सत्वर आणीव. माझा सारथि 'इंद्रसेन' व अर्जुनाचा सारथि 'पुरु' यांना माझें प्रिय करण्यासाठीं अन्नादि सामग्री पुरविण्याच्या कामावर नेम. हे कुरुश्रेष्ठा सहदेवा, ब्राह्मणांच्या मनाला संतुष्ट करून त्यांचे मनोरथ पूर्ण होतील असे अन्नादि सर्व रुचकर व स्वादिष्ठ पदार्थ त्यांना यथेष्ट मिळण्याची व्यवस्था ठेव.

युधिष्ठिराची ही आज्ञा ऐकतांच त्याच्या वचनांत स्थित असलेल्या भ्रात्या सहदवान 'आपल्या आज्ञेप्रमाणें सर्व व्यवस्था केली आहे,' असें त्याला तत्काल निवेदन केलें.

(२) त्यानंतर बा जनमेजया, द्वैपायनानें साक्षात् मूर्तिमान् वेदाप्रमाणें भासणाऱ्या ऋत्विज ब्राह्मणांना धर्मराजाच्या यज्ञांत आणिलें. त्या सत्यवतीपुत्रानें स्वतः ब्रह्मत्व स्वीकारलें. धनंजय गोत्रांतील 'सुसाम'-नांवाचा श्रेष्ठ आंगिरस 'सामग' झाला. ब्रह्मिष्ठ याज्ञवल्क्य श्रेष्ठ 'अध्वर्यु' झाला. धौम्यासह वसुपुत्र पैल 'होता' झाला. वेद-वेदांगांमध्यें पारंगत असलेले त्याचे सर्व पुत्र व शिष्य सप्तसंख्याक 'होत्रग' झाले. त्यांनीं पुण्याहवाचन करून व युधिष्ठिराकडून 'स्वाराज्यप्राप्तीसाठीं मी राजसूय यागानें देवांचें पूजन करतों.' इत्यादि संकल्परूप ऊह करवून त्या मोठ्या यज्ञस्थानाचें शास्त्रोक्त पूजन करविलें. धर्मराजाच्या आज्ञेनें त्याच्या कुशल शिल्पकारांनीं देवांच्या गृहाप्रमाणें विशाल व सुगंधयुक्त पत्नीशालादि अग्निगृहें निर्माण केलीं.

(३) त्यानंतर त्या श्रेष्ठ राजानें आपल्या मुख्य सहदेव मंत्र्यास 'क्षत्रियादि चातुर्वर्ण्याच्या लोकांना निमंत्रण करण्यासाठीं सत्वर दूत पाठीव' अशी आज्ञा केली. राजाचें हें आज्ञावचन कानीं पडतांच भ्रात्या सहदेवानें 'सर्व राष्ट्रांतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व मान्य शूद्र यांस सत्वर घेऊन या' असें सांगून शीघ्रगामी दूतांस चोहोंकडे पाठविलें. तेव्हां ते दूत दश-दिशेंत त्वरेनें गेले व त्यांनीं सर्वांना पांडवांचें निमंत्रण पोंचवून कित्येकांना आपल्या बरोबरहि आणिलें

हे भारता, त्यानंतर ब्राह्मणांनीं विहित कालीं कुंतीपुत्र युधिष्ठिराला राजसूय यज्ञाची दीक्षा दिली. दीक्षेनें युक्त झालेला तो धर्मात्मा युधिष्ठिर हजारों ब्राह्मण, भ्राते, ज्ञातीचे लोक, सुहृद्, सचिव, निरनिराळ्या दिशांतून आलेले नरश्रेष्ठ क्षत्रिय व अमात्य यांसह, मूर्तिमंत धर्माप्रमाणें, त्या विस्तीर्ण यज्ञस्थानीं गेला. तो अपूर्व यज्ञ पहाण्यासाठीं भिन्न भिन्न देशांहून सर्व विद्यांमध्यें निष्णात व व वेद-वेदांगांमध्यें पारंगत असलेले हजारों ब्राह्मण तेथें आले. तेव्हां धर्मराजाच्या आज्ञेनें शिल्पकारांनीं त्यांच्यासाठीं हजारों गृहें निर्माण केलीं. तीं विपुल अन्न, आच्छादन व सर्व ऋतूंतील गुण, यांनीं संपन्न होतीं.

हे राजा, राजभृत्यांकडून सत्कार केले गेलेले ते ब्राह्मण त्या गृहांत सुखानें राहिले. निरनिराळ्या देशांतून आलेले ते विद्वान् ब्राह्मण आपसांत अनेक प्रकारच्या गोष्टी सांगत. नट-नर्तकांच्या कलेंतील कौशल्य पहात असतां त्यांच्या मनाचें अतिशय रंजन झालें. हे राजा, भोजन करणाऱ्या व आपसांत भाषण करणाऱ्या त्या संतुष्ट महात्म्यांचा महाध्वनि तेथें नित्य ऐकूं येत असे. ‘यांना द्या, द्या; यथेच्छ भोजन करा.’ अशा प्रकारचे त्यांचे शब्द तेथें नित्य ऐकूं येत. धर्मराजानें त्यांस अगणित गायी व गाद्या, गिरद्या यांसह सुवर्णाचे असंख्य मंचक पृथक् पृथक् अर्पण केले. देवलोकांतील इंद्राप्रमाणें भूलोकामध्यें अद्वितीय वीर असलेल्या महात्म्या पांडवाचा तो यज्ञ अशाप्रकारें सुरू झाला.

( ४ ) तेव्हां राजा युधिष्ठिरानें भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, विदुर, कृप व दुर्योधनादि सर्व भ्राते आणि आपल्यावर स्नेह करणारे इतर सर्व लोक यांना आणण्यासाठीं पांडुपुत्र नकुलाला हस्तिनापुरास पाठविलें. २. ६. ३३.

---

## अध्याय ३४ वा.

[ १ राजसूय क्रतु पाहण्यासाठीं निमंत्रित राजांचें आगमन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, संग्रामांत विजयी होणारा नकुल हस्तिनापुरास त्वरेनें गेला व भीष्म, धृतराष्ट्र, द्रोणाचार्य इत्यादि सर्व श्रेष्ठ पुरुषांना त्यानें यज्ञ पहावयास येण्यासाठीं मोठ्या आदरानें आमंत्रण केलें. तेव्हां ते सर्व हृष्ट झाले व ब्राह्मणांसह मोठ्या आनंदानें यज्ञ पहावयास निघाले. ‘धर्मराज राजसूययज्ञ करीत आहे,’ हें ऐकून हस्तिनापुरांतील दुसरेहि अनेक यज्ञवेत्ते तो यज्ञ व धर्मराजाची दिव्य सभा पहाण्यासाठीं मोठ्या आनंदानें त्यांच्या

बरोबरच निघाले. इतर क्षत्रियहि अनेकप्रकारचीं मूल्यवान् रत्नें घेऊन धर्मराज पांडवाकडें चारी दिशांतून आले.

जनमेजया, त्यांतील मुख्य मुख्य राजांचीं नांवें मी तुला सांगतों. धृतराष्ट्र, भीष्म, बुद्धिमान् विदुर, दुर्योधनादि सर्व भ्राते, गांधारराज सुबल व महाबलाढ्य शकुनि, अचल नृप, रथिश्रेष्ठ कर्ण, बलवान् शल्य, बाह्लिक, सोमदत्त, भूरी, भूरिश्रवा, अश्वत्थामा, कृप, द्रोण, सिंधुराज जयद्रथ, पुत्रासह द्रुपद, शाल्व, प्राग्जोतिषेश्वर, समुद्रतीरावर रहाणाऱ्या सर्व म्लेच्छांसह भगदत्त, पार्वतीय राजे, बृहद्बल, पौंड्रक, वासुदेव, वंग, कालिंगक, आकर्ष, कुंतल, मालव, आंध्रक, द्राविड, सिंहल, काश्मीरक राजा, कुंतिभोज, गौरवाहन व इतर शूर बाह्लिक, दोन पुत्रांसह विराट, मावेल्ल हे व असेच दुसरेहि भिन्न भिन्न देशांचे राजे आणि राजपुत्र तेथें आले. पुत्रांसह बलाढ्य व मदोन्मत्त शिशुपालहि धर्मराजाचा यज्ञ पहावयास आला. बलराम, अनिरुद्ध इत्यादि सर्व प्रमुख यादवहि तेथें आले होते.

हे वीरा जनमेजया, पांडुपुत्र युधिष्ठिराचा तो राजसूय महाक्रतु पहाण्यास मध्य देशांतील असे अनेक राजे आले. धर्मराजाच्या आज्ञेनें त्याच्या अधिकाऱ्यांनीं त्या सर्वांना रहावयास उत्तमोत्तम गृहें दिलीं. तीं सर्वहि विपुल भक्ष्यभोज्यांनीं युक्त असून प्रत्येक गृहांत वृक्षांनीं सुशोभित व विहारास योग्य अशी एकेक विपुल वापी होती. धर्मराजानें आलेल्या त्या सर्व नृपतींचा पूजापूर्वक सत्कार केला असतां त्यांच्यासाठीं नियत केलेल्या सर्वांगपूर्ण व सुंदर राजगृहांत ते जाऊन राहिले.

त्यांचीं तीं गृहें कैलासशिखरांसारखीं रम्य असून उंच प्राकारांनीं सुरक्षित होतीं. त्यांतील भूमि, भिंती, सोपानमार्ग, सिंहासनें इत्यादि सर्व राजभोगास योग्य असून हंस किंवा चंद्र यांप्रमाणें शुभ्र असलेलीं तीं सर्व राजमंदिरें दूर अंतरावरून दिसत असत. हिमालयाच्या शिखराप्रमाणें सर्वथा सुखावह असलेल्या त्या राजगृहांत विश्रांति घेऊन ते सर्व राजे विपुल दक्षिणा देणाऱ्या व अनेक सदस्यांनीं युक्त असलेल्या धर्मराज युधिष्ठिराला भेटावयास यज्ञमंडपांत आले. हे वीरा, महर्षि, श्रेष्ठ ब्राह्मण व नृपति यांनीं व्याप्त असलेलें तें यज्ञस्थान त्या वेळीं देवांनीं व्यापिलेल्या स्वर्गाप्रमाणें शोभलें. २. ६. ३४.

## अध्याय ३५ वा.

[ १ धर्मराजाचें यज्ञानुष्ठान. ]

( १ ) वैशंपायन—हे कुरुकुलश्रेष्ठा, पितामह भीष्म व गुरु द्रोण यज्ञस्थानीं येत आहेत, असें पाहून दीक्षित युधिष्ठिर ऋत्विजांच्या अनुज्ञेनें स्वस्थानावरून उठला व त्यांस अभिवादन करून भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा, दुर्योधन व विविंशति यांस म्हणाला—"या यज्ञांत तुम्ही सर्व मजवर अनुग्रह करा. येथें हें जें माझें विपुल धन आहे, त्याचा माझ्या प्रार्थनेवरून आपल्या इच्छेप्रमाणें विनियोग करून मला श्रेयःप्राप्ति करून द्या." असें बोलून यज्ञदीक्षा घेतलेल्या त्या पांडवाग्रजानें त्या सर्वांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें योग्य अधिकारांवर नेमिलें.

भक्ष्य व भोज्य यांच्या अधिकारावर दुःशासनाला नेमून अश्वत्थाम्यास ब्राह्मणांचें स्वागत करावयास सांगितलें. राजांच्या सत्काराचें कार्य संजयाकडे सोंपविलें. कोणतें कार्य झालें व कोणतें व्हावयाचें आहे, यांकडे लक्ष ठेवण्याविषयीं भीष्म व द्रोण यांची प्रार्थना केली. उत्तम सुवर्ण व रत्नें यांच्यावर नजर ठेवून दक्षिणादानाचा अधिकार कृपाचार्यांस दिला. याचप्रमाणें दुसऱ्याहि पुरुषश्रेष्ठांना त्यानें भिन्न भिन्न कार्यांवर योजिलें.

नकुलानें स्वतः जाऊन आणलेला बाल्हिक, धृतराष्ट्र, सोमदत्त व जयद्रथ हे चौघे तेथें स्वामीप्रमाणेंच वागूं लागले. सर्वधर्मज्ञ विदुराकडे खर्चाची व्यवस्था सोंपविली. राजे, क्षत्रिय व वैश्य यांनीं आणलेलीं उपायनें स्वीकारण्याचें कार्य दुर्योधनास सांगितलें. यदुनंदन कृष्णानें ब्राह्मणांच्या चरणप्रक्षालनाचें कार्य स्वतःच आपल्याकडे घेतलें व उत्तम फलप्राप्तीनें धर्माला संतुष्ट करण्याची इच्छा करणाऱ्या त्या पुरुषश्रेष्ठानें आपल्या अंकित असलेल्या सर्व लोकांसह तें महत्कार्य मोठ्या आदरानें पार पाडिलें.

धर्मराज युधिष्ठिर व त्याची अलौकिक सभा यांस पहाण्याच्या इच्छेनें आलेल्या लोकांतील कोणीं एखाद्यानेंहि एक सहस्रापेक्षां कमी मूल्याचें उपायन आणलें नव्हतें. प्रत्येक राजानें अनेक रत्नें समर्पण करून धर्मराजाला समृद्ध केलें. 'मीं दिलेल्या रत्नांनींच हा धर्मराजा आपला यज्ञ कसा बरें पार पाडूं शकेल' अशा स्पर्धेनें प्रत्येक राजानें त्याला विपुल धन अर्पण केलें. महात्म्या युधिष्ठिराचा तो विस्तीर्ण यज्ञमंडप विमानासारखीं राजगृहें, ब्राह्मणांचीं निवासस्थानें, सर्व राजांचीं सैन्यें, विचित्र रत्नें व श्रेष्ठ राजलक्ष्मी यांनीं युक्त असलेले

राजे, वेदाध्यायी ब्राह्मण व यज्ञ पहाण्यासाठीं अंतरिक्षांत आलेलीं देवादिकांची विमानें यांच्या योगानें फारच शोभला.

त्यावेळीं तो ज्येष्ठ पांडव आपल्या संपत्तीनें वरुणदेवतेशीं स्पर्धा करीत आहे, असा भास झाला. तो यज्ञ सर्वांगपूर्ण होता. तो आरंभणीय, क्षत्र, धृति, व्युष्टि, द्विरात्र व दशपेय या सहा अग्नींनीं युक्त होता. उदार राजानें त्या यज्ञांत ब्राह्मणांना विपुल दक्षिणा दिली व सर्व लोकांना इष्ट असलेले सर्व उत्तम भोग्यपदार्थ देऊन तृप्त केलें. तेथें जमलेल्या सर्व लोकांनीं भक्ष्य व भोज्य पदार्थांनीं आपली यथेच्छ तृप्ति करून घेतली. यज्ञांतील तो अपूर्व समागम रत्नोपहारांनीं युक्त होता. मंत्र व शिक्षा म्हणजे कर्मानुष्ठान यांमध्यें विशारद असलेल्या ऋत्विजांनीं केलेलें इडाकर्म, स्विष्टकृत्, ऊर्ध्वशिष्ट, हवि व प्रतिपत्तिकर्म यांनीं त्या यज्ञांत देव तृप्त झाले. दक्षिणा, अन्न व महाधन यांच्या योगानें देवांप्रमाणेंच ब्राह्मणहि प्रसन्न झाले व त्या अभूतपूर्व यज्ञांत ब्राह्मणांप्रमाणेंच इतर सर्व वर्गांचे लोकहि आपापल्या इष्टप्राप्तीनें संतुष्ट झाले. हे जनमेजया, याप्रमाणें तुझ्या प्रपितामहाच्या त्या राजसूय यागांत सर्व प्राणी संतुष्ट झाले. २. ६. ३५.

येथें सहावें राजसूयपर्व समाप्त झालें.

# अर्घाभिहरणपर्व ७.



## अध्याय ३६ वा.

[ १ सोमयागाच्या दिवशीं ब्राह्मणादिकांचा अंतर्वेदींत प्रवेश. २ क्षत्रियनाशाविषयीं नारदाची चिंता. ३ भीष्माच्या आज्ञेनें श्रीकृष्णाची अग्रपूजा. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, त्यानंतर राजसूयांगभूत सोमयागाच्या दिवशीं सत्कारार्ह महर्षि व ब्राह्मण राजांसह अंतर्वेदीमध्यें प्रविष्ट झाले. त्या अंतर्वेदींत राजर्षींसह बसलेले नारदादि महात्मे ब्रह्मभवनामध्यें बसलेले देव आणि देवर्षी यांच्यासारखे शोभले. मध्यें मध्यें यज्ञकर्म थांबलें असतां ते प्रतिभासंपन्न ब्राह्मण आपसांत वाद-विवाद करीत.

---

१ यापुढील दहा अध्याय नानाविध मतभेदांचा उपन्यास करून महाकाशमठाकाशन्यायानें कृष्ण व शिशुपाल यांच्या रूपकानें जीवाचा ब्रह्मामध्यें लय दाखवितात. यांतील कथाभाग स्पष्ट आहे. पण यांचाच अध्यात्मपर अर्थ दुर्बोध असल्यामुळें पुढें कोठें कोठें तो व्यक्त केला आहे.

कोणी म्हणत 'हें असेंच आहे' व कोणी म्हणत 'तसें नाहीं.' म्हणजे ते स्वमताचें समर्थन करून परमतावर दूषण देत. दुसरे कित्येक सिद्धान्तपक्षाला पुष्टि देऊन पूर्ववादाचा निषेध करीत. कांहीं वादी तर नुस्ती वितंडा करीत. म्हणजे स्वपक्षाचें किंवा परपक्षाचें स्थापन न करितां केवल युक्तिशून्य वाचाळता करीत. कांहीं विद्वान् ब्राह्मण युक्तिदौर्बल्यामुळें विविध तर्कांनीं हीनपक्षाचें समर्थन करीत व तो हीनपक्षहि युक्तियुक्त आहे, असें दाखवीत. तसेच कांहीं पंडित याच्या उलट विविध युक्तींनीं प्रबल असलेल्याहि पक्षाला दुर्बल ठरवीत.

ज्याप्रमाणें श्येनपक्षी आकाशांतील आमिष दुसऱ्याकडून हिरावून घेतो, त्याप्रमाणें कांहीं बुद्धिमान् एखाद्या महा तार्किकानें सिद्ध केलेलाहि सिद्धांत अनेक अनुमानांनीं अन्यथा करीत होते.

तेथें कांहीं ब्राह्मण धर्म व अर्थ यांमध्यें कुशल होते. कित्येक मोठमोठ्या व्रतांनीं संपन्न होते. सर्व भाष्यवेत्त्यांतील श्रेष्ठ पंडित परस्परांना आपापला सिद्धान्त सांगण्यांत अतिशय निमग्न झाले होते. राजा, नक्षत्रांनीं व्याप्त असलेलें विस्तीर्ण अंतरिक्ष जसें शोभावें, त्याप्रमाणें वेदसंपन्न देव, द्विज व महर्षि यांनीं ती वेदी शोभली. त्यावेळीं युधिष्ठिराच्या यज्ञमंडपांतील यज्ञवेदीजवळ एकहि शूद्र किंवा अव्रती नव्हता. हे राजा, त्या बुद्धिमान् व ऐश्वर्यसंपन्न धर्मराजाची ती विचित्र लक्ष्मी व यज्ञश्रद्धा पाहून नारदमुनि अतिशय संतुष्ट झाला.

(२) पण हे नरेंद्रा, त्याच वेळीं सर्व क्षत्रिय त्या ठिकाणीं एकत्र जमले आहेत हें पाहून त्याच्या मनांत चिंताहि उत्पन्न झाली. हे पुरुषश्रेष्ठा, पूर्वी अंशावतरणप्रसंगीं ब्रह्मलोकामध्यें जो वृत्तान्त घडला होता, त्याचें त्याला स्मरण झालें आणि येथील हा क्षत्रियांचा समागम म्हणजे पृथ्वीचा भार कमी करण्यासाठीं अवतार घेतलेल्या देवासुरांचाच समागम आहे, असें जाणून त्या देवर्षीनें आपल्या मनानें पुंडरीकाक्ष हरीचें स्मरण केलें. देवशत्रूंचा नाश करणारा साक्षात् प्रभु नारायणच आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठीं क्षत्रियकुलांत कृष्णरूपानें अवतीर्ण झाला आहे. त्या भूतकर्त्यानें स्वतः आपल्या मुखानें देवांना 'तुम्ही समरांगणांत एकमेकांचा नाश करून पुनः स्वलोकीं परत याल' असें पूर्वी सांगितलें होतें व शंभूला दिलेल्या वचनास अनुसरून तो भूतकर्ता भगवान् नारायण सर्व देवांना भूलोकीं जन्म घ्यावयास सांगून स्वतःहि वृष्णि-अंधकांच्या वंशांत यदुगृहीं उत्पन्न झाला आहे.

हा भगवान् नक्षत्रांतील चंद्राप्रमाणें या सर्व क्षत्रियांमध्यें आपल्या अलौकिक कांतीनें शोभत आहे. इंद्रादिक देव ज्याच्या बाहुबलाचा आश्रय करून रहातात तो हा शत्रुनाशक हरि येथें मनुष्याप्रमाणें आचरण करीत आहे. हा स्वयंभू महाविष्णु अशा या बलाढ्य क्षत्रियवर्गाला समरांगणांत मारून या सर्वांचा पुनरपि आपल्या स्वरूपांत उपसंहार करणार आहे. हर हर, ही केवढी दुःखाची गोष्ट आहे ! या नारायणानें राजसूयाच्या मिषानें आज हा क्षत्रियांच्या नाशाचाच उपक्रम केला आहे. युधिष्ठिराला निमित्त करून या नारायणानेंच हा यज्ञ संपादन केला आहे. राजा जनमेजया, याप्रमाणें आपल्या मनांत चिंतन करीत धर्मज्ञ नारद युधिष्ठिराच्या महायज्ञांत बहुमानानें बसला.

त्यानंतर हे भारता, कुरुकुलवृद्ध भीष्म धर्मराज युधिष्ठिराला म्हणाला—"हे महाभागा, तूं आतां राजांचें यथायोग्य अर्हण कर. हे सार्वभौमराजा, आचार्य, ऋत्विज, श्वशुरादि संबंधी जन, स्नातक, प्रिय मित्र व राजा, असे सहा पुरुष पूजेला पात्र आहेत, असें वेदशास्त्रज्ञ सांगतात. एक वर्षानंतर आपल्या घरीं आलेल्या यांची अर्घ्यादिकांनीं पूजा करावी, असा शास्त्रविधि आहे.

आज हे सर्व पूज्य ब्राह्मण-क्षत्रियादि श्रेष्ठ पुरुष आपल्या येथें दीर्घ कालानें आलेले आहेत. यास्तव हे अजातशत्रो, तूं त्यांतील प्रत्येकाची अर्घ्यप्रदानादिपूर्वक पूजा कर. त्यांतल्या त्यांत या सर्वांमध्यें जो वरिष्ठ व समर्थ असेल त्याची पूजा तूं प्रथम कर."

पितामह भीष्माचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर नम्रपणें म्हणाला—"हे कुरुनंदना, या सर्व ब्रह्म-क्षत्रसमूहांत वरिष्ठ व श्रेष्ठ पुरुष कोण आहे, तें मला सांग. म्हणजे मी प्रथम त्याची पूजा करितों. सर्वांच्या पूर्वी मीं कोणाला अर्घाहरण करणें उचित आहे, तें तूं मला सांग; म्हणजे तुझ्या आज्ञेप्रमाणें मी प्रथम त्याचीच पूजा करितों."

हे कुरुश्रेष्ठा, युधिष्ठिराचा हा प्रश्न ऐकून वीर्यवान् शांतनव भीष्मानें आपल्या विवेचक बुद्धीनें या सर्व समूहांत पूज्यतम कोण आहे, याचा विचार केला. "ब्राह्मण देवताप्रसादाचें निमित्त असल्यामुळें ते अर्हणीय आहेत. देव मनोरथ पूर्ण करणारे असल्यामुळें अर्हणीयतर आहेत व आत्मा निरतिशय प्रीतीचें स्थान असल्यामुळें तो सर्वांना अर्हणीयतम आहे. यास्तव या कर्मभूमी-

मध्यें सर्वात्मा वार्ष्णेय कृष्णच सर्वांत पूजनीयतम आहे, असा त्यानें निश्चय केला. कारण सर्व ज्योतींमध्यें जसा भास्कर, त्याप्रमाणें हा श्रीकृष्ण तेज, बल व पराक्रम यांनीं युक्त असलेल्या या सर्वांहून अधिक प्रकाश पावत आहे. अंधकारांत असलेल्या वस्तूला जसा सूर्य प्रकाशित करितो व निर्वात प्रदेशांतील प्राण्याला जसा वायु आह्लादित करितो, त्याप्रमाणें कृष्णानें या आमच्या यज्ञस्थानाला प्रकाशित व आह्लादयुक्त केलें आहे. यास्तव हे महाभाग पांडुपुत्रा, तूं प्रथम या आत्मरूप कृष्णाचीच पूजा कर. हाच तुला पूज्यतम आहे."

राजा, भीष्मानें अशी अनुज्ञा दिली असतां युधिष्ठिराच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या प्रतापी सहदेवानें वृष्णिकुलोत्पन्न कृष्णाला उत्तम अर्घ्य यथाविधि समर्पण केलें व त्या वीर्यवान् कृष्णानेंहि शास्त्रोक्त विधीनें त्याचें ग्रहण केलें. पण वासुदेवाची ती पूजा शिशुपालाला सहन झाली नाहीं. त्या दुर्बुद्धि मदोन्मत्त चेदिराजानें त्या महा सभेंत भीष्म व धर्मराज यांची निंदा करून वासुदेवाच्या वर्तनावरहि आक्षेप घेतला. २. ७. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

[१ शिशुपालाचें भीष्म, युधिष्ठिर व कृष्ण यांची निंदा करून सभेंतून निर्गमन.]

(१) **शिशुपाल**—हे युधिष्ठिरा, या तुझ्या यज्ञमंडपांत एवढे श्रेष्ठ श्रेष्ठ राजे बसले असतां हा वार्ष्णेय एखाद्या भूपतीप्रमाणें राजपूजेला पात्र नाहीं. महात्म्या पांडवांच्या ठिकाणीं असा अनाचार उचित नाहीं. हे पांडवा, तूं केवळ या

---

१ प्रत्येक शरीर पूर्वकर्मामुळें उत्पन्न होतें, असा नियम आहे. या कृष्णाचें शरीरहि आम्हांप्रमाणेंच देवकीपासून उत्पन्न झालें आहे. शिवाय हा वृष्णिकुलोत्पन्न आहे. त्यामुळें त्याचें स्वयंभूत्वहि संभवत नाहीं. कारण एक आत्माच स्वयंभू आहे. कृष्णाचें कर्तृत्वादिकहि खरेंच आहे. तें मायिक व अविद्याकृतहि नाहीं. कारण त्याचें कर्तृत्व जर मिथ्या असतें, तर त्यापासून वास्तविक कार्य झालें नसतें. शुक्तिरजत खऱ्या रजताप्रमाणें वितळवितां येत नाहीं. अशारीतीनें जैमिनिमतानुसारी शिशुपाल वर्ण, आश्रम, वय, तप व विद्या यांच्या योगानेंच पुरुषाला श्रेष्ठत्व किंवा अश्रेष्ठत्व आहे, असें मानून साधारण पुरुषाप्रमाणें कृष्णालाहि अपूज्य ठरवीत आहे.

कृष्णाला प्रसन्न करण्याच्या इच्छेनेंच याची पूजा केली आहेस. यावरून तुम्ही सर्व मूढ अहांत, सूक्ष्मधर्म तुम्हांला कळत नाहीं, हें उघड होतें. हा भीष्महि अज्ञ असून त्याच्या स्मृतीला भ्रंश झाला आहे. हे राजा, तुझें प्रिय करण्याच्या इच्छेनें या मूढ भीष्मानें तुझ्याकडून हें अधर्मयुक्त कार्य करविलें आहे. त्यामुळें हा सज्जनांच्या तिरस्कारास अधिकच पात्र झाला आहे.

पांडवांनों, तुम्ही जशी या कृष्णाची पूजा केली आहे, तशा पूजेला इतक्या सर्व राजांमध्यें तो कसा पात्र झाला! हा कांहीं एखाद्या देशाचा राजा नाहीं! युधिष्ठिरा, 'हा अस्मदादिकांप्रमाणें उत्पन्न जरी झाला असला व राजा जरी नसला तरी वृद्धत्वादि इतर कारणानें तो आम्हांस पूज्य आहे,' असें जर तूं म्हणशील तर, तेंहि योग्य नाहीं. वृद्ध वसुदेव जीवंत असतांना त्याचा पुत्र वृद्धत्वामुळें पूजार्ह कसा होईल! बरें, 'तो आमच्या मनाप्रमाणें वागणारा आहे, तो आमचें प्रिय संपादन करणारा आहे, म्हणून आम्हीं त्याची पूजा केली' असें जर म्हणशील, तर तुमचा श्वशुर येथें विद्यमान असतांना हा माधव पूजार्ह कसा होतो!

तूं याला आचार्य समजत असशील तर तुमचा धनुर्वेदाचार्य द्रोण येथें स्थित आहे. ऋत्विज मानीत असशील, तर वृद्ध कृष्णद्वैपायन येथें उपस्थित आहे. पुरुषोत्तम म्हणत असशील तर स्वच्छंदमृत्यु शांतनव भीष्म येथें तुझ्याजवळ बसला आहे. हा सर्वशास्त्रविशारद आहे, अशी तुझी कल्पना असेल, तर खरा सर्वशास्त्रपारंगत द्रोणपुत्र अश्वत्थामा येथें आहे. राजेंद्र दुर्योधन व भारताचार्य कृप हेहि पूज्य पुरुष आपापलीं आसनें अलंकृत करीत आहेत. असें असतांना हे कौंतेया, तूं या कृष्णाचें पूजन कां केलेंस!

किंपुरुषाचार्य द्रुम, पांडूप्रमाणें सर्व लक्षणांनीं युक्त असलेला दुर्धर्ष भीष्मक, त्याचा पुत्र नृपश्रेष्ठ रुक्मी, निषादाधिपति एकलव्य व मद्रराज शल्य, या पूज्य पुरुषांचें अतिक्रमण करून तूं या पुरुषाची पूजा कां केलीस! सर्व राजांमध्यें अति बलाढ्य, जामदग्न्य ब्राह्मणाचा प्रिय शिष्य व ज्यानें आत्मबलाचा आश्रय करून सर्व राजांना युद्धामध्यें जिंकलें, तो धनुर्धर कर्ण येथें असतांना त्याचेंहि अतिक्रमण करून तूं कृष्णाचें पूजन कां केलेंस!

हा ऋत्विज नाहीं, आचार्य नाहीं व राजाहि नाहीं, असें असतांना हे कुरुश्रेष्ठा, तूं दुसरें कोणतें प्रिय साधण्यासाठीं या हीनाची आज पूजा केलीस!

किंवा तुम्हां पांडवांना जर या वासुदेवाचीच पूजा करावयाची होती, तर या सर्व राजांना, त्यांचा अपमान करण्यासाठीं येथें बोलावून आणलेंत तरी कशाला ? आम्ही सर्व या कुंतीपुत्र युधिष्ठिराला जो कर देत आहों तो लोभानें, भीतीनें किंवा सामामुळेंहि देत नाहीं. तर हा धर्माचरण करावयास प्रवृत्त झाला आहे, पार्थिवत्वाची इच्छा करीत आहे, म्हणून आम्ही याला कर देतों. पण हा तर आम्हांला कस्पटाप्रमाणें लेखित आहे !

हे युधिष्ठिरा, तूं या एवढ्या मोठ्या राजसभेंत छत्र-चामरादि राजचिह्नांनीं युक्त नसलेल्या ( परमार्थदृष्ट्या असंग, चिद्रूप असल्यामुळें अलक्षण व अचिंत्य असलेल्या ) कृष्णाची ही जी पूजा केली आहेस, तिच्या योगानें आमचा अवमान करणें या एका कार्यावांचून तूं काय साधलेंस ! खरोखर, या धर्मपुत्राची ' धर्मात्मा ' अशी जी कीर्ति पसरली आहे, ती निष्कारण आहे. हा युधिष्ठिर जर खरोखरच धर्मात्मा असता, तर त्यानें धर्मापासून च्युत झालेल्या या वार्ष्णे-याची अशी श्रेष्ठ पूजा कधींच केली नसती. अहो, हा वृष्णिकुलांत उत्पन्न झाला व यानें आपल्याच कंसराजाला मारिलें. ही झाली मागची गोष्ट. आतां नुकतेंच, या दुरात्म्यानें महात्म्या जरासंधाला केवळ अन्यायानें मारविलें. खरोखर, या युधिष्ठिराची धर्मात्मता आज त्याला सोडून निघून गेली आहे. कारण त्यानें या हीन कृष्णाला अर्घप्रदान करून आपलें कृपणत्व प्रकट केलें आहे.

हे वसुदेवपुत्रा कृष्णा, हे बिचारे कौंतेय तुला भिऊन कृपण बनले आहेत; पण अरे शहाण्या, आपण कोणत्या पूजेला योग्य आहों, याचा तूं तरी विचार करावयाचा होतास ! कृपण झालेल्या या पांडवांनीं समर्पण करावयास आण-लेल्या या पूजेला ' मी अयोग्य आहें,' असें समजून तूं तिचा निषेध कां केला नाहींस ! एखाद्या निर्लज्जाप्रमाणें तिचा स्वीकार कसा केलास ! एखादा कुत्रा हवीचा वास घेऊन त्यावर लोलुप होतो व जवळपास कोणी नाहीं असें पाहून त्यांतील लेश जसा भक्षण करितो, त्याप्रमाणें तूं आपल्या या अयुक्त पूजेचा

---

१ ' आत्मा एकच अद्वितीय आहे. त्यामध्यें पूज्य-पूजकभाव नाहीं. असें असतांना तूं द्विचंद्रन्यायानें मायेनें भेदारूढ होऊन भक्तानें अर्पण केलेलें पत्र-पुष्पादि स्वीकारितोस व त्यालाच श्रेष्ठ पूजा समजतोस. पण तुज अद्वितीय आत्म्याला असें करणें शोभत नाहीं, ' असा याचा गूढ आशय आहे.

स्वीकार करून तिला श्रेष्ठ समजत आहेस. पांडवांनीं आपला बहुमान केला असें तुला वाटत आहे. पण या सर्व राजेंद्रांचा असा अपमान करणें तुला सर्वथा अयोग्य आहे. यावरून हे कुरुकुलोत्पन्न पांडव केवळ तुझ्या आश्रयानें राहिले आहेत, हें व्यक्त होतें.

पण हे मधुसूदना, क्लीबाचा विवाह किंवा अंधाचें रूपदर्शन जसें अयोग्य त्याचप्रमाणें राजा नसलेल्या तुझी एखाद्या नृपतीप्रमाणें पूजा करणें अयोग्य होय. हा राजा युधिष्ठिर किती धार्मिक आहे, तसाच हा भीष्म किती अविवेकी आहे व हा कृष्ण किती स्वार्थी आहे, हें सर्व आज आम्हांला यथार्थ कळून चुकलें.

जनमेजया, पांडवांना असें बोलून क्रुद्ध झालेला शिशुपाल आपल्या श्रेष्ठ आसनावरून उठला व इतर राजांसह त्या यज्ञमंडपांतून बाहेर निघून गेला. २. ७. ३७.

---

## अध्याय ३८ वा.

[ १ शिशुपालाचें सान्त्वन करणाऱ्या युधिष्ठिराचें निवारण करून भीष्मानें केलेलें कृष्णमाहात्म्यकथन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, शिशुपाल सभेंतून क्रोधानें उठून गेला आहे असें पाहून राजा युधिष्ठिर त्वरेनें त्याच्यापाशीं आला व मधुर वाणीनें त्याचें सान्त्वन करीत म्हणाला—" हे भूपाला, तूं जें बोललास तें सर्वथा अनुचित आहे. हे राजा, तूं हा फार मोठा अधर्म केलास व विनाकारण आपलें पारुष्य व्यक्त केलेंस. शांतनुपुत्र भीष्म श्रेष्ठ धर्म काय आहे हें जाणत नाहीं, असें का तुला वाटतें !

---

१ कृष्ण ही परा देवता असून ती केवल वेदगम्य आहे. तर्कगम्य नाहीं. बृहदारण्यकोपनिषदांत 'केवल तर्कबलानें या परादेवतेचें निरसन करणाऱ्या शाकल्याचा याज्ञवल्क्याच्या शापानें मूर्धापात झाला' असें वर्णन केलें आहे. (बृ. अ ५. ब्रा. ९) त्यावरून परादेवतेचें प्रत्याख्यान केल्यास महान् अधर्म घडतो असें सिद्ध होतें. तूंहि शाकल्याचें अनुकरण करीत आहेस. त्यामुळें तुलाहि मोठा प्रत्यवाय लागेल. कारण तूंहि वृथा पारुष्य म्ह० भेददृष्टि प्रकट करीत आहेस. पण ती प्रमाणानें सिद्ध होत नाहीं.

हे राजा, तूं अशी भलतीच समजूत करून घेऊं नको. हा आमचा पितामह वस्तुतः या भूलोकाचा स्वामीच आहे ! यास्तव तू याचा असा अवमान करूं नको. या सभेंत तुझ्याहि पेक्षां अधिक वयोवृद्ध भूपाल बसले आहेत, त्यांजकडे पहा. कृष्णाची अग्रपूजा त्यांना अमान्य नाहीं. यास्तव तुलाहि ती संमत होवो. हे चेदिराजा, हा भीष्म कृष्णाला जसा तत्त्वतः[1] जाणतो, तसा तूं जाणत नाहींस."

हे पारिक्षिता, याप्रमाणें राजा युधिष्ठिर शिशुपालाचें सान्त्वन करीत आहे, असें पाहून शांतनव भीष्म त्याला म्हणाला—" हे अजातशत्रो, या शिशुपालाशीं असें नीतियुक्त[2] वचन बोलूं लागणें व त्या क्रुद्धाला प्रसन्न करण्याचा यत्न करणें सर्वथा अयोग्य आहे. हा शमाचा अधिकारी नाहीं. कारण हा सर्व लोकांमध्यें अतिशय श्रेष्ठ असलेल्या कृष्णाच्या पूजेला विरोध करीत आहे. मूढाला मूढाच्या भाषेंतच बोध केला पाहिजे, असा न्याय आहे. त्याला अनुसरून शिशुपालाच्या दृष्टीनें जरी पाहिलें, तरी हा कृष्णच सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे, असें मी पुनः तुला सांगतों, तें ऐक. जो रणधुरंधर क्षत्रिय दुसऱ्या क्षत्रियाला रणांत जिंकून स्वाधीन करून सोडतो, तोच त्याचा गुरु होतो.

राजांच्या या एवढ्या मोठ्या सभेमध्यें या देवकिपुत्राच्या तेजानें युद्धांत पराभूत न झालेला असा एकहि राजा मला दिसत नाहीं. हा अच्युत केवल आम्हांलाच अतिशय पूज्य आहे, असें नाहीं; तर हा महापराक्रमी कृष्ण या त्रिभुवनांतील ब्रह्मादि मोठमोठ्या देवादिकांनाहि पूज्य आहे. या कृष्णानें सांप्रतच्या क्षत्रियांहूनहि श्रेष्ठ असलेले जे हिरण्याक्षादिक दानव, त्यांना व असंख्य क्षत्रियश्रेष्ठांनाहि युद्धांत जिंकलें आहे.

---

१ हा गांगेय कृष्णाला योगबलानें जाणतो, व 'अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ।' (याज्ञ. स्मृ. अ १. श्लो. ८.) या न्यायानें कृष्णाला योगबलानें जाणणें हा परमधर्म आहे. भीष्माचें ज्ञान निर्दोष असल्यामुळें त्याच्या वचनावर विश्वास न ठेवणें अयोग्य आहे.

२ मूळांत ' अस्मै अनुनयः न देयः ' असें वचन आहे. नय म्ह० युक्ति, मनन त्याच्या अनु म्ह० मागून ज्याचें विधान केलें जातें तो अनुनय. अध्यात्मशास्त्रांत श्रवणानंतर मनन व मननानंतर निदिध्यासन सांगितलें जातें. त्यालाच ध्यान किंवा योग असेंहि म्हणतात. ज्यानें सगुणोपासना केलेली नाहीं, त्या अधिकाऱ्याला ध्यान किंवा योग सांगणें अयोग्य आहे, असा याचा भावार्थ.

या वार्ष्णेयामध्यें हें सर्व जगत् पूर्णपणें प्रतिष्ठित आहे. यास्तव वसुदेव, द्रुपद, मी, द्रोण, द्वैपायन इत्यादि अनेक वयोवृद्ध ब्राह्मण व क्षत्रिय या ठिकाणीं जरी असले, तरी आम्ही या कृष्णाचीच पूजा करणार. अग्रपूजेचा मान दुसऱ्या कोणालाहि देणार नाहीं. यास्तव हे पृथ्वीपते, तूं या मूढ शिशुपालाशीं असें सांत्व वचन बोलूं नकोस. या भेददृष्टि राजाप्रमाणें तुझीहि अशी विपरीत बुद्धि न होवो.

हे सार्वभौमराजा, मीं आजपर्यंत अनेक ज्ञानवृद्धांचा सहवास केला आहे. ते सर्व शिष्टलोक एकत्र जमून या सर्वगुणसंपन्न शौरीच्या सर्वसंमत गुणांचें वर्णन करीत असतांना त्यांच्या तोंडून मीं ते ऐकिले आहेत. त्याचप्रमाणें श्रेष्ठ लोक या बुद्धिमानाचीं जन्मप्रभृति अद्भुत कर्में कथन करीत असतांना मीं ऐकलीं आहेत. हे चेदिराजा, आम्ही मनांत कांहीं इच्छा धरून किंवा यानें केलेला एखादा उपकार आठवून किंवा याचा संबंध लक्षांत आणून याची पूजा करीत नाहीं. तर हा महात्मा श्रेष्ठांना पूज्य झाला आहे व या भूलोकीं सर्व प्राण्यांना सुख देणारा आहे. तसेंच याचें शौर्य, यश व विजय अप्रतिम आहे, हें जाणूनच आम्हीं याची अग्रपूजा केली आहे. आम्ही ज्याला पूर्णपणें ओळखीत नाहीं, असा एखादा बालकहि येथें नाहीं.

हा हरि आपल्या गुणांनीं सर्व वृद्धांचें अतिक्रमण करून अत्यंत पूज्य झाला आहे. ब्राह्मणांमध्यें ज्ञानवृद्ध, क्षत्रियांमध्यें बलाढ्य, वैश्यांमध्यें धन-धान्यवान् व शूद्रांमध्यें वयोवृद्ध पुरुष पूज्य होतो. गोविंदामध्यें पूज्यतेचीं दोन कारणें नित्य सिद्ध आहेत. एक लक्ष्मीपतित्व व दुसरें पुराणपुरुषत्व; या शिवाय याच्या ठिकाणीं वेद-वेदांगविज्ञान व सर्वांहून अधिक बल स्वभावतःच स्थित आहे. तेव्हां या भूलोकीं केशवाहून अधिक पूजार्ह दुसरा कोण असणार! या अच्युतामध्यें दान, दक्षता, शास्त्राध्ययन, शौर्य, अकार्याविषयीं लज्जा, उत्तम कीर्ति, अकुंठित बुद्धि, संतति, श्री, धृति, तुष्टि व पुष्टि हे गुण नियत आहेत. ते कोणत्याहि कर्मापासून उत्पन्न झालेले नाहींत. त्यामुळेंच ते नित्य आहेत.

---

१ रज्जुसर्पन्यायानें हा भगवान्‌च सर्व जगाचें अधिष्ठान असल्यामुळें त्याच्या आधारानेंच जगाचे उत्पत्ति-स्थिति-लय होतात. ज्ञानानेंच कैवल्यप्राप्ति होते, हा श्रुतिसिद्धान्त प्रसिद्ध आहे.

इतर श्रेष्ठ पुरुषांमध्येंहि यांतील कांहीं गुण न्यूनाधिक प्रमाणानें रहातात व तेहि अस्थिर असतात. यास्तव ज्ञानसंपन्न आचार्य, पिता, गुरु व त्यामुळेंच सर्वथा पूजार्ह अशा या यदुनंदनाची आम्हीं अग्रपूजा केली आहे. तुम्ही सर्वांनीं तिला मान द्यावा. हा हृषीकेश आमचा ऋत्विक्, गुरु, स्नातक, नृपति व प्रियहि आहे. त्यामुळें तो आम्हांला पूज्य असून आम्हीं त्याची यथाविधि पूजा केली आहे.

हे राजन्, मीं तुला या वासुदेवाचें हें लौकिक माहात्म्य सांगितलें. आतां शास्त्रदृष्ट्याहि त्याचें माहात्म्य ऐक. हा कृष्णच या सर्व लोकांचें अविनाशी उपादान कारण व निमित्तहि आहे. त्यामुळें परिणामी उपादान कारणाप्रमाणें याचा नाश होत नाहीं. हा भगवान् कूटस्थ नित्य आहे. पृथिव्यादि पदार्थांप्रमाणें परिणामी नित्य नाहीं. ज्या पदार्थांत सतत परिणाम होत असूनहि तोच हा पदार्थ ही बुद्धि निवृत्त होत नाहीं, त्याला परिणामी नित्य म्हणतात. हा कृष्ण स्वरूपतः निर्विकार आहे, त्यामुळें तो अपरिणामी कूटस्थ नित्य आहे. त्याच्या चित्स्वरूपामध्यें कधींच बदल होत नाहीं. हें सर्व चराचर जगत् या आत्मरूप कृष्णासाठीं आहे. कारणं आत्म्यासाठीं सर्व, सर्वांसाठीं आत्मा नव्हे.

---

१ ज्या द्रव्यापासून कार्य—विकार उत्पन्न होतो तें द्रव्य त्याचें उपादान कारण आहे. जसें माती घटाचें, कापूस तंतू-वस्त्र यांचें, सोनें अलंकाराचें, दूध दह्याचें उपादान आहे. घटादि कार्यांना जो बनवितो तें त्यांचें निमित्त कारण, जसे कुंभार, कोष्टी, सोनार व विरजण लावणारा. मायाविशिष्ट भगवान् जगाचें विवर्तोपादान कारण व निमित्त कारणहि आहे. विवर्त, परिणामी व आरंभी असें उपादान तीन प्रकारचें आहे. रज्जुसर्पाचें रज्जु हें विवर्तोपादान, दह्याचें दूध हें परिणामी उपादान व वैशेषिकांच्या मतीं तंतू हें वस्त्राचें आरंभी उपादान. परिणामी उपादानाचा कार्य होतांच नाश होतो, दहीं होतांच दूधाचा नाश होतो. विवर्तोपादान कार्य भासलें तरी नाश पावत नाहीं. तर कार्य भासण्यापूर्वी, तें भासत असतांना व त्याची निवृति झाल्यावरहि म्ह० त्रिकालीं स्वतःच्या निर्विकार स्वरूपानें स्थित असतें. अशा त्रिकालीं स्वरूपानें निर्विकार असलेल्या वस्तूला ‘ कूटस्थ नित्य ’ म्हणतात व ज्या वस्तूमध्यें क्षणोक्षणीं बदल—विकार होत असला तरी ‘ तीच ही वस्तु ’ अशी प्रत्यभिज्ञा—ओळख होते ती परिणामी नित्य होय. सु. पं. प्र. १३ श्लो. ६-१० पृ. ६५०-५१ पहा. २ सु. पंचदशी प्र. १२ श्लो. ६-१९ पृ. ६१४-१७. बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ अ. २. ब्रा. ४ कं. ५ पृ. १७६-८० पहा.

म्हणून हा श्रीकृष्ण शेषी किंवा अंगी असून सर्व जगत् त्याचा शेष किंवा अंग आहे.

हा स्वरूपानें निर्विकार जरी असला तरी विकारी आकाशादिकांचें अव्यक्त उपादान कारण आहे. हाच त्याचा सनातन कर्ता आहे. याच्या आश्रयानें रहाणारी अनादि अव्यक्त प्रकृति महत्, अहंकार, पंचतन्मात्रें इत्यादि सर्व सूक्ष्म व पंचमहाभूतादि स्थूल प्रपंचरूपानें परिणाम पावते. त्यामुळें 'जगत्' हा प्रकृतीचा परिणाम व या चिद्रूप परमात्म्यावर मिथ्या आरोप आहे. त्यामुळें हा कृष्ण सर्व भूतांहून अगदीं विलक्षण आहे. त्यामुळेंच हा अच्युत पूज्यतम आहे.

जगाची ही सर्व कार्य-कारणपरंपरा अनादि आहे. प्रलय व सुषुप्ति यांमध्येंहि महदहंकारादि सर्व प्रकृतिकार्य संस्काररूपानें प्रकृतीमध्यें लीन होऊन राहतें, यास्तव तें कांहीं काल प्रतीत होत असल्यामुळें मिथ्या जरी असलें, तरी भ्रम व त्यांचे संस्कार यांच्या परंपरेनें बीजांकुरन्यायानें अनादिच आहे. महत्तत्त्व, अहंकार, पंचतन्मात्रें, आकाशादि पंचमहाभूतें, जरायुजादि चतुर्विध भूतसमुदाय, सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें, दिशा, विदिशा, हें सर्व कृष्णामध्येंच रज्जुसर्पन्यायानें प्रतिष्ठित आहे. अग्निहोत्र हें वेदांचें मुख आहे, गायत्री सर्व छंदांचें मुख आहे, राजा मनुष्यांचें मुख आहे, समुद्र नद्यांचें मुख आहे, चंद्र नक्षत्रांचें मुख आहे, आदित्य सर्व तेजांचें मुख आहे, मेरु सर्व पर्वतांचें मुख आहे, गरुड पक्ष्यांचें मुख आहे, म्हणजे अग्निहोत्रादि हें वेदादिकांचें प्रधानस्थान किंवा पर्यवसान भूमि आहे. त्याचप्रमाणें देवादि सर्व लोकांतील ज्या उत्तम, मध्यम व हीन गति आहेत, त्या सर्वांचें मुख म्हणजे पर्यवसानस्थान केशव आहे. म्हणजे केशवामध्यें या सर्वांचा अंतर्भाव होतो.

हा शिशुपाल अविवेकी आहे. त्याला अध्यात्मशास्त्राचा संस्कार झालेला नाहीं. त्यामुळें तो सर्व कालीं व सर्व देशीं असलेल्या कृष्णाला जाणत नाहीं. हा परमात्मा तिन्ही काळीं सर्व वस्तूंना सत्ता व स्फूर्ति देतो. त्याच्या सत्तेनेंच हें सर्व भूत-भौतिक कार्यजात सत्तावान् झालें आहे. जो बुद्धिमान् पुरुष उत्कृष्ट धर्म म्ह० आत्मदर्शन संपादन करितो, तोच आत्मरूप धर्माला यथावत् जाणतो. पण हा चेदिराज अनात्मज्ञ असल्यामुळें या आत्मरूप धर्माला जाणत नाहीं. या आबालवृद्ध लोकांमध्यें किंवा येथें जमलेल्या या महात्म्या राजांमध्यें अशा या स्वात्मरूप कृष्णाला सर्वप्रकारें मान न देणारा असा कोण आहे! 'हा कृष्ण सर्वात्मा आहे' हें कळल्यावर त्याची पूजा न करील असा तरी

कोण आहे ! तथापि हा शिशुपाल ' आम्हीं केलेली पूजा अयोग्य आहे, आम्हीं हा मोठा अन्याय केला आहे ' असें जर समजत असेल तर त्याला या आमच्या अकार्यांचा प्रतीकार यथान्याय करूं दे. तो राजा असल्यामुळें अन्यायाचा यथाशास्त्र प्रतीकार करणें, हा त्याचा धर्मच आहे. " २. ७. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

[ १ सहदेवप्रतिज्ञा. २ नारदवचन. ३ पूजार्ह पुरुषांचा सत्कार. ४ क्रुद्ध शिशुपालादि राजांचा युद्धसंकेत. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, असें बोलून महाबलाढ्य भीष्म स्वस्थ बसला असतां सहदेव सर्व राजांस उद्देशून असें अर्थपूर्ण वचन बोलला —" अहो भूपालांनो, केशिदैत्याला मारणाऱ्या अचिंत्य पराक्रमी केशवाची मीं जी अग्रपूजा केली आहे, ती तुम्हांपैकीं ज्यांना ज्यांना सहन होत नसेल, त्या सर्व बलवानांच्या मस्तकावर, या पूज्याची पूजा करून, मीं पाय ठेविला आहे. माझें हें निर्भय वचन ऐकून त्यावर ज्याला जें कांहीं बोलावयाचें असेल तें त्यानें बोलावें. मी त्याचा निःसंशय वध करीन. हे नृपश्रेष्ठहो, तुम्हांमध्यें जे सुविचारी असतील त्यांनीं आचार्य, पितर, गुरु व पूजार्ह अशा या वासुदेवाच्या अग्रपूजेला आपली अनुमति द्यावी. "

राजा, असें बोलून सहदेवानें आपला पाय पुढें ठेविला. तेव्हां त्या बुद्धिमान्, समर्थ व मानी राजांतील कोणी एखाद्यानेंहि एक शब्द देखील उच्चारला नाहीं. उलट अंतरिक्षांतून सहदेवाच्या मस्तकावर पुष्पवृष्टि झाली व ' धन्य धन्य ' अशी आकाशवाणी ऐकूं आली.

( २ ) त्यानंतर भूत-भविष्यद्वेत्ता, सर्व संशयविमोक्ता व सर्वलोकगामी देवर्षि नारद आपलें कृष्णवर्ण अजिन हालवून सर्व सभासदांच्या समोर स्पष्ट वाणीनें बोलला—" जे कोणी कमलनेत्र श्यामसुंदर श्रीकृष्णाची पूजा करीत

---

१ सहदेवाची प्रतिज्ञा व नारदाचें वचन यांवरून भीष्मानें ज्या वासुदेवाचें परमात्मरूपानें वर्णन केलें, तोच हा वसुदेवपुत्र आहे, असा निश्चय करण्यासाठीं हा अध्याय आरंभिला आहे.

नाहींत, ते जरी जिवंत असले तरी मृतांप्रमाणेंच मानावे व त्यांच्याशीं कधीं भाषणहि करूं नये."

( ३ ) हे पारिक्षिता, त्यानंतर त्या सभेंतील प्रत्येकाची योग्यता पूर्णपणें जाणणाऱ्या सहदेवानें पूजार्ह ब्राह्मण व क्षत्रिय यांचें यथाशास्त्र व यथाक्रम पूजन करून तें सत्कार करण्याचें कार्य संपविलें. याप्रमाणें श्रीकृष्णाचीच अग्रपूजा झाली असतां ज्याचे नेत्र क्रोधानें रक्तवर्ण झाले आहेत असा शत्रूला ताप देणारा शिशुपाल सर्व राजांना म्हणाला—

( ४ ) " हे भूपालहो, मी तुमचा सेनापति येथें असतांना तुम्ही कसला विचार करीत अहांत ! उठा, आपण सर्व मिळून या यादव-पांडवांशीं युद्ध करूं या."

याप्रमाणें त्या चेदिराजानें सभेंतील सर्व नृपतींना प्रोत्साहन देऊन त्यांच्याशीं पांडवांच्या राजसूययज्ञांत विघ्न करण्याचा संकेत केला. त्यावेळीं हे जनमेजया, शिशुपालाच्या पक्षाचे सर्व निमंत्रित राजे क्रुद्ध झाले. त्यांची चर्या बदलली. ते सर्व ' युधिष्ठिराचा साम्राज्याभिषेक व कृष्णाची अग्रपूजा आम्ही होऊं देणार नाहीं ' असें बोलले व क्रोधानें देहभान विसरलेले ते सर्व विरुद्धपक्षीय राजे यज्ञमंडपांतून निघून गेले. त्या सर्वांना स्वतःच्या सामर्थ्याची खात्री वाटत होती. त्यामुळें त्यांच्या आप्त-सुहृदांनीं त्यांचें निवारण केलें असतांहि त्यांनीं अपमान सहन न करण्याचा आपला निश्चय सोडला नाहीं.

---

१. शरीररूप उपाधीच्या द्वारा हा कृष्ण मनुष्याकार जरी दिसत असला तरी उपाधिरहित असलेला हा साक्षात् ब्रह्मच आहे. इतर जीवहि वस्तुतः ब्रह्मस्वरूपच आहेत; तथापि त्यांच्या ऐश्वर्याचा काम-कर्मादि निमित्तांनीं देशतः व कालतः परिच्छेद झालेला असतो. त्यामुळें त्यांच्या ऐश्वर्यांत न्यूनाधिकता संभवते. परंतु हा कृष्ण अविद्या-काम-कर्माधीन नसल्यामुळें त्याच्या ऐश्वर्याचा देश-कालांनीं परिच्छेद होत नाहीं. सर्व परिमाणांचें पर्यवसान आकाशांत जसें होतें, त्याप्रमाणें जगांतील ऐश्वर्याच्या तारतम्याचें पर्यवसान या निरुपाधिक कृष्णामध्यें होतें. त्यामुळें कार्यकारणशून्य असलेला हा निरुपाधिक कृष्ण साक्षात् ब्रह्म आहे. म्हणून तोच पूज्यतम आहे. यास्तव त्याची पूजा न करणारे मृततुल्य असून ते संभाषणार्हहि नाहींत, असा या नारदवचनाचा आशय आहे

हे राजा, आमिष निसटून गेलें असतां सिंह जसा गर्जना करितो, तसे ते सर्व क्रुद्ध नृपाल गर्जना करूं लागले. तेव्हां त्या अगाध व अक्षय राजरूपी सागराच्या बलाढ्य सेनेचा ओघ आपल्याकडेच येत आहे हें पाहून श्रीकृष्णानें त्यांचा युद्ध करण्याचा संकेत जाणला. २. ७. ३९.

येथें सातवें अर्घाभिहरणपर्व समाप्त झालें.

---

# शिशुपालवधपर्व ८



## अध्याय ४० वा.

[ १ भीष्मानें केलेलें युधिष्ठिराचें समाधान. २ कृष्णाचें माहात्म्य. ]

( १ ) वैशंपायन—हे भारता, प्रलयकालच्या वायूनें महासागर जसा क्षुब्ध होतो, तसें तें सागरोपम नृपतिमंडल क्रुद्ध झालेलें पाहून, बृहस्पतीशीं भापण करणाऱ्या परंतप इंद्राप्रमाणें युधिष्ठिर बुद्धिमानांतील श्रेष्ठ व वृद्ध भीष्माला म्हणाला—" हे पूज्य पितामह, सागरासारखा हा नृपतिसमूह अतिशय क्षुब्ध झाला आहे. यावेळीं काय करावें तें मला सांग. ज्यायोगें यज्ञांत विघ्न न येतां प्रजेचें हित होईल, असा उपाय तूं मला सुचीव. "

धर्मज्ञ युधिष्ठिराचें हें वचन ऐकून कुरुवृद्ध भीष्म म्हणाला—" हे कुरुश्रेष्ठा, तूं भिऊं नकोस. श्वान केव्हां तरी सिंहाला मारूं शकेल काय ! मीं पूर्वीं स्वीकारलेला कृष्णाश्रयरूप मार्गच अत्यंत शुभ व नीतियुक्त आहे. जोंवर सिंह निजलेला असतो, तोंवरच श्वान एकत्र जमून भुंकत असतात. तशीच या नृपांची स्थिति आहे. जोंवर हा यादवसिंह जागृत होऊन उठला नाहीं तोंवरच हे सर्व क्षत्रिय, श्वान सुप्त सिंहाच्या समीप जाऊन जसे भुंकतात, तसे क्रोधानें बडबड करीत आहेत. हा अच्युत सुप्त सिंहाप्रमाणें स्वस्थ बसला आहे, म्हणूनच हा चेदिराज इतर राजांना सिंह बनवीत आहे. हा मूढ शिशुपाल या सर्व भूपालांना यमलोकीं नेण्याच्या इच्छेनेंच असें आचरण करीत आहे.

(२) हे भारता, हा अधोक्षज या शिशुपालामध्यें जें भगवत्तेज आहे, त्याचा उपसंहार त्याच्या नाशानेंच करण्याची इच्छा करीत आहे. हा या भगवानाचा पूर्व पार्षद असल्यामुळें त्याच्यामध्यें भगवानाचें ज्ञानैश्वर्यादि तेज आहे. याच्या

हिरण्याक्ष, रावण, इत्यादि जन्मप्रसंगीं या भगवानानें त्यांच्या देहपातानेंच त्यांचें तेज आकर्षण करून घेतलें, तसेंच पुनरपि करण्याची याची इच्छा आहे.

हे बुद्धिमान् कुंतिपुत्रा, तुझें कल्याण असो. चेदिराज व हे सर्व राजे यांचा मृत्यु जवळ आल्यामुळेंच यांच्या बुद्धीचा भ्रंश झाला आहे. हा भगवान् ज्याचा संहार करण्याची इच्छा करितो, त्याची बुद्धि या चेदिराजाप्रमाणेंच विपरीत होत असते. 'पण हा कृष्ण अन्य पुरुषांचें तेज कां ग्रहण करितो ! तें पृथक् कां रहात नाहीं' असें जर विचारशील तर त्याचेंहि कारण सांगतों—"बा युधिष्ठिरा, हा माधव त्रैलोक्यांतील जरायुजादि चतुर्विध भूतसमुदायांचा प्रभव व प्रलय आहे. तरंग, बुद्बुद इत्यादि जलविकार जलापासून उत्पन्न होऊन त्यांतच जसे लीन होतात, त्याप्रमाणें हा चराचर प्रपंच या कृष्णापासून उत्पन्न होऊन, त्यांतच लीन होतो, असें अथर्ववेदाच्या मांडूक्य उपनिषदांत स्पष्ट सांगितलें आहे." परंतु हे राजा, भीष्माचें हें वचन ऐकून चेदिराज शिशुपालानें त्याला अति कठोर वचनें ऐकविलीं. २. ८. ४०

---

## अध्याय ४१ वा.

[ १ शिशुपालानें केलेली भीष्माची निर्भर्त्सना. ]

(१) वैशंपायन—हे राजश्रेष्ठा, भीष्माचें पूर्वोक्त वचन ऐकून अतिशय क्रुद्ध झालेला शिशुपाल[1] त्यास म्हणाला—"हे कुलकलंका, तूं इतका वृद्ध झाला

---

१ हा सर्व ग्रंथ भगवन्निंदापर आहे. तथापि तो भूतार्थवाद नाहीं. भूतार्थवाद म्हणजे सत्यार्थ अर्थवाद. अर्थवादाचे गुणवाद, अनुवाद व भूतार्थवाद असे तीन प्रकार आहेत. अर्थवाद म्ह० विहिताची स्तुति किंवा निषिद्धाची निंदा. 'देवदत्त सिंह आहे' 'यूप आदित्य आहे' यांत सिंहाचे शौर्यादि गुण देवदत्तामध्यें आहेत, आदित्यासारखा चकचकीतपणा यूपामध्यें आहे. अशी गुणांच्या द्वारा देवदत्त व यूप यांची स्तुति केली आहे. 'अग्नि थंडीचें औषध आहे' इत्यादि लौकिक प्रत्यक्षादि-प्रमाणांनीं सिद्ध असलेल्या वस्तुस्थितीचें वर्णन ज्या अर्थवादांत असतें तो अनुवाद व या दोन्ही अर्थवादांहून विलक्षण असलेला म्ह० ज्यांत लौकिक प्रमाणसिद्ध अर्थाचें वर्णन किंवा गुणवर्णन नसून सत्यार्थाचें वर्णन असतें तो भूतार्थवाद होय. शिशुपालानें केलेली भगवन्निंदा हा जर भूतार्थवाद असता

आहेस, तरी तुला या सर्व राजांना अशी अनेक प्रकारें भीति दाखवितांना लाज कशी वाटत नाहीं. तृतीय प्रकृतीमध्यें सर्व जन्म घालविणाऱ्या तुला असें धर्मबाह्य भाषण करणें युक्तच आहे आणि तूं तर सर्व कौरवांचा नेता आहेस! ज्याप्रमाणें एका नावेला दुसरी नाव जोडावी, किंवा एका आंधळयानें दुसऱ्या आंधळ्याच्या खांद्यावर हात ठेवून जावें, त्याप्रमाणें हे सर्व कौरव तुझें अनुकरण करीत आहेत!

भीष्मा कृष्णाच्या पूतनावधादि कर्मांचा विशेषतः उल्लेख करून तूं आमच्या मनाला अतिशय व्यथित केलें आहेस. हे शांतनवा, तूं स्वतः दुरभिमानी व मूर्ख आहेस. केशवाची स्तुति करण्याची इच्छा करणाऱ्या तुझी जिह्वा शतशः विदीर्ण कशी झाली नाहीं! हे गांगेया, अज्ञ जनहि ज्या कृत्याची निंदा करतील, त्या स्त्रीवधादि कर्मे करणाऱ्या या पापी गवळ्याची तूं ज्ञानवृद्ध असून अशी स्तुति करण्याची इच्छा कां करितोस! यानें बालपणीं एखाद्या पक्ष्याला मारिलें असलें, तर त्यांत काय आश्चर्य आहे! युद्धामध्यें निपुण नसलेल्या एका घोड्याला व बैलाला यानें मारिलें, यांत याचा पुरुषार्थ तो कोणता! यानें

---

तर त्या निंदक शिशुपालाला मुक्ति मिळणें शक्य नव्हतें. यास्तव हा सर्व ग्रंथ ध्येयाचें सारूप्य प्राप्त करून देणारें केवल ध्यान आहे. मग तें ध्यान द्वेषानें जरी केलेलें असलें, तरी त्याचें ध्येयसारूप्य हें फल मिळतेंच. असें जर नसतें तर भगवानाची निंदा करणाऱ्या वेदादिकांना अंधतमाची प्राप्ति झाली नसती. बृहदारण्यकाच्या तिसऱ्या अध्यायांत मु. उ. पृ. ३३९ याज्ञवल्क्याचा द्वेष करणाऱ्या शाकल्याचा मूर्धापात होऊन त्याला दुर्गति मिळाली नसती. यास्तव मीमांसेच्या 'आनर्थक्य-प्रतिहतानां विपरीतं बलाबलं' या न्यायानें आकाशादि श्रुतींची जशी गौणवृत्तीनें व्यवस्था लावावी लागते, त्याप्रमाणें शिशुपालानें केलेली भगवन्निंदाहि ब्रह्मपरत्वानें लावणें योग्य आहे. श्रीधरस्वामींनीं भागवतांतील हरिनिंदाहि अशीच स्तुतिपर लाविली आहे, इत्यादि पुष्कळ विचार करून नीलकंठांनीं आपल्या भारतभावदीपांत शिशुपालाच्या निंदापर ग्रंथाचा स्तुतिपर अर्थ लाविला आहे. पण आम्हीं विस्तारभयास्तव त्याचें सर्व भाषांतर न करितां कांहीं विशिष्ट पदांचा अर्थ मात्र टीकेला अनुसरून येथें सुचविला आहे. ग्रंथाच्या संदर्भाकडे जरी पाहिलें तरी निंदापर अर्थच अधिक जुळतो, हेंहि लाक्षणिक अर्थ न करण्याचें दुसरें कारण आहे.

आपल्या पायानें एक गाडा उलटून टाकिला, याचें तुला मोठें आश्चर्य वाटतें, पण चेतनारहित काष्ठाला फेंकून देण्यांत यानें कोणता पराक्रम दाखविला, तेंच मला कळत नाहीं.

पूर्वीं यानें गोवर्धन पर्वताला सात दिवस उचलून धरिलें, हा तुला मोठा चमत्कार वाटतो. पण वारुळानें पोकळ झालेल्या भुसभुशीत पर्वताला उचलून धरणें, यांत मला आश्चर्यकारक असें कांहींच दिसत नाहीं. पर्वतावर क्रीडा करीत असलेल्या या गोपानें विपुल अन्न भक्षण केलें हें ऐकून तुम्ही अतिशय विस्मित झालां अहांत; पण मला त्याचें मुळींच कौतुक वाटत नाहीं. अरे धर्मज्ञा, ज्या बलाढ्य कंसाचें या मूढानें अन्न खाल्लें त्याचाच यानें कृतघ्नपणें वध केला. त्याबद्दल खरोखर त्याची निंदाच करावयास पाहिजे. पण तुमच्या सारखे मूढ लोक ' ही त्याची लीला आहे, ' असें समजतात !

हे भीष्मा, मी तुज अधर्मज्ञाला जें वाक्य सांगणार आहें तें तूं सज्जनांच्या मुखानें ऐकलें नाहींस, असें वाटतें. धर्मज्ञ सत्पुरुष स्त्रिया, गायी, ब्राह्मण, अन्नदाता व आश्रयदाता यांवर शस्त्रप्रहार करूं नये, असें सांगतात. पण हे भीष्मा, तुझ्या दृष्टीनें तें सर्व खोटेंच आहे, असें मला वाटतें. हे कौरवाधमा, मी जणुंकाय जाणत नसल्याप्रमाणेंच तूं हा केशव ज्ञानवृद्ध, वयोवृद्ध व सर्वश्रेष्ठ आहे असें स्तुतीच्या भरांत मला सांगत आहेस. पण हे शांतनवा, गायी, स्त्रिया व अन्नदाता यांची हिंसा करणारा हा कृष्ण तुझ्या स्तुतीला पात्र तरी कसा होतो ! आणि तुझ्या सांगण्यावरून जर या कृतघ्नाचीहि या राजसभेंत अग्रपूजा होत आहे तर आम्हीं ती सहन कशी करावी !

हा जनार्दन तुझ्या असल्या खोट्या स्तुतीनें स्वतःला मोठा बुद्धिमान् व जगत्प्रभु मानीत आहे. ' भीष्म जें बोलतो, तें खरेंच आहे ' अशी त्याची कल्पना आहे. पण मी तुला व त्यालाहि सांगून ठेवितों कीं, हा तुम्हां दोघांचा मिथ्या भ्रम आहे. एखादा गायक पुष्कळ धर्मप्रधान गीत जरी गात असला, तरी तें त्याच्या स्वभावाचें नियमन करूं शकत नाहीं.

हे प्रातिपेया, भूलिंग या नांवाचा एक भूमीमध्यें रहाणारा पक्षी आहे. तो "साहस करूं नका,'असा सर्वांना सतत उपदेश करीत असतो. पण स्वतः सिंहाच्या दाढेंतील मांस काढून घेण्याची इच्छा करितो. त्याचप्रमाणें तूं या कृष्णाची मोठी

स्तुति करितोस. तो दया, क्षमा, शांति इत्यादि सात्त्विक गुणांनीं युक्त आहे, असें सांगतोस व दंभानें आपलें धार्मिकत्वहि प्रकट करितोस. पण तुम्ही दोघेहि अधार्मिक अहां. सर्व प्राणी आपल्या मूळ स्वभावाला अनुसरतात, अशी जी म्हण आहे, ती अगदीं खरी आहे. तुम्ही दोघांनीं आपल्या मुखानें कितीहि धर्मोपदेश केलात, तरी तुम्ही त्याप्रमाणें वागत नाहीं, हें मी या राजसभेंत स्पष्ट सांगतों. खरोखर तुझी ही हीन प्रकृति आहे, यांत कांहीं संशय नाहीं. त्यामुळें या पांडवांची प्रवृत्तिहि पापी आहे. कारण त्यांना कृष्ण पूज्यतम वाटतो व तूं त्यांचा मार्गदर्शक आहेस.

हे अधर्मज्ञा, पांडव तुला मोठा धार्मिक समजतात, पण तूं धार्मिकांच्या मार्गाला सोडून विपरीत मार्गाचें अवलंबन करितोस, हें मला माहीत आहे. स्वतःला धर्मज्ञ समजणारा कोणता श्रेष्ठ ज्ञानी तुझ्यासारखें वर्तन करील! हे भीष्मा, 'मी सूक्ष्म धर्मालाहि जाणतों' असें समजणारा दुसरा कोणता पुरुष तुझ्यासारखें अन्यायाचरण करील! हे गांगेया, तुझी बुद्धि जर उदार असती व तूं धर्माला पूर्णपणें जाणत असतास, तर दुसऱ्या अनुरूप पतीवर प्रेम करणाऱ्या धर्मज्ञ काशिराज कन्या अंबेचा तूं अपहार कसा केला असतास व एकदा तिचा अपहार केल्यावर तिच्याशीं विवाह केल्यावांचून कोणता धर्मज्ञ राहिला असता! खरोखर, तुझा भ्राता विचित्रवीर्य सन्मार्गानें चालणारा होता. त्यामुळें त्यानें अंबेचें मन दुसऱ्या राजावर बसलें आहे असें पाहून तिची इच्छा केली नाहीं.

भीष्मा, 'दृढ ब्रह्मचारी' म्हणून तुझी प्रसिद्धि आहे व तुझें ब्रह्मचर्य अखंडित असावें, असें मलाहि वाटतें. कारण अंबेनें तुझी प्रार्थना केली असतां तूं तिची इच्छा पूर्ण केली नाहींस, हें मीं आतांच सांगितलें. पुनरपि धर्मसंकट ओढवलें असतांहि तूं आपल्या दृढ ब्रह्मव्रतापासून ढळला नाहींस. तुझा भ्राता विचित्रवीर्य मरण पावल्यावर त्याच्या दोन भार्यांच्या ठिकाणीं तिसऱ्याच पुरुषानें वंशवर्धक अपत्यें उत्पन्न केलीं व आपल्याला मोठा बुद्धिमान् समजणारा तूं जिवंत असतांनाहि सज्जनांच्या मार्गाला अनुसरला नाहींस. वस्तुतः कनिष्ठ भ्रात्याच्या क्षेत्रामध्यें ज्येष्ठ भ्रात्यानें अपत्य उत्पन्न करणें हा धर्मच आहे. पण तूं त्याला अनुसरला नाहींस. पण हे भीष्मा, यांत तुझा धर्म तो कोणता! तुझें हें ब्रह्मचर्य व्यर्थ आहे. तूं हें व्रत मोहानें तरी धारण करीत असला पाहिजेस

हे धर्मज्ञा, शम-दमादि साधनांतील एकाहि साधनांत तुझा अलौकिक उत्कर्ष झालेला मला दिसत नाहीं. आपल्या पारलौकिक हितासाठीं तूं वृद्धांचें सेवन केलें नाहींस व त्यांच्या तोंडून धर्मोपदेशहि ऐकिलेला नाहींस. कारण तूं जर वृद्धांचें सेवन केलें असतेंस तर असें अधर्मयुक्त भाषण केलें नसतेंस व या पांडवांना असा विपरीत धर्म सांगितला नसतास.

अरे शाहण्या, इष्ट, पूर्त, दत्त, स्वाध्याय व बहुदक्षिणायुक्त यज्ञ हें सर्वेहि अपत्याच्या सोळाव्या कलेलाहि पात्र नाहीं. भीष्मा, ज्याला अपत्य नाहीं, त्यानें अनेक व्रतोपवासांनीं संपादन केलेलेंहि पुण्य निष्फल होतें, यांत कांहीं संशय नाहीं. गांगेया, तूं अपत्यरहित, वृद्ध व मिथ्या धर्माला अनुसरणारा आहेस. यास्तव तूंहि आतां त्या प्रसिद्ध हंसाप्रमाणें आपल्या ज्ञातीच्या हातून वधाला प्राप्त हो.

भीष्मा, प्राचीन विद्वान् हंसाची एक गोष्ट सांगत असतात, ती तूं, युधिष्ठिरानें किंवा दुसऱ्या कोणीं राजानेंहि ऐकली नसेल. यास्तव मी तुला ती सांगतों. लक्ष देऊन ऐक. पूर्वीं समुद्राच्या तीरावर एक वृद्ध हंस रहात होता. तो इतर पक्ष्यांना धर्माचा उपदेश करीत असे. पण स्वतः मात्र धर्माचरण करीत नसे. त्याची वाणी धर्माचें रसभरीत वर्णन करी, पण त्याचें आचरण मात्र तिच्या अगदीं उलट होतें. तो नेहमीं ' धर्माचरण करा, अधर्म करूं नका ' असा उच्च स्वरानें सारखा घोष करीत असे व हा मोठा सत्यवक्ता आहे, असें समजून सर्व पक्षी त्याचा तो धर्मोपदेश श्रद्धेनें सतत ऐकत असत.

हे भीष्मा, ते श्रद्धाळू समुद्रजलचर पक्षी त्याला धर्मासाठीं नानाप्रकारचें भक्ष्य आणून देत आणि मोठ्या विश्वासानें आपलीं अंडीं त्याच्याजवळ ठेवून भक्ष्य मिळविण्यासाठीं समुद्रजलांत संचार करीत. पण हा पापी हंस, त्यांच्या न कळत, त्यांची अंडीं हळुहळू खात असे. हा धर्मज्ञ हंस मोठा धार्मिक आहे, असें समजून ते पक्षी आपल्या अंड्यांविषयीं निश्चिन्त होऊन सर्व दिवसभर बाहेर रहात आणि हा दुष्ट आपल्या क्रूर कर्मांत दक्ष असे. कांहीं दिवसांनीं आपल्या अंड्यांची संख्या कमी होत आहे, असें त्या पक्ष्यांच्या लक्षांत आलें. तेव्हां त्यांतील एक बुद्धिमान् पक्षी ' या धर्मोपदेशक हंसाचें तर हें काम नसेल ! ' अशी शंका आल्यामुळें एके दिवशीं तेथेंच लपून राहिला. तेव्हां हा दुष्ट हंसच आपलीं अंडीं खात आहे, असें त्याच्या दृष्टीं पडलें. त्यावेळीं त्याला

फार दुःख झालें व त्यानें हंसाचें तें घोर कृत्य सर्व पक्ष्यांना निवेदन केलें. त्याबरोबर ते सर्व पक्षी त्या हंसापाशीं आले व त्या दुष्टाचेंच हें कृत्य आहे, अशी खात्री करून घेऊन, हे कुरुकुलश्रेष्ठा, त्या ढोंगी हंसाला त्या सर्वांनीं मिळून मारून टाकिलें.

हे गांगेया, तूंहि त्या हंसासारखाच धार्मिक आहेस, यास्तव इतर पक्ष्यांनीं त्या ढोंगी हंसाचा जसा वध केला, त्याचप्रमाणें क्रुद्ध झालेले हे सर्व राजे तुझाहि वध करतील. लोकांमध्यें शाब्दपांडित्यच अधिक असतें. धर्माचरण फार थोडें. अशा अर्थाची ही गाथा पुराणवेत्ते नेहमीं सांगत असतात व तीच मीहि तुला सांगतों, ऐक—"हे पक्ष्या, तुझें अंतःकरण कामादिकांनीं व्याकुल झालें असतांहि तूं मुखानें 'धर्माचरण करा' असें सांगतोस व त्याच्या उलट पक्ष्यांचीं अंडीं भक्षण करण्यासारखें अशुचि कर्म आचरितोस. पण बाबारे, हें तुझें आचरण तुझ्या भाषणाच्या विरुद्ध आहे." २. ८. ४१.

---

## अध्याय ४२ वा.

[ १ शिशुपालाचें आणखी निंदावचन. २ भीमाचा क्रोध. ]

( १ ) वैशंपायन—हे कुरुश्रेष्ठा, याप्रमाणें शिशुपालानें भीष्माची लौकिक दृष्ट्या निंदा, पण अध्यात्मदृष्ट्या प्रशंसा करून विरुद्ध वृत्तीनें हरीची स्तुति केली व आतां जरासंधाच्या स्तुतीनेंहि परंपरेनें कृष्णाची स्तुति करण्यासाठीं तो म्हणाला—" महा बलाढ्य राजा जरासंध मला अतिशय मान्य आहे. 'कृष्ण हा दास आहे' असें समजून तो समरांगणांत त्याच्याशीं युद्ध करण्याची इच्छा करीत नसे. पण या केशवानें भीमार्जुनांच्या साह्यानें जरासंधवधप्रसंगीं जें निंद्य आचरण केलें, त्याला क्षत्रियाचा सद्धर्म असें कोण म्हणेल ! यानें ब्राह्मण-वेष घेऊन, 'मी ब्राह्मण आहें' असें सांगून व अमार्गानें त्याच्या मंदिरांत प्रवेश करून, जरासंधराजाचा प्रभाव प्रत्यक्ष पाहिला. या वासुदेवाला त्या शूराचा पराक्रम पूर्वींच अवगत झाला होता, म्हणून त्यानें हें सर्व कपट केलें.

त्या धर्मज्ञ जरासंधानें या दुरात्म्याला ब्राह्मण समजून प्रथम अर्घ्य समर्पण केलें. पण याला आपल्या ब्राह्मण्याचा संशय असल्यामुळें यानें तें स्वीकारिलें नाहीं. त्या महात्म्यानें कृष्ण, भीम व धनंजय यांस भोजन करण्याविषयीं प्रार्थना केली, पण या कृतघ्नानें तिला मान न देतां त्याच्याशीं द्रोह केला.

---

१ अंतरात्मन्यमिहते रौषि पत्ररथाशुचि। अंडभक्षणकर्मैतत्तव वाचमतीयते ॥

हे मूर्ख भीष्मा, तूं जसें समजतोस त्याप्रमाणें हा जर जगत्कर्ता असता, तर यानें आपल्याला ब्राह्मण कां मानिलें नसतें! तूं या पांडवांना सन्मार्गापासून च्युत करून अमार्गानें जावयास लावीत आहेस व हे पांडव तूं दाखविलेल्या मार्गाला सन्मार्ग समजत आहेत, याचें मला मोठें आश्चर्य वाटतें. किंवा ज्यांचा मार्गदर्शक तुझ्यासारखा वृद्ध व स्त्रियांसारखा दुर्बल आहे, त्यांनीं असें धर्मविरुद्ध आचरण करावें यांत मुळींच आश्चर्य नाहीं."

( २ ) राजा जनमेजया, शिशुपालाचें हें शब्दतः व अर्थतःहि कर्णकटु वचन ऐकून बलवानांतील श्रेष्ठ व प्रतापी भीमसेन अतिशय क्रुद्ध झाला. त्याचे कमलपत्राप्रमाणें स्वभावतःच विस्तृत, दीर्घ व आरक्त असलेले नेत्र क्रोधामुळें अधिकच लाल झाले. त्याच्या ललाटावर पडलेल्या तीन आठ्या सर्व राजांना स्पष्ट दिसल्या. खरोखर त्या वेळीं त्रिकुट पर्वतावर तीन मार्गांनीं वहाणाऱ्या गंगेप्रमाणें त्या भासल्या. क्रोधानें दांत-ओंठ खाणाऱ्या त्याचें मुख युगांतसमयीं सर्व भूतांना ग्रासण्याची इच्छा करणाऱ्या कालाच्या मुखासारखें उग्र झालें. तो महाबाहु भीम वेगानें शिशुपालाच्या अंगावर धांवला.

पण महादेव जसा कार्तिकेयाला धरून ठेवितो, त्याप्रमाणें महाबाहु भीष्मानें त्या मानी मध्यम कौंतेयाला आंवरून धरिलें. गुरूप्रमाणें पूज्य असलेल्या भीष्मानें आपल्या सिंहपराक्रमी पौत्राचें अनेक वाक्यांनीं सांत्वन केलें. त्यामुळें त्याचा क्रोध शांत झाला. क्षुब्ध झालेला महासागर वर्षाकाल निघून गेला असतां वेलेचें जसें अतिक्रमण करीत नाहीं, त्याप्रमाणें त्या शत्रुनाशक वृकोदरानें भीष्माच्या आज्ञेचें उल्लंघन केलें नाहीं.

राजा, भीमसेन याप्रमाणें अति क्रुद्ध झाला असतांहि स्वतःच्या पराक्रमाविषयीं निश्चित असलेला वीर शिशुपाल मनांत यत्किंचित्‌हि डगमगला नाहीं. उलट क्रुद्ध झालेला सिंह मृगाला जसा कस्पटासारखा मानितो, त्याप्रमाणें शत्रूंचें दमन करणाऱ्या शिशुपालानें स्वस्थानावरून पुनः पुनः वेगानें उठणाऱ्या भीमाला कःपदार्थ मानिलें व तो प्रतापी चेदिराज भीमपराक्रमी भीमसेन अतिशय क्रुद्ध झाला आहे, असें पाहून हंसत म्हणाला—" हे भीष्मा, या वृकोदराला सोड, म्हणजे अग्नीनें दग्ध झालेल्या पतंगाप्रमाणें माझ्या प्रभावानें होरपळून गेलेल्या या मानी कौंतेयाला हे सर्व भूपति पहातील."

चेदिपतीचें हें वाक्य ऐकून कुरुकुलश्रेष्ठ भीष्म भीमसेनास पुढील युक्तियुक्त वचन बोलला. २. ८. ४२.

---

## अध्याय ४३ वा.

[ १ भीष्मानें सांगितलेलें शिशुपालाचें जन्मवृत्त. ]

( १ ) **भीष्म**—वत्सा भीमा, तुला या शिशुपालाचें जन्मवृत्त माहीत नाहीं. हा मूढ चेदिराजकुलांत जेव्हां उत्पन्न झाला तेव्हां याला तीन नेत्र व चार भुजा होत्या. हा अशुभ लक्षणांनीं युक्त असलेला राजपुत्र जेव्हां जन्मास आला, तेव्हां गर्दभासारख्या कर्कश ध्वनीनें ओरडूं लागला. यानें आपल्या आक्रोशानें राजमंदिर दुमदुमून सोडिलें, त्यामुळें याचे माता-पितर व इतर बांधव भयभीत झाले. याचें विकृत स्वरूप पाहून त्या सर्वांनीं याचा त्याग करण्याचा निश्चय केला आणि भार्या, अमात्य व पुरोहित यांसह चेदिराजा चिंतेनें व्याकुळ झाला असतां अशी आकाशवाणी झाली.

"हे राजा, तुला झालेला हा पुत्र श्रीमान् व बलाढ्य आहे. यास्तव तूं भिऊं नकोस. चिंतेनें व्यग्र न होतां या शिशूचें तूं रक्षण कर. याच्या स्थूलदेहाचा वियोग व याला मारणारा मृत्यु समीप आलेला नाहीं. याचा शस्त्रानें नाश होणार आहे व हे राजा, याला मारणारा वीरहि भूलोकीं उत्पन्न झाला आहे."

याप्रमाणें कोणींतरी गुप्त राहून उच्चारिलेलें हें वाक्य ऐकून पुत्रस्नेहानें व्याकुळ झालेली याची जननी तें उच्चारणाऱ्या महद्भूतास म्हणाली—"माझ्या या पुत्राविषयीं ज्या कोणीं हें वाक्य उच्चारिलें आहे, त्याला माझा नमस्कार असो. त्या पूज्य महद्भूतानें या माझ्या अपत्याचा मृत्यु कोणाच्या हातीं आहे, हें मला तत्त्वतः सांगावें. याला भगवान् देव आपल्या शस्त्रानें मारणार आहे किंवा दुसरा कोणी मनुष्यच याच्या वधास कारण होणार आहे?"

राज्ञीचें हें प्रार्थनावचन ऐकून गुप्त असलेलें तें महद्भूत तिला पुनः म्हणालें—"हे भामिनि, ज्या पुरुषानें याला आपल्या मांडीवर घेतलें असतां याच्या अधिक असलेल्या या दोन भुजा पांच फणांच्या दोन नागांप्रमाणें भूतलावर गळून पडतील व ज्याला पाहून याचा ललाटस्थ तृतीय नेत्र लुप्त होईल, त्या पुरुषाच्या हातून शस्त्रानें याला मृत्यु येईल."

हे राजा, चेदिपतीला चतुर्भुज व त्रिनेत्र पुत्र झाला आहे, असें ऐकून, पृथ्वींतील सर्व राजे त्याला पहाण्याच्या इच्छेनें तेथें आले. तेव्हां चेदिराजानें सर्व राजांची यथाविधि पूजा करून आपल्या पुत्राला एकेकाच्या अंकावर बसविलें. पण त्याला हजारों राजांच्या मांडीवर क्रमानें पृथक् पृथक् बसविलें असूनहि त्या अदृश्य महद्भूतानें सांगितलेला प्रत्यय राजाच्या निदर्शनास आला नाहीं.

कांहीं दिवसांनीं हीच अद्भुत वार्ता द्वारकेंत जाऊन पोंचली. तेव्हां ती ऐकून यदुकुलोत्पन्न संकर्षण व जनार्दन आपल्या पितृभगिनीला भेटण्यासाठीं चेदि-नगरीस आले. राजमंदिरांत आल्यावर राम व केशव या दोघां भ्रात्यांनीं वयः-क्रमानें राजाला व राज्ञीला यथाविधि अभिवादन केलें आणि कुशल (म्हणजे बल-कोशादिकांची वृद्धि ) व अनामय ( म्ह० आरोग्य ) विचारून ते दोघे बंधु उचित आसनावर बसले. तेव्हां त्या दोघां वीरांची पूजा करून राज्ञीनें स्वतः आपल्या बालकाला आणून दामोदराच्या मांडीवर ठेविलें. तों तत्क्षणीं त्याच्या दोन्ही भुजा गळून पडल्या व ललाटावरील तिसरा नेत्रहि जागच्या जागीं गुप्त झाला.

हे वीरा, तें पाहून याची माता मनांत व्याकुळ झाली. 'या कृष्णाच्या हातून आपल्या पुत्राचा वध होणार' असें जाणून ती साध्वी भयभीत झाली व कृष्णास म्हणाली—"हे पराक्रमी वसुदेवपुत्रा, भय व दुःख यांनीं आर्त झालेल्या मला तूं वर दे. तूं आर्तांच्या दुःखाचें निवारण करणारा व भयभीत झालेल्या जीवांना अभय देणारा आहेस."

त्या वसुदेवभगिनीनें दीन होऊन अशी याचना केली असतां यदुनंदन कृष्ण तिला म्हणाला—"हे धर्मज्ञ देवि, तूं भिऊं नकोस. मजपासून तुला कोणत्याहि प्रकारचें भय नाहीं. हे पितृभगिनि, मी तुला कोणता वर देऊं किंवा तुझें कोणतें इष्ट संपादन करूं ? तूं जें सांगशील तें शक्य असो किंवा अशक्य असो, मी निश्चयानें करीन."

कृष्णाचें हें वचन ऐकून ती यादवी आपल्या भ्रातृपुत्राला म्हणाली—"हे प्रभो वासुदेवा, हे यदुसिंहा, तूं माझ्यासाठीं या माझ्या शिशुपालपुत्राच्या अनेक अपराधांची क्षमा कर. हे वत्सा, मला हाच वर इष्ट आहे."

तें ऐकून हा यदुनंदन आपल्या पितृभगिनीस म्हणाला—"हे माते, वधास योग्य असलेल्या या तुझ्या पुत्राचे शंभर अपराध मी सहन करीन. तूं अशी दुःखी होऊं नकोस."

हे भीमा, या शिशुपालाचा जन्मवृत्तान्त हा असा आहे. हे वीरा, गोविं-दाच्या वरानें दृप्त झालेला हा पापी व मंदबुद्धि शिशुपाल राजा तुला युद्धासाठीं आह्वान करीत आहे. २. ८. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ भीष्माचें भाषण ऐकून शिशुपालाचा क्रोध. २ त्यानें केलेली निंदा. ३ त्यावर भीष्माचें उत्तर. ]

( १ ) भीष्म—हे कौंतेया, तुला युद्धाचें आह्वान करण्याची ही बुद्धि या चेदिराजाची स्वतःची नसून अंतर्यामी श्रीकृष्णाच्या प्रेरणेनेंच तो अशी वल्गना करीत आहे. याच्या हातून असे अपराध घडावे हा कृष्णाचाच संकेत आहे. नाहीं तर हे भीमसेना, हा कालग्रस्त कुलकलंक जसा आज भरसभेंत माझी निंदा करीत आहे, तसा भूलोकांतील दुसरा कोणता राजा ती करण्यास धजेल ! हा महापराक्रमी शिशुपाल खरोखर या हरीचा तेजोंश आहे. हा प्रभु आपल्या अपरिच्छिन्न तेजांत त्याचा पुनः उपसंहार करण्याची इच्छा करीत आहे. हे कुरुसिंहा भीमा, त्यामुळेंच हा दुर्बुद्धि चेदिराट् आम्हां सर्वांना कस्पटाप्रमाणें लेखून एखाद्या सिंहाप्रमाणें गर्जना करीत आहे.

राजा जनमेजया, भीष्माचें तें वचन चैद्याला त्या वेळीं सहन झालें नाहीं. तो पूर्वीपेक्षां अधिक क्रुद्ध होऊन भीष्माला पुनः म्हणाला—" हे गांगेया, केशवाचा जो प्रभाव तूं सांगत आहेस, तो त्याचे शत्रु असलेल्या आम्हांलाहि प्राप्त होवो. हे भीष्मा, तूं भाटाप्रमाणें सतत मोठ्या उत्साहानें ज्याचा स्तुतिपाठ करितोस, त्याचाच प्रभाव आम्हांमध्येंहि नाहीं असें तूं कां समजतोस ? हे कुरुनंदना, दुसऱ्याची स्तुति करण्यांतच जर तुझें मन रमत असेल तर तूं या स्तुतीला पात्र नसलेल्या जनार्दनाला सोडून इतर राजांची स्तुति कर.

( २ ) हे शांतनवा, मातेच्या अंकावरून पर्वतावर पडणाऱ्या भीमानें आपल्या शरीराच्या आघातानें मोठ्या शिलेचें जसें चूर्ण केलें, त्याचप्रमाणें उत्पन्न होत असलेल्या ज्या वीरानें या पृथ्वीचें विदारण केलें, त्या पार्थिवश्रेष्ठ दरद बाह्लिकाची तूं स्तुति कर. हे भीष्मा, इतरांच्या स्तुतीचें जर तुला व्यसनच लागलें असेल तर महाधनुष्याचें आकर्षण करणाऱ्या व बलामध्यें इंद्रतुल्य असलेल्या या अंगवंगाध्यक्ष कर्णाची स्तुति कर. ज्या महात्म्याच्या कानांत हीं देवनिर्मित

---

१ शिशुपालानें येथें ईश्वराच्या प्रभावाची इच्छा करून निर्गुण परमात्मा स्तुतीचा विषयच होत नसल्यामुळें त्याचें हृदयामध्यें धारण करून त्याच्याच स्वरूपानें तूं इतर राजांची स्तुति कर, असा स्तुतिपक्षीं आपला आशय व्यक्त केला आहे.

सहज दिव्य कुंडलें व अंगांत बालसूर्यासारखें तेजस्वी सहज कवच आहे, तो या आचारहीन कृष्णापेक्षां शतपट स्तुत्य आहे. ज्या कुंतीपुत्रानें इंद्रासारख्या दुर्जय जरासंधाला बाहुयुद्धांत जिंकिलें व त्याचा देह उभा चिरला, त्या भीमसेनाची जरी तूं स्तुति केलीस तरी मला त्यांत वैषम्य वाटणार नाहीं.

हे कुरुनंदना भीष्मा, हे दोघे महारथ पिता-पुत्र द्रोण व द्रौणि स्तुत्य आहेत. त्या द्विजोत्तमांची तूं सतत यथेच्छ स्तुति कर. कारण त्या दोघांतील कोणीहि जरी अतिशय क्रुद्ध झाला तरी तो या सचराचर पृथ्वीला निःशेष करून सोडील, असें माझें निश्चित मत आहे. हे गंगासुता, द्रोण व अश्वत्थामा यांची युद्धांत बरोबरी करील किंवा यांचा प्रतियोद्धा होईल असा राजा मला या सागरान्त पृथ्वीमध्यें दिसत नाहीं.

हे शांतनुपुत्रा, महाबाहु राजेंद्र दुर्योधन, अस्त्रविशारद व दृढपराक्रमी जयद्रथ राजा, ज्याचा पराक्रम या लोकीं प्रसिद्ध आहे, असा किंपुरुषाचार्य द्रुम, वृद्ध भारताचार्य शारद्वत कृप, धनुर्धरांतील श्रेष्ठ पुरुषोत्तम रुक्मी, महावीर्यवान् भीष्मक, राजा दंतवक्र, भगदत्त, यूपकेतु, मागध जयत्सेन, विराट, द्रुपद, बृहद्बल, शकुनि, अवंतिदेशाचे अधिपति विंद व अनुविंद, महाभाग शंख, मानी वृषसेन, पराक्रमी एकलव्य, महारथ कालिंग अशा लोकोत्तर वीरांना सोडून तूं केशवाची प्रशंसा कां करितोस! भीष्मा, तुझ्या बुद्धीला स्तुतीचीच जर आवड असेल, तर तूं शल्यादि भूपालांची स्तुति कां करीत नाहींस!

हे क्षत्रिया, खरोखर प्राचीन धर्मोपदेशक वृद्धांचें वचन तूं ऐकलें नाहींस, त्याला आतां मी तरी काय करणार! 'हे गांगेया, आत्मनिंदा व आत्मश्लाघा परनिंदा व परस्तुति हा आर्यांचा सदाचार नव्हे' असें वृद्धांचें वचन आहे. हे कुलवृद्धा, तूं स्तुतीला पात्र नसलेल्या केशवाची जी मोठ्या भक्तीनें व मोहानें सतत स्तुति करीत आहेस, तिला कोणीहि अनुमोदन देत नाहीं. तूं केवल स्वेच्छेनें कंसाच्या गायी राखणाऱ्या या दुरात्म्या दासाच्या ठिकाणीं सर्व जगाची स्थापना कशी करितोस! यावरून तूं बाह्यतः कितीहि जरी धार्मिक वृत्ति दाखविलीस तरी मीं पूर्वी सांगितलेल्या भूलिंगपक्ष्याप्रमाणें तूं आपल्या स्वभावालाच अनुसरणार, हेंच सिद्ध होतें.

---

१ आत्मनिंदात्मपूजा च परनिंदा परस्तवः। अनाचरितमार्याणां इति ते भीष्म न श्रुतम् ॥

हे भीष्मा, हिमालयाच्या पलीकडे पश्चिमदिशेस भूलिंगनांवाचा पक्षी रहात असतो. त्याच्या वाणींत आणि कृतींत कांहींच मेळ नसतो. 'साहस करूं नका,' असें तो मुखानें सतत बोलत असतो. पण स्वतः मात्र अतिशय साहसाचें कर्म करीत असतांनाहि तें जाणत नाहीं. तो मूर्ख पक्षी सिंह मांस खात असतांना त्याच्या दाढेंत अडकून राहिलेल्या मांसाचा अल्पांश काढून घेण्याचा प्रयत्न करीत असतो.

हे भीष्मा, त्या वेळीं त्याचें जीवित जसें त्या सिंहाच्या इच्छेवर अवलंबून असतें, त्याप्रमाणें हे अधर्मिष्ठा, अवास्तव वल्गना करणाऱ्या तुझेंहि जीवित सर्वस्वीं या सर्व भूपालांच्या स्वाधीन आहे. साक्षात् मृत्यूच्या मुखांतच प्रवेश करणारा तो पक्षी सिंह जोंवर उपेक्षा करीत असतो, तोंवरच जीवंत राहूं शकतो; त्याप्रमाणें तूंहि देहधारी असल्यामुळें मृत्युमुखांत पडूनहि केवळ मृत्यूनें उपेक्षा केल्यामुळें जिवंत राहिला आहेस आणि आम्हांला 'मृत्युमुखांत पडूं नका,' असा उपदेश करीत आहेस. तुझ्या सारखा लोकांना अप्रिय असणारें कर्म करणारा दुसरा कोणीहि नसेल. अरे भीष्मा, तूं द्वेषयुक्त हिंस्र क्षात्रकर्म हा ज्याचा स्वभावच आहे, असा क्षत्रिय असूनहि फार मोठा ब्रह्मवेत्ता बनला आहेस."

( ३ ) राजा जनमेजया, याप्रमाणें शिशुपालानें गूढ अर्थानें स्तुति, पण बाह्यतः कटु भाषण केलें असतां, त्याला अपेक्षित असलेला मोक्ष देण्याची इच्छा करणाऱ्या भीष्मानें त्याच्या बाह्य निंदावचनाचा आश्रय करून वैर उत्पन्न करणारें वाक्य त्याला ऐकूं जाईल इतक्या मोठ्या स्वरानें उच्चारलें. भीष्म म्हणाला—"होय, या सर्व नराधिपांच्या इच्छेवरच मी जिवंत राहिलों आहें, परंतु मी या सर्व भूपालांना तृणाइतकेंहि महत्त्व देत नाहीं."

भारता, भीष्माचें हें वचन ऐकतांच कांहीं राजे क्रुद्ध झाले, कांहीं हृष्ट झाले, कित्येक भीष्माची निंदा करूं लागले व कित्येक धनुर्धर नृपाल संतप्त होऊन गर्जना करीत म्हणाले—"हे नृपहो, हा पापी वृद्ध भीष्म अति गर्विष्ठ झाला आहे. हा क्षमेला मुळींच पात्र नाहीं. या दुर्मति भीष्माला पशूप्रमाणें मारून टाका; किंवा आपण सर्व मिळून याला गवतानें आच्छादित करून व तें पेटवून जाळून टाकूं या."

---

१. सर्वधर्मशून्य ब्रह्म हेंच अधर्मि, तन्निष्ठ म्ह० तूं ब्रह्मनिष्ठ आहेस. ब्रह्मनिष्ठ मृत्युमुखांत पडत नाहीं, असा वेदशास्त्रसिद्धान्त आहे.

त्यांचें हें भाषण ऐकून बुद्धिमान् कुरुश्रेष्ठ भीष्म त्या वल्गना करणाऱ्या राजांनाच म्हणाला—" हे भूपालहो, उत्तराला प्रति-उत्तर करण्यानें हा वाद मिटेल असें मला वाटत नाहीं. यास्तव हे वीरहो, मी तुम्हांला आतां जें सांगत आहें, तें लक्षपूर्वक ऐका.

तुम्ही मला पशूप्रमाणें मारून टाका किंवा गवतानें जाळून टाका. मी तर तुमच्या मस्तकावर पूर्णपणें पाय ठेवून उभा आहें आणि ज्याची आम्हीं अग्रपूजा केली, तो हा अच्युतहि येथें तुमच्या समोर स्थित आहे. यास्तव ज्याला स्वतःचें मरणच ओढवून घेण्याची बुद्धि झाली असेल, त्यानें या गदा-चक्रधारी श्रीकृष्ण माधवाला युद्धासाठीं आह्वान करावें व त्याच्या हातून मरण आल्यावर या देवाधिदेवाच्या शरीरांतच प्रविष्ट व्हावें. " २. ८. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १ शिशुपालाचें श्रीकृष्णास युद्धाह्वान. २ कृष्णाचें भाषण. ३ शिशुपालाचें उत्तर. ४ त्याचा वध व तेजाचा कृष्णशरीरांत प्रवेश. ५ यज्ञसमाप्ति व राजांचें स्वस्थानीं गमन. ६ कृष्णाचें द्वारकागमन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, भीष्माचें हें भाषण ऐकून पराक्रमी शिशुपाल वासुदेवाशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें त्यास म्हणाला—" हे जनार्दना, मी तुला आह्वान करितों. माझ्याशीं युद्ध करावयास तूं समरांगणांत उभा रहा. म्हणजे मी आज तुला सर्व पांडवांसह मारून टाकितों. ज्या पांडवांनीं सर्व राजांचा अपमान करून राजा नसलेल्या तुझी पूजा केली, ते पांडव तुझ्यासह मला सर्वथा वध्य आहेत. हे कृष्णा, जे मूढ कंसाचा दास, अराजा, दुर्बुद्धि व पूजेला अपात्र असलेल्या तुझी मूढपणें एखाद्या पूज्याप्रमाणें पूजा करितात, ते वध्य आहेत, असें माझें निश्चित मत आहे. " इतकें बोलून तो क्रोधी चेदिराजा सिंहाप्रमाणें गर्जना करीत उभा राहिला.

(२) हे पारिक्षिता, शिशुपालानें असें आह्वान केलें असतां वीर्यवान् कृष्ण सर्व राजांस, त्याच्या समक्ष शांतपणें असें मृदु वचन बोलला—" हे नृपालहो, हा दुरात्मा सात्त्वतीपुत्र आमचा भयंकर शत्रु आहे. याला कोणत्याहि प्रकारें अपकार न करणाऱ्या आम्हां सात्त्वतांचा हा हितकर्ता नाहीं. आम्ही प्राग्ज्योतिषपुराला गेलों आहों, असें जाणून हा यादवांचा भागिनेय म्हणजे भाचा असूनहि यानें एखाद्या क्रूर कर्में करणाऱ्या राक्षसाप्रमाणें द्वारका-नगरी जाळिली.

एकदा भोजराजा-रैवतक पर्वतावर क्रीडा करीत असतांना हा दुरात्मा तेथें गेला व क्रीडा करणाऱ्या सर्व स्त्री-पुरुषांस मारून व बांधून आपल्या नगरीला निघून गेला. माझ्या पित्यानें अश्वमेध यज्ञांतील मेध्य अश्व रक्षकांसह पृथ्वीवर सोडला असतां या पापनिश्चयी शिशुपालानें यज्ञांत विघ्न आणण्यासाठीं त्याचें हरण केलें.

या कामांध चेदिराजानें 'सौवीर'–देशास गेलेली या बिचाऱ्या 'बभ्रु'–यादवाची भार्या परत येत असतांना, तिच्या इच्छेविरुद्ध, मोहानें तिचें हरण केलें. या दुष्टानें कपट करून करूष-देशाच्या राजाचा वेष घेतला व त्याला दिलेल्या आपल्या मामाच्या वैशाली-कन्येचें हरण केलें. त्याचा मामा विशाला-नगरीचा अधिपति होता, पण ह्या नीचानें कपटवेषानें त्याच्या 'भद्रा'-कन्येचें हरण केल्यामुळें त्याला याचा संशय आला नाहीं.

हे वीरांनो, मी आपल्या पितृभगिनीसाठीं हें असह्य दुःख सहन करीत आहें. हा दुरात्मा आज तुमच्या समोरच हें उद्दाम वर्तन करीत आहे, ही मोठी समाधानाची गोष्ट आहे. यानें आज सर्व राजांच्या समक्ष माझा कसा अपमान चालविला आहे, तो तुम्ही पहातच अहां. यानें आजपर्यंत माझ्या परोक्ष कोण-कोणते अपराध केले आहेत, ते सर्व मी तुम्हांस सांगतों ऐका.

आज या सर्व राजमंडलामध्यें यानें दुरभिमानानें माझा जो हा मोठा व्यति-क्रम केला आहे, तो सहन करण्यास मी समर्थ नाहीं. मरणाची इच्छा करणाऱ्या या मूढाला रुक्मिणी आपल्याला मिळावी, अशी फार इच्छा होती, पण शूद्र वेदश्रुतीला जसा पात्र होत नाहीं, त्याप्रमाणें या मूढाला ती प्राप्त झाली नाहीं."

(३) राजा जनमेजया, वासुदेवाचें हें वचन ऐकून ते सर्व नराधिप चेदिराजाची निंदा करूं लागले. पण त्या वेळीं तो प्रतापवान् शिशुपाल त्यांच्याकडे दुर्लक्ष करून व कृष्णाचें पूर्वोक्त वचन ऐकून मोठ्यानें हंसला व म्हणाला—"हे कृष्णा, रुक्मिणीच्या पितरादि आप्तांनीं प्रथम ती मला देऊं केली होती. पण असें असतांना या सर्व भूपालांच्या समोर पर्यायानें 'मीं परस्त्रीचें हरण केलें' असें सांग-तांना तुला लाज कशी वाटत नाहीं! हे मधुसूदना, 'पूर्वीं दुसऱ्याला देऊं केलेल्या वधूचा मीं स्वीकार केला,' असें तुझ्यावांचून दुसरा कोणीहि मान्य पुरुष सांग-णार नाहीं. हे केशवा, आपल्या पितृभगिनीला दिलेलें वचन पाळण्याची तुझी इच्छा असेल तर मला क्षमा कर, नसेल तर करूं नकोस. हे कृष्णा, तूं क्रुद्ध झालास किंवा प्रसन्न झालास, तरी तुझ्या हातून माझें काय होणार आहे!"

(४) राजा, शिशुपाल असें बोलत असतां इकडे भगवान् मधुसूदनानें दैत्यांचा संहार करणाऱ्या सुदर्शन-चक्राचें मनांत स्मरण केलें. तत्काल तें चक्र हातीं आलें असतां तो वाक्यविशारद वासुदेव उच्चस्वरानें म्हणाला—" हे भूपालहो, माझें बोलणें लक्ष्यपूर्वक ऐका. या शिशुपालाच्या मातेनें पूर्वी माझी प्रार्थना केली असतां 'मी याचे शंभर अपराध सहन करीन' असा वर तिला दिला होता. त्याप्रमाणें आतांपर्यंत मीं याचे सर्व अपराध शांतपणें सहन केले. आज याचे शंभर अपराध पूर्ण झाले आहेत, यास्तव मी आतां तुम्हां सर्व नृपालांच्या समक्ष याचा वध करितों."

असें बोलून त्या क्रुद्ध झालेल्या यदुश्रेष्ठानें तत्क्षणीं त्या चेदिराजाच्या मस्तकाचा आपल्या चक्रानें छेद केला. तेव्हां वज्रप्रहार झालेल्या पर्वताप्रमाणें त्या महाबाहु शिशुपालाचा देह भूमीवर पडला. त्या वेळीं त्या चेदिपतीच्या शरीरांतून आकाशांतील सूर्याच्या तेजाप्रमाणें अनादि तेज निघालेलें सर्व राजांना दिसलें. त्यानंतर हे नराधिपा, त्या तेजानें त्या सर्व लोकांना वंद्य असलेल्या कमलपत्राक्ष श्रीकृष्णाला नमस्कार केला व तें त्या वंद्य परमात्म्याच्या शरीरांत प्रविष्ट झालें.

सर्व राजांनीं शिशुपालाच्या तेजाचा श्रीकृष्णशरीरांत झालेला प्रवेश प्रत्यक्ष पाहिला व त्यांना मोठा चमत्कार वाटला. कृष्णानें एका निमिषांत त्या चैद्याचा असा वध केला असतां अंतरिक्षांत अभ्रें नसतांनाहि मोठी वृष्टि झाली, विद्युत्पात झाला व पृथ्वी हादरली.

त्या वेळीं कित्येक राजे एक अक्षरहि न बोलतां कृष्णाकडे पहात स्वस्थ बसले. कारण हा काल न बोलण्याचा आहे, असें त्यांनीं जाणलें. कांहीं क्रोधी राजांनीं आपले हात एकावर एक घांसले. शिशुपालाचे पक्षपाती राजे क्रोधानें देहभान विसरून दांत-ओठ खाऊं लागले. तात्पर्य कांहीं राजांनीं एकांतांत कृष्णाची स्तुति केली. कांहीं थोडे नृपाल त्याच्यावर क्षुब्ध झाले व बाकीचे सर्व उदासीन राहिले. महर्षी, महात्मे ब्राह्मण व बलाढ्य राजे अतिशय हृष्ट होऊन स्तुति करीत कृष्णाजवळ गेले व त्या वासुदेवाचा अद्भुत पराक्रम पाहून ते सर्व संतुष्ट झाले.

राजा युधिष्ठिरानें 'या दमघोषात्मज वीर शिशुपालाचा मोठ्या आदरानें सत्वर अग्निसंस्कार करा,' अशी आपल्या भ्रात्यांस आज्ञा केली. तिला मान

देऊन वृकोदरादि पांडवांनीं तत्काल मोठ्या समारंभानें त्या चेदिराजाचा अंत्यविधि केला. त्यानंतर तेथें जमलेल्या सर्व राजांसह सम्राट् युधिष्ठिरानें चेदिदेशाच्या राज्यावर त्याच्या पुत्राला अभिषेक केला.

( ५ ) राजा जनमेजया, याप्रमाणें त्या बलाढ्य कुरुराजाचा सर्व समृद्धीनें युक्त असलेला राजसूय क्रतु तरुणांना अतिशय प्रिय झाला. ज्याचा आरंभ अनायासानें झाला आहे, जो विपुल धन-धान्य, अन्न व विविध भक्ष्य यांनीं युक्त आहे, केशवानें ज्याचें उत्तम प्रकारें रक्षण केलें आहे व ज्यांतील विघ्नें शांत झालीं आहेत, अशा त्या राजसूय यज्ञाची युधिष्ठिरानें समाप्ति केली. ती होईपर्यंत शार्ङ्ग-चक्र-गदाधर भगवान् जनार्दनानें त्या महायज्ञाचें रक्षण केलें. त्यानंतर धर्मात्म्या युधिष्ठिरानें यज्ञसमाप्तिसूचक अवभृथस्नान केलें असतां सर्व नृपश्रेष्ठ त्याच्यासमीप येऊन म्हणाले—

" धर्मज्ञा, तुझा हा उत्कर्ष पाहून आम्हांला अतिशय आनंद वाटत आहे. तूं आज सम्राट्-पदाला प्राप्त झाला आहेस. हे आजमीढा, अजमीढवंशाचें यश तूंच वृद्धिंगत केलेंस. हे राजेंद्रा, या यज्ञाच्या योगानें तूं फार मोठें धर्मकृत्य केलें आहेस. हे नरश्रेष्ठा, तूं आमचा यथायोग्य सत्कार केला आहेस. आतां आम्ही स्वदेशीं परत जाण्याची आज्ञा मागत आहों, तरी तूं आतां आम्हांला अनुज्ञा दे. "

सर्व नृपालांचें हें भाषण ऐकून धर्मराज युधिष्ठिरानें त्या सर्वांचें यथाशास्त्र पूजन केलें व आपल्या सर्व भ्रात्यांस म्हटलें—" हे वीरांनो, हे सर्व भूपाल मोठ्या प्रेमानें आपल्याकडे आले होते. ते आतां माझा निरोप घेऊन आपापल्या राष्ट्रांस जावयास निघाले आहेत. तुम्हीं या सर्व श्रेष्ठ नृपतींना सीमेपर्यंत पोंचवून या. "

राजा, ज्येष्ठ भ्रात्याची ही आज्ञा ऐकतांच ते चारी धार्मिक पांडुपुत्र त्या राजांच्या योग्यतेप्रमाणें प्रत्येकाला पोंचविण्यास निघाले.

महाप्रतापी धृष्टद्युम्न मोठ्या त्वरेनें विराटराजाबरोबर निघाला असतां महारथ धनंजय महात्म्या द्रुपदराजाबरोबर गेला. महाबलाढ्य भीमसेनानें भीष्म व धृतराष्ट्र यांना पोंचविलें. महायोद्धा सहदेव पुत्रांसह वीर द्रोणाबरोबर निघाला. पराक्रमी नकुल सुबलराजाला त्याच्या पुत्रांसह पोंचविण्यास गेला. द्रौपदीचे पुत्र व महारथ अभिमन्यु अनेक पर्वताधिपतींना पोंचविण्यास निघाले. त्याचप्रमाणें इतर क्षत्रियश्रेष्ठ दुसऱ्या क्षत्रियांबरोबर गेले. याप्रमाणें

पांडवांकडून उत्तमप्रकारें सत्कार पावलेले राजे व हजारों ब्राह्मण स्व-स्व-स्थानीं निघून गेले.

(६) जनमेजया, राजसूय महाक्रतूसाठीं आलेले सर्व पार्थिवेंद्र व ब्राह्मण संतुष्ट होऊन खांडवप्रस्थांतून निघून गेले असतां प्रतापी वासुदेव युधिष्ठिरास म्हणाला— " कुरुनंदना, मी आतां द्वारकेस जातों. तूं मला अनुज्ञा दे. हे धर्मज्ञा, तुझा राजसूय महाक्रतु निर्विघ्नपणें पार पडला, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. या महाक्रतूमुळें तुझी कीर्ति दाही दिशांत पसरली आहे. "

जनार्दनाचें हें वचन ऐकून धर्मराजा विनयानें म्हणाला—" हे गोविंदा, तुझ्या प्रसादानें मला हा महाक्रतु प्राप्त झाला. तुझ्या कृपेनेंच सर्वहि क्षत्रिय-वर्ग माझ्या आज्ञेंत स्थित होऊन वरिष्ठ प्रतीच्या करभारासह मजकडे आला. तेव्हां हे निष्पापा, तुला ' जा ' असें म्हणण्यास माझी वाणी कशी धजेल ! हे वीरा, तुजवांचून मला क्षणभरहि करमत नाहीं. पण तुलाहि आपल्या द्वारका-नगरीस परत जाणें अवश्यच आहे, त्यामुळें माझा उपाय नाहीं. "

धर्मराजानें मोठ्या असमाधानानें असें सांगितलें असतां महायशस्वी हरि युधिष्ठिराला बरोबर घेऊन पृथेकडे गेला व तिला म्हणाला—" हे पितृभगिनि, आज तुझे पुत्र साम्राज्य-पदाला प्राप्त झाले आहेत. त्यांचा मनोरथ पूर्ण झाला असून त्यांना विपुल ऐश्वर्यहि प्राप्त झालें आहे. तूं आपल्या पुत्रांचा हा उत्कर्ष पाहून संतुष्ट हो. आतां मी तुझी अनुज्ञा घेऊन द्वारकेला जाण्याची इच्छा करीत आहें. "

यदुनंदनाचें हें वचन ऐकून कुंतीनें परम संतोषानें त्याला स्वस्थानीं जाण्याची अनुज्ञा दिली असतां केशवानें सुभद्रा व द्रौपदी यांना आपल्या मधुर वाणीनें संतुष्ट केलें आणि तो युधिष्ठिरासह अंतःपुरांतून बाहेर आला. त्यानंतर त्या महात्म्यानें स्नान व जप करून ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करविलें.

इतक्यांत मेघाप्रमाणें सुंदर दिसणारा व शस्त्रास्त्रांनीं सज्ज केलेला महारथ जोडून दारुक द्वारापाशीं येऊन उभा राहिला. गरुडध्वज रथ द्वारापाशीं येऊन उभा आहे, असें पाहून उदारात्मा पुंडरीकाक्ष रथापाशीं आला व त्याला प्रद-क्षिणा करून रथारूढ झाला आणि द्वारकानगरीकडे निघाला. तेव्हां भ्रात्यांसह श्रीमान् धर्मराज युधिष्ठिर महाबलाढ्य वासुदेवाला पोंचवावयास पायांनींच चालला.

त्यावेळीं हरीनें दारुकाला आपला श्रेष्ठ रथ कांहीं वेळ थांबवावयास सांगून कुंतीपुत्र युधिष्ठिराला म्हटलें—" हे पृथ्वीपते, पर्जन्य भूतांचें किंवा द्विज महावृक्षांचें जसें पोषण करितात, त्याप्रमाणें तूं नित्य दक्ष राहून प्रजेचें पोषण कर. देव जसे इंद्रावर आपली उपजीविका करितात, त्याप्रमाणें तुझे बांधव तुझ्यावर उपजीविका करोत." याप्रमाणें संकेत करून व परस्परांची अनुज्ञा घेऊन कृष्ण व पांडव स्व-स्वस्थानाकडे निघून गेले. हे राजा, तो यदुश्रेष्ठ कृष्ण द्वारकेस गेला असतां एक राजा दुर्योधन व दुसरा सौबल शकुनि असे दोघे नरश्रेष्ठ त्या दिव्य सभेंत राहिले. २. ८. ४५.

येथें आठवें शिशुपालवधपर्व समाप्त झालें.

---

# द्यूतपर्व ९.



## अध्याय ४६ वा.

[ १ युधिष्ठिरानें व्यासाला उत्पातांचें फल विचारिलें असतां तत्कथनपूर्वक व्यासाचें कैलासगमन. २ शोकाकुल झालेल्या युधिष्ठिराचें अर्जुनानें केलेलें समाधान. ३ युधिष्ठिराची प्रतिज्ञा. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, अशाप्रकारचा तो दुष्कर असलेला श्रेष्ठ राजसूययज्ञ निर्विघ्नपणें समाप्त झाला असतां भगवान् व्यास आपल्या शिष्यांसह पुढें आला. तेव्हां धर्मराजानें भ्रात्यांसह त्या पितामहास तत्काल उत्थान देऊन अर्घ्य-पाद्यादिकांनीं त्याचें पूजन केलें. नंतर सुवर्णाच्या श्रेष्ठ आसनावर बसलेल्या भगवान् द्वैपायनानें 'तुम्हीहि बसा' असें म्हटल्यावर धर्मराज आपल्या भ्रात्यांसह तेथें बसला. तेव्हां वाक्यविशारद व्यासमुनि त्यांस म्हणाला —" हे अवनिपाल युधिष्ठिरा, अत्यंत दुर्लभ असलेलें हें सम्राट्पद तुला प्राप्त झालें असून तुझा अतिशय उत्कर्ष झाला, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे.

---

१ या अध्यायाच्या आरंभापासून शेवटच्या श्लोकापर्यंत 'कुलक्षयाला कारण होणाऱ्या क्षुद्रबुद्धि पुरुषाचें मरणच श्रेयस्कर असून सर्वांबरोबर स्नेहानें वागणेंच हितावह आहे' हें तात्पर्य सुचविलें आहे.

तुझ्या या उत्कर्षानें कुरुवंशजांचा उद्धार झाला आहे. हे राजा, तूं माझाहि उत्तमप्रकारें सत्कार केला आहेस, आतां तुझा निरोप घेऊन मी स्वस्थानीं जातों."

कृष्णद्वैपायनाचें हें वचन ऐकून धर्मराज युधिष्ठिरानें त्या पितामहाच्या दोन्ही चरणांना अभिवादनपूर्वक स्पर्श करून म्हटलें—" हे द्विजश्रेष्ठा, माझ्या मनांत उत्पन्न झालेल्या संशयाचें निरसन करण्यास तुझ्यावांचून दुसरा कोणीहि समर्थ नाहीं. हे पितामह, भगवान् नारदमुनीनें अशनिपातादि दिव्य, धूमकेतु-दर्शनादि आंतरिक्ष व भूकंपादि पार्थिव असे तीन प्रकारचे उत्पात सांगितले आहेत. त्या भयंकर उत्पातांची शिशुपालाच्या वधानेंच शांति झाली किंवा आणखी कांहीं अनर्थ ओढवणार आहेत ! "

राजा जनमेजया, युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून पराशरपुत्र, महा-ओजस्वी कृष्णद्वैपायन व्यास म्हणाला—" हे राजन्, या उत्पातांचें सर्व क्षत्रियांचा संहार करणारें भयंकर फल तेरा वर्षें भोगावें लागेल. हे भारता, तुला एकट्यालाच निमित्त करून काल सर्व क्षत्रियांना एकत्र जमवील व दुर्योधनाच्या घोर अपराधानें आणि भीमार्जुनांच्या बलानें त्या सर्व क्षत्रियांचा नाश होईल.

हे पृथ्वीपते युधिष्ठिरा, तूं एक दिवशीं पहांटेस स्वप्नांत वृषभध्वजाला पाहशील. तो नीलकंठ, भव, स्थाणु, कपाली, त्रिपुरांतक, उग्र, रुद्र, पशुपति, महादेव, उमापति, हर, शर्व, वृष, शूल, पिनाकी व कृत्तिवास, कैलासपर्वतासारखा शुभ्र, वृषभारूढ महादेव दक्षिण दिशेकडे पहात असलेला तुझ्या दृष्टीं पडेल. हे धर्मराजा, अशाप्रकारचें स्वप्न तूं जेव्हां पाहशील तेव्हां त्याचेंच चिंतन करीत बसूं नको. कारण भवितव्यतेचें उल्लंघन कोणालाहि करितां येत नाहीं. हे नरेंद्रा, तुझें कल्याण असो. मी आतां कैलासपर्वतावर जात आहें. तूं दमनशील व दक्ष राहून पृथ्वीचें प्रतिपालन कर."

राजा, याप्रमाणें धर्मराजाला उपदेश करून भगवान् व्यास आपल्या वेदाध्ययन करणाऱ्या शिष्यांसह कैलास पर्वतावर गेला. इकडे पितामह व्यास गेल्यानंतर राजा युधिष्ठिर चिंता व शोक यांनीं व्याकुल होऊन वरचेवर उष्ण निःश्वास टाकीत त्याचेंच चिंतन करीत बसला. ' पुरुषप्रयत्नानें दैवाला प्रतिबंध करणें कसें शक्य आहे ! त्या परम ऋषीनें म्हटल्याप्रमाणें निश्चयानें घडून येणारच ' असा मनांत विचार करून तो महातेजस्वी युधिष्ठिर आपल्या सर्व भ्रात्यांना म्हणाला—

" हे वीरांनो, आतां कृष्णद्वैपायनानें मला काय सांगितलें, तें तुम्हीं ऐकलेंच आहे. तेव्हां मीं आतां प्राणत्याग करण्याचा निश्चय केला आहे. प्रिय भ्रात्यांनो, कालानें सर्व क्षत्रियांच्या नाशामध्यें मला एकट्यालाच जर नियुक्त केलें आहे, तर मी निमित्तभूत होण्यासाठीं जिवंत तरी कशाला राहूं ? "

( २ ) धर्मराजाचें तें उद्वेगजन्य भाषण ऐकून अर्जुन म्हणाला—" हे राजन्, तूं मनामध्यें असे भलतेच बुद्धिभ्रंश करणारे विकल्प आणूं नकोस. हे महाराजा, तूं आपल्या मनाशीं चांगला विचार करून जें योग्य दिसेल तें कर. पण असा अविचार करूं नकोस. "

( ३ ) तेव्हां सत्यप्रतिज्ञ युधिष्ठिर कृष्णद्वैपायनाचें भाषण मनांत आणून आपल्या भ्रात्यांना म्हणाला—" हे वत्सांनो, तुमचें कल्याण असो. तुम्ही आतां माझी प्रतिज्ञा ऐका. बाळांनो, तेरा वर्षें जिवंत राहून माझ्या आयुष्याचें साफल्य तरी काय होणार ! मी आजपासून माझ्या भ्रात्यांना व इतर नृपालांना केव्हांहि कठोर वचन बोलणार नाहीं. मी ज्ञाति-बांधवांच्या आज्ञेनेंच सर्व व्यवहार करीन. मी माझ्या पुत्रांबरोबर व इतरांशींहि सम वर्तन ठेवीन. त्यांमध्यें भेद करणार नाहीं. कारण युद्धाचें निमित्त भेदच आहे, हें प्रसिद्ध आहे. याप्रमाणें मी युद्धापासून दूर राहिलों, लोकांना प्रिय असेंच आचरण करूं लागलों म्हणजे हे नरश्रेष्ठहो, लोकांत माझी निंदा होणार नाहीं. "

राजा, ज्येष्ठ भ्रात्याचें हें वचन ऐकून धर्मराजाच्या हितामध्यें तत्पर असलेल्या त्या चौघां पांडवांनींहि तेंच व्रत आचरण्याचा निश्चय केला. याप्रमाणें सभेमध्यें भ्रात्यांसह प्रतिज्ञा करून धर्मराजानें पितर व देवता यांचें यथान्याय तर्पण केलें. नंतर सर्व क्षत्रिय परत गेले असतां ज्यानें मंगलकारक स्वस्त्ययन केलें आहे, असा युधिष्ठिर भ्राते व अमात्य यांसह आपल्या उत्तम नगरींत परत आला आणि दुर्योधन व सुबलपुत्र शकुनि त्या रम्य मयसभेंत राहिले. २. ९. ४६.

---

*

## अध्याय ४७ वा.

[ १ दुर्योधनाचा मयसभेंतील उपहास. २ त्याचें हस्तिनापुरास प्रयाण व क्रोध. ]

(१) वैशंपायन—हे पुरुषश्रेष्ठा, दुर्योधनानें शकुनीसह त्या मयसभेंत राहून ती सर्व सभा हळुहळू पाहिली. त्या कौरवानें पूर्वी हस्तिनापुरांत केव्हांहि न पाहिलेल्या देवादिकांच्या विचित्र क्रीडा व त्यांचीं स्थानें दाखविणारीं चित्रें तेथें पाहिलीं. एकदा तो राजा दुर्योधन त्या सभेंतील एका स्फटिक स्थलापाशीं येऊन तें जल आहे, असें समजला व भ्रांतीनें आपलीं वस्त्रें सांवरून चालूं लागला. परंतु तेथें जल नसून स्थलच आहे, हें पाहून लज्जित झालेला दुर्योधन तेथून परत फिरला व त्या सभेंत इतरत्र फिरूं लागला. तों स्फटिकाच्या गुळगुळीत भूमीवर पाय घसरून पडला. तेव्हां तो राजा पुनरपि लज्जेनें खिन्न-वदन करून निःश्वास टाकीत सभेच्या दुसऱ्या भागाकडे वळला.

तेथें स्फटिकासारख्या निर्मल जलानें युक्त व स्फटिकासारख्या शुभ्र कमलांनीं सुशोभित अशी एक सुंदर पुष्करणी होती. पहाणारांस ती स्फटिकाचे चिरे बसविलेली भूमिच आहे, असा भास होत असे. दुर्योधनानें त्या स्थलावर पाऊल ठेवतांच तो त्या जलांत पडला. त्याला पडलेलें पहातांच जवळच असलेला महाबलवान् भीमसेन हंसला. तेथील सेवकहि हंसूं लागले. लगेच राजाच्या आज्ञेनें त्या सेवकांनीं दुर्योधनाला नवीं वस्त्रें आणून दिलीं. तेव्हां कोरडीं वस्त्रें परिधान करून आलेल्या त्याला पाहून भीमसेन, अर्जुन, नकुल-सहदेव व इतर लोकहि हंसूं लागले.

राजा, त्यांनीं केलेला हा उपहास दुर्योधनाला सहन झाला नाहीं. परंतु आपल्या मनांतील क्षोभ चर्येवरून यांस कळूं नये, म्हणून त्यानें त्यांच्याकडे पाहिलेंहि नाहीं. एका ठिकाणीं जलप्रवाहाचा भास होत होता. त्यामुळें येथें जलच आहे, असें समजून दुर्योधन आपलीं वस्त्रें नीट सांवरून त्या जलाचें उल्लंघन करूं लागला. तेव्हां तेथें असलेले सर्व लोक पुनः हंसले. जनमेजया, त्यानंतर तो राजा दुसऱ्या बाजूला वळला. तेथें स्फटिकाच्या भिंतीवर उघडे-लेल्या दाराची आकृति काढलेली होती. त्यामुळें हें उघडलेलें दारच आहे, असें समजून दुर्योधन त्या द्वारांतून प्रवेश करण्यासाठीं पुढें झाला. तों त्याचें मस्तक भिंतीवर आपटून तो क्षणभर संज्ञाशून्य झाल्याप्रमाणें उभा राहिला. पुनः तो तशाच प्रकारच्या दुसऱ्या एका दाराकडे वळला. तें खरोखर उघडेंच

असून, पहाणारास मात्र बंद असल्याप्रमाणें भासत असे. त्याच्याजवळ येऊन दुर्योधन तें उघडण्यासाठीं आपले दोन्ही हात त्यावर ठेवूं लागला, तों त्याचा तोल जाऊन तो त्या दारांत सपशेल पडला. तेव्हां तो तेथून मुकाट्यानें उठून पुढें निघाला. तेथें एक उघडलेलें दार होतें, तें पाहून यांतहि कांहीं कपट असेल असें मानून तो लज्जित झालेला धृतराष्ट्रपुत्र त्या दाराच्या आंत प्रवेश न करितां विचार करीत तेथेंच उभा राहिला.

( २ ) राजा पारिक्षिता, याप्रमाणें त्या मयसभेंत अनेक प्रकारच्या उपहासास पात्र झाला असतां धार्तराष्ट्र दुर्योधन पांडवांचा निरोप घेऊन उद्विग्न मनानें हस्तिनापुरास जावयास निघाला. राजसूय महायज्ञांतील अद्भुत ऐश्वर्य पाहून पांडवांचा तो विलक्षण उत्कर्ष त्याला सहन झाला नाहीं. त्यामुळें वाटेनें त्याचाच विचार करीत जाणाऱ्या दुर्योधनाच्या मनांत पापबुद्धि उत्पन्न झाली.

हे राजा, पांडवांची प्रसन्नता, त्यांना वश असलेले सर्व नृपाल, त्यांचे आबाल-वृद्धांपर्यंत सर्व हितचिंतक आणि त्या महात्म्यांचा श्रेष्ठ महिमा पाहून तो दुरात्मा दुर्योधन निस्तेज झाला. तो मार्गानें चालला असतां केवळ त्या एका सभेचेंच चिंतन करीत होता. त्यामुळें शकुनि पुनः पुनः प्रश्न करीत असतांहि बुद्धिमान् धर्मराजाच्या अपार संपत्तीचाच विचार करणाऱ्या दुष्ट दुर्योधनानें त्यास कांहींच उत्तर दिलें नाहीं.

तेव्हां व्यग्रचित्त झालेल्या दुर्योधनाला शकुनीनें पुनः विचारिलें—" हे दुर्योधना, तूं असा दुःखाचे निःश्वास टाकीत घरीं कां चालला आहेस ! "

त्यावर दुर्योधन म्हणाला—हे मातुल, महात्म्या अर्जुनाच्या अस्त्रसामर्थ्यानें ही समग्र पृथ्वी युधिष्ठिराच्या अधीन झालेली पाहून माझ्या अंगाचा नुसता दाह होत आहे. देवांतील अतितेजस्वी इंद्राच्या यज्ञाप्रमाणें महातेजस्वी युधिष्ठिराचा तो तशाप्रकारचा अपूर्व यज्ञ पाहिल्यापासून मी रात्रंदिवस द्वेषानें जळत आहें. ग्रीष्म-ऋतूंत जल आटून गेलेल्या विहिरी जशा कोरड्या ठणठणित होतात, तसें माझें शरीर संतापानें शुष्क होऊन गेलें आहे. शकुने, त्या सात्वतश्रेष्ठ वासुदेवानें जेव्हां शिशुपालाचा वध केला तेव्हां तेथें त्याला प्रतिकार करणारा एकहि पुरुष पुढें आला नाहीं. पांडवाच्या प्रतापाग्नीनें दग्ध होणाऱ्या सर्व नृपश्रेष्ठांनीं कृष्णाचा तो अपराध मुकाट्यानें सहन केला.

वासुदेवाचें तें परम अन्यायाचें महत्कृत्य केवल महात्म्या पांडवांच्या प्रतापानेंच सिद्धीस गेलें. नाहीं तर तें कोणीं सहन केलें असतें ! कर देणाऱ्या वैश्याप्रमाणेंच युधिष्ठिराला विविध रत्नें अर्पण करून ते सर्व नृपति त्याच्या पुढें सेवकाप्रमाणें उभे राहिले. पांडवांना प्राप्त झालेली ती तशा प्रकारची उज्ज्वल संपत्ति पाहून क्रोधवश झालेला मी आंतल्या आंत जळत आहें, हें कांहीं योग्य नव्हे.

राजा, इतकें बोलून संतापानें अग्नीप्रमाणें जळत असलेला तो दुर्योधन मनांत कांहीं निश्चय करीत पुनः शकुनीला म्हणाला—" मी आतां अग्निप्रवेश करीन, विष भक्षण करीन, किंवा जलाशयांत जीव देईन. पण मी आतां जिवंत रहाण्यास समर्थ नाहीं. या जगांत कोणीहि स्वाभिमानी मनुष्य आपल्या शत्रूचा उत्कर्ष व स्वतःचा अपकर्ष होत आहे, असें पाहून स्वस्थ बसणार नाहीं. मातुला, तूंच सांग बरें, माझ्या सारखा वीर असा अपमान कधीं तरी सहन करील काय ? मी स्त्री नव्हें ! कारण स्त्रिया परतंत्र असल्यामुळ आपल्या सपत्नीचा उत्कर्ष सहन करितात. "

'तर मग तूं युद्धानेंच पांडवांना जिंकण्याची इच्छा कर ' असें म्हणशील तर मी अर्जुनादिकांप्रमाणें अस्त्रसंपन्नहि नाहीं. ' तर मग तूं त्यांच्या सारखें अस्त्रबल संपादन कर ' असें म्हणशील तर तेंहि करण्यास मी समर्थ नाहीं. ' तर मग तूं क्लीब असशील ' असें म्हणशील तर तसेंहि नाहीं. मी अत्यंत असमर्थहि नाहीं. जर तसा असमर्थ असतों तर शत्रूचा हा उत्कर्ष मुकाट्यानें सहन केला असता ! पांडवांचें तें तशाप्रकारचें वैभव, पृथ्वीचें प्रभुत्व, ती अपार संपत्ति व तो अलौकिक यज्ञ पाहून माझ्यासारखा कोणता मनुष्य संतप्त होणार नाहीं !

सौबला, शत्रूंचा हा उत्कर्ष मला सहन होत नाहीं. यास्तव त्यांच्या संपत्तीचा अपहार करण्यासाठीं मला कांहीं तरी कपटाचा उपायच योजिला पाहिजे. कारण मी एकटा त्या पांडवांचें राजैश्वर्य हरण करण्यास समर्थ नाहीं व मला साह्यकर्ताहि कोणी दिसत नाहीं. यास्तव मी मरणाची इच्छा करीत आहें. पांडवांचा हा महान् उत्कर्ष पाहून दैवच श्रेष्ठ असून पुरुषप्रयत्न व्यर्थ आहे, असें मी समजतों.

---

१ शकुनीचें सामर्थ्य जाणणाऱ्या दुर्योधनानें आपलें इष्ट साधण्यासाठीं त्यानें उद्योग करावा म्हणून त्याच्यापाशीं आपला हा मृत्यूचा निश्चय प्रकट केला.

हे शकुने, मीं पूर्वी या पांडवांच्या नाशासाठीं जेवढे प्रयत्न केले त्या सर्वांचें अतिक्रमण करून ज्याप्रमाणें जलामध्यें कमल वाढत असतें, त्याप्रमाणें त्यांचा उत्कर्ष उत्तरोत्तर वाढतच चालला आहे, म्हणूनच मी दैव श्रेष्ठ असून पुरुषार्थ निरर्थक आहे असें मानितों. कारण धार्तराष्ट्रांचा सध्या अपकर्ष होत असून पांडुपुत्रांचा नित्य उत्कर्ष होत आहे. पांडवांची ती अपरंपार संपत्ति, ती दिव्य सभा व तेथील रक्षकांनीं केलेला माझा उपहास, यांचें स्मरण झालें कीं अग्नीनें दग्ध झाल्याप्रमाणें माझ्या अंगाचा दाह होत आहे. यास्तव हे मातुला, अति दुःखित झालेल्या मला प्राणत्याग करण्याची तूं अनुज्ञा दे आणि मला अतिशय क्रोध आला आहे असें धृतराष्ट्राला जाऊन सांग. २. ९. ४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ पांडवांचा पराक्रम व त्यांचें दुर्जयत्व. २ शकुनीनें त्यांना द्यूतांत जिंकण्याचें दुर्योधनाला दिलेलें आश्वासन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, दुर्योधनाचे हे अमर्षयुक्त उद्गार ऐकून शकुनि म्हणाला—" हे दुर्योधना, पांडवांचा असा द्वेष करणें तुला योग्य नव्हे. त्यांच्या भाग्यानेंच त्यांना इतकें ऐश्वर्य प्राप्त झालें असून ते त्याचा उपभोग घेत आहेत. त्यांनीं स्वतःच्या उत्कर्षासाठीं जेवढा प्रयत्न केला त्यापेक्षां तूं त्यांच्या नाशाचे उपायच अधिक योजिलेस. परंतु हे राजा, ते सर्व व्यर्थ झाले व नरव्याघ्र पांडव सर्व संकटांतून मुक्त होऊन दैवबलानें अधिकच उत्कर्ष पावले.

त्यांना द्रौपदीसारख्या दुर्लभ भार्येचा लाभ झाला. द्रुपदराजा पुत्रांसह त्यांच्या पक्षास मिळाला व वीर्यवान् वासुदेवाच्या साहाय्यानें त्यांना पृथ्वी प्राप्त झाली. त्यांनीं पित्याच्या राज्याचा प्राप्त झालेला विभाग घेऊन स्वपराक्रमानें आपलें ऐश्वर्य वाढविलें असतां तुला कां रे बाबा खेद होतो!

धनंजयानें गांडीव धनुष्य व दोन अक्षय्य भाते मिळविले आहेत. अग्नीला संतुष्ट करून दिव्य अस्त्रें संपादन केलीं आहेत. त्या श्रेष्ठ धनुष्याच्या सामर्थ्यानें व स्वतःच्या बाहुबलानें सर्व भूपतींना त्यानें जिंकलें, त्यांत तुला कां दुःख वाटत आहे! त्याचप्रमाणें त्या सव्यसाची परंतपानें मयराक्षसाला अग्नीच्या दाहांतून सोडविलें व त्याच्याकडून ती दिव्य सभा करविली. त्या मया-

सुराच्या आज्ञेंत असणारे 'किंकर'-नांवाचे बलाढ्य राक्षस ती विमानतुल्य सभा इच्छेस येईल तेथें वाहून नेतात. त्यासाठीं तुला खिन्न होण्याचें काय कारण !

हे कौरवा, 'मी असहाय आहें' असें जें तूं म्हटलेंस तें मात्र अगदीं मिथ्या आहे. कारण तुझे सर्व भ्राते तुझ्या आज्ञेंत वागत आहेत. शिवाय आपल्या पराक्रमी पुत्रासह धनुर्धर द्रोण, सूतपुत्र कर्ण, महारथ कृप, राजा सोमदत्ति व माझ्या सर्व भ्रात्यांसह मी, असे आम्ही सर्व तुझ्या पक्षाचे आहोंत. यास्तव तूं आमच्या साह्यानें सर्व पृथ्वीला जिंकून घे."

शकुनीचें हें प्रोत्साहनपर भाषण ऐकून दुर्योधन म्हणाला—हे गांधारराज शकुने, तुझी जर अनुमति असेल तर मग तुझ्या व या सर्व महारथांच्या साहाय्यानें अगोदर मी पांडवांनाच जिंकितों. कारण त्यांना एकदा जिंकिलें म्हणजे ही सर्व पृथ्वी, ती अपूर्व सभा, त्यांची अपार संपत्ति व सर्व भूपाल हीं अनायासानेंच माझ्या स्वाधीन होतील.

शकुनि—हे धार्तराष्ट्रा, पांडवांना जिंकणें तूं समजतोस तितकें सोपें नाहीं. धनंजय, वासुदेव, भीमसेन, युधिष्ठिर, नकुल, सहदेव, आणि पुत्रांसह द्रुपदराजा, हे सर्व महारथ, धनुर्धर, अस्त्रवेत्ते व दुर्जय आहेत. देवसमूहहि त्यांना युद्धामध्यें जिंकण्यास समर्थ नाहीं. तेथें आमचा काय टिकाव लागणार ! परंतु एकट्या युधिष्ठिराला जिंकण्याची मात्र एक युक्ति मला ठाऊक आहे. ती मी तुला सांगतों. ती ऐकून तूं संतोषानें तिचा स्वीकार कर.

(२) दुर्योधन—हे मातुला, आप्त, सुहृद्, भ्राते इत्यादिकांचा नाश न होतां पांडवांना जिंकणें जर शक्य असेल, तर मग मला तो उपाय सत्वर सांग.

शकुनि—हे दुर्योधना, युधिष्ठिराला द्यूताची फार आवड आहे. परंतु तें खेळण्यांत मात्र तो फारसा प्रवीण नाहीं. हे राजन्, त्याला द्यूतासाठीं आह्वान केलें असतां तो तें कधींहि नाकारणार नाहीं. हे कौरवा, माझ्या सारखा द्यूतप्रवीण या भूमंडलांतच नव्हे तर त्रिभुवनांतहि कोणी सांपडणार नाहीं. यास्तव तूं धर्मराजाला द्यूतासाठीं आह्वान कर. फांसे टाकण्यांत कुशल असलेला मी त्या पांडवांचें राज्य व ती उज्ज्वल संपत्ति तुझ्यासाठीं तत्काल जिंकून घेईन, यांत संशयच नाहीं. परंतु तूं अगोदर हा सर्व आपला संकेत तुझ्या पित्याला निवेदन कर आणि एकदा त्याची अनुज्ञा मिळविलीस कीं मी त्या कौंतेयांना निःसंशय जिंकितों.

शकुनीचें हें भाषण ऐकून संतुष्ट झालेला दुर्योधन म्हणाला—हे सौबला, कुरुकुलश्रेष्ठ धृतराष्ट्राला तूंच हें सर्व कथन कर. कारण तुलाच तें योग्य प्रकारें सांगतां येईल, मला तसें साधणार नाहीं. २. ९. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ दुर्योधनाचा संताप. २ धृतराष्ट्राची द्यूतास अनुज्ञा. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, युधिष्ठिर-राजाच्या त्या श्रेष्ठ राजसूय-यज्ञाचा गांधारीपुत्रांसह अनुभव घेऊन आणि दुर्योधनाचें तें इष्ट मत ऐकून शकुनि प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्राच्या समीप गेला व त्या बुद्धिमान् नराधिपाला म्हणाला—"हे महाराजा, खांडवप्रस्थाहून परत आल्यापासून हा तुझा ज्येष्ठ पुत्र दुर्योधन कसा निस्तेज, दीन, कृश व चिंताक्रांत दिसत आहे, पहा. तुझें लक्ष त्याच्याकडे नसावेंसें वाटतें. शत्रूंच्या निमित्तानें दुर्योधनाच्या मनांत उद्भ-वलेला हा असह्य हृद्रोग तुझ्या लक्षांत कसा येत नाहीं!"

शकुनीचें हें भाषण ऐकून धृतराष्ट्र मोठ्या कळवळ्यानें आपल्या पुत्राला म्हणाला—"बाळा दुर्योधना, तूं कोणत्या कारणानें असा अतिशय आर्त झाला आहेस! तुझ्या या मानसव्यथेचें कारण मला जर सांगण्यासारखें असेल तर सत्वर सांग. तूं अलीकडे निस्तेज व कृश झाला आहेस, असें हा शकुनि म्हणतो. मीं पुष्कळ विचार केला. पण तुझ्या शोकाचें कारण मला कांहींच दिसत नाहीं.

वत्सा, तूं सर्वप्रकारच्या उत्तम ऐश्वर्यांत स्थित आहेस. तुझे सर्व भ्राते व सुहृद् तुझ्याशीं कधींहि अप्रिय वर्तन करीत नाहींत. तूं मूल्यवान् वस्त्रें परि-धान करीत आहेस. मांसयुक्त उत्तम प्रकारचें रुचकर अन्न सेवन करीत आहेस. जातिवंत अश्व जोडलेल्या रथांतून विहार करीत आहेस. याप्रमाणें सर्व प्रकारचें श्रेष्ठ ऐश्वर्य भोगीत असतांना तूं असा कृश व निस्तेज कशानें बाबा झालास! मनोरम सुंदर स्त्रिया तुझ्या सेवेंत तत्पर असतात. उत्तमोत्तम मऊ शय्यांनीं युक्त असलेलीं सुशोभित मंदिरें व क्रीडास्थानें तुझ्यासाठीं निर्माण केलेलीं आहेत. तेथें तूं सुखानें विहार करीत आहेस. देवाप्रमाणें असलेल्या तुझी केवळ आज्ञा होतांच तुझें इष्ट कार्य सिद्ध होत असतांना हे दुर्जय पुत्रा, तूं असा दीनासारखा शोकमग्न कां झाला आहेस!"

दुर्योधन—हे तात, मी एखाद्या सामर्थ्यहीन माणसाप्रमाणें खातों, पितों, वस्त्राभरणें धारण करितों व बाह्यतः सुखी दिसतों, परंतु तीव्र द्वेषाग्नीनें माझ्या अंतःकरणाला व्यापिलें असल्यामुळें मी कसा तरी काल कंठीत आहें. जो आपल्या संबंधी जनांना शत्रूंच्या क्लेशांपासून सोडविण्यास समर्थ असतो तोच ‘ पुरुष ’ म्हटला जातो. परंतु मी आपल्या प्रजेच्या सुखाची कांहींच चिंता न करितां द्वेषाग्नीनें आंतल्या आंत दग्ध होत राहिलों आहें.

हे राजा, मनुष्य प्राप्त स्थितींत संतोष मानूं लागला कीं, त्याचें असलेलें ऐश्वर्यहि नष्ट होतें. त्याची प्रजा क्लेशाला प्राप्त होते. त्याचा अभिमान, दया, भय मुळींच जागृत होत नाहींत व तो स्वाभिमानशून्य बनतो. यास्तव हे भरतश्रेष्ठा, युधिष्ठिराचा तो उत्कर्ष पाहिल्यापासून मला या सर्व राज्योपभोगांपासून मुळींच सुख होत नाहीं. शत्रूंचा उत्कर्ष व स्वतःचा अपकर्ष पाहून माझ्या अंतःकरणाचा होत असलेला दाहच मला क्षीण करीत आहे.

प्रभो, येथून दूर असलेल्याहि युधिष्ठिराच्या अपार संपत्तीचा मनानें नुस्ता विचार जरी केला तरीसुद्धां ती जणुकाय माझ्या दृष्टीपुढें उभी रहाते व त्यामुळेंच मी दीन, निस्तेज व कृश होत आहें. युधिष्ठिर प्रत्येकीं तीस तीस दासी असलेले ऐशीं हजार स्नातक व गृहस्थ यांचें नित्य पोषण करीत आहे. युधिष्ठिराच्या गृहांत प्रत्यहीं दहा हजार ब्राह्मण सुवर्णाच्या पात्रांत पंच पक्वान्नांचें भोजन करीत असतात. हे नृपते, कांबोजाधिपतीनें त्याला निरनिराळ्या रंगांचीं मृगाजिनें व उत्तम ऊर्णावस्त्रें त्याच्याकडे पाठविलीं. त्या पांडुपुत्रापाशीं हजारों गायी, घोडे व हत्तिणी असून सांडणी व घोड्या यांच्या तीनशें पागा आहेत. त्या प्रत्येक पागेंत शंभर शंभर घोड्या व सांडणी बांधल्या जातात.

हे महाराज, देशोदेशींचे अनेक राजे कर घेऊन युधिष्ठिराच्या घरीं आलेले मीं पाहिले. हे पृथ्वीपते, सर्व भूपालांनीं राजसूय क्रतूंत कुंतीपुत्राला अर्पण करण्यासाठीं नानाप्रकारचीं अमूल्य रत्नें आणलीं होतीं. हे तात, मला त्यांची गणनाहि करितां आली नाहीं. त्या बुद्धिमान् पांडुपुत्राच्या यज्ञांत जशा प्रकारचा धनसंचय मीं प्रत्यक्ष पाहिला, तसा या पूर्वीं कधीं पाहिला तर नाहींच, पण कधीं कानानें ऐकलाहि नव्हता. हे राजा, शत्रूचा तो अमर्याद धनौघ पाहून माझें मन अतिशय अस्वस्थ झालें आहे. मी त्याचा विचार करूं लागलों म्हणजे मला यत्किंचित्हि सुख होत नाहीं. माझ्या मनांत त्याच्या त्या अपार संपत्तीचाच विचार सारखा घोळत आहे.

विपुल शेतकीवर उपजीविका करणारे व गायींचीं अनेक खिल्लारें बाळगणारे तीन खर्व ब्राह्मण कर घेऊन आले होते, पण द्वारपालांनीं प्रतिबंध केल्यामुळें ते दारांतच उभे राहिले. त्यांतील कित्येकांनीं आपल्या हातांत घृतपूर्ण शुभ सुवर्णकमंडलु धारण केले होते. पण इतकें धन आणणाऱ्याहि त्या ब्राह्मणांना त्याच्या मंदिरांत प्रवेश करितां आला नाहीं. ज्याप्रमाणें सोमस्त्रिया ओषधि इंद्रासाठीं मधु धारण करितात व सोम तें इंद्राकडे घेऊन जातो त्याप्रमाणें सोम तेंच दिव्य मधु कांस्य पात्रांमध्यें घालून युधिष्ठिराकडे घेऊन आला. समुद्र वरुणानें पाठविलेलें दधि स्वतः घेऊन आला. वासुदेवानें आपल्या हातांत सर्वोत्तम शंख घेऊन त्यानें युधिष्ठिराला अभिषेक केला.

हे पूज्य राजा, त्याच्या अभिषेकासाठीं ब्राह्मण ज्या कावडी घेऊन पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर समुद्र, इतर प्रसिद्ध नद्या व तीर्थें यांकडे जात होते, त्या कावडींचीं शिंकींहि मूल्यवान् होतीं. त्या रत्नजडित कावडी हजारों तोळे सुवर्णाच्या केल्या होत्या. त्यांतून समुद्रादिकांचें पवित्र जल आणून वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं त्या भाग्यवान् राजास अभिषेक केला. ज्या उत्तर दिशेकडे पक्ष्यांवांचून इतर कोणतेहि प्राणी जाऊं शकत नाहींत, त्या दिशेंत जाऊन अर्जुनानें कराच्या रूपानें अमित धन आणिलें. राजा, तुला काय सांगूं! आकाशांतून संचार करणाऱ्या प्राण्यांनीं युधिष्ठिराच्या अभिषेकासाठीं उत्तर समुद्राचें जल आणून दिलें. हें सर्व पाहून माझ्या अंतःकरणाचा जणुंकाय भडका झाला आहे.

राजा, त्या यज्ञांत आणखींहि एक चमत्कार मीं पाहिला, तो तुला सांगतों, लक्ष देऊन ऐक. एक लक्ष ब्राह्मण जेवून उठले, म्हणजे एकदा शंख वाजवावा अशी एक खूण त्या यज्ञांत करून ठेविली होती. पण काय आश्चर्य सांगावें! तो खुणेचा ध्वनि त्या यज्ञांत वारंवार होत असे व तो ऐकला म्हणजे माझ्या अंगावर रोमांच उभे रहात. सभा पहाण्याच्या इच्छेनें आलेल्या असंख्य राजांनीं व्याप्त झालेलें तें स्थान नक्षत्रांनीं व्यापिलेल्या निरभ्र अंतरिक्षाप्रमाणें शोभलें.

हे महाराजा, त्या बुद्धिमान् पांडुपुत्राच्या यज्ञामध्यें कर घेऊन आलेल्या वैश्यांप्रमाणें सर्व प्रकारचीं रत्नें घेऊन आलेले राजे भोजन करीत असलेल्या ब्राह्मणांना चतुर्विध अन्न वाढीत होते. हे तात, युधिष्ठिराच्या यज्ञांत जें ऐश्वर्य मीं पाहिलें, तें देवराज, यम, वरुण व कुबेर यांच्या मंदिरांतहि असेल, असें मला वाटत नाहीं. पांडुपुत्राची ती अपरिमित संपत्ति पाहून मी अस्वस्थ झालों

आहें. माझें चित्त मत्सरानें पेटलें आहे. हे महाराजा, माझ्या चित्ताची शांति होत नाहीं.

शकुनि—हे सत्यपराक्रमी दुर्योधना, तूं जी पांडवांची अतुल संपत्ति पाहिलीस, ती प्राप्त करून घेण्याचा मी तुला एक उपाय सांगतों, तो ऐक. हे कौरवा, सगळ्या पृथ्वीमध्यें मीच एक श्रेष्ठ अक्षविशारद आहें. फांसे कशा-प्रकारें टाकले असतां जय अथवा पराजय होतो, याचें मला उत्तम ज्ञान आहे. पणाला कोणत्या वस्तु लावून द्रव्य मिळवावें हें मी चांगलें जाणतों. द्यूताला कोणतें स्थल व कोणता काल अनुकूल असतो याचीहि मला माहिती आहे. कुंतीपुत्र युधिष्ठिर द्यूतप्रिय आहे, परंतु तो खेळण्यांत मात्र अनभिज्ञ आहे. तथापि त्याला कोणीं द्यूताचें आह्वान केलें असतां तो तें तत्काल स्वीकारितो. यास्तव हे प्रभो, मी [1]कपटद्यूत खेळून त्याला निश्चयानें जिंकीन व ती सर्व उज्ज्वल संपत्ति तुला मिळवून देईन. तरी तूं त्यास द्यूताचें आह्वान कर.

हे राजा, शकुनीचें हें भाषण ऐकून राजा दुर्योधन लगेच धृतराष्ट्राला म्हणाला—" हे तात, हा अक्षवेत्ता शकुनि पांडुपुत्रांची ती अपूर्व संपत्ति द्यूतांत हरण करण्याचा उत्साह बाळगीत आहे. तरी तूं त्याला द्यूत खेळण्याची अनुज्ञा दे." त्यावर धृतराष्ट्र म्हणाला—बाळा दुर्योधना, महाबुद्धिमान् विदुर माझा मंत्री असून मी त्याच्या आज्ञेप्रमाणें वागत असतों. यास्तव मी त्याच्याच विचारानें या कार्याचा निश्चय करीन. तो धर्माचरणशील व दूरदर्शी असल्या-मुळें उभयपक्षांचें हित कशांत आहे हें निश्चयानें सांगेल.

दुर्योधन—हे राजेंद्रा, फार उत्तम ! त्या विदुरानें जर हा आमचा संकेत अमान्य केला, तर तूंहि त्यापासून निवृत्त होशील, असेंच कीं नाहीं ! कांहीं हर-

---

१ कपट म्ह० फांशांच्या अधिष्ठातृ-देवतेला वश करून घेणें. किंवा द्यूतामध्यें तीन फांसे असतात व प्रत्येकाला चार बाजू असतात. त्यामुळें बारा आधार व सहा तल होतात. त्यांतील तीन तीन तलांवर खेळणाऱ्या दोघांचीं नांवें लिहिलीं जातात. त्यांत ज्याचें नांव वर येतें त्याचा जय व ज्याचें खालीं जातें त्याचा पराजय असा द्यूतांतील संकेत आहे. जे कपटाचे फांसे असतात, त्यांना बारीक भोंक पाडून ज्या बाजूला दुसऱ्याचें नांव असतें, त्याच्या आंत कांहीं तरी जड पदार्थ भरलेला असतो, त्यामुळें फांसे उधळून टाकतांच स्वतःचें नांव वर येतें व प्रतिपक्षाचें खालीं जातें. त्यामुळें आपला विजय व प्रतिस्पर्ध्याचा पराजय करितां येतो.

कत नाहीं. परंतु तूं जर या विचारापासून निवृत्त झालास, तर मी कांहीं जिवंत रहाणार नाहीं. हा माझा निश्चय तुला सांगून ठेवतों. हे राजा, मी मरण पावल्यावर तूं विदुरासह सुखानें रहा व संपूर्ण पृथ्वीचें राज्य खुशाल भोग. तुला माझ्याशीं काय करावयाचें आहे[1] !

( २ ) हे जनमेजया, पुत्राचें तें स्नेहयुक्त आर्त भाषण ऐकतांच धृतराष्ट्राचें मन कळवळलें. तो प्रज्ञाचक्षु पुत्रमोहानें त्याला अनुकूल झाला व समीप असलेल्या सेवकांस म्हणाला—" हे भृत्यहो, शिल्पकारांना सत्वर बोलावून माझ्यासाठीं एक भव्य व रम्य सभास्थान निर्माण करवा. तें स्थान सहस्रावधि विशाल स्तंभांनीं व असंख्य द्वारांनीं युक्त असावें. सर्व देशांतील कुशल कारागिरांना आणवून माझी ही रत्नजडित सभा सत्वर तयार करवा. तिचीं प्रवेश द्वारें उत्तम प्रकारें सुशोभित करून ती प्रवेश करण्यास योग्य होतांच मला तत्काल निवेदन करा. "

हे महाराज, धृतराष्ट्रानें दुर्योधनाच्या समाधानासाठीं असा निश्चय करून विदुराला बोलावणें पाठविलें. धृतराष्ट्र केव्हांहि विदुराला विचारल्यावांचून कसलाहि निश्चय करीत नसे. द्यूत खेळण्यापासून होणारे अनर्थ तो जाणत होता. तरीहि तो पुत्रस्नेहामुळें मोहांत पडला. बुद्धिमान् विदुरानें जेव्हां हा संकेत ऐकला तेव्हां ' हें कलीचें द्वारच किंवा विनाशाचें मुखच उघडलें आहे' असें जाणून तो त्वरेनें धृतराष्ट्राकडे यावयास निघाला व त्याच्या समीप आल्यावर त्या महात्म्या वडिल भ्रात्याच्या चरणांवर मस्तक ठेवून त्याला म्हणाला—"हे प्रभो, तुझा हा निश्चय मला संमत नाहीं. ज्यायोगें या द्यूतामुळें तुझे पुत्र व पांडुपुत्र या उभयतांमध्यें कलह होणार नाहीं, असा विचार कर."

विदुराचें हें वचन ऐकून धृतराष्ट्र म्हणाला—हे विदुरा, देव जर आमच्यावर प्रसन्न असतील तर या माझ्या व पांडूच्या पुत्रांमध्यें कधींहि कलह होणार नाहीं, हें तूं निःसंशय जाण. हें शुभ असो वा अशुभ असो, हें हिताचें असो वा अहिताचें असो, त्यांना स्नेहानें द्यूतांत प्रवृत्त होऊं दे. कारण दैवानेंच ही प्रेरणा केली आहे. शिवाय हे विदुरा, भीष्म, द्रोण, तूं व मी, असे आपण सर्व समीप असतां दैव त्यांस केव्हांहि प्रतिकूल होऊं शकणार नाहीं. तरी तूं आजच

१ पुण्यवानांचा ईशप्रसादानें झालेला उत्कर्ष पाप्यांना सहन होत नाहीं. तो पाहून दुर्जनांचा संताप होतो, हेंच दुर्योधनाच्या या सर्व विलापाचें तात्पर्य आहे.

शीघ्रगामी अश्वांनीं युक्त असलेल्या रथांत बसून सत्वर खांडवप्रस्थाला जा आणि युधिष्ठिराला घेऊन ये. हे विदुरा, माझा हा निश्चय तूं त्यास कळवूं नको किंवा मला दोषहि देऊं नको. हें मी तुला मुद्दाम सांगतों. कारण दैवच बलवत्तर आहे व त्यामुळेंच हें घडून येत आहे. धृतराष्ट्रानें असें सांगितलें असतां 'हें कांहीं चांगलें होत नाहीं' असें मनांत बोलून तो बुद्धिमान् विदुर गंगापुत्र भीष्माकडे गेला. २. ९. ४९.

---

## अध्याय ५० वा.

[ १ दुर्योधनाचा संताप. ]

(१) जनमेजय—हे ब्रह्मन्, ज्यायोगें माझ्या पितामह पांडवांवर एवढा अनर्थ ओढवला तें द्यूत त्या आप्तांमध्यें कसें झालें ! ते धार्मिकहि अशा संकटांत कसे पडले ! त्या वेळीं त्या सभेंत कोण कोण प्रमुख राजे होते ! त्यांतील अनुमोदन कोणीं दिलें व निषेध कोणीं केला ! हे द्विजा, सर्व पृथ्वीच्या नाशाचें मूळ असलेल्या या द्यूताचा सविस्तर वृत्तान्त ऐकण्याची माझी इच्छा आहे.

सौति—हे शौनकादि ऋषिहो, राजाचा हा प्रश्न ऐकून व्यासांचा प्रतापवान् व तत्त्ववेत्ता शिष्य तें सर्व वृत्त सांगूं लागला.

वैशंपायन म्हणाला—हे भरतसत्तम, ती कथा विस्तारानें ऐकण्याची जर तुझी इच्छा असेल, तर मी ती पुनः सविस्तर सांगतों ऐक.

अंबिकापुत्र धृतराष्ट्रानें विदुराचा विचार जाणून दुर्योधनाला एकांतात पुनः म्हटलें—"हे वत्सा, तूं हा द्यूताचा नाद सोडून दे. विदुराला तें संमत नाहीं. तो महाबुद्धिमान् विदुर आपलें अहित होईल असें कधींहि सांगत नाहीं. तो जें कांहीं बोलतो, तें आमच्या परम हिताचेंच असतें, असें मी समजतों. त्याच्या मताप्रमाणेंच तूं वागावेंस. त्यांतच तुझें हित आहे. दुर्योधना, देवर्षि भगवान् बृहस्पतीनें बुद्धिमान् देवेंद्राला जें शास्त्र सांगितलें, तें सर्व रहस्यासह महाज्ञानी विदुर जाणत आहे. अरे बाबा, मीसुद्धां नेहमीं त्याच्या आज्ञेंत असतों. या कुरुवंशामध्यें श्रेष्ठ व ज्ञानी असा एक विदुर आणि यादवांना पूजार्ह असलेला दुसरा महाबुद्धिमान् उद्धव, असे हे दोघेच कायते या भूलोकीं ज्ञानसंपन्न आहेत. यास्तव, हे पुत्रा, हें द्यूत पुरे कर. द्यूतानें परस्परांत वैर उत्पन्न होतें व वैरामुळें राज्याचा नाश होतो. म्हणून बाबा दुर्योधना, तूं तें वर्ज्य कर.

पुत्रांविषयीं माता-पितरांचें जें कर्तव्य स्मृत आहे, तें आम्हीं कधींच केलें आहे. पितृ-पितामहांचें राज्यपद तर तुला पूर्वीच प्राप्त झालें आहे. तूं शास्त्राध्ययन केलें आहेस. राजमंदिरांत तुझें सर्व प्रकारें कौतुक होत आहे. तूं ज्येष्ठ भ्राता असल्यामुळें राज्यावरहि तूंच स्थित आहेस ! तुला कोणतें शुभ प्राप्त झालेलें नाहीं ? अरे बाळा, इतरांना दुष्प्राप्य असलेलें श्रेष्ठ प्रतीचें भोजनाच्छादनादि तुला सदैव प्राप्त असतां तूं असा शोक कां करितोस ! हे पराक्रमी दुर्योधना, तुझ्या पितृ-पितामहांपासून प्राप्त झालेल्या या विस्तीर्ण राष्ट्राचें नित्य नियमन करणारा तूं स्वर्गांतील इंद्रासारखाच भासतोस. अशा प्रकारच्या पूर्ण सौख्यांत असलेल्या तुला ही दुःखद द्यूत खेळण्याची बुद्धि सुचली तरी कशी, तें मला सांग. ''

दुर्योधन—हे तात, केवळ अन्नाच्छादनावर संतोष मानणारा पुरुष पातकी मानिला जातो. ज्या पुरुषाला परोत्कर्षाविषयीं असहिष्णुता वाटत नाहीं, तो 'अधम' म्हटलेला आहे. हे प्रभो, ही सामान्य संपत्ति मला समाधान देत नाहीं. हे राजेंद्रा, युधिष्ठिराची ती दृष्टीला दिपविणारी उज्ज्वल संपत्ति पाहून माझें मन एकसारखें व्यथित होत आहे. समग्र पृथ्वी युधिष्ठिराला वश झालेली पाहूनहि ज्या अर्थीं मी विदीर्ण झालों नाहीं, त्या अर्थीं मी पाषाणच बनलों आहें. 'मी जिवंत आहें' हेंहि मी तुला मोठ्या दुःखानेंच सांगत आहें.

हे नृपश्रेष्ठा, युधिष्ठिराच्या गृहांत नीप, चित्रक, कौक्कुर, कारस्कर, लोहजंघ इत्यादि सर्व नृपति दासांसारखे त्याच्या अधीन होऊन राहिले आहेत. हिमालय पर्वत व सागर यांच्या समीप असलेल्या 'अनूप'-प्रदेशाचे अधिपति, तसेच समुद्रतीरावरील सर्व नृपाल यांचा तर युधिष्ठिराच्या मंदिरांत कोठें पत्ताहि लागत नाहीं, इतक्या दूर अंतरावर त्यांना ठेवलेलें आहे. हे भारता, मी सर्वांत ज्येष्ठ भ्राता व योग्यतेनेंहि श्रेष्ठ म्हणून युधिष्ठिरानें रत्नें व इतर मूल्यवान् वस्तु स्वीकारण्याच्या कामीं मला योजिलें होतें. त्याच्या गृहांत त्यावेळीं अमूल्य रत्नें, अश्व-गजादि पशु व इतर उत्कृष्ट वस्तू यांच्या इतक्या उंच राशी पडल्या होत्या कीं, त्यामुळें पलीकडच्या वस्तूहि दृष्टीस पडत नव्हत्या व पलीकडून अलीकडचें कांहीं दिसत नव्हतें. ते सर्व मूल्यवान् अहेर घेतां घेतां माझे हात थकून गेल्यामुळें मी विश्रांति घेण्यासाठीं क्षणभर जरी थांबलों, तरी दूर देशांहून अमूल्य अहेर घेऊन आलेल्या अनेक भूपालांना तिष्ठत उभें रहावें लागत असे.

हे तात, युधिष्ठिराच्या मयसभेंत बिंदुसरोवरावरून आणलेलीं दिव्य रत्नें बसवून मयासुरानें स्फटिकाच्या पायऱ्यांनीं युक्त असलेली कृत्रिम पुष्करणी तयार केली आहे. त्यांत स्वाभाविक भासणारें निर्मल जल व कमलें पाहून मीं आपलीं वस्त्रें सांवरून घेतलीं. तेव्हां वृकोदरानें माझा उपहास केला. त्या वेळीं शत्रूंचा तो उत्कर्ष पाहून रत्नहीन असलेल्या माझी मति कुंठित झाली. हे राजा, काय करूं! मी जर तेवढा समर्थ असतों तर मला हंसणाऱ्या त्या भीमसेनाला तेथल्या तेथें ठार केलें असतें. परंतु हे तात, मीं जर का त्या वेळीं भीमावर नुसता हात उगारला असता, तर शिशुपालासारखीच माझीहि गति झाली असती, यांत संशय नाहीं! शत्रूंनीं केलेला तो उपहास माझ्या मनाला सारखा जाळीत आहे.

हे नराधिपा, त्या युधिष्ठिराच्या मयसभेंत पुनः मीं पूर्वींसारखीच दुसरी जलयुक्त पुष्करणी पाहिली. परंतु तीहि कृत्रिमच असेल असें मला वाटलें व ती स्फटिकाची भूमीच आहे, असें समजून मी तिच्यावर पाऊल ठेवतांच जलांत पडलों. तेव्हां पार्थासह कृष्ण मला मोठ्यानें हंसला. तिकडे द्रौपदीहि आपल्या दासीजनांसह हंसूं लागली. त्यामुळें माझ्या मनाला अतिशय दुःख होत आहे. जलांत पडल्यामुळें माझीं सर्व वस्त्रें भिजून गेलीं. तेव्हां सेवकांनीं राजाज्ञेनें मला तत्काल कोरडीं वस्त्रें आणून दिलीं. खरोखर तेंहि मला अत्यंत दुःसह झालें.

हे महाराजा, पांडुपुत्रांनीं माझी आणखींहि कशी वंचना केली ती ऐक. त्या सभेंत एका भिंतीवर उघड्या दाराचें चित्र काढलेलें होतें, तें इतकें स्वाभाविक दिसत होतें कीं, मी तें द्वारच समजून त्यांतून जाऊं लागलों, तों माझें ललाट शिलेवर जोरानें आपटलें. तेव्हां नकुल व सहदेव या जुळ्या भावांनीं माझ्याजवळ येऊन मला हातांनीं धरिलें व मोठा खेद व्यक्त केला. सहदेव माझ्याकडे पाहून हंसत म्हणाला—"अहो महाराज, हें द्वार आहे, यांतून चला." राजा, तो दुरात्मा मला मार्ग दाखवीत पुनः पुनः असें बोलूं लागला. तेव्हां भीमसेनानें मला 'हे धृतराष्ट्रपुत्रा,' असें उपरोधिकपणानें संबोधून 'हें पहा येथें द्वार आहे.' असें हंसून म्हटलें. त्याच्या त्या संबोधनाचा अर्थ 'हे अंधसुता' म्हणजे 'हे अंधा,' असाच होता, यांत संशय नाहीं. हे तात, तेथें मीं जीं रत्नें पाहिलीं, त्यांचीं नांवेंहि पूर्वीं कधीं ऐकिलीं नव्हतीं. त्यामुळें हे राजन्, मला असह्य मनस्ताप होत आहे. २. ९. ५०.

## अध्याय ५१ वा.

[ १ दुर्योधनानें केलेलें पांडवांच्या संपत्तीचें वर्णन. ]

( १ ) दुर्योधन—हे नृपश्रेष्ठा, मी पांडवांच्या दुसऱ्या संपत्तीचें आणखींहि यथार्थ वर्णन करितों तें ऐक. निरनिराळ्या देशांतील नृपालांनीं ज्या विविध वस्तु आणल्या होत्या, त्या पाहून माझी मति कुंठितच झाली. त्यामुळें कोणाकडून किती व कशाप्रकारचे पदार्थ आले, याची गणना करण्याचें मला भानहि राहिलें नाहीं. तथापि त्यांतील मुख्य मुख्य वस्त्रें व रत्नें यांचें थोडेंसें दिग्दर्शन करितों.

कांबोज-देशाच्या अधिपतीनें मेंढ्यांची लोकर, बिळांत रहाणारे प्राणी, मांजरें इत्यादिकांच्या केंसांचीं बनविलेलीं जरतारी उंची वस्त्रें व अमूल्य अजिनें आणिलीं होतीं. त्यानें तित्तिर पक्ष्याप्रमाणें चित्र-विचित्र व शुकाच्या चोंचीसारख्या वर्णाचे तीनशें अश्व आणि अक्रोड, शमी व हिंगणबेठे यांवर पुष्ट झालेले तिनशें उंट राजाला अर्पण केले.

हे राजा, गायी व बैल यांचीं खिल्लारें बाळगून शेतकीवर उपजीविका करणारे ब्राह्मण, दास होण्यास योग्य असलेले शूद्रादि किंवा मूर्ख ब्राह्मण महात्म्या धर्मराजाच्या संतोषासाठीं विपुल कर घेऊन आले, पण ते सर्व विद्या-अध्ययनादि सत्कर्मशून्य असल्यामुळें द्वारावरच तिष्ठत उभे राहिले. द्वारपालानें त्यांस आंत सोडिलें नाहीं, इत्यादि वर्णन मीं पूर्वींच केलें आहे.

हे प्रभो, विचित्र वस्त्रें व भूषणें धारण करून आलेल्या सुंदर व तरुण कार्पासिक-देशांतील हजारों स्त्रियांना राजमंडपांत प्रवेश करितां आला नाहीं. कर्मठ ब्राह्मणांसाठीं रंकु मृगाचीं अजिनें घेऊन आलेल्या इतर शूद्रादिकांचीहि तीच गति झाली. मरु व कच्छ देशांत रहाणाऱ्या क्षत्रियांनीं राजाला करभार देऊन गांधार-देशांतील उत्तम अश्वहि अर्पिले. पर्जन्याच्या व कालव्याच्या पाण्यावर कृषि करणारे, समुद्राच्या तीरावरील व त्या पलीकडीलहि वैराम, पारद, आभीर व कितव, या जातींचे लोक नानाप्रकारचा करभार व रत्नें घेऊन राजाकडे आले. त्यांनीं बकऱ्या, मेंढ्या इत्यादि पशु, विविध ऊबदार वस्त्रें व सुवर्णादि रत्नेंहि आणलीं होतीं. पण त्यांनाहि द्वारावरच प्रतिबंध झाला.

प्राग्ज्योतिष देशाचा शूर म्लेच्छाधिप राजा भगदत्त जातिवंत व वायूसारखे वेगवान् अश्व व विपुल खंडणी घेऊन आला होता. पण द्वारपालांनीं प्रतीकार

केल्यामुळें त्याला कांहीं काल यज्ञमंडपाच्या बाहेरच उभें रहावें लागलें. तेव्हां यवनांसह आलेल्या त्या शूर भगदत्तानें पद्मरागादि रत्नजडित अलंकार व हस्तिदंती मुठ बसविलेलें खड्ग युधिष्ठिराकडे पाठवून तो बाहेरूनच स्वदेशास परत गेला.

द्व्यक्ष, त्र्यक्ष, ललाटाक्ष, औष्णीक, आंतवास, रोमक, पुरुषाद व एकपाद या निरनिराळ्या प्राच्य देशांतील राजांनीं विपुल कर आणला होता. तथापि त्यांना द्वारावर प्रतिबंध झालेला मीं प्रत्यक्ष पाहिला आहे. दुसऱ्याहि अनेक राजांनीं नियत करभाराशिवाय निरनिराळ्या रंगांचीं खेचरें आणिलीं होतीं. तीं धिप्पाड असून त्यांच्या माना काळ्या होत्या व तीं वेगवान् असल्यामुळें अल्पावकाशांत दूर अंतरावर जात असत. राजा, तीं सुप्रसिद्ध खेचरें कमींत कमी दहा हजार तरी असावींत असें माझें अनुमान आहे. त्या सर्वांच्या गळ्यांत काळा कंठमणि बांधलेला होता. त्यामुळें तर तीं फारच शोभत होतीं. त्यांना उत्तम शिक्षण दिलें होतें. त्यांची लांबी, उंची व पुष्टि असामान्य असून त्यांचा वर्णहि अद्भुत होता. या प्राच्य देशांतील लोकांनीं अशीं सहस्रावधि खेचरें देऊन, शिवाय विपुल सुवर्ण व रौप्यहि जेव्हां दिलें, तेव्हांच त्यांचा युधिष्ठिराच्या गृहांत प्रवेश झाला.

एकपाद-देशांतील नृपालांनीं वनगायी, शुक, इंद्रधनुष्य व संध्यामेघ इत्यादिकांसारखे विविध वर्णांचे अनेक अश्व व अगणित सुवर्ण युधिष्ठिराला अर्पण केलें. त्याचप्रमाणें चीन, शक, अरण्यवासी बर्बर, वार्ष्णेय हारहूण, कृष्ण, व हिमालयाच्या उंच-सखल प्रदेशांतील अनेक प्रकारचे पर्वतवासी जन, यांनीं द्वारावर प्रतिबंध झाला असतांहि काळ्या मानेचे, उंच बांध्याचे, वेगवान् व दशदिशांत प्रसिद्ध असलेले दहा हजार गर्दभ युधिष्ठिराला समर्पण केले.

हे महाराज, बाल्हीक व चीन देशांत तयार झालेलीं विस्तीर्ण, रंगीत व मृदु वस्त्रें, चित्र-विचित्र आकृति व वेलबुट्टी यांनीं युक्त असलेलीं रेशमीं वस्त्रें, ‘ रंकु ’-संज्ञक मृगाच्या केसांचीं तंतुरहित अतिशय गुळगुळीत वस्त्रें व अजिनें; तीक्ष्ण धारेचीं खड्गें, कुऱ्हाडी इत्यादि शस्त्रें; पाश्चात्य देशांतील परशु, अनेक प्रकारचीं रस-गंधयुक्त सुगंधी द्रव्यें व विविध रत्नें इत्यादि असंख्य वस्तूंचा कर घेऊन आलेले लोक आंत प्रवेश करण्यास प्रतिबंध झाल्यामुळें द्वारांतच तिष्ठत उभे होते. तसेंच, शक, तुषार, कंक, रोमश व श्रृंगी या देशांतील प्रमुख लोकांनीं

लक्षावधि शीघ्रगामी बलाढ्य गज, जातिवंत अश्व व अपरिमित सुवर्ण इत्यादिकांचा कर आणलेला असूनहि द्वारपालांनीं निवारण केल्यामुळें त्यांना बाहेरच तिष्ठत रहावें लागलें.

हे राजा, तेथील सर्व आसनें, सिंहासनें, वाहनें व मंचकादि शय्या हीं सर्व हस्तिदंती असून त्यांवर सुवर्णाच्या कोंदणांत विविध रत्नें बसविलीं होतीं.

हे तात, पौरस्त्य देशांतील राजे विचित्र कवचें, विविध शस्त्रें, व्याघ्रचर्मांनीं मढविलेले व शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांनीं युक्त असलेले अनेक आकारांचे सुवर्ण रथ, नाराच व अर्धनाराच बाण, हत्तींच्या मूल्यवान् झुली आणि विविध रत्नें इत्यादि कर घेऊन महात्म्या पांडवांच्या यज्ञमंडपांत आले. २. ९. ५१.

---

## अध्याय ५२ वा.

[ १ युधिष्ठिराच्या यज्ञांत कर घेऊन आलेल्या नृपालांचें कथन. ]

( १ ) दुर्योधन—हे निष्पापा, त्या युधिष्ठिराला राजसूय यज्ञासाठीं अनेक राजांनीं करार्थ केवढा मोठा धनसंचय आणून दिला, त्याचें आणखीं वर्णन करितों, तें ऐक. मेरु व मंदर या पर्वतांच्या मध्य प्रदेशांतून शैलोद नदी वाहते. त्या नदीतीरावरील किचकवेणूच्या रम्य छायेंत राहणारे खस, एकासन, अर्ह, प्रदर, दीर्घवेणु, पारद, कुलिंद, तंगण व परतंगण, हे सर्व नृपाल युधिष्ठिराकडे आले. त्यांनीं मुंग्यांनीं वारुळांतून काढल्यामुळें 'पिपीलिक'-नांवानें प्रसिद्ध असलेल्या सुवर्णाच्या राशी हत्तीवर लादून आणल्या होत्या. त्या कुडवांनीं मोजून घेतल्या.

दुसरे पर्वताधीश नृपति कृष्ण, ललाम व चमर या नांवाचे व दुसरेहि चंद्रकिरणासारखे शुभ्र मणी, रुचकर मध, जलांनीं वाहून आणलेलीं पुष्पें, उत्तर कैलासावरील प्रभावशाली ओषधि, इत्यादि दुर्लभ पदार्थांचा कर घेऊन आले होते, परंतु त्यांना त्या अजातशत्रु धर्मराजाच्या प्रवेशद्वारीं प्रतिबंध झाल्यामुळें ते सर्व राजे विनयपूर्वक तेथेंच तिष्ठत राहिले.

हे राजेश्वरा, हिमालयाच्या पलीकडील, उदयाचल पर्वतावरील, कारूषदेशांतील, समुद्रतीरावरील व पर्वताच्या सभोंवार रहाणारे भूप आणि फलमूलाहार करून चर्में पांघरणारे अनेक सशस्त्र शूर किरात मीं तेथें पाहिले. त्यांनीं चंदन, अगरु व कृष्णागरु; बहुमोल चर्में, रत्नें सुवर्ण व सुगंधी द्रव्यें यांच्या राशी आणल्या होत्या. पण हे प्रभो, ते सर्व किरातजातीच्या दहा हजार

दासी, दूर दूर देशांतील पशु, पक्षी व इतर रमणीय वस्तु, पर्वतांवरील खाणींतील सोनें, इत्यादि दुर्लभ पदार्थांची खंडणी आणूनहि प्रवेश द्वारीं तिष्ठत बसले होते.

त्याचप्रमाणें हे राजा, अर्जुनादि चारी भ्रात्यांनीं दिग्विजयाच्या प्रसंगीं कैरात, दरद, इत्यादि ज्या ज्या क्षत्रिय जातींना जिंकिलें होतें त्या सर्वांनीं धर्मराजासाठीं अगणित वित्त आणिलें. तें सुवर्ण, रत्नें, गज, अश्व, रथ, वस्त्रें, इत्यादि विविध प्रकारचें होतें.

राजा, या भूलोकांतील राजे दाही दिशांतून असें विविध धन घेऊन आले, यांत मोठेंसें आश्चर्य नाहीं. पण इंद्राचा अनुचर जो चित्ररथ गंधर्व त्यानेंहि धर्मराजाला वायूसारखे वेगवान् चारशें अश्व आणून दिले. हृष्ट झालेल्या तुंबुरु-गंधर्वानें शंभरच अश्व आणिले होते, पण त्यांचा वर्ण आम्रवृक्षाच्या पल्लवासारखा असून त्यांतील प्रत्येकाच्या गळ्यांत रत्नजडित सुवर्णमाला होती.

शुकर-देशाच्या कौरव्य-राजानें युधिष्ठिराला शेंकडों उत्कृष्ट गज दिले. मत्स्यराज विराटानें त्याला दोन हजार मदोन्मत्त हत्ती अर्पण केले. ते सर्व सुवर्णमालांनीं युक्त होते. पांशु-राष्ट्राच्या वसुदान-राजानें सव्वीस गज व दोन हजार वेगवान् तरुण अश्व आणिले होते. त्यानें ते सर्व पांडवांना अर्पण केले.

द्रुपदानें पांडवांना असंख्य दासी, दास, गज, सव्वीस रथ व आपलें सर्व राज्यहि यज्ञासाठीं निवेदन केलें. वार्ष्णेय वासुदेवानें अर्जुनाचा मोठा सन्मान करण्यासाठीं त्याला हजारों गजेंद्र अर्पण केले. कृष्ण व अर्जुन हे परस्परांचे आत्मेच आहेत. पार्थ जें जें सांगेल तें तें कृष्ण निःसंशय करील. तो धनंजयासाठीं आपला प्रिय स्वर्गलोकहि टाकील व उलट धनंजय कृष्णासाठीं आपल्या प्राणांचाहि परित्याग करील असें मला वाटतें.

हे महाराज, चोल व पांड्य सुवर्णकुंभांतून सुवासिक चंदनरस आणि मलय व दर्दुर पर्वतांवरून चंदन व अगरु यांचे ढीग घेऊन आले. त्यांनीं तेजस्वी मणि, रत्नें, सुवर्ण व सूक्ष्म वस्त्रेंहि आणिलीं होतीं. पण त्यांनाहि युधिष्ठिराच्या मंदिरांत प्रवेश करितां आला नाहीं! हे राजा, सिंहलद्वीपाच्या राजांनीं समुद्रांतील शेकडों सारभूत वैदूर्यमणि व मुक्ताफळें आणिलीं होतीं. त्याचप्रमाणें हत्तींच्या मूल्यवान् झुलीहि आणिल्या होत्या. त्यांवर जरतारी विचित्र काम केलें होतें. तथापि तें सर्व धन आणणाऱ्या लोकांना द्वारपालांनीं प्रतिबंध केल्यामुळें प्रवेशद्वारींच तिष्ठत उभें रहावें लागलें.

हे तात, युधिष्ठिरावर प्रेम करणारे ब्राह्मण, त्याच्या भ्रात्यांनीं पराभूत केलेले क्षत्रिय, कर देणारे वैश्य व शुश्रूषा करणारे शूद्र धर्मराजाकडे अतिशय प्रीतीनें व आदरानें आले. सर्व म्लेच्छ, ब्राह्मणादि सर्व वर्ण, निरनिराळ्या देशांतील अंत्यजाति, या सर्वांचा तेथें फारच मोठा समुदाय जमला होता. त्यामुळें तें युधिष्ठिराचें नगर स्वर्गलोकाप्रमाणें भासलें. तेथें आलेल्या राजांनीं त्या माझ्या शत्रूंना आणून दिलेल्या अगणित उच्च-नीच वस्तु पाहून मला असह्य दुःख झालें व 'आपण आतां यापुढें जिवंतहि राहूं नये' असें वाटलें.

राजन्, पांडवांच्या शिध्यावर व शिजलेल्या अन्नावर उपजीविका करणाऱ्या भृत्यांची संख्याहि अशीच अद्भुत आहे. तीन पद्म घोडेस्वार, दहा हजार माहुत व एक कोटि रथसेवक असून, पदातींची तर गणतीच नाहीं. त्या नगरामध्यें सर्व कार्यें व्यवस्थित चालू होतीं. कोठें धान्याचें माप चाललें होतें. कोठें विपुल अन्न शिजत होतें. कोठें अन्न वांटण्याचा क्रम चालू होता व कोठें ब्राह्मणांचा पुण्याह ध्वनि ऐकूं येत होता. गायक मंगलकारक गायन करीत असून वादक मंगल वाद्यें वाजवीत होते.

राजा, त्या युधिष्ठिराच्या घरीं असंख्य लोक जमले होते, पण त्यांतील कोणालाहि खावयास मिळालें नाहीं, प्यावयास मिळालें नाहीं, वस्त्रालंकार मिळाले नाहींत, किंवा त्यांतील कोणाचा आदरसत्कार झाला नाहीं, असें माझ्या पहाण्यांत आलें नाहीं. सर्व जातींच्या व वर्णांच्या लोकांचा तेथें सर्वप्रकारें योग्य सत्कार होत असे. राजा, मीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें युधिष्ठिर अठ्ठ्यायशीं सहस्र ब्राह्मणांचें नित्य पोषण करीत असतो व तेहि त्या राजावर सुप्रसन्न होऊन त्याच्या शत्रूंचा क्षय व्हावा, असा प्रत्यहीं आशीर्वाद देतात. धर्मराजाच्या घरीं दहा हजार ऊर्ध्वरेते यति नित्य सुवर्णपात्रांत भोजन करितात.

हे महाराज, पांडवपत्नी द्रौपदी ब्राह्मणांपासून शूद्रांपर्यंत, अंध-पंगूंपासून बाल-गोपालांपर्यंत कोणीं भोजन केलें व कोणीं केलें नाहीं, याचा स्वतः शोध करून व सर्व आबालवृद्ध स्त्री-पुरुष तृप्त झाले आहेत असें पाहून मग भोजन करिते. हे भारता, कुंतीपुत्राला कर न देणारे एक पांचाल व दुसरे वृष्णि-अंधक असे दोघेच होते. पांचाल संबंधी असल्यामुळें व वृष्णि-अंधक मित्र असल्यामुळें युधिष्ठिरानें त्यांच्यापासून कर घेतला नाहीं. २. ९. ५२.

## अध्याय ५३ वा.

[ १ यज्ञाचें वर्णन व दुर्योधनाचा संताप. ]

(१) दुर्योधन—हे वीर्यवान् महाराजा, सत्यप्रतिज्ञ, महाव्रत, विद्वान्, वक्ते, वेदान्तज्ञानरूपी पवित्र जलांत ज्यांनीं अवभृत स्नान केलें आहे, असे धैर्यसंपन्न, अकार्यभीरु, यशस्वी, मूर्धाभिषिक्त व धर्मात्मे असे जे श्रेष्ठ राजे तेथें आले होते, ते सर्वहि युधिष्ठिराच्या यज्ञांत त्याची सेवा करीत होते. त्या राजांनीं ब्राह्मणांना दक्षिणा देण्यासाठीं विपुल दूध देणाऱ्या अरण्यांतील हजारों गायी आणलेल्या मीं प्रत्यक्ष पाहिल्या. श्रेष्ठ राजांनीं आपला स्वाभाविक अभिमान टाकून युधिष्ठिराच्या अभिषेकासाठीं लागणाऱ्या उच्च-नीच वस्तु मोठ्या आदरानें उचलून आणिल्या.

बाह्लिकानें सुवर्णभूषित रथ आपल्या हातांनीं ओढून आणिला. सुदक्षिण राजानें कांबोज देशांतील शुभ्र अश्व त्याला जोडिले. युधिष्ठिरावर अनुरक्त असलेल्या महाबलाढ्य सुनीथ-राजानें अनुकर्ष म्हणजे रथाच्या खालीं जोडण्याचें काष्ठ आणिलें, चेदिपतीनें ध्वज आणिला व तो स्वतः त्याच्या रथावर उभारिला. दाक्षिणात्यानें कवच, मागधानें पुष्पमाला व शिरोवेष्टन, महाधनुर्धर वसुदानानें एक मोठा साठ वर्षांचा मत्त गजेंद्र, मत्स्यानें धनपूर्ण अनेक शकट, एकलव्यानें सुंदर पादत्राणाची जोडी, आवंत्यानें अभिषेकासाठीं निरनिराळ्या पवित्र जलाशयांतील उदक, चेकितानानें बाणांचा भाता, काश्यानें धनुष्य व शल्यानें सुवर्णभूषित कोशासह तीक्ष्ण धारेचें खड्ग आणिलें.

नारद व असित देवल यांना पुढें करून धौम्य व महा तपस्वी व्यास यांनीं युधिष्ठिराला अभिषेक केला. जामदग्न्यासह इतरहि वेदपारंगत महर्षि मोठ्या प्रसन्न चित्तानें त्यावेळीं युधिष्ठिराच्या सभोंवार उभे राहिले. ज्याप्रमाणें स्वर्गांत सप्तर्षि देवेंद्राजवळ येऊन उभे राहतात, त्याप्रमाणें मंत्रयुक्त विपुल दक्षिणा देणाऱ्या युधिष्ठिरापाशीं हे सर्व महर्षि उभे होते.

सत्य पराक्रमी सात्यकीनें युधिष्ठिरावर छत्र धरिलें. धनंजय व भीमसेन दोन व्यजनें हातांत घेऊन वारा घालीत होते आणि नकुल-सहदेव दोन शुद्ध चामरें वारीत होते. पूर्व कल्पामध्यें प्रजापतीनें इंद्राला जो वारुण शंख दिला होता, तोच समुद्रानें युधिष्ठिराला आणून दिला. विश्वकर्म्यानें त्या शंखावर निष्कसहस्र सुवर्णानें सुंदर वेलबुट्टी काढिली होती. हे राजा, कृष्णानें त्या शंखानें त्याला अभिषेक केलेला पाहून मला तर मूर्च्छाच आली.

राजा, पूर्वादि तिन्ही दिशांतील समुद्रांकडे सर्व लोक जाऊं शकतात, पण उत्तर दिशेकडे पक्ष्यांवांचून दुसरें कोणी जाऊं शकत नाहीं. असें असूनहि दिग्विजयी अर्जुन उत्तर समुद्रापर्यंत जाऊन विपुल धन घेऊन आल्याचा वृत्तान्त मीं तुला पूर्वीं सांगितलाच आहे.

हे राजा, युधिष्ठिराचा अभिषेक चालला असतां शेंकडों मंगलकारक शंख वाजूं लागले. त्यांचा तो गंभीर ध्वनि ऐकून माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्यावेळीं तेजोहीन असलेले राजे भयभीत होऊन भूमीवर पडले. तेव्हां ज्यांचें दर्शन परस्परांस प्रिय आहे, असे सत्त्वस्थ व वीर्यसंपन्न धृष्टद्युम्न, पांच पांडव, सात्यकी व आठवा केशव, हे सर्वहि मूर्छित झालेल्या इतर राजांना व मलाहि पाहून हंसले.

युधिष्ठिराचा अभिषेकसमारंभ समाप्त झाल्यावर अतिशय हृष्ट झालेल्या अर्जुनानें ज्यांचीं शिंगें सुवर्णानें भूषित आहेत, असे पांचशें वृषभ ब्राह्मणांना दिले. युधिष्ठिर राजसूय यज्ञ करून हरिश्चंद्राप्रमाणेंच अप्रतिम ऐश्वर्यानें युक्त झाला व सर्व नृपालांहून अधिक शोभला. मला वाटतें कीं त्या राजाप्रमाणें रंतिदेव, नाभाग, यौवनाश्व, मनु, पृथुराजा, वैन्य, भगीरथ, ययाति व नहुषहि शोभला नसेल. कारण युधिष्ठिराची संपत्ति अभूतपूर्व आहे, यांत शंका नाहीं.

हे प्रभो, पार्थाचें हें हरिश्चंद्रासारखें अलौकिक ऐश्वर्य पाहून माझें जीवित श्रेयस्कर आहे, असें तुला कसें वाटतें ! असल्या वैभवावांचून जिवंत राहण्यांत काय अर्थ आहे ! हें द्वापरयुग असूनहि त्यांत कनिष्ठांचा अत्यंत उत्कर्ष व ज्येष्ठांचा अत्यंत ऱ्हास झालेला पाहून हें युग एखाद्या अंध विधात्यानें युक्त झालें आहे, म्हणजे याचा विधाता जणुकाय अंध आहे असें मला वाटतें. हे राजा, युधिष्ठिराचें तें ऐश्वर्य अवलोकन करून माझें मन अस्वस्थ झालें आहे. मीं पुष्कळ विचार केला, पण तें शांत होत नाहीं. उत्तरोत्तर अधिकच संतप्त होत आहे. त्यामुळेंच हे कुरुश्रेष्ठा, मी असा कृश, निस्तेज व संतप्त झालों आहें. २. ९. ५३.

---

## अध्याय ५४ वा.

[ १ धृतराष्ट्राचा दुर्योधनाला उपदेश. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे दुर्योधना, तूं माझ्या ज्येष्ठ पत्नीचा पुत्र असून जन्माच्या क्रमानेंहि ज्येष्ठच आहेस. यास्तव तूं पांडवांचा द्वेष करूं नकोस. द्वेष करणाराला जसे क्लेश भोगावे लागतात, तसेंच मरणहि प्राप्त होतें. युधिष्ठिर कधींहि दुसऱ्याशीं कपटाचरण करीत नाहीं. तुझें व त्याचें ऐश्वर्य सारखेंच आहे, कारण तुला व त्याला राज्याचा विभाग सारखाच मिळालेला आहे. तो तुझ्या मित्रांशींहि द्रोह करीत नाहीं, असें असतांना हे बाळा, तुझा द्वेष न करणाराशीं तूं अशा प्रकारचा दीर्घ द्वेष कां बरें करीत आहेस ! तूं पांडवांसारखाच कुलीन व वीर्यवान् असतां मोहानें त्यांच्या संपत्तीची इच्छा कां करितोस !

हे पुत्रा, शांत हो. शोक करूं नकोस. तुला यज्ञाच्या ऐश्वर्याचीच इच्छा असेल, तर ज्यांत सप्तगायत्री हेच तंतु आहेत असा यज्ञ तूंहि ऋत्विजांकडून करीव. म्हणजे तुलाहि अनेक राजे विपुल धन, अमूल्य रत्नें, आभरणें इत्यादि मोठ्या प्रेमानें आणून देतील. अरे बाबा, परद्रव्याचा अभिलाष धरणें हें अत्यंत अनार्याचरण आहे. प्राप्त स्थितींत समाधान मानून स्वधर्मानें वागणाराच सुखी होतो. परधनावर लुब्ध न होतां स्वकर्मांतच निमग्न राहून प्राप्त संपत्तीचें रक्षण करणें हेंच वैभवाचें लक्षण आहे. जो पुरुष विपत्तींतहि खेद न मानितां नित्य दक्ष, उत्साही व नम्र असतो, त्याचें सर्वदा कल्याणच होतें. हे वत्सा, पांडव तुझे बाहु आहेत, त्यांचा विच्छेद करणें म्हणजे स्वतःचाच नाश करण्यासारखें आहे. यास्तव बाहूंसारख्या असणाऱ्या त्यांना तूं तोडूं नकोस. केवळ भ्रात्यांच्या धनासाठीं तूं मित्रद्रोह करूं नकोस.

दुर्योधना, तूं पांडुपुत्रांचा द्वेष करूं नकोस. त्यांचें जें वित्त तें तुझेंच भ्रातृधन आहे. कारण त्यांचे व तुझे पितामह एकच आहेत. मित्रद्रोहांत फार मोठा अधर्म आहे. यास्तव तूं यज्ञांत आपल्या संपत्तीचा सद्व्यय कर. तुला इष्ट असलेल्या विषयांचा उपभोग घे. स्त्रियांशीं क्रीडा कर व निरामय होऊन शांत चित्तानें रहा. २. ९. ५४.

---

## अध्याय ५५ वा.

[ १ धृतराष्ट्रनिषेधपूर्वक दुर्योधनाचा संताप. ]

( १ ) **दुर्योधन**—हे तात, ज्याला स्वतःची ऊहापोहकुशल बुद्धि नसते, तर जो केवल बहुश्रुत असतो तो पुरुष, सर्व पदार्थ ढवळणारी पळी जशी कोणत्याहि पदार्थांची चव जाणत नाहीं, तसा शास्त्रार्थ जाणत नाहीं. एका नांवेला बांधलेल्या दुसऱ्या नांवेप्रमाणें तूं मलाहि पराधीन करून स्वतःबरोबर बुडवूं पहात आहेस. पण तूं स्वतः ज्ञाता असून मला मोहित कां करितोस ! तुझें स्वार्थाकडे लक्ष नाहीं, कीं तूं माझा द्वेष करीत आहेस ! ज्यांचा तूं शास्ता आहेस ते आम्ही धृतराष्ट्रपुत्र असून नसल्यासारखेच आहोंत. द्यूतानें तत्काल संपत्ति प्राप्त करून घेण्याचा सुलभ मार्ग सोडून तूं 'यज्ञ करावा म्हणजे राजे विपुल धन आणून देतील,' असा भविष्यत्कालीन लाभाचा उपाय सांगतोस. तेव्हां तुला काय म्हणावें !

खरोखर, ज्याचा नेता दुसऱ्याच्या बुद्धीनें चालणारा असतो, तो आपल्या इष्ट मार्गाला खात्रीनें मुकतो, हें जाणत असतांना त्याचे अनुयायी त्याच्या मार्गाला कसे बरें अनुसरतील ! याच न्यायानें तूं जो आमचा अग्रणी, तो विदुराच्या बुद्धीनें चालूं लागल्यास आम्ही तें कसें मान्य करावें ! हे राजन्, विचारी, वृद्ध व जितेंद्रिय असलेला तूं आम्हीं स्वकार्य करीत असतांना, त्यापासून आम्हांला असा वारंवार मोहानें निवृत्त कां करितोस ! आमच्या हिताचें कांहींच सांगत नाहींस. 'लौकिक नीतीहून राजनीति अगदीं भिन्न आहे' असें बृहस्पतीचें वचन आहे. यास्तव राजानें सदैव स्वार्थाच्या विचारांत दक्ष रहावें. शत्रूवर जय मिळविण्याकडेच नेहमीं क्षत्रियांची प्रवृत्ति असावी. मग त्यांत धर्म असो किंवा अधर्म असो. स्ववृत्तीची चिकित्सा करण्यांत काय अर्थ आहे ! तस्मात् हे महाराज, तुझा हा निवृत्तिरूप धर्म उत्कर्ष पावण्याची इच्छा करणाऱ्या आम्हांला इष्ट वाटत नाहीं.

हे तात, ज्याप्रमाणें सारथि चाबकानें अश्वांना ताब्यांत ठेवितो, त्याप्रमाणें शत्रूचें उज्ज्वल ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याची इच्छा करणारानें सर्व दिशा आपल्या अधीन ठेविल्या पाहिजेत. शत्रूचा नाश करणारें जें गुप्त किंवा प्रकट साधन तेंच खरें शस्त्र होय. केवल शरीराचा छेद करणारें शस्त्र नव्हे. हे राजा अपकार करणारा प्रत्येक प्राणी हा शत्रुच आहे. 'पांडव तसे नाहींत,'

असें तूं म्हणतोस; परंतु 'हा शत्रु व हा मित्र' असें कोठें लिहिलेलें नसतें किंवा त्याचें कांहीं विशेष चिह्नहि नसतें. तर ज्याच्यापासून संताप होतो, तोच शत्रु होय. असंतोष हेंच संपत्तीचें मूळ आहे, म्हणून मी तेंच इच्छीत आहें. हे राजन्, स्वतःच्या उत्कर्षाचा प्रयत्न करणें हीच परम नीति होय. धन किंवा ऐश्वर्य यांवर कधींहि ममत्व ठेवूं नये. कारण पूर्वी एखाद्या नृपतीनें संपादिलेल्या राज्याचें दुसरा एखादा राजा जेव्हां हरण करितो, तेव्हां त्याचा तो राजधर्मच म्हटला जातो.

हे प्रभो, इंद्रानें द्रोह न करण्याची प्रतिज्ञा करूनहि नमुचि दैत्याचा-शिरश्छेद केला व इंद्राच्या त्या कृत्याचा गौरव झाला. ही सनातन नीति आहे. हे महाराज, बिळांत रहाणाऱ्या प्राण्याला ज्याप्रमाणें सर्प ग्रासून टाकितो, त्याप्रमाणेंच कोणाशीं वैर न करणारा राजा व प्रवास न करितां एकाच ठिकाणीं रहाणारा संन्यासी या दोघांना भूमि ग्रासते.

हे विशांपते, वस्तुतः पुरुषाला जन्मतः शत्रुच नाहीं. ज्यांच्या उपजीविकेचा व्यवसाय समान असतो, ते परस्परांचे शत्रुच होत. त्याहून इतर कोणी शत्रु नाहींत. शत्रुपक्षाची समृद्धि होत असतांना जो मोहानें त्याची उपेक्षा करितो, त्याचा तो शत्रु अपथ्यसेवनानें वाढविलेल्या रोगाप्रमाणें समूळ नाश करितो.

हे आजमीढा, एखाद्या वृक्षाच्या मुळाशीं वाढलेलें मुंग्यांचें वारूळ ज्याप्रमाणें त्या वृक्षाला पोखरून टाकितें त्याप्रमाणें शत्रु अल्प जरी असला, तरी त्याची उपेक्षा केली असतां तो आपल्या पराक्रमानें वृद्धि पावून प्रतिपक्षाची हानि करितो. यास्तव हे राजा, शत्रूच्या उत्कर्षानें तूं आपल्याला कृतार्थ मानूं नकोस. बुद्धिमान् लोकांना संमत असलेली ही नीति विद्वानांनीं शिरसा मान्य करणेंच योग्य होय. हे तात शरीराच्या स्वाभाविक वाढीप्रमाणें जो ऐश्वर्याच्या वृद्धीची आकांक्षा करितो, त्याचाच ज्ञातीमध्यें उत्कर्ष होतो आणि अशाप्रकारच्या वृद्धीचें जें साधन तोच पराक्रम होय. मीं जर पांडावांचें तें अपूर्व ऐश्वर्य पाहिलेंच नसतें तर मी त्यांच्या संपत्तीचा अभिलाष धरिला नसता. परंतु आतां मात्र मी त्यांचें तें सर्व ऐश्वर्य हरण तरी करीन, किंवा युद्धामध्यें मरण तरी पावेन, असा माझा निश्चय झाला आहे. हे राजा, पांडवांचा नित्य उत्कर्ष होत आहे आणि आम्ही उत्कर्षहीन झालों आहोंत. अशा स्थितींत माझ्या जीविताचा तरी काय उपयोग! २. ९. ५५.

## अध्याय ५६ वा.

[ १ शकुनीचें द्यूतास प्रोत्साहन. २ दुर्योधन व धृतराष्ट्र यांचा त्याविषयीं संवाद. ३ अमात्यास सभागृहनिर्माण करण्याची व विदुरास पांडवांस आणण्याची आज्ञा. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें दुर्योधनाचें भाषण ऐकून शकुनि त्यास म्हणाला—"हे विजयी वीरांतील श्रेष्ठ दुर्योधना, पांडुपुत्र युधिष्ठिराची जी संपत्ति पाहून तूं इतका संतापला आहेस, ती सर्व मी द्यूतांत निःसंशय हरण करीन. पण तूं त्या कुंतीपुत्र युधिष्ठिराला सत्वर आह्वान कर. कोणत्याहि संकटांत न पडतां, सैन्याशीं तोंड देऊन युद्ध न करितां, मी केवळ फांसे टाकून द्यूत खेळण्यांत अनभिज्ञ असलेल्या त्या ज्येष्ठ पांडवाला खात्रीनें जिंकीन. हे कौरवा, 'पण' हेंच माझें धनुष्य, 'फांसे' हेच शर, 'फांसे टाकण्याचें कौशल्य' हीच धनुष्याची दोरी, आणि 'फांसे टाकण्याचें स्थान' हाच माझा रथ आहे असें तूं समज."

(२) शकुनीचें हें उत्साहपूर्ण भाषण ऐकून दुर्योधनानें द्यूतासाठीं पूर्वीप्रमाणें आपल्या पित्याची अनुज्ञा मागितली व धृतराष्ट्रानेंहि 'विदुराच्या विचारानें संमति देईन' असें पूर्ववत् उत्तर दिलें. तें ऐकून दुर्योधन पुनः म्हणाला—"हे तात, विदुर निःसंशय तुझा बुद्धिभेद करील. कारण तो जसा पांडवांच्या हितामध्यें तत्पर असतो, तसा माझ्या हिताविषयीं नसतो. हे कुरुनंदना, कोणत्याहि दोन पुरुषांचें मत एकसारखें केव्हांहि नसतें. यास्तव [१]दुसऱ्याच्या सामर्थ्यावर आपलें कार्य कधींहि आरंभूं नये. परबुद्धि विनाशकारक असते. जो मूढ मनुष्य स्वतःचें परिपालन करण्यास भितो, तो वर्षा-ऋतूंत भिजलेलें शुष्क तृण जसें जागच्याजागीं कुजून जातें, तसा शवटीं क्लेश पावतो. त्याच न्यायानें आम्ही भीतीनें द्यूतादिकांचा परिहार केल्यास आमचीहि तशीच स्थिति होईल. हे राजन्, [२]व्याधि किंवा मृत्यु, हे यावयाचे झाले म्हणजे ते 'यानें आपलें श्रेय साधलें आहे किंवा नाहीं' याची वाट पहात नाहींत, यास्तव जोंवर सामर्थ्य आहे तोंवरच स्वतःचें श्रेय साधून घ्यावें."

**धृतराष्ट्र**—हे पुत्रा, बलवानांशीं वैर करणें, मला मुळींच आवडत नाहीं. वैरामुळें मनुष्य आपल्या मानसिक पूर्वावस्थेपासून च्युत होतो. वैर हें 'लोह-

---

१ नारभेतान्यसामर्थ्यात्पुरुषः कार्यमात्मनः। २ न व्याधयो नापि यमः प्राप्तुं श्रेयः प्रतीक्षते। यावदेव भवेत् कल्यस्तावच्छ्रेयः समाचरेत्॥

रहित शस्त्रच' आहे. हे दुर्योधना, तूं या द्यूतरूप अनर्थहेतूला आपल्या श्रेयाचें साधन मानीत आहेस, परंतु तें कलहांत गुंतविणारें आहे. तें एकदा प्रवृत्त झालें कीं त्याचें पर्यवसान खड्ग व बाण या युद्धसामग्रींत खात्रीनें होत असतें.

दुर्योधन—हे महाराज, नलादि प्राचीन राजे द्यूतांत प्रवृत्त झालेले आहेत. परंतु त्यापासून त्यांतील कोणाचा नाश झालेला नाहीं, किंवा युद्धहि उद्भवलें नाहीं. यास्तव हे राजन्, शकुनीच्या बोलण्याला अनुमति देऊन तूं आजच सत्वर सभा तयार करण्याची आज्ञा कर. द्यूत खेळणाऱ्या आमचें ' द्यूत ' हेंच श्रेष्ठ सुखाचें द्वार आहे व तें जसें आम्हांला हितावह आहे, तसेंच प्रतिपक्षालाहि हितावह होण्याचा संभव आहे. कारण त्यापासून शत्रूचा पराभव आणि धनलाभ हीं दोन्ही साधतात. हें अशाप्रकारचें दुहेरी सुख केवळ धनानें किंवा यज्ञादिकांनींहि साधत नाहीं. यास्तव तूं आम्हांला पांडवांशीं द्यूत खेळण्याची संमति दे.

धृतराष्ट्र—हे नरेंद्रा, तुझे हे विचार मला मान्य नाहींत. या उपर तुला जें योग्य वाटेल तें कर. परंतु जेव्हां पश्चात्तापाचा प्रसंग येईल, तेव्हां तुला माझ्या या वचनाचें स्मरण होईल. तुझें हें भाषण धर्मयुक्त नसल्यामुळें परिणामीं हितावह होणार नाहीं. ऊहापोहकुशल, विवेकी व ज्ञानी विदुरानें याचा दुष्परिणाम पूर्वीच जाणला आहे व त्याच्या म्हणण्याप्रमाणें या द्यूतामुळें क्षत्रियजातीचा नाश करणारें महद्भय अवश्य प्राप्त होईल.

( ३ ) राजा जनमेजया, याप्रमाणें बोलून बुद्धिमान् धृतराष्ट्रानें 'दैव परम दुस्तर आहे' असा निश्चय केला व पुत्राच्या अध्यावचनांत रहाणाऱ्या आणि त्यामुळेंच दुर्दैवानें मूढबुद्धि बनलेल्या त्या राजानें आपल्या अमात्यांस पूर्वोक्त विस्तीर्ण सभागृह सत्वर निर्माण करविण्याची आज्ञा केली.

राजाची आज्ञा पाळण्यांत दक्ष असलेल्या त्याच्या सेवकांनीं तत्काल सर्व द्रव्य-सामग्री व कुशल शिल्पी आणविले व अल्पावधींतच सुवर्णाच्या आसनांनीं युक्त असलेलें तें रत्नजडित सुंदर सभास्थान तयार झाल्याचें राजाला निवेदन केलें.

तेव्हां धृतराष्ट्रानें आपला विद्वान् मुख्य मंत्री जो विदुर त्याला बोलावून म्हटलें—" हे विदुरा, तूं राजपुत्र युधिष्ठिराकडे जा व विविध सिंहासनें, शय्या-इत्यादिकांनीं युक्त असलेली ही रत्नजडित सभा पहाण्यासाठीं त्याला भ्रात्यां-सह घेऊन ये व 'येथें येऊन या सभेंत एकदा आपल्या सुहृदांबरोबर प्रेमानें द्यूतहि खेळा,' असें त्यांस माझ्या आज्ञेनें सांग. २. ९. ५६.

---

## अध्याय ५७ वा.

[ १ द्यूताविषयीं विदुराचा निषेध व धृतराष्ट्राचें दैवावलंबन. ]

( १ ) **वैशंपायन—हे पारिक्षिता, राजा धृतराष्ट्रानें ' दैव दुस्तर आहे' असें मानून पुत्राचें म्हणणें जरी मान्य केलें तरी विद्वद्वर विदुराला आल्याचें हें कृत्य** अत्यंत अन्यायाचें वाटलें. त्यानें त्याचें अभिनंदन केलें नाहीं. उलट तो त्याला म्हणाला—" हे नृपते, तुझें हें आज्ञावचन मला प्रशंसनीय वाटत नाहीं. तूं असें करूं नको. यापासून मला कुलक्षयाची भीति वाटते. हे नरेंद्रा, तुझे पुत्र भेददृष्टीनें पहात असल्यामुळें या द्यूताच्या योगानें त्यांचा व पांडवांचा निःसंशय कलह होईल. "

धृतराष्ट्र—हे धर्मज्ञा, दैव जर प्रतिकूल नसेल तर मला कलहाचें कांहींच कारण दिसत नाहीं. ब्रह्मदेवानें या सर्व सृष्टीला दैवाधीन करून ठेविलें आहे. ती स्वतंत्र नाहीं. पूर्वकर्मांच्या अनुसार ईश्वरच मनुष्याला शुभ अथवा अशुभ कर्मांत प्रवृत्त करितो. अंतर्यामीच्या प्रेरणेवांचून कोणतीहि जगच्चेष्टा होत नाहीं. याविषयीं "हा अंतर्यामीच ज्याचा या लोकांतून उद्धार करण्याची इच्छा करितो, त्याच्याकडून पुण्यकर्म करवितो आणि ज्याला अधोलोकीं नेण्याची इच्छा करितो, त्याच्याकडून पापकर्म करवितो." ही श्रुति[1] प्रमाण आहे. सर्व मनुष्यें दैवपरतंत्र आहेत, यास्तव हे विदुरा, तूं आतां त्या राजपुत्राकडे जा व अजिंक्य युधिष्ठिराला माझ्या आज्ञेनें सत्वर घेऊन ये. २. ९. ५७.

---

## अध्याय ५८ वा.

[ १ विदुराचें पांडवांकडे गमन. २ धृतराष्ट्राच्या आज्ञेनें युधिष्ठिराला द्यूताचें निमंत्रण. ३ त्याविषयीं त्या उभयतांचा संवाद. ४ पांडवांचें हस्तिनापुरास आगमन व सभाप्रवेश. ]

(१) **वैशंपायन—हे राजा, याप्रमाणें धृतराष्ट्रानें विदुराला या कार्यांत हठानें नियुक्त केलें असतां तो धर्मज्ञ विदुर अतिशय वेगवान् व जातिवंत अश्वांनीं युक्त असलेल्या रथांत बसून मार्गस्थ झाला. थोड्याच अवधींत तो महात्म्या धर्मराजाच्या नगरासमीप आला. त्या महाबुद्धिमान् विदुरानें त्रैवर्णिक स्तुति**

---

१ स एव साधु कर्म कारयति तं यं उन्निनीषते
स एवासाधु कर्म कारयति तं यं अधो निनीषते । कौ. ३८ सु. उ. पृ. ८८२

करीत असतां युधिष्ठिराच्या नगरींत प्रवेश केला आणि तो धर्मज्ञ क्षत्ता कुबेराच्या भुवनाप्रमाणें असलेल्या भव्य राजमंदिरांत धर्मपुत्र युधिष्ठिरापाशीं गेला. त्यावेळीं त्या सत्यनिष्ठ, अजातशत्रु धर्मराजानें महात्म्या विदुराची यथाविधि पूजा व सत्कार करून त्याला पुत्रांसह धृतराष्ट्राचें कुशल विचारिलें.

युधिष्ठिर म्हणाला—हे महात्म्या, आज तुझें चित्त प्रसन्न दिसत नाहीं, तूं आमचें हित करण्यासाठींच आला आहेस ना ! वृद्ध धृतराष्ट्राचे पुत्र त्याला अनुकूल आहेत ना व सर्व प्रजा त्याच्या आज्ञेंत वागते ना ?

विदुर—हे युधिष्ठिरा, धृतराष्ट्र राजा पुत्र व आप्तजन यांसह महात्म्या इंद्रासारखा कुशल आहे. हे राजा, तो पुत्राच्या लोकप्रसिद्ध गुणांनीं संतुष्ट झाला आहे. म्हणजे दुर्योधनादिकांच्या दुर्गुणाचेंच त्याला मोठें कौतुक वाटतें. तो महात्मा विनीत, विशोक व आत्मरति होऊन राहिला आहे. [ 1तो नीतीच्या विरुद्ध वागत असून दुर्योधन आपल्या इच्छेविरुद्ध वर्तन करीत असल्यामुळें फार कष्टी होत आहे. पुत्रलोभानें तो आपल्या उत्कर्षामध्येंच रत झाला आहे. धर्माकडे त्याची दृष्टि नाहीं. ] 'राजा, तुझें कुशल आहेना व तुझ्या कोशादिकांचा अस्थानीं व्यय झालेला नाहींना' असें तुला प्रथम विचारून घेऊन नंतर त्यानें तुला असें सांगावयास मला पाठविलें आहे.

"हे पुत्रा, तुझ्या सभेसारखीच आम्हीं एक सभा निर्माण केली आहे. यास्तव तूं येथें येऊन आपल्या भ्रात्यांची ही अपूर्व सभा पहा. हे पृथापुत्रा, दुर्योधनादि भ्रात्यांच्या सहवासांत राहून तूं त्यांच्याशीं सुहृद्-द्यूत कर. म्हणजे प्रेमभावानें द्यूत खेळ व यथेच्छ क्रीडा कर. तुझ्या समागमानें आम्हांला व येथें आलेल्या सर्व कौरवांनाहि मोठा संतोष होईल आणि येथें आल्यानें आम्हीं त्या सभेंत जे द्यूतकार नेमलेले आहेत, त्या सर्व धूर्तांना तूं एकत्र पहाशील."

(२) राजा, इतकें बोलून विदुर पुनः त्या पांडुपुत्रास म्हणाला—"युधिष्ठिरा, मी धृतराष्ट्राच्या आज्ञेनें तुला द्यूताचें आमंत्रण करावयास आलों आहें. यास्तव हे राजा, तूं त्याचा स्वीकार कर."

---

१ विदुर धर्मराजाशीं इतर लोकांसमक्ष बोलत असल्यामुळें त्यानें या आपल्या वाक्यांत गुण, विनीत, विशोक व आत्मरति हे शब्द द्व्यर्थी योजिले आहेत. युधिष्ठिर अर्थज्ञ असल्यामुळें त्यानें त्यांतील गूढ अर्थ जाणला. तोच आम्हीं कंसांत दिला आहे.

विदुराचें हें भाषण ऐकून युधिष्ठिर म्हणाला—हे पूज्य विदुरा, द्यूतामध्यें कलह अवश्य होतो, द्यूतांतील दोष जाणणारा कोणता विवेकी मनुष्य तें करावयास तयार होईल ! आम्हां पांडवांतील कोणालाहि तें आवडणें शक्य नाहीं. हे क्षत्त्या, तुला काय वाटतें ? आम्हीं द्यूत खेळावें हें तुला तरी मान्य आहे का ? आम्ही सर्व पांडव तुझ्या वचनांत स्थित आहोंत.

युधिष्ठिराचें हें विचारपूर्ण वचन ऐकून विदुर त्यास म्हणाला—हे धर्मराजा, द्यूत सर्व अनर्थांचें मूळ आहे, हें मी जाणतों व धृतराष्ट्राचें द्यूतापासून निवारण करण्याचा मीं पुष्कळ यत्नहि केला. पण तो निष्फळ होऊन राजानें मला आग्रहानें तुजकडे पाठविलें. युधिष्ठिरा, तूं विद्वान् आहेस, यास्तव त्या प्रज्ञाचक्षूचें हें वचन ऐकून यांत तुला जें श्रेयस्कर वाटेल, तेंच या प्रसंगीं कर.

(३) युधिष्ठिर—विदुरा, राजा धृतराष्ट्राच्या पुत्रांशिवाय तेथें आणखीं कोण कोण द्यूतकार जमले आहेत ? ज्यांच्याशीं असंख्य द्रव्याचा पण लावून आम्हांला खेळावयाचें आहे, त्यांचीं नांवें तूं आम्हांला सांग.

विदुर—हे युधिष्ठिरा, गांधारराज शकुनि, हा मुख्य द्यूतकार तेथें आहे. तो 'अतिदेवी'[1] म्हणजे मर्यादेचें उल्लंघन करून द्यूत खेळणारा आहे. त्यामुळें तो द्यूतामध्यें तुमचे देह, भार्या, धन, इत्यादि सर्वांचा पण लावील. तसाच तो 'कृतहस्त' म्ह० आपल्या इच्छेप्रमाणें फांसे टाकण्यांत अति निपुण आहे. कारण त्याला अक्षविद्येचें तत्त्व पूर्णपणें अवगत आहे. त्याचप्रमाणें विविंशति, चित्रसेन, राजा सत्यव्रत, पुरुमित्र व जय हे त्या सभेंत द्यूतकार आहेत.

युधिष्ठिर—हे विदुरा, तर मग त्या सभेंत कपटाचा पुरस्कार करणारेच महा भयंकर द्यूतकर जमले आहेत, यांत संशय नाहीं. हें सर्व जगत् दैवाधीन आहे. खरोखर तें स्वतंत्र नाहीं. हे विद्वन्, मी धृतराष्ट्राच्या आज्ञेनें द्यूतासाठीं तेथें येऊं इच्छीत नाहीं. पण त्यानें आज्ञा केल्यास मी त्यापासून निवृत्तहि

---

१ 'अतिदेवी' व 'कृतहस्तः' अशीं दोन पदें मानून वर अर्थ केला आहे. पण 'अतिदेवीकृतहस्तः' असें एक पद मानिल्यास त्याचा अर्थ असा—देवी म्ह० महिषी द्रौपदी, तिच्याविषयीं ज्यानें आपला हात व्यापारयुक्त केला आहे, तो देवीकृतहस्तः, तिचा अभिलाष करणारे जे दुर्योधनादि त्यांचेंहि ज्यानें उल्लंघन केलें आहे, तो 'अतिदेवीकृतहस्तः' दुर्योधनादिक द्रौपदीचें हरण करण्याची नुस्ती इच्छाच करितात; पण हा द्यूतानें तिचें हरण करणारा आहे, असा याचा भावार्थ.

होणार नाहीं. कारण पिता पुत्राला सर्वदाच इष्ट आहे. तूंहि आमचा पिताच आहेस, यास्तव तूं जसें सांगशील तसें मी करीन. धृतराष्ट्रानें मला जिंकण्यासाठींच जर सभेमध्यें बोलिवलें नसेल तर मी शकुनीबरोबरहि द्यूत करीन. कारण युद्ध व द्यूत यांसाठीं कोणीं आह्वान केल्यास त्यापासून निवृत्त व्हावयाचें नाहीं, हें माझें शाश्वत व्रत आहे.

(४) राजा जनमेजया, विदुराला असें बोलून धर्मराजानें धन, स्त्रिया इत्यादिकांसह प्रवास करण्यास उपयुक्त असलेलें वाहनादि सर्व उपकरण सत्वर सज्ज करण्याची आज्ञा केली व दुसऱ्या दिवशीं तो महात्मा आपले भ्राते, मुख्य अमात्य, सर्व सेवक व स्त्रिया यांसह द्रौपदीला कृतांताचें मुख करून हस्तिनापुराकडे जावयास निघाला. पण 'द्यूत कुलक्षयाला कारण होणारें आहे' हें जाणणारेहि पांडव त्यासाठीं कसे निघाले?' म्हणून म्हणशील तर, राजा, वीज चमकतांच नेत्र जसे दीपतात त्याप्रमाणें दैव पुरुषाच्या प्रज्ञेचें हरण करितें. पाशांनीं बद्ध केल्याप्रमाणें पुरुष दैवाधीन होतो, असा नियम आहे.

राजा, युधिष्ठिरहि हें सर्व जाणूनच, धृतराष्ट्राचें आह्वान नाकारतां न आल्यामुळें, विदुरासह कौरवांच्या राजधानीकडे जावयास निघाला. शत्रुनाशक धर्मराज आपल्या भ्रात्यांसह वाल्हिकदेशांतील अश्व जोडलेल्या रथांत बसून निघाला. धृतराष्ट्रानें कालाच्या संकेतामुळेंच ज्याला द्यूताचें आह्वान केलें आहे, असा तो भ्रातृपरिवेष्टित पांडवश्रेष्ठ ब्राह्मणांना पुढें करून जाऊं लागला असतां, आपल्या राजैश्वर्यानें अतिशय शोभला. हस्तिनापुरास गेल्यावर तो प्रथम धृतराष्ट्राच्या मंदिरांत प्रवेश करून त्यास भेटला. त्यानंतर त्या धर्मात्म्या पांडवानें भीष्म, द्रोण, कर्ण, कृप, अश्वत्थामा, सोमदत्त, दुर्योधन, शकुनि, दुःशासन, जयद्रथ व त्यांच्या पूर्वींच दुसरेहि जे राजे तेथें आले होते, त्या सर्वांकडे जाऊन त्यांची यथान्याय भेट घेतली. त्या महात्म्यानें श्रेष्ठांचा योग्य सत्कार केला.

त्यानंतर आपल्या भ्रात्यांसह त्या पराक्रमी युधिष्ठिरानें बुद्धिमान् धृतराष्ट्राच्या अंतःपुरांत प्रवेश केला. तेथें त्यानें सर्वप्रकारें पतीला अनुसरणाऱ्या देवी गांधारीचें दर्शन घेतलें. त्यावेळीं स्नुषांनीं परिवेष्टित झालेली गांधारी अश्विन्यादि नक्षत्रांनीं परिवेष्टित झालेल्या रोहिणीप्रमाणें त्याला दिसली. तिला अभिवादन केलें असतां, त्या साध्वीनेंहि त्याचें अभिनंदन केलें. त्यानंतर तो

१ दैवं हि प्रज्ञां मुष्णाति चक्षुस्तेज इवापतत् ।
धातुश्च वशमन्वेति पाशैरिव नरः सितः ॥

आजमीढ युधिष्ठिर वृद्ध प्रज्ञाचक्षूराजाला पुनः भेटला. तेव्हां त्यानेंहि युधिष्ठिराच्या मस्तकाचें अवघ्राण करून भीमप्रभृति चारी भ्रात्यांचें अभिनंदन केलें.

हे राजा, त्या प्रियदर्शन पुरुषश्रेष्ठ पांडवांना पाहून भीष्म-विदुरप्रभृति कौरवांना परम समाधान वाटलें; नंतर धृतराष्ट्राच्या आज्ञेनें ते वीर अनेक उत्कृष्ट वस्तूंनीं युक्त असलेल्या गृहांत जाऊन राहिले. द्रौपदीप्रभृति स्त्रियांसह राजमंदिरांत येऊन राहिलेल्या त्या वीरांस व द्रौपदीच्या देदीप्यमान परम ऋद्धीस पाहून धृतराष्ट्राच्या स्नुषांना तिचा हेवा वाटला.

त्यानंतर ते पुरुषश्रेष्ठ स्त्रियांसह कांहीं वेळ बोलत बसले. त्यांनीं व्यायामादि आपलीं नित्य कर्में केलीं. स्त्रियांनींहि आपली वेणी-फणी केली. पांडवांनीं आपलें सर्व आह्निक उरकून घेतलें. ते दिव्य चंदनानें भूषित झाले. त्यांनीं शुद्धान्तःकरणानें ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन करविलें, सुग्रास भोजन केलें व ते आपापल्या शयनगृहांत गेले. तेथें त्यांच्या रंजनासाठीं स्त्रिया गायन करीत होत्या. तें ऐकत कांहीं वेळ ते वीर आपल्या शय्येवर पडून राहिले व स्त्रियांच्या सहवासांत त्यांनीं ती शुभ रात्र सुखानें घालविली.

उषःकालीं वैतालिक स्तुतिपाठ करूं लागले असतां ते पांडववीर पूर्ण विश्रांति घेऊन उठले. याप्रमाणें ती रात्र मोठ्या सुखांत घालवून प्रातःकालीं पांची पांडवांनीं आपापलें आह्निक केलें व ते वीर धृतराष्ट्राच्या नूतन रम्य सभेंत गेले असतां सर्व द्यूतकारांनीं त्यांचें अभिनंदन केलें. २. ९. ५८.

---

## अध्याय ५९ वा.

[ १ पांडवांचा सभेंत प्रवेश व शकुनीचें युधिष्ठिरास द्यूतासाठीं आह्वान. २ युधिष्ठिर व शकुनि यांचा संवाद. ३ दैवावर भार टाकून युधिष्ठिराची द्यूतांत प्रवृत्ति. ]

( १ ) **वैशंपायन**—हे जनमेजया, युधिष्ठिरादि पार्थ त्या सभेंत गेले. ते तेथील सर्व राजांना भेटले. त्यांत जे पूजार्ह होते, त्यांची त्यांनीं पूजा केली. वयोमानाप्रमाणें वृद्धांस नमस्कार करून व कनिष्ठांस आशीर्वाद देऊन ते आपल्या योग्यतेप्रमाणें बसले. त्या सभेंत विचित्र, प्रेक्षणीय व आच्छादनांनीं युक्त अशीं आसनें मांडलीं होतीं. त्यांवर ते महात्मे पांडव व इतर सर्व राजे बसले असतां सौबल शकुनि युधिष्ठिरास म्हणाला—" हे राजा, या सभेमध्यें

द्यूतासाठीं पट पसरलेला आहे व आम्हीं सर्व जणांनीं तुझ्याशीं द्यूत करण्याचा संकेत केला आहे. यास्तव हे युधिष्ठिरा, तूं फांसे टाकून द्यूत खेळण्याचा संकल्प कर."

( २ ) **युधिष्ठिर** म्हणाला—शकुने, द्यूत पापाचें कारण आहे व ती केवल वंचना आहे, त्यांत क्षत्रियांचा पराक्रम कांहींच नाहीं. कारण त्यांत नीति मुळींच नसते. द्यूतामध्यें सत्याचा लेशहि नसतो. असें असतांना तूं त्याची प्रशंसा कां करितोस! द्यूतकार नेहमीं शाठ्याचा अवलंब करितो. त्यामुळें त्याची कृति प्रामाणिक आहे, असें कोणी मानीत नाहीं. यास्तव हे सौबला, तूं एखाद्या हीन पुरुषाप्रमाणें अमार्गानें आम्हांला जिंकण्याची इच्छा करूं नको.

**शकुनि** म्हणाला—ज्याला जय व पराजय यांचें रहस्य माहीत असतें व प्रतिपक्षी कपट करूं लागला असतां आपण काय करावें, हेंहि ज्याला अवगत असतें तो द्यूतकार फांसे कसेहि जरी पडले तरी खिन्न होत नाहीं. जो महा-बुद्धिमान् पुरुष आपला जय होईल. असाच पण करून पराजयावह पणाचा प्रतिकार कसा करावा हें जाणतो तोच द्यूतज्ञ होय व तोच द्यूतकर्मामध्यें सर्व कांहीं करण्यास समर्थ असतो. द्यूत हें पाप आहे, असें तूं समजतोस, पण वस्तुतः तें पाप नाहीं. कारण जय व पराजय फांशाच्या अधीन असतो. फांसा अनुकूल किंवा प्रतिकूल पडणें दैवाधीन आहे. द्यूत करणाऱ्या आम्हां उभयतां पैकीं ज्याला तो प्रतिकूल पडेल त्याचा पराभव होईल. त्यांत स्वेच्छेनें कपट करणें शक्यच नाहीं. यांत जर कोणाचा दोष असला तर तो दैवाचा व फांशाचा आहे. यास्तव हे राजा, तूं साशंक होऊं नकोस, आपण द्यूत खेळूं या. तूं आपलें कोणतें द्रव्य पणाला लावतोस तें सांग. आतां व्यर्थ विलंब लावूं नको.

**युधिष्ठिर** म्हणाला—मुनिश्रेष्ठ असित देवल स्वर्ग व मोक्ष प्राप्त करून देणाऱ्या कर्म-ज्ञानादि लोकद्वारांतून नित्य संचार करितो. त्यानें याविषयीं असें सांगितलें आहे. शत्रूंचा पराभव करण्याचे दोन उपाय आहेत. एक फांशांनीं द्यूत करणें व दुसरें शस्त्रांनीं युद्ध करणें. त्यांतील कपटी द्यूतकारांशीं द्यूत करणें अत्यंत निंद्य व पापकारण आहे. युद्धांत धर्मानें शत्रूला जिंकणें स्तुत्य असून तें धर्मकारण आहे. यास्तव युद्ध हा शत्रुविजयाचा श्रेष्ठ उपाय असून द्यूत हा अतिहीन उपाय आहे. आर्यलोक आपल्या वाणीनें कधीं अपशब्द बोलत

नाहींत व कोणतेंहि कपटाचरण करीत नाहींत. यास्तव कपट व शाठ्य यांनीं रहित असलेलें युद्ध हेंच सत्पुरुषाचें व्रत आहे.

बा शकुने, यथाशक्ति ब्राह्मणांना देण्यासाठीं व त्यांच्यापासून विद्या संपादन करण्यासाठीं आम्ही धन संपादन करण्याचा यत्न करीत आहों. तें आमचें वित्त तूं कपट द्यूत करून हरण करण्याची इच्छा करूं नकोस. आम्ही वस्तुतः तुझे शत्रु नाहीं. पण तूं जरी आम्हांला शत्रु मानीत असलास, तरी आम्हांकडून सर्वस्वाचा पण करवून त्याचा अपहार करण्यासाठीं तूं असें अतिद्यूत करूं नको. द्यूतांतील जय किंवा पराजय फाशांच्या अधीन आहे व तो दोन्ही पक्षीं समान आहे, हें तुझें म्हणणें जरी खरें असलें, तरी मी असल्या नीच कर्मानें धन किंवा सुख मिळविण्याची कधींच इच्छा करीत नाहीं. विद्वान् लोक द्यूतकाराच्या या कृतीची कधींच प्रशंसा करीत नाहींत.

शकुनि म्हणाला—युधिष्ठिरा, एक श्रोत्रिय दुसऱ्या श्रोत्रियापाशीं त्याला जिंकण्याच्या इच्छेनेंच जातो व विद्वान् अविद्वानास जिंकण्याची इच्छा करितो. पण लोक[1] त्यांच्या कृतीला नीच कर्म म्हणत नाहींत. युधिष्ठिरा, त्याच न्यायानें द्यूतकलेंत निष्णात असलेला पुरुष विजयाच्या इच्छेनेंच दुसऱ्याला आह्वान करितो. विद्वान् अविद्वानाला, अस्त्रज्ञ अकृतास्त्रज्ञाला, बलवान् दुर्बलाला, असेंच आह्वान करीत असतो. पुरुष सर्व कर्मांमध्यें विजयेच्छेनेंच प्रवृत्त होतो. परंतु तूं माझ्या समोर येऊन माझ्याशीं द्यूत करणें याला जर निंद्य कर्म समजत असशील व तुला माझें भय वाटत असेल, तर तूं माझ्या आह्वानाचा अव्हेर करून द्यूतापासून निवृत्त हो.

( ३ ) युधिष्ठिर म्हणाला—मला युद्ध व द्यूत यांसाठीं कोणीं आह्वान केलें असतां त्यापासून निवृत्त व्हावयाचें नाहीं, हें माझें अढळ व्रत आहे. हे राजा, सर्व जीवांचा प्रेरक अंतर्यामी बलाढ्य आहे. मी दैवाधीन होऊन राहिलों आहें.

---

१ 'बहूनिमे अकृता कर्त्वा नियुध्यै त्वेन संत्वेन पृच्छै' असा मंत्र असून, त्यांत युद्धानें किंवा वादानें दुसऱ्याला जिंकण्याची इच्छा करणें हें नीच कर्मच आहे, असें म्हटलें आहे. तथापि व्यावहारिक लोक विजयाच्या इच्छेनें शत्रूपाशीं जाणें याला नीच कर्म म्हणत नाहींत. प्रस्तुत श्रुति विरक्त पुरुषासाठीं आहे. आमच्या सारख्या व्यावहारिकांसाठीं नाहीं.

या समागमामध्यें माझें द्यूत कोणाशीं होणार व मीं जिंकलेल्या पणाची हमी घेणारा दुसरा कोण आहे, तें मला सांग व मग द्यूत सुरू होऊं दे.

**दुर्योधन** म्हणाला—हे भूपते, द्यूतांत जिंकलेलीं रत्नें व धन देणारा मी आहें व माझ्यासाठीं द्यूत खेळणारा हा माझा मातुल शकुनि आहे.

**युधिष्ठिर** म्हणाला—राजा, एकानें दुसऱ्यासाठीं द्यूत करणें योग्य नाहीं, असें मला वाटतें. यास्तव तूं चांगला विचार कर आणि मग हें निंद्य द्यूत प्रवृत्त कर. २. ९. ५९.

---

## अध्याय ६० वा.

[ १ युधिष्ठिराचा पहिला डाव व त्यांत त्याचा पराभव. ]

(१) **वैशंपायन** म्हणाला—राजा जनमेजया, याप्रमाणें द्यूत सुरू होण्याची वेळ येऊन ठेपली असतां राजा धृतराष्ट्र व त्याच्या मागोमाग इतर सर्व राजे त्या सभेंत आले. हे भारता, भीष्म, द्रोण, कृप व महाबुद्धिमान् विदुर अतिशय अप्रसन्न मनानेंच राजाबरोबर तेथें आले व सिंहाप्रमाणें ज्यांची मान आहे, असे ते बलाढ्य वीर अनेक विचित्र सिंहासनांवर बसले. त्यांतील कित्येक पृथक् पृथक् बसले व कित्येक जोडी-जोडीनें एकेका सिंहासनावर आरूढ झाले. हे राजा, महाभाग देव एकत्र बसले असतां स्वर्गलोक जसा शोभतो, त्याप्रमाणें त्या सभेंत एकत्र बसलेल्या राजांच्या योगानें ती नूतन सभा शोभली. कारण ते सर्व राजे वेदवेत्ते, शूर व अतिशय तेजस्वी होते. त्यानंतर हे महाराजा, तें सुहृद्-द्यूत सुरू झालें.

**युधिष्ठिर** म्हणाला—हे राजा, सागराच्या भोंवऱ्यामध्यें उत्पन्न झालेला महा मूल्यवान् मणि ज्यामध्यें आहे, असा हा सुवर्णाचा कांतिमान् व अमूल्य उत्तम हार आहे. हे राजा, हें माझें पणाला लावलेलें धन आहे. तूं याच्या जोडीला कोणतें धन लावून खेळणार आहेस, तें मला सांग.

---

१ शकुनीचें धन परिमित होतें. यास्तव 'माझ्या सारखा दुसरा कोणता धनाढ्य राजा मजबरोबर पण लावण्यास तयार आहे?' असा या प्रश्नांत युधिष्ठिराचा आशय आहे.

**दुर्योधन** म्हणाला—युधिष्ठिरा, माझ्यापाशीं असंख्य रत्नें व विपुल धनहि आहे व तूं लावलेल्या पणाचें मूल्य कमी आहे, इत्यादि दोषबुद्धिहि माझ्या ठिकाणीं नाहीं. यास्तव तूं आतां मीं लावलेला हा पण जिंक.

**वैशंपायन** म्हणाला—जनमेजया, याप्रमाणें त्या दोघांनीं आपापले पण लाविले असतां द्यूतविद्येंत प्रवीण असलेल्या शकुनीनें हातांत फांसे घेतले व ते टाकून 'राजा, हा पहा तुझा हार मीं जिंकून घेतला' एवढेंच तो युधिष्ठिरास बोलला. २. ९. ६०.

---

## अध्याय ६१ वा.

[ १ युधिष्ठिरानें पणास लावलेल्या विविध वस्तु व त्यांचा शकुनीनें कपटद्यूतानें केलेला अपहार. ]

( १ ) **युधिष्ठिर** म्हणाला—हे मत्त शकुने, ज्या अर्थीं तूं मला या द्यूतांत केवल कपटानेंच जिंकिलें आहेस, त्या अर्थीं पण लावून परस्परांस जिंकण्यासाठीं आपण पुनः द्यूत खेळूं या. मजपाशीं 'सुवर्ण-'संज्ञक निष्कांनीं भरलेल्या अनेक पेट्या आहेत. प्रत्येक पेटींत एक सहस्र निष्क ठेवलेले आहेत. तसाच सुवर्ण व रौप्य यांचा मोठा खजिना आहे, तें सर्व धन पणास लावून मी आज तुझ्याशीं खेळतों.

राजा, युधिष्ठिराच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतांच शकुनीनें आपले कृत्रिम फांसे भूमीवर टाकले आणि भरतकुलवर्धन व आपल्या वचनापासून कधींहि न ढळणारा, असा जो ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर त्यास 'हे राजा, मीं तुझें हें सर्व धन जिंकून घेतलें आहे, पहा,' असें म्हटलें. तेव्हां पराभव झाल्यामुळें क्रुद्ध झालेला युधिष्ठिर त्यास पुनः म्हणाला—हे शकुने, तूं कपटद्यूत करीत आहेस, तथापि मी पुनः माझा सहस्र रथांच्या तोडीचा एकच रथ पणाला लावतों, तो व्याघ्रचर्मानें मढविलेला असून सर्वलोकप्रसिद्ध आहे. त्याचीं चक्रादि उपांगें उत्कृष्ट असून त्या चमकणाऱ्या सुंदर रथाला सुवर्णाच्या घागऱ्यांनीं मंडित केलें आहे. त्याचा ध्वनि मेघगर्जनेसारखा गंभीर असून त्या राजरथांत बसूनच आम्ही येथें आलों. हा श्रेष्ठ रथ विजयी आहे. त्याला सर्व राष्ट्रांना संमत असलेले व कुरर-पक्ष्याच्या रंगाचे आठ सदश्व जोडले जातात. पायांनीं भूमीवरून चालणारा एखादा प्राणी कितीहि जरी वेगवान् असला, तरी हे

अश्व मला एका क्षणांत त्याच्या पुढें घेऊन जातात, इतकेंच नव्हे, तर तो प्राणी वेगानें जाणाऱ्या या अश्वांच्या पायांखालीं तुडविला जातो. हे सौबला, हेंच धन पणास लावून मी तुझ्याशीं खेळतों.

राजा जनमेजया, युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून कपटाचाच आश्रय केल्यामुळें स्वतःच्या विजयाविषयीं निश्चित असलेला तो शठ शकुनि फांसे टाकतांनाच 'हें पहा, मीं तुझें धन जिंकिलें.' असें युधिष्ठिरास बोलला. शकुनीला अनुकूल फांसा पडला, हें पाहून युधिष्ठिर ईर्ष्येनें त्याला म्हणाला—"हे शकुने, मी आपल्या एक लक्ष तरुण दासी पणास लावितों. त्यांनीं सुवर्णाचीं मंगलसूत्रादि आभरणें धारण केलेलीं असून त्या हातांत शंखवलयें, वक्षःस्थलीं निष्क, गळ्यांत रत्नजडित सुवर्णमाला, मूल्यवान् वस्त्रें व चंदनाची उटी यांनीं सर्वदा भूपित झालेल्या असतात. त्या चौसष्ट कलांमध्यें विशारद असून आमची सेवा करण्यांत अतिशय दक्ष आहेत. नृत्य व गायन या कलांमध्यें तर त्या अत्यंत प्रवीण आहेत. माझ्या आज्ञेनें त्या स्नातक, अमात्य व राजे यांची पादप्रक्षालनादि शुश्रूषा करीत असतात. राजा, माझें हें दासीरूप धन पणास लावून मी आतां तुझ्याशीं खेळतों.

जनमेजया, युधिष्ठिराचे हे शब्द कांनीं पडतांच कपटपटु शकुनीनें लगेच फांसे टाकिले व 'हे महाराज, तुझें दासीरूप सर्व धन मीं हरण केलें आहे, पहा.' असें त्यास म्हटलें; तेव्हां युधिष्ठिर म्हणाला—"राजा, या दासींच्या इतकेच माझे दासहि आहेत. ते नेहमीं दक्ष, अनुकूल आचरण करणारे, सर्वदा रेशमीं वस्त्रें परिधान करणारे, बुद्धिमान् धारणाशक्तीनें युक्त, दमनशील, तरुण, रत्नजडित सुवर्णकुंडलें धारण करणारे व अहोरात्र हातांत पात्रें घेऊन अतिथींना भोजन घालणारे आहेत. राजा, हें माझें दासरूप धन मी पणास लावितों."

परिक्षिता, युधिष्ठिराचा तो पण ऐकून कपटानेंच द्यूत खेळणाऱ्या शकुनीनें मोठ्या त्वेषानेंच हातांतील फांसे भूमीवर टाकून 'युधिष्ठिरा, तुझें दासरूप धन मीं जिंकून घेतलें आहे, आतां कोणता पण लावतोस बोल.' असें म्हटलें. तें ऐकून युधिष्ठिर पुनः म्हणाला—"हे सौबला, मजपाशीं एक सहस्त्र मदोन्मत्त गज आहेत. त्यांच्या गळ्यांतील शृंखला सुवर्णाच्या असून, ते सर्वहि विविध गजभूषणांनीं भूषित केलेले आहेत. त्यांच्या गंडस्थलावर कमलचिह्नें आहेत. त्यांच्या गळ्यांत सुवर्णमाला आहेत. त्यांना उत्तम शिक्षण दिलेलें असून ते राजांनाच आपल्या पाठीवर वहातात. ते युद्धामध्यें सर्व प्रकारचे घोर शब्द

सहन करूं शकतात. त्यांचे दांत नांगराच्या दांड्याप्रमाणें दीर्घ असून, त्यांचीं शरीरें पर्वतप्राय विशाल आहेत. त्यांतील एकेका हत्तीबरोबर आठ आठ हत्तिणी असतात. ते सर्वहि शत्रूंच्या नगरांचा विध्वंस करणारे आहेत व ते दुरून सजल मेघांसारखे दिसतात. हे राजा, मी माझें हें धन पणास लावितों."

हे पांडवेया, तें ऐकून सुबलपुत्र हंसत हंसत फांसे टाकून 'युधिष्ठिरा, तुझें हेंहि धन मीं जिकलें आहे. तुला खोटें वाटत असेल तर फांशाकडे पहा' असें बोलला. त्यावर युधिष्ठिर म्हणाला—"राजा, माझे एक सहस्र रथ आहेत. त्यांचे ध्वजदंड सुवर्णाचे असून त्यांवर सुंदर पताका फडकत असतात. ते सर्वहि दान्त अश्वांनीं युक्त असून विचित्र युद्ध करणारे रथी त्यांत बसत असतात. त्यांतील प्रत्येक रथी वीराला युद्धप्रसंगीं किंवा युद्धाचा प्रसंग नसतांनाहि एक सहस्र सुवर्ण हें मासिक वेतन मिळत असतें. हे राजा, हें माझें धन मी आज पणास लावितों."

हे राजन्, युधिष्ठिराच्या मुखांतून हें वचन बाहेर पडतांच त्याचा दुरात्मा वैरी शकुनि 'ठीक आहे, तुझें हेंहि धन मीं जिंकलें आहे' असें फांसे टाकून बोलला. तेव्हां युधिष्ठिर म्हणाला—"युद्धामध्यें पराभूत झालेल्या चित्ररथ गंधर्वानें संतुष्ट होऊन या माझ्या प्रिय गांडीवधन्व्याला प्रीतिपूर्वक जे सुवर्णालंकारांनीं भूषित केलेले तित्तिरपक्ष्याच्या वर्णाचे गांधर्व अश्व दिले आहेत, तेच आतां पणास लावून मी तुझ्याशीं द्यूत करितों."

हे परिक्षित्पुत्रा, युधिष्ठिराचा हा पण ऐकून ज्यानें कपटानेंच त्याला जिंकण्याचा निश्चय केला आहे, असा दुरात्मा शकुनि 'राजा, तुझे ते गांधर्व अश्व मीं जिंकून घेतले आहेत,' असें मोठ्या गर्वानें बोलला. तेव्हां युधिष्ठिर म्हणाला—"मजपाशीं दहा सहस्र श्रेष्ठ रथ व शकट आहेत. त्याला उच्च-नीच अश्व व वृषभ सतत जोडलेले असतात. त्याचप्रमाणें प्रत्येक जातींतील उत्तम उत्तम पुरुष निवडून हजारों वीरांचा एकेक असे अनेक योधसमूह सज्ज करून ठेवलेले आहेत. ते सर्व महावीर उत्साही व पराक्रमी असून नित्य विपुल दुग्धपान करून शाल्योदन भक्षण करितात आणि माझ्या आज्ञेप्रमाणें नित्य व्यायाम करितात. त्या सर्वांचीं वक्षःस्थळें विस्तीर्ण असून त्यांची संख्या साठ सहस्र आहे. हे शकुने, हें माझें विपुल धन पणास लावून मी तुझ्याशीं द्यूत खेळतों."

हे भारता, युधिष्ठिराचें हें पणवचन ऐकून पापाची भीति न बाळगितां केवळ कपटच करण्यांत प्रवृत्त झालेल्या शकुनीनें भूमीवर फांसे टाकिले व 'बा युधिष्ठिरा, तुझ्या दुर्दैवामुळें व माझ्या सुदैवानें मला हें सर्व धन प्राप्त झालें आहे पहा' असें म्हटलें.

तें ऐकून युधिष्ठिर म्हणाला—शकुने, माझे चारशें निधि आहेत, तांब्याच्या व लोखंडाच्या मंजूषांतून त्यांचा संग्रह केलेला आहे. त्यांवर माझी नाममुद्रा केलेली असून त्यांतील प्रत्येकामध्यें उत्कृष्ट प्रतीचें अडीच मण सुवर्ण ठेविलेलें आहे. हा माझा अमूल्य निधि माझें धन म्हणून मी आतां पणास लावितों.

राजा, वंचना करण्यांत प्रवीण असलेल्या त्या सुबलपुत्रानें मोठ्या उत्साहानें फांसे टाकून 'हेंहि तुझें धन मीं जिंकून घेतलें आहे' असें युधिष्ठिरास म्हटलें. २. ९. ६१.

---

## अध्याय ६२ वा.

[ १ विदुराचा सदुपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, पांडवांच्या सर्वस्वाचा अपहार करणारें असें द्यूत प्रवृत्त झालें असतां सर्व संशयांचा छेद करणारा विदुर धृतराष्ट्रास म्हणाला—" हे महाराजा, मी तुला काय सांगतों, तें ऐक. मरणोन्मुख झालेल्या मनुष्याला औषध जसें रुचत नाहीं, त्याप्रमाणें माझें भाषण या वेळीं तुला आवडणार नाहीं. तथापि माझें कर्तव्य म्हणून मी तें तुला सांगतों. लक्ष देऊन ऐक. हा दुर्योधन पूर्वी जेव्हां जन्मास आला, त्या वेळीं कोल्ह्याप्रमाणें कर्कश ध्वनीनें रडूं लागला. देवांनीं या पापी दुर्योधनाला तुमच्या नाशाचें कारण होण्यासाठीं या लोकीं पाठविलें आहे. हा भरतवंशजांच्या कुलाचा नाश करणारा आहे. राजा, तूं अविवेकामुळें दुर्योधनाच्या रूपानें तुझ्या गृहांत रहाणाऱ्या या कोल्ह्याला ओळखीत नाहींस. पण हे प्रभो, शुक्राची ही नीतियुक्त वाणी ऐकून ठेव. मध विकून त्यावर उपजीविका करणारा पुरुष पर्वतावर मधाचें पोळें लागलेलें पाहून त्यावरच लुब्ध होतो, त्यामुळें त्याच्या खालीं तुटलेला

---

१ मधु वै माध्विको लब्ध्वा प्रपातं नैव बुध्यते । आरुह्य तं मज्जति वा पतनं चाधिगच्छति ॥

कडा किती खोल आहे, इकडे त्याचें लक्षहि जात नाहीं. तो त्या पोळ्यापर्यंत वर चढून गेल्यावर तें आपल्या हातीं लागावें म्हणून यत्न करूं लागतो आणि शेवटीं अनवधानानें त्या भयंकर दरींत पडून मरून जातो. त्याप्रमाणें हा तुझा पुत्र अक्षद्यूतानें मत्त झाला आहे. जसा एखादा पुरुष मद्य पिऊन विवेकहीन बनतो त्याप्रमाणें हा विवेकभ्रष्ट झाला आहे. महारथ पार्थाशीं वैर करून पुढें केवढा अनर्थ ओढवेल, याचें त्याला भान नाहींसें झालें आहे.

हे बुद्धिमान् राजा, पूर्वी सगरानें पौरांच्या हितासाठीं आपल्या असमंजस-नांवाच्या पुत्राचा त्याग केला, हें सर्वांना विदित आहे. भोज-देशांतील एका राजानें आपल्या अशाच दुर्वृत्त पुत्राचा त्याग केल्याचें मला माहित आहे. अंधक, यादव व भोज या सर्वांनीं एकमतानें कंसाचा त्याग केला. पुढें दैवयोगानें शत्रुनाशक कृष्णानें त्याला मारिलें. तेव्हां त्याच्या ज्ञातीचे शंभर लोक मोठ्या आनंदांत राहिले. त्याचप्रमाणें हे राजा, तुझ्या आज्ञेनें हा सव्यसाची सुयोधनाचा निग्रह करो व या पापी दुर्योधनाच्या निग्रहानेंच सर्व कौरव सुखानें नांदोत.

हे महाराज, हा काक देऊन तूं या मयूरांना विकत घे. किंवा हे भूपाला, या कोल्ह्याला देऊन तूं पांच पांडवरूपी सिंह विकत घे. हे राजा, तूं शोक-सागरांत बुडूं नको. सर्वज्ञ व सर्व प्राण्यांचा आशय जाणणारा काव्य शुक्र जंभदैत्याचा त्याग करण्यासाठीं महासुरांस म्हणाला—“हे असुरांनो, हा जंभ स्वकीयांचा व परकीयांचाहि भयंकर शत्रु आहे आणि ‘कुलाच्या रक्षणासाठीं एका कुपुरुषाचा त्याग करावा. ग्रामाच्या रक्षणासाठीं त्यांतील एका कुलाचा त्याग करावा. देशाच्या रक्षणासाठीं एका ग्रामाचा त्याग करावा व स्वसंरक्षणा-साठीं पृथ्वीचाहि त्याग करावा.’ (आदिपर्व अ. ११५ पृ. ३२५) अशी नीति आहे. यास्तव तिला अनुसरून तुम्ही या जंभाचा त्याग करा.”

हे राजा, अरण्यांत एका जातीचे पक्षी रहातात, ते आपल्या मुखांतून सुवर्ण टाकीत असतात. ते एकदा दैववशात् एका मनुष्याच्या घरीं येऊन राहिले व प्रत्यहीं थोडें थोडें सोनें मुखांतून टाकूं लागले. पण तेवढ्यानें संतुष्ट न होऊन त्या सुवर्णलोभी पुरुषानें त्यांच्या उदरांतील सुवर्णाच्या व मांसाच्या लोभानें त्या पक्ष्यांना मारिलें. त्यामुळें उपभोग व लोभ, यांनीं अंध झालेल्या त्या द्रव्यलोलुप पुरुषानें उपकार करणाऱ्या पक्ष्यांच्या हिंसेनें स्वतःच्या परलोकाचाहि नाश केला व तो या लोकीं अनायासानें प्राप्त होणाऱ्या धनालाहि मुकला.

हे धृतराष्ट्रा, तूंहि त्या अविवेकी मनुष्याप्रमाणेंच धनाचा लोभ करीत आहेस. पण तूं पांडवांशीं असा द्रोह करूं नको. पक्ष्यांचा नाश करणाऱ्या त्या मूढ पुरुषाप्रमाणें तुलहि मागून पश्चात्ताप होईल. माळी उद्यानांतील लतेवर प्रत्यहीं फुलणाऱ्या पुष्पांना काढून घेतो. सर्व पुष्पें एकदमच मिळावीं म्हणून लताच तोडून टाकीत नाहीं. त्याचप्रमाणें तूंहि पांडवांवर स्नेह ठेवून त्यांच्यापासून पुनः पुनः योग्य धन घे. कोळशांचा व्यापार करणारा पुरुष ज्याप्रमाणें वृक्षांना जाळून टाकितो, त्याप्रमाणें तूं यांना समूळ जाळून टाकूं नको. हे भ्रात्या, तूं पुत्र, अमात्य व सैन्य यांसह यमलोकाचा मार्ग धरूं नकोस. हे भारता, एकमतानें युद्धास सज्ज झालेल्या या पांच पांडुपुत्रांबरोबर कोण युद्ध करूं शकेल? क्रुद्ध होऊन समरांगणांत उभ्या राहिलेल्या या वीरांशीं प्रतियुद्ध करण्यास देवांसह साक्षात् इंद्र तरी समर्थ आहे का, त्याचा तूं विचार कर." २. ९. ६२.

---

## अध्याय ६३ वा.

[ १ सभेला उद्देशून विदुराचा आणखी उपदेश. ]

( १ ) विदुर म्हणाला—अहो सभासदहो, द्यूत हें कलहाचें मूळ आहे. तें बंधुबंधूंमध्येंहि भेद उत्पन्न करितें व त्यापासून भयंकर अनर्थ ओढवतात. हा धृतराष्ट्राचा पुत्र दुर्योधन द्यूताचा आश्रय करून उग्र वैर उत्पन्न करीत आहे. या प्रतिपवंशामध्यें उत्पन्न झालेले व ज्यांचें सैन्य फार मोठें आहे, असे हे शांतनु-कुलांतील वीर बह्लिकांसह दुर्योधनाच्या अपराधानें मोठ्या संकटांत पडतील! एखादा पोळ मदानें आपणच आपलें शिंग जसें मोडून घेतो, त्याप्रमाणें हा दुर्योधन सर्व कुल व राष्ट्र यांचा नाश करील.

हे राजा धृतराष्ट्रा, जो विवेकी वीर आपल्या विचारशक्तीचा तिरस्कार करून दुसऱ्याच्या बुद्धीनें चालतो, तो अशिक्षित नावाड्यानें चालविलेल्या नौकेंत बसून जाणारा जसा समुद्रांत बुडतो, तसा घोर संकटांत पडतो. हे राजा, दुर्योधन पांडवांशीं पण लावून द्यूत करीत आहे व त्याचा जय होत आहे, म्हणून या वेळीं तुला मोठा संतोष वाटत आहे; पण हे प्रिय भ्रात्या, कोणताहि विनोद मर्यादेच्या बाहेर गेला म्हणजे त्याचाच युद्धामध्यें परिणाम होतो व त्यामुळें असंख्य लोकांचा नाश होतो. या शकुनीनें मृत्यु व नरक हेंच फल देणारा हा द्यूतरूपी अनर्थ तुमच्यापुढें आणून उभा केला आहे. हा द्यूतरूपी नियम तुमच्या हृदया-

मध्यें संकेतपूर्वक दृढ झाला आहे. पण स्वबंधु जो युधिष्ठिर त्याच्याशीं तुमचा हा अकल्पित द्यूतरूपी उपाय कलहरूपानें परिणत होईल व त्याचा शेवट केव्हांहि चांगला होणार नाहीं.

हे प्रतिपकुलोत्पन्न शांतनवहो, मी पुष्कळ विचार करून दीर्घ दृष्टीनें, तुम्हांला या कौरवांच्या सभेंत जें पुनः सांगत आहें तें लक्ष देऊन ऐका. या मूढ दुर्योधनाला अनुसरून तुम्हांपैकीं कोणींहि या कलहरूपी अति घोर अग्नीमध्यें दग्ध न होवो. पांडवांशीं युद्धाचा प्रसंग येण्यापूर्वींच तुम्ही शांत व्हा. द्यूताच्या मदानें पराभूत झालेला हा अजातशत्रु पांडव जेव्हां आपल्या क्रोधाचें नियमन करण्यास असमर्थ होईल व वृकोदर, सव्यसाची अर्जुन आणि नकुलसहदेवहि अतिशय क्रुद्ध होतील, तेव्हां त्या उद्भवलेल्या तुमुल युद्धांत तुमचें रक्षण कोण करील? आपत्समुद्रामध्यें बुडणाऱ्या तुम्हांला आश्रय कोण देईल!

हे महाराजा, तूं या द्यूतानेंच धनाढ्य होशील असें नाहीं, याच्या पूर्वींहि तुजपाशीं हवें तितकें धन आहे. शिवाय तूं मनानें जितक्या वित्ताची इच्छा करशील तितकें वित्त तुझ्यापुढें येऊन पडेल. कारण पांडव विपुल धनानें युक्त आहेत. त्यांचें नुस्तें धन जिंकून तुला काय लाभ होणार! त्यापेक्षां साक्षात् धनरूप असलेल्या पांडवांनाच संपादन कर. त्यामुळें आपल्या सर्व कुरुकुलाचें हित होईल. या सौबलाचें द्यूत कशाप्रकारचें आहे, हें आम्ही जाणतों. हा पर्वतेश्वर कपटद्यूत कसें करावें हें चांगल्याप्रकारें जाणतो. यास्तव हा जेथून आला आहे, तेथेंच याला परत जाऊं दे. हे भारता, पांडवांना युद्ध करण्याचा प्रसंग येईल, असें आचरण तूं करूं नको. माझ्या या सदुपदेशाचा जर तुम्ही अव्हेर कराल तर शेवटीं पश्चात्ताप पावाल. २. ९. ६३.

---

## अध्याय ६४ वा

[ १ दुर्योधनानें केलेली विदुराची निर्भर्त्सना. २ त्याला विदुराचें उत्तर. ]

(१) **वैशंपायन** म्हणाला—राजा जनमेजया, विदुराची ही प्रिय, सत्य व हित उक्ति ऐकून दुर्योधनाला अतिशय क्रोध आला व तो मोठ्या आवेशानें म्हणाला— "हे क्षत्त्या, तूं आम्हां धृतराष्ट्रपुत्रांची नेहमीं निंदा करून आमच्या शत्रूंचीच कीर्ति गात असतोस. हे विदुरा, तुला कोण प्रिय आहेत, हें आम्ही जाणतों. आम्हांला मूर्ख समजून तूं आमचा सतत अवमान करीत असतोस. जो पुरुष स्वकीयांची

निंदा व परकीयांची प्रशंसा करितो, त्याला स्वकीय अप्रिय असून परकीय प्रिय आहेत, हें उघड होतें. अशा पुरुषाचें हृद्गत काय आहे, हें त्याच्या शब्दांवरून व्यक्त होतें. 'आमचा पराभव होऊन पांडवांचा जय व्हावा' हीच तुझी इच्छा आहे, हें आम्ही पूर्णपणें ओळखतों. तुझी जिह्वा तुझ्या मनांतील द्वेष व्यक्त करीत आहे. पण आमच्या आश्रयानें राहिलेल्या तुझी वाणी आमची निंदा करितांना शतधा विदीर्ण कशी होत नाहीं ! हे क्षत्त्या, मनांतील द्वेषापेक्षां वाणीची प्रतिकूलता फार भयंकर आहे, तुझ्या मनांत आमच्या विषयीं जरी द्वेष असला, तरी तो वाणीनें बोलून दाखवितांना तुला लोकलज्जेचेंहि भय कसें वाटत नाहीं !

हे विदुरा, आम्हीं आजपर्यंत सर्पाप्रमाणें असलेल्या तुला आपला आश्रय दिला. पण तूं कृतघ्न बोक्याप्रमाणें आपल्या पोषकाचाच नाश करीत आहेस. तुला आश्रय देणारा जो तुझा ज्येष्ठ भ्राता धृतराष्ट्र त्याचाच द्रोह करावयास तयार झालेल्या तुला कांहीं लोक अति पापी समजत नाहींत, ह्मणूनच तूं या पापाला भीत नाहींस. आम्हीं शत्रूंना जिंकून हें मोठें वैभव मिळविलें आहे. यास्तव हे क्षत्त्या, तूं आम्हांला असें निष्ठुर वचन बोलूं नको. शत्रूंचा उत्कर्ष झाला, ह्मणजे तुला मोठा आनंद होतो, कारण तुला ते प्रिय आहेत. म्हणूनच तूं आमच्या आश्रयानें राहूनहि आमचा असा वारंवार द्वेष करीत आहेस. आमच्याशीं वरवर सख्य दाखवून तूं मनांत पांडवांचें हित इच्छितोस व त्यांची प्रशंसा करितोस, पण त्यामुळेंच तूं वारंवार आमच्या द्वेषाला पात्र होतोस, हें तुझ्या लक्षांत कसें येत नाहीं ? वस्तुतः तुला पांडव व आम्ही सारखेच आहों. तथापि तूं मूर्खपणामुळें त्यांचाच पक्ष घेतोस ! पण हें तुझ्या मोठेपणाला शोभत नाहीं.

अरे शाहण्या, एखाद्याला सहन न होईल, असें भाषण करणारा पुरुष त्याच्या शत्रुत्वाला प्राप्त होतो. धूर्त मनुष्य एखादी गुप्त गोष्ट ठाऊक असली तरी उघड बोलून दाखवीत नाहीं. पण तूं शत्रूंची स्तुति करण्याच्या भरांत भरसभेंत मूर्खाप्रमाणें आमचीं रहस्यें प्रकट करितोस. हे निर्लज्जा , तूं या धृतराष्ट्राजाच्या आश्रयानें राहून त्याला वाटेल तसें टाकून बोलतोस, हें चांगलें नाहीं. तूं या वृद्ध राजाला विनाकारण असें दुःख काय ह्मणून देतोस ? हे विदुरा, तुझा आशय आह्मी पूर्णपणें जाणतों. म्हणूनच मी तुला स्पष्टपणें सांगतों कीं, तूं

आमचा असा अपमान करीत जाऊं नको. आपल्या आश्रयदात्याशीं कसें वागावें हें तुला कळत नाहीं. यास्तव वृद्धापासून तूं त्याचें शिक्षण घे व तुला दैव-योगानें प्राप्त झालेल्या यशाचें रक्षण कर. आमच्या कार्यामध्यें अशी लुडबुड करूं नको.

हे विदुरा, 'मी मोठा कार्यकर्ता आहें' असा तूं मिथ्या अभिमान धरूं नको व यापुढें अशीं कठोर भाषणें करूं नको. माझें हित मी तुला विचारावयास आलों नाहीं. यास्तव हे क्षत्त्या, तुला आमचें कृत्य आवडत नसेल तर तूं वाटेल तेथें निघून जा. आम्ही क्षमाशील आहों. तथापि तूं आम्हांवर असे वाक्प्रहार करूं नको. आम्ही जें कांहीं करीत आहों त्यांत आमचा कांहीं अपराध नाहीं. या द्यूताचा कर्ता मी नाहीं, तर या जगाचा जो एक अद्वितीय शास्ता आहे तोच माझ्याकडून हें सर्व करवीत आहे. जो शास्ता मातेच्या गर्भाशयांत असतांना जीवाला त्याच्या कर्तव्याची प्रेरणा करितो त्यानें मलाहि माझ्या कर्तव्याचा उपदेश केला आहे. जल सखल प्रदेशाकडे जसें आपोआप वहातें, त्याप्रमाणें तो मला जशी प्रेरणा करितो, तसाच मी कार्यांत प्रवृत्त होतों. त्या शास्त्याकडून प्रेरित झालेला पुरुष आपलें मस्तक आपटून पर्वताला फोडावयास तयार होतो व आपलाच नाश करून घेतो. त्याच्याच प्रेरणेनें पुरुष साक्षात् मृत्यूप्रमाणें अस-लेल्या सर्पाचें पोषण करितो. त्याची बुद्धीच त्याला कर्तव्याचा उपदेश करिते. तुझ्या म्हणण्याप्रमाणें द्यूत जरी अनिष्ट असलें तरी तो शास्ताच मला त्यांत प्रवृत्त करीत आहे, यास्तव तुझा उपदेश ऐकण्याची मला इच्छा नाहीं आणि एखाद्याची इच्छा नसतांनाहि जो उपदेश करूं लागतो, तो त्याला आपला शत्रु बनवितो. विद्वानानें आपल्या पालकाला उपदेश करण्याच्या साहसांत कधींहि प्रवृत्त होऊं नये. तर त्याच्या मित्रत्वाला स्मरून त्याची उपेक्षाच करावी, अशी नीति आहे. मी तुझा पालक आहें, यास्तव तूं माझ्याशीं मित्रत्वानें वागावेंस हेंच उचित होय. तस्मात् हे विदुरा, तूं मला उपदेश करूं नकोस.

हे पराम्नपुष्टा, 'तूं या वैराग्नीला शांत कर', असें मला सांगत आहेस. पण कर्पूरासारख्या ज्वालाग्राही पदार्थांना पेटवून जो त्याला सत्वर शांत करीत नाहीं त्याच्या हातीं त्याचें भस्महि लागत नाहीं, असा अनुभव आहे. त्याला अनु-सरून मी या पांडवांना अतिशय क्रुद्ध करून जर आतां त्यांचा समूल नाश न केला तर तेच माझा समूल नाश करतील !

हे क्षत्त्या, शत्रुसंघामध्यें उत्पन्न झालेल्या, त्यामुळेंच द्वेष करणाऱ्या व विशेषतः अहितकर असलेल्या मनुष्याला शाहण्या मनुष्यानें आपल्या संघांत राहूं देऊं नये, असा न्याय आहे. यास्तव हे विदुरा, तुला जेथें जाण्याची इच्छा असेल तेथें तूं निघून जा. एखाद्या दुराचरणी स्त्रीला संतुष्ट करण्याचा प्रयत्न कितीहि जरी केला तरी ती पतीला सोडून जाणारच !

( २ ) विदुर म्हणाला—हे राजा धृतराष्ट्रा, एखादा पुरुष नीतीचा उपदेश करूं लागला असतां, त्याचा जे त्याग करितात, त्यांचें सख्य क्षणिक असतें कीं नाहीं, हें तूंच आपल्या पुत्राचा किंवा माझा पक्षपात न करितां सांग. राजांचीं अंतःकरणें द्वेषानें भरलेलीं असतात. तथापि ते वरून गोड गोड बोलून प्रसंगीं शत्रूंचा मुसळानें घात करितात. असो; हे अति मूढबुद्धे राजपुत्रा, तूं स्वतःला मोठा पंडित समजून मला मूढ समजतोस, हें अगदीं विपरीत आहे. कारण जो एखाद्या पुरुषाची आपल्या सुहृदांमध्यें स्थापना करून मागून त्याला दोष देतो व त्याच्यावर विश्वास ठेवीत नाहीं, तोच मूढ होय.

खरोखर एखाद्या श्रोत्रियाच्या घरीं आलेल्याहि दुराचरणी स्त्रीला जसें सन्मार्गाला लावितां येत नाहीं, त्याप्रमाणें मंदबुद्धि पुरुषाला श्रेयोमार्गाकडे वळवितां येत नाहीं. एखाद्या तरुण कुमारीला वृद्ध पति जसा आवडत नाहीं, त्याप्रमाणें या भरतश्रेष्ठाला हितोपदेश करणारा कधींहि आवडणें शक्य नाहीं. यास्तव हे कुलकलंका दुर्योधना, सर्व हिताहित कार्यांमध्यें तुला आवडल तेंच तुझ्या मंत्र्यांनीं बोलावें, अशी जर तुझी इच्छा असेल, तर तूं स्त्रिया, जड, पंगु व अशाच प्रकारच्या सर्व लोकांना कार्याकार्याविषयीं प्रश्न करीत जा. त्यांच्या तोंडून तुला कटु शब्द कधींहि ऐकावे लागणार नाहींत. पापी पुरुषाला रुचेल असें भाषण करणारे लोक हवे तितके मिळतात. पण ऐकण्यास कटु व परिणामीं हितकर असें भाषण करणारा व तें ऐकणाराहि पुरुष या जगांत अतिशय दुर्लभ आहे. जो धर्मपरायण पुरुष स्वामीला प्रिय वाटेल कीं अप्रिय वाटेल याचा विचार न करितां जें हितकर असेल तें अप्रिय असलें तरी सांगतो, तोच राजाचा खरा साह्यकर्ता होय.

---

१ कुटकीसारख्या कटुद्रव्यापासून केलेलें, वेदना उत्पन्न करणारें, जाड्य घालविणारें कामोद्दीपन करून यशाचें हरण करणारें, लसुणादिकांप्रमाणें दुर्गंधयुक्त व आरोग्य देणारें औषध आरोग्येच्छु पुरुष गिळून टाकितात व त्यामुळें त्यांना आरोग्य प्राप्त होतें, हें प्रसिद्ध आहे.

हे महाराजा, व्याधीमुळें प्राप्त न झालेलें पण दोषांपासून उत्पन्न झालेलें, मर्मांचा छेद करणारें, ताप देणारें, अपकीर्ति करणारें, रूक्ष, स्नेहशून्य व दुष्टाप्रमाणें भासणारें, असें हें दैन्य आर्य लोकच प्राशन करीत असतात. यास्तव हे राजा, तूंहि त्याला कटु, तीक्ष्ण इत्यादि पूर्वोक्त दोषांनीं युक्त असलेल्या औषधाप्रमाणें पिऊन टाक व शांत हो. हे राजा, तूं विचित्रवीर्याचा पुत्र आहेस, यास्तव पुत्रांसह तुला विपुल यशोधन प्राप्त व्हावें, अशी माझी इच्छा आहे. तुझें तें धन चिरकाल टिकावें असेंहि मी इच्छितों. यास्तव पांडव तुमचे शत्रु असोत किंवा मी मूढ असों, जरी तें कसेंहि असलें तरी मी तुला नमस्कार करितों व तुला हा उपदेश करितों. ब्राह्मण आपल्या स्वस्तिवाचनानें माझेंहि कल्याण करोत. शाहण्या पुरुषानें ज्यांच्या दाढांमध्यें व दृष्टीमध्यें विष आहे, अशा प्राण्यांना कधींहि कोपवूं नये. हे कुरुनंदना, मी शुद्ध चित्तानें तुला हा असा उपदेश करीत आहें. तूं जर या सदुपदेशाचा अव्हेर करशील तर पांडव शस्त्र व क्रोधदृष्टि यांच्या योगानें तुझ्या पुत्रांना जाळून टाकतील. ५. ९. ६४.

---

## अध्याय ६५ वा.

[ १ द्यूतांत युधिष्ठिराच्या सर्वस्वाचा अपहार. ]

( १ ) **वैशंपायन** म्हणाला—पारिक्षिता, सत्यवक्त्या विदुरानें धृतराष्ट्राला असा हितोपदेश केला असतांहि तिकडे दुर्लक्ष करून शकुनि म्हणाला—"युधिष्ठिरा, तूं पांडवांचें पुष्कळ वित्त द्यूतांत घालविलें आहेस, यास्तव हे कौंतेया, आतां तूं द्यूतांत न हरविलेलें असें जर कांहीं तुझें वित्त असेल तर तें सांग."

**युधिष्ठिर** म्हणाला—हे सुबलपुत्रा, माझें वित्त अगणित आहे व तें मीच जाणतों. पण हे शकुने, तूं माझ्या वित्ताविषयीं प्रश्न कां करीत आहेस ? माझें वित्त दश, सहस्र, लक्ष, असंख्य कोटि, अब्ज, खर्व, निखर्व, शंकु, जलधि, पद्म, महापद्म, मध्य, परार्ध व त्यांहूनहि अधिक आहे. तें पणास लावून मी या वेळीं द्यूत खेळण्यास तयार आहें. राजा, माझें तें सर्व धन मी पणास लावितों. तूं फांसे टाक.

जनमेजया, युधिष्ठिराचें हें भाषण ऐकून कपटाचा आश्रय करूनच द्यूत खेळण्याचा निश्चय केलेल्या शकुनीनें फांसे टाकून 'युधिष्ठिरा, मीं तुझें तें सर्व धन जिंकलें आहे. तुला खोटें वाटत असेल तर फांशांकडे पहा' असें म्हटलें. तें ऐकून युधिष्ठिर पुनः म्हणाला—"हे पर्वतेश्वरा, सिंधुनदीच्या पूर्व तीरापासून पर्णाशानदीच्या पश्चिम तीरापर्यंत माझे असंख्य बैल, घोडे, गायी, बकऱ्या व मेंढ्या आहेत. हें सर्व धन पणास लावून मी तुझ्याशीं खेळतों."

हे भारता, युधिष्ठिराच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतांच शकुनीनें आपले कृत्रिम फांसे भूमीवर टाकिले व 'मीं तें सर्व धन जिंकलें आहे, पहा' असें म्हटलें. तेव्हां युधिष्ठिर पुनः बोलला—"माझें खांडवप्रस्थ नगर, देश, अब्राह्मणांच्या धनासह सर्व भूमि व अब्राह्मण पुरुष हें माझें अवशिष्ट धन आहे. राजा, मी हें सर्व धन पणास लावितों. तूं फांसे टाक."

हे कुरुश्रेष्ठा, युधिष्ठिराचे हे शब्द कांनीं पडतांच कपटी शकुनीनें आपले कृत्रिम फांसे टाकून 'तें सर्व मीं जिंकून घेतलें आहे' एवढेंच म्हटलें. तेव्हां युधिष्ठिर राजा त्यास पुनः म्हणाला—"शकुने, ज्या भूषणांनीं विभूषित झालेले हे राजपुत्र शोभतात, तीं कुंडलें, कंठांतील रत्नजडित हार इत्यादि सर्व राजभूषणें व तीं धारण करणारे हे राजपुत्र, हेंच माझें धन मी पणास लावितों."

राजा, महात्म्या युधिष्ठिराचा हा पणहि कपटी शकुनीनें कपटद्यूतानें जिंकून घेतला. तेव्हां युधिष्ठिर म्हणाला—"शकुने, ज्याचे बाहू पुष्ट व दीर्घ आहेत व खांदे सिंहाच्या खांद्यासारखे आहेत, नेत्र आरक्त वर्ण आहेत व अंगकांति श्याम सुंदर आहे, असा हा माझा तरुण व प्रिय भ्राता नकुल हेंच एक धन मी आतां पणास लावितों." त्यावर शकुनि म्हणाला—"हे राजा युधिष्ठिरा, तुला प्रिय असलेला हा राजपुत्र नकुल आमच्या अधीन झालाच आहे, असें तूं समज. आतां याच्या मागून कोणाला पणाला लावावयाचें त्याचा निश्चय करून ठेव."

हे पांडवेया, इतकें बोलून दुष्ट शकुनीनें हातांतील फांसे भूमीवर टाकले व 'हा डाव मीं जिंकला आहे, पहा.' असें तो म्हणाला. त्याबरोबर कुंतीपुत्र युधिष्ठिर पुनः बोलला—"हा माझा दुसरा भ्राता सहदेव धर्मोपदेश करून लोकांना त्याप्रमाणें वागावयास लावणारा आहे. त्यामुळेंच हा महात्मा या लोकीं 'पंडित' या पदवीस प्राप्त झाला आहे. खरोखर, तो राजपुत्र अशा

आपत्तींत पडण्यास योग्य नाहीं. तथापि मी त्याचा पण लावून तुझ्याशीं द्यूत करितों. मला अतिशय प्रिय असलेल्याहि त्या भ्रात्याचा मी द्यूतांत एखाद्या अप्रिय वस्तूप्रमाणें त्याग करितों."

भारता, हें ऐकून मनांत अतिशय हृष्ट झालेला शठ शकुनि आपले कृत्रिम फांसे टाकून युधिष्ठिराला 'मीं जिंकिलें' इतकेंच बोलला व आपण पांडवांचा अद्यापि पुरता सूड घेतला नाहीं, असें मानूनच कीं काय तो अगोदरच खिन्न झालेल्या युधिष्ठिरास जणुंकाय अधिक दुःख देण्यासाठींच म्हणाला—"राजा, तुला प्रिय असलेले हे दोन्ही माद्रीपुत्र मीं जिंकले आहेत. पण तूं ज्या अर्थी आपल्या या सापत्न बंधूंनाच पणाला लावून भीमार्जुनांचें रक्षण करीत आहेस, त्या अर्थीं ते तुला त्यांच्यापेक्षां अधिक प्रिय आहेत, असें मला वाटतें. ते तुझे सोदर भ्राते आहेत. तेव्हां ते अधिक प्रिय असणें साहजिकच आहे."

शकुनीचें हें कुटिल व कर्णकटु भाषण ऐकून **युधिष्ठिर** त्यास म्हणाला— "शकुने, तूं न्यायाकडे लक्ष न देतां खरोखर हें अधर्मयुक्त भाषण करीत आहेस. अरे मूढा, परस्पर एकमत असलेल्या आम्हां पांच भ्रात्यांमध्यें तूं असा भेद उत्पन्न करीत आहेस काय ?"

त्यावर **शकुनि** म्हणाला—ज्यांचें चित्त वित्तानें परवश झालेलें असतें, तोच अधर्माचरण करितो. पण त्यामुळें तो नरकांत पडतो किंवा स्थावरभावाला प्राप्त होतो. हे राजा, तूं वयानें ज्येष्ठ आहेस व गुणानें वरिष्ठ आहेस, यास्तव हे भरतश्रेष्ठा, तुला नमस्कार असो. द्यूतकार द्यूत करीत असतांना जणु काय उन्मत्त होऊनच जी बडबड करितात, ती ते कधीं स्वप्नांतहि पहात नाहींत व जागृतींतहि अनुभवीत नाहींत.

**युधिष्ठिर** म्हणाला—एखाद्या नौकेप्रमाणें आम्हांला संग्रामसागरांतून तारून नेणारा, शत्रूंचा पराभव करणारा व वेगवान् असलेला हा राजपुत्र अर्जुन लोकैकवीर असल्यामुळें त्याला द्यूतांत पणास लावणें योग्य नाहीं. तथापि हे शकुने, मी आज तुझ्याशीं द्यूत करीत असतांना त्या माझ्या प्रिय भ्रात्यासहि पणास लावितों.

राजा परिक्षिता, युधिष्ठिराचे हे शब्द कानीं पडतांच केवळ कपटद्यूत कर-णाऱ्या शकुनीनें भूमीवर फांसे टाकले व 'हे युधिष्ठिरा, मी आज तुम्हां पांड-

वांतील महा धनुर्धर जो सव्यसाची पांडव त्याला द्यूतांत जिंकलें आहे. आतां तूं प्रिय भीमाचाहि पण लावून माझ्याशीं द्यूत खेळ. कारण द्यूतांत द्यूतकारांना समर्पण करण्यास योग्य असें तेवढेंच धन आतां तुजपाशीं राहिलें आहे ' असें म्हटलें.

तें ऐकून युधिष्ठिर बोलला—जो आम्हां पांडवांचा नेता, युद्धामध्यें आमचें रक्षण करणारा, दानवशत्रु जो वज्रधर इंद्र त्याप्रमाणें लोकैकवीर, तिरकस दृष्टीनें पहाणारा, ज्याच्या दोन्ही भुंवया धनुष्याप्रमाणें वक्र व स्पष्ट आहेत, ज्या महात्म्याचे खांदे सिंहाप्रमाणें पुष्ट आहेत, जो नित्य अति क्रोधि, बलामध्यें ज्याची बरोबरी करणारा या लोकीं एकहि पुरुष नाहीं व जो गदा धारण करणारांमध्यें अग्रेसर आहे, अशा या माझ्या द्यूतांत पणास लावण्यास अयोग्य असलेल्या प्रिय राजपुत्राचा पण लावून मी तुझ्याशीं आज द्यूत खेळतों. हे शकुने, हा माझा प्रिय भ्राता भीमसेन हेंच माझें या डावांत पणास लावलेलें धन आहे.

राजा, युधिष्ठिराचा हा आश्चर्यकारक पण ऐकून निंद्य आचरण करणाऱ्या शकुनीनें हातांतील फांसे भूमीवर टाकतां टाकतां ' राजा, हें तुझें धन मीं हरण केलें आहे, पहा ' इतकें बोलून पुनः मोठ्या काकुळतीनें म्हटलें—" अरे, अरे, युधिष्ठिरा, तूं आपले भ्राते, गज, अश्व, इत्यादि विविध विपुल धन या द्यूतांत घालविलेंस. आतां हे कौंतेया, मीं न जिंकलेलें असें कांहीं वित्त अवशिष्ट राहिलें आहे काय ? "

युधिष्ठिर म्हणाला—राजा, सर्वांमध्यें विशिष्ट व माझ्या भ्रात्यांना अतिशय प्रिय असा मी अद्यापि अवशिष्ट राहिलों आहें. मी स्वतः या द्यूतांत जिंकला गेलों म्हणजे जित झालेल्या पुरुषाला योग्य असें कर्म मी करीन.

धर्माचें हें निर्वाणीचें भाषण ऐकून कपटानेंच पांडवाचा नाश करण्याचा ज्यानें निश्चय केला आहे, अशा शकुनीनें हातांतील फांशांचा डाव टाकून ' हें पहा, मीं तुलाहि जिंकिलें ' असें म्हटलें व तो दुरात्मा शकुनि युधिष्ठिराकडे पाहून त्यास म्हणाला—" हे राजा, पणास लावण्यास योग्य असें धन तुझ्यापाशीं अवशिष्ट असतांना तूं आपल्यालाच जिंकून घेतलेंस, हें फार वाईट केलेंस. स्वतःचें धन असतांनाहि द्यूतांत स्वतःलाच हरविणें हें पाप आहे. त्यामुळें तुला पाप लागेल. "

राजा जनमेजया, कृत्रिम फांसे ज्याला अतिशय संमत आहेत असा शकुनि पणाविषयीं राजाला असें बोलून व त्या सभेंत बसलेल्या सर्व लोकवीरांना 'पांडवांचा द्यूतांत पराभव झाला आहे' असें पृथक् पृथक् सांगून तो नीच शकुनि पुनः युधिष्ठिरास म्हणाला—"हे राजा, तुझी प्रिय भार्या अद्यापि अवशिष्ट राहिली आहे. आम्हीं न जिंकलेली अशी तेवढीच एक वस्तु पणास लावावयाची राहिली आहे. यास्तव तूं पांचाली कृष्णेचा पण लाव व तिच्या योगानें तूं आपल्याला आमच्या दास्यांतून सोडवून घे. किंवा आम्हीं तिला जिंकल्यास तीहि तुम्हांप्रमाणें आमची दासी होईल."

शकुनीचें हें कुत्सित भाषण ऐकून राजा युधिष्ठिर देहभान विसरला व द्यूताच्या आवेशांत शकुनीला म्हणाला—"जी फार ठेंगू नाहीं व उंचहि नाहीं, कृशहि नाहीं व स्थूलहि नाहीं, जिची अंगकांति रक्तवर्ण नाहीं व जिचे केंस काळे व कुरळे आहेत, अशा द्रौपदीला पणास लावून मी आतां तुझ्याशीं द्यूत खेळतों. जिचे नेत्र शरदृतूंतील कमलाच्या पाकळीप्रमाणें आहेत, अंगाला शरत्कालीन कमलांचा सुगंध येत आहे, व जिचें स्वरूप शरदृतूंतील कमलांचें सेवन करणाऱ्या लक्ष्मीसारखें आहे, तिचा पण मी आतां लावितों.

खरोखर, पुरुष ज्या स्त्रीची इच्छा करील, तिचें दयालुत्व, रूप व शीलसंपत्ति लक्ष्मीसारखीच असावी व ती लक्ष्मीसारखीच सर्वगुणसंपन्न, पतीला अनुकूल, प्रिय भाषण करणारी व साक्षात् धर्मार्थ-कामसिद्धि देणारी असावी. शकुने, पुरुषानें अशा श्रेष्ठ स्त्रीचीच इच्छा करावी. ही पांडवपत्नीहि तशीच आहे. आमची कृष्णा सर्वांच्या मागून निजते व सर्वांच्या आधीं उठते. बाल-गोपालांपर्यंत कोणतें कार्य झालें व कोणतें अवशिष्ट आहे, हें स्वतः समजूत घेते. तिचें स्वेदयुक्त मुख कमलाप्रमाणें शोभत असून तिच्या सर्वांगाला कमलासारखा सुगंध येतो. त्या सर्वांग सुंदरीचे केंस लांब असून मुख रक्तवर्ण आहे. तिच्या अंगावरील लोम अति विरल आहेत. हे राजा, अशा लक्ष्मीतुल्य, अलौकिक सर्वांगसुंदर पांचालकन्या द्रौपदीचा पण लावून मी आतां तुझ्याशीं द्यूत करितों."

हे परिक्षित्पुत्रा, बुद्धिमान् धर्मराजानें असें म्हटलें असतां सभेंतील वृद्धांच्या तोंडून 'धिक् धिक्' असे तिरस्कारयुक्त उद्गार निघाले. राजांची ती सभा अतिशय क्षुब्ध झाली. सर्वांचीं अंतःकरणें संतप्त झालीं. भीष्म, द्रोण व कृप यांच्या अंगाला दरदरून घाम सुटला. विदुर दोन्ही हातांनीं आपलें मस्तक

धरून जणुकाय चेतनाशून्य झाला. तो महात्मा सर्पाप्रमाणें दीर्घ निःश्वास सोडीत अधोमुख होऊन ध्यान करीत बसला. मूढ धृतराष्ट्राला मात्र अतिशय हर्ष झाला. तो पुत्रस्नेहानें अंध झालेला राजा आपल्या मनांतील विकार गुप्त ठेवूं शकला नाहीं. उलट 'काय जिंकलें? काय जिंकलें ?' असे वारंवार विचारूं लागला. दुःशासनासह कर्णाला पराकाष्ठेचा आनंद झाला. पण इतर सभासदांच्या नेत्रांतून दुःखाश्रु गळाले. वर सांगितल्याप्रमाणें बोलून द्यूतजयानें मत्त झालेला शकुनि मोठ्या गर्वानें भूमीवर फांसे टाकून 'जितं' इतकेंच मोठ्यानें बोलला. २.९.६५

---

## अध्याय ६६ वा.

[ १ दुर्योधनाचें दुर्वचन ऐकून विदुरानें केलेली त्याची निर्भर्त्सना. ]

( १ ) **वैशंपायन** म्हणाला—राजा जनमेजया, शकुनीनें याप्रमाणें द्यूतामध्यें द्रौपदीलाहि जिंकून घेतलेलें पहातांच दुष्ट दुर्योधनाला पराकाष्ठेचा आनंद झाला व तो मोठ्या गर्वानें विदुराला म्हणाला—"हे क्षत्त्या, पांडवांना अतिशय संमत व प्रिय असलेली जी त्यांची भार्या द्रौपदी तिला तूं जाऊन सभेंत घेऊन ये. तिला आमचें घर झाडूनसारवून साफ करूं दे. लोकांकडून धिक्कार केली गेलेली ती राजपत्नी सत्वर येथें येऊं दे व आमच्या इतर दासी जेथें आहेत, तेथेंच त्या अपुण्यशीलेला राहूं दे."

राजा दुर्योधनाच्या तोंडचे हे अपमानकारक शब्द ऐकतांच विदुराला अतिशय खेद झाला व तो मोठ्या क्रोधानें दुरात्म्या दुर्योधनास म्हणाला—"हे नीचा, तुझ्या सारख्या भरतवंशांत उत्पन्न झालेल्या राजपुत्रानें असें दुर्वचन मुखांतून उच्चारणें म्हणजे आपल्या सर्व पूर्वजांना कलंक लावण्यासारखें आहे. हे मूढा, तूं यमाच्या पाशानें बद्ध झाला आहेस, हें तुला कळत नाहीं. तूं फार मोठ्या पर्वताच्या तुटलेल्या कड्यावर लोंबत आहेस, याचें तुला भान नाहीं. तूं स्वतः दुर्बल मृग असतांना या पांच व्याघ्रांना खिजवीत आहेस? हे अतिशय विषारी पांच महासर्प क्रुद्ध होऊन तुझ्या मस्तकावर उभे आहेत, हें तूं विसरला आहेस. हे अति मंदमते, यांना तूं असा कोपवूं नकोस व यांच्या हातून फुकट मरून जाऊं नकोस.

हे कुक्षत्रिया, पांडवपत्नी कृष्णा दासीभावास प्राप्त होणें केव्हांहि शक्य नाहीं. कारण द्यूतांत स्वतःला जिंकून घेतल्यामुळें अनीश्वर झालेल्या या युधि

ष्ठिरानें तिला पणास लाविलें आहे. परंतु स्वतः दुसऱ्याचा दास झाल्यावर त्याला पांडवांची पत्नी पणाला लावितां येत नाहीं, असें माझें निश्चित मत आहे. हा धृतराष्ट्राचा आत्मघाती पुत्र 'वेन'-राजाप्रमाणें उन्मत्त झाला आहे. पण ऐश्वर्यानें मत्त झालेला तो राजा मान्याचा अपमान करून जसा तत्काल नष्ट झाला, तसाच हाहि उन्मत्त राजा लवकरच नष्ट होईल. द्यूत वैर व महा-भय उत्पन्न करीत असतें, पण हा मत्त दुर्योधन त्यामुळें आपला अंतकाल समीप येत आहे हें जाणत नाहीं.

मनुष्यानें केव्हांहि मर्मभेदक भाषण करूं नये. मुखानें कर्कश शब्द उच्चारूं नयेत. द्यूतासारख्या निंद्य कर्मानें शत्रूला स्ववश करून घेऊं नये. ज्या भाषणानें दुसऱ्याला उद्वेग होईल, अशी दुसऱ्यांच्या अंतःकरणाला जाळणारी व शेवटीं नरक देणारी भाषा मुखांतून काढूं नये. नीच मनुष्यांच्या मुखांतूनच कठोर शब्द बाहेर पडतात व ते ज्याच्या मर्मांना शस्त्राप्रमाणें टोचतात, तो रात्रंदिवस संतप्त होतो. कारण नीच पुरुषाचे शस्त्राप्रमाणें तीक्ष्ण असलेले ते शब्द दुस-ऱ्याच्या मर्मस्थानींच पडतात. यास्तव शहाण्या मनुष्यानें दुसऱ्या मनुष्यांवर असे वाक्प्रहार करूं नयेत.

हे दुर्योधना, एक बकरा उन्मत्त झाला व शस्त्र गिळूं लागला, पण त्याला तें गिळतां येईना. म्हणून त्यानें आपलें मुख भूमीवर टेंकिलें व तो पायानें तें शस्त्र हालवून गिळूं लागला. त्यामुळें तें शस्त्र अस्ताव्यस्त हालून मस्तका-सह त्याचा कंठ चिरला व तो मूर्ख पशु मरण पावला. त्याप्रमाणें हे दुर्योधना, तूंहि पांडवांच्या वैररूपी शस्त्रानें आपला नाश करून घेऊं नको.

---

१ नारुंतुदः स्यान्न नृशंसवादी न हीनतः परमभ्याददीत ।
ययास्य वाचा पर उद्विजेत न तां वदेद्रुशतीं पापलोक्याम् ॥
समुच्चरन्त्यतिवादांश्च वक्त्राद्यैराहतः शोचति रात्र्यहानि ।
परस्य नामर्मसु ते पतन्ति तान्पण्डितो नावसृजेत्परेषु ॥

२ या श्लोकाचा अर्थ नीलकंठांनीं असा केला आहे—कोणी एक मासे मारणारा कोळी गळाला पिठाची गोळी लावून तो गळ पाण्यांत जों टाकीत आहे, तोंच त्याच्या घरांत पाळलेल्या बकऱ्यानें स्वाभाविक चापल्यानें तो गळ पिठासह गिळला. तेव्हां तो कोळी गळ बाहेर काढूं लागला असतां बकऱ्याचा गळा चिरला व तो मरण

हे पृथापुत्र गृहस्थाला किंवा वनस्थाला अशाप्रकारचीं दुरुत्तरें कधींच बोलत नाहींत. पण जे पुरुष श्वानाप्रमाणें वाटेल त्यावर तोंड सोडणारे असतात, ते दुर्वाक्याहून दुसरें कांहींहि बोलत नाहींत. हीन प्रकृतीचे लोक कोणी तपस्वी असो कीं महा विद्वान् असो, त्यांवर कुत्र्याप्रमाणें सर्वदा भुंकत सुटतात. ते अपत्कालीं धीर पुरुषांना मर्मभेदक वाक्यांनीं दुःख देण्याचा यत्न करितात. पण अशा प्रसंगीं ते धीर पुरुष मात्र आपल्या स्वाभाविक धैर्यामुळें त्यांच्या त्या भुंकण्याकडे लक्षहि देत नाहींत. या द्यूतामुळें आपला मोठा उत्कर्ष झाला आहे, असें हा धृतराष्ट्राचा पुत्र समजत आहे. पण त्या मूढाला 'हा उत्कर्ष नसून घोर नरकाचें कुटिल द्वारच आपल्यासाठीं उघडलें आहे' हें कळत नाहीं. परंतु दुःशासनासह अनेक कौरव या मूढाच्या मागोमाग त्यांत पडणार आहेत, असें मला स्पष्ट दिसूं लागलें आहे.

एखादे वेळीं भोपळेहि पाण्यांत बुडतील, पाषाण तरंगतील व सतत गमन करणाऱ्या नौकाहि जलामध्यें अडकून पडतील, पण हा धृतराष्ट्राचा मूढ पुत्र माझें हितवचन ऐकणार नाहीं. त्यामुळें या कौरवांचा सर्वस्वाचें हरण करणारा भयंकर नाश खचित होईल. कारण ते सुहृदांचा हितावह व विद्वत्तापूर्ण उपदेश ऐकत नाहींत. उलट त्यांचा लोभच वाढत आहे. २. ९. ६६.

---

## अध्याय ६७ वा.

[ १ दुर्योधनानें द्रौपदीला सभेंत आणण्याविषयीं क्रमानें, विदुर, प्रातिकामी व दुःशासन यांस केलेली आज्ञा. २ दुःशासनानें द्रौपदीला सभेंत ओढीत आणिलें. ३ तिचा सर्व सभेला प्रश्न. ]

( १ ) वैशंपायन म्हणाला—राजा, दर्पानें मत्त झालेल्या व 'या क्षत्त्याला धिक्कार असो' असें बोलणाऱ्या धृतराष्ट्रपुत्रानें प्रातिकामीकडे पाहिलें व तो त्या

---

पावला. ही आख्यायिका येथें दृष्टान्तासाठीं सांगितली आहे. याचा भावार्थ असा—कोळी त्या पशूच्या घशांतून गळ ओढून काढूं लागला असतां तो पशू लोंबकळूं लागला. पण गळ कांहीं केल्या बाहेर निघेना. तेव्हां हा पशु कांहीं झालें तरी मरणारच असा निश्चय करून कोळ्यानें गळासाठीं त्या पशूचा कंठ चिरला. त्याच न्यायानें हे दुर्योधना, दृष्टान्तांतील गळाप्रमाणें असलेल्या या द्रौपदीला स्पर्श करणारा तूंहि दृष्टान्तांतील बकऱ्याप्रमाणें नाश पावशील.

सभेंतील श्रेष्ठ लोकांसमक्ष असें वचन बोलला—" हे प्रातिकामिन्, तूं पांडवांच्या अंतःपुरांत जा व द्रौपदीला येथें घेऊन ये. तूं पांडवांना मुळींच भिऊं नको. हा क्षत्ता त्यांना भिऊन असें विपरीत भाषण करीत आहे. तो आमचा उत्कर्ष व्हावा, असें कधींच इच्छीत नाहीं."

जनमेजया, राजाचें हें वचन ऐकून सूत प्रातिकामी सत्वर तेथून निघाला व एखादा श्वान सिंहाच्या गुहेंत जसा शिरावा, त्याप्रमाणें तो दुर्योधनाचा भृत्य अंतःपुरांतील पांडवांच्या महिषीजवळ आला आणि म्हणाला—" हे द्रौपदी, युधिष्ठिर द्यूतमदानें मत्त झाला असून दुर्योधनानें तुला जिंकिलें आहे. यास्तव तूं धृतराष्ट्राच्या घरीं चल. हे याज्ञसेनि, मी तुला तेथें दासीचें काम करावयास नेत आहें."

त्या सूताचें हें कर्णकटु भाषण ऐकून साध्वी द्रौपदी मनांत अतिशय विह्वल होऊन त्यास म्हणाली—" हे प्रातिकामिन्, तूं हें काय बोलत आहेस ! कोणता राजपुत्र आपल्या भार्येचा पण लावून द्यूत करील ? राजा मूढ, अविवेकी व द्यूतमदानें मत्त झाला आहे असें मला वाटतें. त्याच्यापाशीं द्यूतांत पणास लावावयास दुसरें कांहीं धन नव्हतेंच कीं काय ?

प्रातिकामी—हे साध्वि, जेव्हां त्या राजापाशीं दुसरें कांहीं पणनीय द्रव्य राहिलें नाहीं, तेव्हांच त्या अजात शत्रु पांडवानें तुझा पण लाविला. त्यानें अगोदर आपल्या चारी भ्रात्यांना पणास लाविलें, त्यानंतर त्यानें स्वतःच्या देहाचा पण लाविला व शेवटीं हे राजकन्ये, तुला द्यूतांत हरविलें.

द्रौपदी—हे सूतपुत्रा, असें जर असेल तर तूं परत जा व त्या द्यूतकाराला सभेमध्यें असा प्रश्न विचार—" तूं अगोदर स्वतःला जिंकून घेतलेंस किंवा मला ?" हे प्रातिकामिन्, यावर तो काय उत्तर देतो तें ऐकून तूं परत ये व मग मला घेऊन जा. राजाचा आशय कळल्यावर मी मोठ्या कष्टानें तुजबरोबर सभेंत येईन.

हे पारिक्षिता, द्रौपदीची ती आज्ञा शिरसा मान्य करून तो दुर्योधनाचा सारथि सभेंत परत आला व त्यानें द्रौपदीचें तें वचन सर्व नरेंद्रांमध्यें बसलेल्या युधिष्ठिराला निवेदन केलें. तो म्हणाला—"राजा युधिष्ठिरा, द्रौपदीनें तुला असें विचारिलें आहे कीं, तूं कोणाचा स्वामी होऊन मला द्यूतांत पणाला लाविलेंस ? तूं प्रथम स्वतःला जिंकून घेतलेंस कीं माझा पण लाविलास ?" हे भारता, द्रौप-

दीचा हा प्रश्न ऐकून युधिष्ठिर निश्चेष्ट व संज्ञाशून्य झाला. तो त्या सूताला अनुकूल किंवा प्रतिकूल असें कांहींच उत्तर बोलला नाहीं. तें पाहून दुर्योधन त्या सूतास म्हणाला—"पांचालीला येथेंच येऊन हा प्रश्न विचारूं दे. तिचा प्रश्न व याचें उत्तर सर्व लोक येथेंच ऐकूं देत."

जनमेजया, दुर्योधनाच्या अंकित असलेला प्रातिकामी राजमंदिरांत पुनः परत गेला व मनांत अतिशय खिन्न होऊन द्रौपदीस म्हणाला—"हे राजपुत्रि, सभासद तुला बोलावीत आहेत. कौरवांचा विनाशकाल प्राप्त झाला आहे, असेंच मला वाटतें. हे सम्राज्ञि, जो अति नीच पुरुष तुला सभेंत नेण्याची इच्छा करीत आहे, तो आपल्या समृद्धीचें पालन करीत नाहीं, असें मला वाटतें."

द्रौपदी म्हणाली—हे प्रातिकामिन्, ईश्वरानें खरोखर अशीच योजना केली आहे, असें मलाहि वाटतें. कारण पंडित व मूर्ख या दोघांनाहि सुख व दुःख प्राप्त होतें. या लोकीं एक धर्मच श्रेष्ठ आहे व आम्हांकडून रक्षण केला जाणारा तोच आम्हांला सुखावह होईल. खरोखर, सर्वांना सुखावह होणारा धर्म कौरवांनाहि सोडून न जावो. तूं सभेंत जाऊन माझा हा धर्म्य प्रश्न सर्व सभासदांस विचार. ते धर्मात्मे, नीतिमान् व वरिष्ठ सभासद मला जें निश्चित उत्तर देतील त्याप्रमाणें मी करीन.

याज्ञसेनीचें हें वचन ऐकून प्रातिकामी सभेंत परत आला व त्यानें सर्व सभासदांस तिचें म्हणणें कळविलें. पण दुष्ट दुर्योधनाचा त्या राज्ञीला सभेंत आणण्याचा अतिशय आग्रहच आहे, असें पाहून ते कांहीं बोलले नाहींत. उलट लज्जेनें आपलीं मुखें खालीं घालून मुकाट्यानें बसले. तेव्हां दुर्योधनाचा दुष्ट आशय जाणून युधिष्ठिरानें द्रौपदीला संमत असलेला आपला दूत तिजकडे पाठविला. तो म्हणाला—"हे दूता, तूं द्रौपदीकडे जा व तिला सांग कीं, तूं रजस्वला व एकवस्त्रा आहेस. तथापि ज्या स्थितींत तूं आहेस त्या स्थितींत रोदन करीत या सभेंत ये व आपल्या श्वशुराच्या पुढें उभी रहा. तूं राजकन्या असून अशा स्थितींत सभेंत आली आहेस, हें पाहून सर्व सभासद आपल्या मनांत धृतराष्ट्रपुत्राची अतिशय निंदा करतील." युधिष्ठिराची ही आज्ञा ऐकून तो दूत सत्वर कृष्णेच्या मंदिरांत गेला व त्या बुद्धिमानानें धर्मराजाचा आशय तिला निवेदन केला.

इकडे, सत्यरूपी रज्जूनें ज्यांचीं अंगें जखडून टाकिलीं आहेत असे महात्मे पांडव दीन व दुःखानें व्याकुळ झाले आहेत, ते मान वर करून इकडे तिकडे

पहातहि नाहींत, असें पाहून राजा दुर्योधन त्यांच्या मुखाकडे पहात मोठ्या हर्षानें आपल्या सूतास म्हणाला—" हे प्रातिकामिन्, तूं तिला येथेंच घेऊन ये. हे सभासद कौरव तिला येथेंच काय तें सांगूं देत. "

राजा, दुष्ट दुर्योधनाच्या सर्वथा अधीन असलेला तो त्याचा भृत्य प्रातिकामी द्रुपदकन्येच्या क्रोधाला भिऊन तेथेंच उभा राहिला. त्यावेळीं त्यानें दुर्योधनाच्या आज्ञेचा भंग करून त्याचें श्रेष्ठत्वहि क्षणभर झुगारून दिलें व तो विचारी सूत 'कृष्णेला मी काय सांगूं?' असें सर्व सभ्यांना पुनः विचारूं लागला. तें पाहून दुर्योधन क्रोधानें म्हणाला—" दुःशासना, हा माझा क्षुद्रचित्त सूतपुत्र या वृकोदराला भीत आहे. यास्तव तूं जा व स्वतः त्या याज्ञसेनीला धरून येथें घेऊन ये. पराधीन झालेले हे शत्रु तुझें काय करणार आहेत!"

आपल्या भ्रात्याचें हें आज्ञावचन ऐकून राजपुत्र दुःशासन आपल्या आसनावरून उठला व क्रोधानें नेत्र लाल करून महारथ पांडवांच्या मंदिरांत शिरला आणि राजकन्या द्रौपदीला म्हणाला—" हे पांचालि, चल चल, सभेंत चल. तुला आम्हीं जिंकिलें आहे. आतां तूं सर्व लज्जा सोडून दुर्योधनाला पहा. हे कमलनयने, तूं आतां कौरवाचें सेवन कर. आम्हीं तुला धर्मानेंच दासी केलें आहे. यास्तव दासीभावास प्राप्त झालेली तूं सभेंत चल. "

त्या दुर्बुद्धि दुःशासनाचें हें घोर वचन ऐकतांच ती साध्वी आपल्या आसनावरून उठली. तिचें अंतःकरण अतिशय खिन्न झालें व शोकानें आर्त झालेली ती पांडवपत्नी आपलें निस्तेज मुख हातानें पुसून वृद्ध कुरुराजाच्या स्त्रिया जेथें होत्या तेथें धांवत गेली. तेव्हां दुःशासनहि क्रोधानें गर्जना करीत वेगानें तिच्या मागोमाग धांवला व त्यानें त्या नरेंद्रपत्नीचे लांब, नीलवर्ण व कुरळे[1] केंस धरले. राजसूयाच्या शेवटीं अवभृत स्नानप्रसंगीं जे केंस मंत्रपूत जलानें भिजले होते, त्याच केंसांना नीच धृतराष्ट्रपुत्रानें, पांडवांच्या वीर्याचा तिरस्कार करून, बलात्कारानें स्पर्श केला!

---

१ मुळांत 'ऊर्मिमत्सु' असें विशेषण आहे. त्याचा अर्थ दुर्बोध होऊं नये म्हणून 'कुरळे केंस' असें आम्हीं म्हटलें आहे. पण वस्तुतः द्रौपदीनें केंसाची वेणी घातलेली होती व वहाणाऱ्या नदीजलाप्रमाणें तिच्या उंच-सखल प्रदेशीं अलंकार घातले होते. वेणींतील अलंकारांनाच येथें ऊर्मि म्हटलें आहे. त्यांनीं युक्त असे केंस, असा याचा भावार्थ.

(२) राजा, पापी दुःशासनानें जिचे केंस अति दीर्घ आहेत, अशा कृष्णेला ओढीत सभेपाशीं आणिलें. वायु कर्दलीला जसें हलवितो, त्याप्रमाणें त्या वेळीं थरथर कांपत असलेल्या,आर्त झालेल्या व समर्थ नाथांनीं युक्त असलेल्या त्या द्रुपदकन्या कृष्णेला त्या निर्दय धृतराष्ट्रपुत्रानें एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें ओढून आणिलें. तो निर्दय कौरव तिला ओढूं लागला असतां, जिनें आपली अंगयष्टि वांकविली आहे अशी ती राजकन्या त्याला मंदस्वरानें म्हणाली—" हे अनार्या, मी रजस्वला आहें, एकच वस्त्र परिधान केलें आहे, यास्तव हे मंदबुद्धे, तूं मला असें ओढीत कौरवसभेंत नेऊं नकोस."

तेव्हां तो दुष्ट दुःशासन तिचे काळे केंस जोरानें धरून म्हणाला—" याज्ञसेनि, तूं नारायण कृष्ण व नर जिष्णु यांस आपल्या रक्षणासाठीं हांका मार. तूं रजस्वला, एकवस्त्रा किंवा वस्त्ररहितहि जरी असलीस, तरी आम्हीं तुला द्यूतामध्यें जिंकिलें आहे; तुला आम्हीं दासी केलें आहे. यास्तव तुला आतां आमच्या इच्छेप्रमाणें दासीसारखेंच राहिलें पाहिजे. "

( ३ ) राजा जनमेजया, दुःशासनानें ओढून आणल्यामुळें जिचे केंस विखुरले आहेत व अंगावरील अर्धें वस्त्र खालीं पडलें आहे, अशा पांडवपत्नीला अतिशय लज्जा वाटली. तथापि क्रोधानें जिचें अंतःकरण संतप्त झालें आहे, अशी ती साध्वी कृष्णा मंद स्वरानें म्हणाली—" अरे घोर कर्म करणाऱ्या पाप्या, या सभेमध्यें मला गुरुस्थानीं असलेले हे सर्व श्रेष्ठ पुरुष बसले आहेत. ते सर्व विद्वान्, सदाचारसंपन्न व इंद्रासारखे पुण्यात्मे आहेत. त्यांच्यापुढें मी अशा स्थितींत उभी राहूं इच्छीत नाहीं. हे अनार्या, मला अशी विवस्त्र करूं नको. मला अशी ओढूं नको. इंद्रासह सर्व देव जरी तुला साहाय्य करावयास धांवून आले तरी तुझा हा अपराध ते राजपुत्र सहन करणार नाहींत. महात्मा धर्मपुत्र धर्मामध्यें स्थित आहे. धर्म अतिशय सूक्ष्म आहे. सूक्ष्मबुद्धि लोकांनाच त्याचें ज्ञान होतें. यास्तव माझ्या त्या भर्त्याचा परमाणुमात्र दोषहि मी आपल्या मुखानें बोलूं इच्छीत नाहीं. सर्व श्रेष्ठ गुणांचा त्याग करून तो दुष्ट आचरण करील ही गोष्ट कालत्रयींहि शक्य नाहीं. यास्तव मी अपराधी पतींची भार्या नाहीं, हें तूं लक्षांत ठेव. रजस्वला असलेल्या मला तूं या कुरुवीरांच्या सभेमध्यें ओढून आणीत आहेस, हें फार मोठें अकार्य होत आहे! पण या सभेंतील कोणी एकहि पुरुष तुझी निंदा करीत नाहीं, यावरून त्या सर्वांना तुझें हें कृत्य संमत आहे, असेंच मला वाटतें.

अरे अरे, धिक्कार असो! सभेंतील हे सर्व कौरव तुझ्याकडून कुरुवंशाच्या धर्ममर्यादेचें अतिक्रमण होत असतांहि ज्या अर्थी स्वस्थ पहात बसले आहेत, त्या अर्थी भारतांचा धर्म नष्ट झाला आहे व क्षत्रधर्मज्ञांचा सदाचारहि लुप्त झाला आहे, असेंच मी मानितें. द्रोण, भीष्म व महात्मा विदुर यांच्या मध्यें धैर्य नाहीं, असें मला वाटतें. त्याचप्रमाणें या धृतराष्ट्राचेंहि सत्त्व नष्ट झालें आहे, असेंच म्हणावें लागतें. त्यामुळेंच हे सर्व मुख्य मुख्य कुरुवृद्ध त्यांच्या समोर घडत असलेल्या या घोर अधर्माकडे लक्ष देत नाहींत."

राजा जनमेजया, असें करुण वचन बोलणारी ती सुकुमार द्रौपदी क्रुद्ध झालेल्या आपल्या पतींकडे वक्रदृष्टीनें पाहूं लागली. क्रोधाग्नीनें ज्यांचीं शरीरें अगोदरच व्याप्त झालीं आहेत, अशा पांडवांस त्या भामिनीनें आपल्या कटाक्ष-पातांनीं अधिकच प्रज्वलित केलें. लज्जा व कोप यांनीं युक्त होऊन कृष्णेनें फेंकलेल्या कटाक्षांनीं जसें त्या महात्म्यांना दुःख झालें, तसें त्यांना द्यूतांत घालविलेलें राज्य, धन व मुख्य मुख्य रत्नें यांसाठीं झालें नाहीं.

इकडे दुःशासनहि कृष्णा आपल्या दीन झालेल्या पतींकडे पहात आहे हें जाणून देहभान विसरलेल्या तिला वेगानें ओढूं लागला व मोठ्यानें हंसून 'हे दासि' असें बोलला. त्याचें तें वचन ऐकून कर्णहि अतिशय संतुष्ट झाला व मोठ्यानें हंसून त्यानें दुःशासनाच्या दुर्वचनाची प्रशंसा केली. गांधारराज सुबल-पुत्रानेंहि कर्णाप्रमाणेंच दुःशासनाचें अभिनंदन केलें. पण दुर्योधन, दुःशासन व शकुनि या तिघांवांचून इतर जे सभासद तेथें होते त्यांना मात्र 'दुःशासन कृष्णेला सभेमध्यें ओढीत आहे' असें पाहून अतिशय दुःख झालें.

भीष्म म्हणाला– हे सुभगे, धर्माचें रहस्य अतिसूक्ष्म असल्यामुळें मी तुझ्या या प्रश्नाचा निश्चित निर्णय करूं शकत नाहीं. जो ज्या धनाचा स्वामी नसतो तो तें दुसऱ्याचें धन पणास लावूं शकत नाहीं, हें खरें. पण स्त्री सर्वदा भर्त्याच्या अधीन असते हें जाणून मला तुझ्या प्रश्नाचें अनुकूल उत्तर देतां येत नाहीं. कारण दासाची जी भार्या ती दासीच होय. हा युधिष्ठिर सर्व इष्ट भोगांनीं समृद्ध असलेल्या समग्र पृथ्वीचाहि त्याग करील. पण धर्माचा त्याग कर-णार नाहीं. अशा त्या पांडवानें 'मी पराभूत झालों आहें' असें आपल्या मुखानें बोलून दाखविलें आहे. त्यामुळें मी तुझ्या प्रश्नाचा निर्णय सांगण्यास समर्थ नाहीं. कारण 'मी पराभूत झालों आहें,' असें बोलणाऱ्या त्यानें स्वतःचेंच दास्य

मान्य केलें आहे. स्त्रीचें दास्य मान्य केलें नाहीं. राजाच्या जयानें तुझा जय सिद्ध होत नाहीं. तो जर सिद्ध झाला असता तर द्यूतमर्यादा जाणणाऱ्या शकुनीनेंच त्याच्याकडून तुझा पृथक् पण करविला नसता. राजानेंहि शकुनीच्या प्रेरणेनें तुला पणाला लाविलें आहे. स्वेच्छेनें तुझा पण लाविला नाहीं. त्यामुळें 'अस्वामी नसलेल्या त्यानें पण कसा लाविला?' हाहि दोष राजाकडे येत नाहीं. अर्थात् शकुनीच्या बुद्धीनेंच तूं अजित आहेस. पण ही गोष्ट शकुनि मान्य करीत नाहीं. युधिष्ठिराला त्याचें हें कपट कळत नाहीं. तथापि दुसऱ्याचा दास होऊन त्यानें ज्या अर्थी तुला पणाला लाविलें आहे, त्या अर्थी तूं अजितच आहेस. परंतु हा युधिष्ठिर तसें म्हणत नाहीं, त्यामुळें मला तुझ्या प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं.

द्रौपदी म्हणाली—कपटद्यूतामध्यें प्रवीण असलेल्या, अनार्य, दुष्टचित्त, निर्दय व द्यूतप्रिय अशा या नीचांनीं ज्याला द्यूताचा अभ्यास नाहीं, अशा या धर्मराजाला द्यूताचें आह्वान करून त्याचें सर्वस्व हरण करून घेतलें. त्यामुळें हा माझा स्वामी राहिला नाहीं; असें असतांना त्यानें माझा पण लावून शत्रूंचे मनोरथ पूर्ण कसे केले? ज्यांचें चित्त अतिशय अशुद्ध आहे व जे कपट करण्यास प्रवृत्त झाले आहेत, अशा या सर्व नीचांनीं द्यूतामध्यें अनभिज्ञ असणाऱ्या या कुरुपांडवश्रेष्ठाला जिंकून आपला दास बनविलें. त्यानें ज्या वेळीं स्वतःचा पराभव करून घेतला, त्याच वेळीं द्यूत संपलें. असें असतांना त्यानंतरहि त्यानें माझा पण लावून द्यूत कसें केलें? आज या सभेंत समर्थ कौरव बसले आहेत. त्यांना कन्या व स्नुषा आहेत. त्या सर्वांनीं माझ्या या क्लेशांकडे लक्ष देऊन 'मी कौरवांची दासी न्यायानें कशी होतें?' या माझ्या प्रश्नाचें उत्तर द्यावें.

राजा जनमेजया, याप्रमाणें करुण भाषण करणाऱ्या, रडणाऱ्या व आपल्या कृपण पतींकडे पहाणाऱ्या त्या द्रौपदीला दुरात्मा दुःशासन अति कठोर, कर्कश व घोर वचनें बोलूं लागला. त्या वेळीं दुःशासन जिला निर्दयपणें ओढीत आहे व त्यामुळें जिचें उत्तरीय अंगावरून घसरलें आहे, अशा रजस्वला व तशा अपमानास अयोग्य असलेल्या कृष्णेकडे पाहून वृकोदर मनांत अतिशय व्याकुळ झाला. त्याला युधिष्ठिराचा फार क्रोध आला. २. ९. ६७.

## अध्याय ६८ वा.

[ १ भीमाचें क्रोधयुक्त वचन. २ विकर्णाचें न्याय्य भाषण. ३ दुःशासनानें केलेला द्रौपदीवस्त्रापहार. ४ कृष्णप्रसादानें असंख्य वस्त्रांचा प्रादुर्भाव व द्रौपदीचें लज्जारक्षण. ५ भीमाची प्रतिज्ञा. ६ विदुरवचन व प्राचीन इतिहासाचें कथन. ]

( १ ) **वैशंपायन म्हणाला**—राजा द्वितीय पांडव भीम द्रौपदीची ती दुरवस्था पाहून अतिशय क्रुद्ध झाला व आपल्या ज्येष्ठ भ्रात्यास म्हणाला—"युधिष्ठिरा, द्यूतकारांच्या घरीं दासीप्रभृति हीन स्त्रियाहि असतात. परंतु त्यांचा पण लावून ते कधीं द्यूत करीत नाहींत. त्यांच्यावरहि त्या कितवांची दया असते. पण तूं प्रत्यक्ष आपली प्रिय भार्याहि पणाला लावलीस, हें केवढें आश्चर्य आहे !

हे प्रभो, काशिराजानें जें धन व इतर उत्तमोत्तम वस्तु आणल्या होत्या, इतर राजांनींहि राजसूयाच्या प्रसंगीं तुला जीं उत्तमोत्तम रत्नें आणून दिलीं होतीं, त्याचप्रमाणें आपल्याजवळ जीं उत्तमोत्तम वाहनें, विपुल धन, विचित्र कवचें व आयुधें होतीं, त्या सर्वांसह तूं आपलें राज्य, स्वतःचा देह व आम्ही तुझे भ्राते, हें आपलें सर्वस्व कपट द्यूतांत हरविलेंस. शत्रूंनीं केवल कपटाचा आश्रय करून तुला जिंकिलें, पण त्याविषयीं मला यत्किंचित्हि दुःख झालें नाहीं. किंवा कोपहि आला नाहीं. कारण तूं आम्हां सर्वांचा स्वामी आहेस. परंतु या असल्या कृत्रिम द्यूतांत तूं द्रौपदीचा पण लाविलास हा फारच मोठा अतिक्रम केला आहेस, असें मी मानितों.

अरे, ही सुकुमारी द्रौपदी अशा अपमानास सर्वथा पात्र नाहीं. तथापि ती पांडवांची पत्नी झाल्यामुळें, तुझ्या अपराधानें, अति क्षुद्र, अति निर्दय व अति नीच अशा कौरवांकडून आज भरसभेंत अशी गांजली जात आहे. तिचा हा असामान्य अपमान पाहून मला जो क्रोध आला आहे, त्याचा परिणाम अगोदर तुझ्यावर होईल, असेंच मी करितों. सहदेवा, जा आणि प्रदीप्त अग्नि घेऊन ये. मी द्यूत खेळणाऱ्या या राजाचे हात जाळून टाकितों."

भीमसेनाचें हें उग्र वचन ऐकून स्वभावतःच शांत असलेला अर्जुन म्हणाला—"भीमसेना, आजपर्यंत तूं अशा प्रकारचे शब्द आपल्या ज्येष्ठ भ्रात्याला कधीं बोलला नाहींस. पण आज ते तुझ्या मुखांतून निघालेले ऐकून या दुष्ट शत्रूंनीं तुझें धर्मगांभीर्यहि हिरावून घेतलें आहे, असें मला वाटतें. पण हे पूज्य भ्रात्या,

तूं असा क्रुद्ध होऊन हें अकार्य करूं नको. आम्हां पांच भ्रात्यांमध्यें भेद उत्पन्न व्हावा, हाच शत्रूंचा मनोरथ आहे. तो तूं पूर्ण होऊं देऊं नको. वृकोदरा, या वेळीं तूं श्रेष्ठ धर्माचेंच आचरण कर. आपल्या ज्येष्ठ धार्मिक भ्रात्याचें अतिक्रमण करण्यास कोण समर्थ आहे! हा धर्मात्मा स्वेच्छेनें द्यूतांत प्रवृत्त झाला नाहीं. तर शत्रूंनीं त्याला आह्वान केल्यामुळें, क्षत्रियांच्या व्रताला स्मरून, परेच्छेनें तो कपटपटु शकुनीशीं द्यूत खेळत आहे. वस्तुतः हें त्याचें आचरण या लोकीं आमची मोठी कीर्तिच करणारें आहे."

अर्जुनाचें तें हितवचन ऐकून भीमसेन किंचित् शांत झाला व म्हणाला—"धनंजया, तूं म्हणतोस तें खरें आहे. पण हा अन्याय मला सहन झाला नाहीं, म्हणून मी असें बोललों. या प्रसंगीं धर्मपालन करणें हेंच आमचें कर्तव्य आहे, हें जर मी जाणलें नसतें, तर मात्र मीं याचे दोन्ही हात बलात्कारानें अग्नीनें खचित दग्ध करून टाकिले असते."

( २ ) पारिक्षिता, याप्रमाणें महात्मे पांडव अतिशय दुःखी झाले आहेत व निर्दय दुःशासन पांचालीला ओढीत आहे, असें पाहून धृतराष्ट्रपुत्र विकर्ण म्हणाला—" हे नरश्रेष्ठहो, या साध्वी याज्ञसेनीनें तुम्हांला जो प्रश्न केला आहे, त्याचें यथार्थ उत्तर द्या. तिच्या वाक्याचा निर्णय न केल्यास आम्हां सभासदांना तत्काल नरकप्राप्तिच होईल. भीष्म व धृतराष्ट्र, हे आमच्या कुलांतील अति वृद्ध पुरुष आहेत. पण ते कांहींच बोलत नाहींत. महा बुद्धिमान् विदुरहि न्यायनिष्ठुर होऊन निर्णय सांगत नाहीं. आम्हां सर्वांचा आचार्य भारद्वाज द्रोण व शारद्वत कृपाचार्य, हे निःस्पृह द्विजश्रेष्ठ असतांना, तेहि द्रौपदीच्या प्रश्नाचें उत्तर न देतां स्वस्थ कां बसले आहेत, सर्व देशांतून द्यूत पहाण्यासाठीं आलेले जे इतर भूपाल या सभेंत बसले आहेत, त्यांनींहि काम-क्रोधांचा त्याग करून यथामति उत्तर द्यावें. ही साध्वी द्रौपदी वारंवार जो प्रश्न करीत आहे, त्याचा चांगला विचार करून, हे पार्थिवहो, कोणाचें काय मत आहे, तें स्पष्ट सांगा."

हे राजा, याप्रमाणें धार्मिक विकर्णानें सर्व सभासदांना द्रौपदीच्या प्रश्नाचें उत्तर देण्याविषयीं परोपरीनें विनविलें. पण त्यांतील एकाहि भूपालानें त्याला 'बरें किंवा वाईट' असें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां आपण या पृथ्वीपतींना वारंवार प्रेरणा करीत असूनहि हे कांहीं बोलत नाहींत, असें पाहून विकर्णाला

अतिशय क्रोध आला व तो आपले दोन्ही हात एकमेकांवर घांसून सर्पाप्रमाणें निःश्वास टाकीत म्हणाला—

"हे नरेंद्रहो, तुम्ही आपलें स्पष्ट मत सांगा किंवा नका सांगूं. या प्रसंगीं मला जें न्याय्य वाटतें, तें मी स्पष्टपणें सांगतों. हे नरश्रेष्ठ कौरवहो, मृगया, मद्यपान, द्यूत व ग्राम्यविषयांतील अत्यासक्ति हीं राजांचीं चार व्यसनें प्रसिद्ध आहेत. जो पुरुष त्यांत आसक्त होतो, तो धर्माचें उल्लंघन करून वागूं लागतो. व्यसनासक्त मनुष्यानें अयोग्य मार्गानें जें कार्य केलेलें असतें, त्याला विद्वान् लोक केव्हांहि मान देत नाहींत. उलट त्यानें तशा संकटांत सांपडून केलेल्या क्रियेला ते अक्रियाच म्हणतात. नीच द्यूतकरांनीं आह्वान केल्यामुळें हा पांडुपुत्र द्यूत करावयास प्रवृत्त झाला व कपटी कितवांनीं त्याला संकटांत पाडल्यामुळें त्यानें हा द्रौपदीचा पण लाविला. ही अनिंद्य द्रौपदी सर्व पांडवांची सामान्य भार्या आहे व स्वतः द्यूतामध्यें पूर्वींच पराजित झालेल्या पांडवानें तिचा पण लाविला. तिच्या पणाची इच्छा करणाऱ्या सौबलानेंच युधिष्ठिराला तिचा पण लावण्याची प्रेरणा केली. याप्रमाणें राजाचें व्यसनित्व, जितत्व, द्रौपदीचें सामान्यत्व व परप्रवर्तितत्व या चार कारणांचा विचार केला असतां द्रौपदी जिंकिली गेली नाहीं, असें माझें निश्चित मत आहे."

हे राजा, विकर्णाचें हें न्याय्य भाषण ऐकून त्याची प्रशंसा व सौबलाची निंदा करणाऱ्या सभासदांनीं फार मोठा कोलाहल केला. कांहीं वेळानें तो शब्द शांत झाला असतां क्रोधानें देहभान विसरलेला कर्ण स्वतःचा सुंदर बाहु वर करून असें वचन बोलला –"या विकर्णाच्या ठिकाणीं अनेक प्रकारच्या विपरीत भावना प्रतीत होत आहेत. अरणीपासून उत्पन्न झालेला अग्नि जसा त्या अरणीलाच जाळून टाकितो, तसा धृतराष्ट्रापासून उत्पन्न झालेला हा मूढ धार्तराष्ट्रांच्याच विनाशाला कारण होत आहे. द्रौपदीनें पुनः पुनः प्रश्न केला असतां हे सभासद कांहीं एक बोलत नाहींत. शकुनीनें या द्रुपदकन्येला धर्मानेंच जिंकिलें आहे, असें ते समजतात. पण हे धृतराष्ट्रपुत्रा, तूं मात्र केवल मूढतेनें आपलें भिन्न मत प्रकट करीत आहेस.

वत्सा, तूं अद्यापि बाल आहेस. म्हणून सभेमध्यें प्रौढांच्या गोष्टी बोलून असें आपलें अज्ञान प्रकट करीत आहेस. पण हे दुर्योधनानुजा, तूं धर्माला पूर्णपणें जाणत नाहींस; तूं अतिमंदबुद्धित्वामुळें जिंकलेल्याहि कृष्णेला न जिंकलेली

म्हणत आहेस. पण हे धार्तराष्ट्रा, तूं तिला अजित कसें म्हणतोस ? पांडवांच्या ज्येष्ठ भ्रात्यानें सभेमध्यें जर आपलें सर्वस्व पणाला लाविलें, तर त्यांत द्रौपदीचाहि अंतर्भाव झालाच ! मग धर्मानें जिंकिलेल्या तिला तूं अजित कसें मानितोस ? युधिष्ठिरानें आपल्या मुखानें द्रौपदीच्या नांवाचा उच्चार करून तिला पणास लाविलें, तेव्हां इतर पांडवांनीं ज्या अर्थी त्याचा निषेध केला नाहीं, त्या अर्थी त्यांनींहि तिच्या पणाला अनुज्ञा दिलीच ! असें असतांना 'ती अजित आहे' असें तुला कोणत्या कारणानें वाटतें ?

आतां एकवस्त्रा असलेल्या तिला अधर्मानें सभेंत आणिलें, असें जर तूं समजत असशील, तर त्याविषयींहि माझें उत्तम वाक्य ऐक. हे कुरुनंदना, देवांनीं स्त्रीचा एकच भर्ता नियत केला आहे, असें असतांना ही द्रौपदी अनेक पतींना वश होऊन राहिली आहे. यावरून ही दुराचरणी आहे, यांत कांहीं संशय नाहीं. अशा पांचालीला सभेंत ओढून आणणें, तिनें एकवस्त्रा असणें किंवा वस्त्ररहित असणें, यांत कांहींच आश्चर्य नाहीं, असें माझें निश्चित मत आहे. सौबलानें पांडवांचें धन, त्यांची स्त्री व स्वतः पांडव यांचें धर्मतः हरण केलें आहे. यास्तव हें सर्व धर्मतः जिंकिलेलें धन आहे. हे दुःशासना, हा विकर्ण आपल्याला जरी मोठा पंडित मानीत असला तरी तो अति मूढ आहे. यास्तव तूं आतां पांडव व द्रौपदी यांचीं वस्त्रें काढून घे ."

(३) हे भारता, कर्णाचें हें वचन ऐकून सर्व पांडवांनीं आपापल्या अंगावरील उत्तरीय वस्त्रें काढून ठेविलीं व ते सभेंत बसले. त्यानंतर हे राजा, दुःशासन द्रौपदीचें वस्त्र बलात्कारानें हरण करण्यासाठीं तें हातानें घट्ट धरून त्या सभेमध्यें ओढूं लागला. राजा, तो दुष्ट आपलें वस्त्र जोरानें ओढीत आहे, असें पाहून द्रौपदीनें सर्व दुःखाचें निवारण व खलांचा संहार करणाऱ्या हरीचें चिंतन केलें.

**द्रौपदी** म्हणाली—हे गोविंदा[1], तूं इंद्रियांचा चालक असल्यामुळें माझ्या हृदयामध्यें स्थित आहेस. पण तूं इतका जवळ असूनहि माझ्यावर केवढा अनर्थ ओढवला आहे, हें कसें जाणत नाहींस ? (पण तो समीप जरी असला

---

१ येथें गोविंद, द्वारकावासिन् इत्यादि मुळांतील संबोधनें जशींच्या तशींच घेऊन त्यांचेंच पुढें स्पष्टीकरण केलें आहे.

तरी असमर्थ असल्यास काय करणार ? उत्तर—) हे द्वारकावासिन्—स्वकीयांच्या संकटाचें निवारण करण्यासाठीं एका रात्रींत समुद्रामध्यें द्वारकापुरी निर्माण करून मथुरेंतील सर्व लोकांना तूं एकाच वेळीं त्या नगरींत घेऊन गेलास. अशा तुज सर्वसमर्थाला मज अबलेचें रक्षण करणें अगदींच सुकर आहे. (हरि हृदयस्थ असून समर्थ जरी असला, तरी त्यानें दुष्टांवर अनुग्रह कां करावा ? उत्तर—) हे कृष्णा, तुझें केवल स्मरण केल्यानेंच तूं सर्व दोषांचें आकर्षण करितोस. (तथापि अनृत, साहस, माया, मूर्खत्व, अतिलोभ, अशुचित्व व निर्दयत्व हे स्त्रियांचे स्वभाविक दोष आहेत, त्यामुळें त्यांचें निवारण करितां येणें शक्य नाहीं. सर्पाच्या दाढेंतून अमृत निघणें अशक्य आहे ! उत्तर–) हे गोपीजनप्रिय, मनुष्यांमध्यें गोप अति नीच आहेत व त्यांच्या स्त्रिया तर त्यांहूनहि निकृष्ट आहेत. असें असतांना त्यांवरहि तूं अनुग्रह केला आहेस. मग केवल तुलाच शरण आलेल्या व राजसूययज्ञांतील अभिषेकानें तुझ्याकडून अनुगृहीत झालेल्या मजवर तूं कसा प्रसन्न होणार नाहींस ?

हे केशवा, तूं ब्रह्मादिकांचाहि प्रवर्तक आहेस. सर्वांचा आत्मा आहेस. यास्तव मजवर अनुग्रह कर. हे नाथ, हे रमानाथ, हे व्रजनाथ, हे दुष्ट कौरव मला गांजीत आहेत. हे आर्तिनाशना, तूं गोवर्धनाचा उद्धार, दावाग्नीचा ग्रास इत्यादि अद्भुत कर्मांनीं व्रजवासी जनांची पीडा जशी घालविलीस, त्याचप्रमाणें हे जनार्दना, या कौरवसागरांत बुडत असलेल्या माझा उद्धार कर. हे कृष्णा, हे महाबाहो कृष्णा, हे महा योगिन्, हे सर्वान्तर्यामिन्, हे विश्वकर्त्या, मी तुला सर्वथा शरण आहें. या कौरवसभेमध्यें क्लेश भोगीत असलेल्या माझें तूं रक्षण कर. तूं सर्वान्तर्यामी आहेस. यास्तव शत्रूला माझें वस्त्र हरण करण्याविषयीं उदासीन तरी कर किंवा तूं विश्वकर्ता असल्यामुळें मला असंख्य वस्त्रें तरी पुरीव. त्यावांचून या प्रसंगीं माझ्या लज्जेचें रक्षण होणें शक्य नाहीं.

(४) जनमेजया, याप्रमाणें त्या त्रिभुवनेश्वर कृष्णाचें चिंतन करून भगवान् आपल्यावर अनुग्रह केल्यावांचून रहाणार नाहीं, असा निश्चय असल्यामुळें शत्रूची यत्किंचित्हि भीति न बाळगणारी ती राजकन्या अतिशय दुःखी होऊन व हातानें आपलें मुख झांकून घेऊन मोठ्यानें आक्रोश करूं लागली.

याज्ञसेनीचा तो धांवा ऐकून कृष्णाला तिची अतिशय दया आली. त्याचा कंठ दाटून आला व तो कृपाळु भगवान् शय्या, आसन इत्यादिकांचा त्याग

करून पायांनींच अति त्वरेनें कौरवसभेंत आला. त्या वेळीं ती पांडवपत्नी याज्ञसेनी नर-नारायणरूप असलेल्या कृष्णार्जुनांना मोठ-मोठ्यानें हाका मारीत होती. तेव्हां द्वारकेहून धांवून आलेला तो भगवान् गुप्त राहून स्वतः द्रौपदीचें धर्मरूप परिधानीय वस्त्र बनला व त्या महात्म्यानें अनेक प्रकारच्या उत्कृष्ट वस्त्रांनीं तिचें शरीर आच्छादित केलें.

हे राजा, दुष्ट दुःशासनानें द्रौपदीचें एकवस्त्र तिच्या अंगावरून ओढून घेतांच तसलें दुसरें वस्त्र तेथें दिसूं लागलें. तें ओढून घेतल्यावर त्याहीपेक्षां तिसरें उत्कृष्ट वस्त्र तिच्या अंगावर दिसलें. हे प्रभो, दुःशासन एका मागून एक अनेक वस्त्रें ओढूं लागला असतां द्रौपदीच्या शरीरावर उत्तरोत्तर उत्कृष्ट, चित्र-विचित्र शुभ्र व अनेक वस्त्रें प्रादुर्भूत झालीं.

(५) हे राजा, पांच पांडव व द्रौपदी यांनीं शुद्ध धर्माचें परिपालन केल्यामुळेंच भगवानानें हा चमत्कार सभेंतील सर्व लोकांस दाखविला. भर सभेंत घडलेला हा अद्भुत प्रकार पाहून सभेंतील सर्व राजे विस्मित झाले व त्यांनीं फार मोठा कोलाहल केला. त्या वेळीं सर्व नृपाल द्रौपदीची प्रशंसा व दुःशासनाची निंदा करूं लागले. त्या प्रसंगीं भीमाचे दोनहि ओंठ क्रोधानें थरथर कांपूं लागले. त्यानें हातावर हात चोळून त्या सर्व राजांमध्यें मेघासारख्या भयंकर ध्वनीनें अशी घोर प्रतिज्ञा केली—"हे भूलोकांतील क्षत्रियहो, माझें हें शपथवचन तुम्ही ऐकून ठेवा. असलें घोर प्रतिज्ञावचन यापूर्वी कोणींहि उच्चारिलें नाहीं व यापुढें कोणी उच्चारणारहि नाहीं. हे पृथ्वीश्वरांनो, मी आतां शपथपूर्वक जें बोलत आहें, तें जर सत्य करून न दाखवीन, तर माझ्या पूर्व पितामहांच्या गतीला मी प्राप्त होणार नाहीं. युद्धांत या पापी दुर्बुद्धि भारतकुलकलंक दुःशासनाचें वक्षःस्थल बलात्कारानें फोडून त्याचें रक्त जर मी न पिईन, तर मला पितामहांची सद्गति प्राप्त होणार नाहीं."

---

१ याच प्रसंगाला उद्देशून नीलकंठांनीं आपल्या टीकेंत पुढील श्लोकाचा उल्लेख केला आहे. 'नास्त्यकार्यं कदर्याणां नास्त्यक्षाम्यं महात्मनाम् । नास्त्युपेक्ष्यो हरेर्भक्त इति द्यूते प्रदर्शितम् ॥ अर्थ—दुर्जनांना अकार्य असें कांहीं नाहीं, महात्म्यांना अक्षम्य असें कांहीं नाहीं व हरीला कोणताहि भक्त उपेक्षणीय नाहीं, हें या द्यूतप्रसंगीं प्रदर्शित केलें आहे.

(६) राजा जनमेजया, भीमाचें हें घोर व अंगावर रोमांच उभे करणारें प्रतिज्ञा-वचन ऐकून सभेंतील वीरांनीं 'धन्य, धन्य' असें म्हणून त्याची प्रशंसा व दुःशासनाची निंदा केली. इकडे दुःशासन द्रौपदीचीं वस्त्रें भराभर ओढीतच होता. सभेमध्यें त्यांचा ढीग पडला. त्या दुष्टाचे हात थकून गेले. एवढा प्रयत्न करूनहि आपले मनोरथ सिद्ध झाले नाहींत, म्हणून त्याला मोठी लाज वाटली व तो सभेंत खालीं मान घालून बसला. पांडव आपलीं उत्तरीय वस्त्रें टाकून सभेंत उघडे बसले आहेत व कौरवांतील कोणी एकहि महात्मा द्रौपदीच्या प्रश्नाचें उत्तर देत नाहीं, असें पाहून सभेंतील नरश्रेष्ठांच्या तोंडून 'धिक्कार, धिक्कार' असा फार मोठा शब्द निघाला. त्या सभेंतील सुजन धृतराष्ट्राची अतिशय निंदा करीत मोठा कोलाहल करूं लागले. तेव्हां सर्वधर्मज्ञ विदुर आपला शुभ बाहु वर उचलून व कोलाहल करणाऱ्या सभासदांचें निवारण करून म्हणाला—

"हे श्रेष्ठहो, द्रौपदी तुम्हां सर्वांना प्रश्न करून, ही साध्वी सनाथ असूनहि एखाद्या अनाथ स्त्रीप्रमाणें तुमच्या पुढें आक्रोश करीत आहे. पण तुम्हीं तिच्या प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. त्यामुळें या सभेंत धर्माचा घात होत आहे. 'एखादा आर्त मनुष्य प्रदीप्त अग्नीप्रमाणें न्याय मागण्यासाठीं सभेंत येतो व सभासद सत्यधर्मानें त्याच्या दुःखाचें निवारण करून त्याचें रक्षण करितात. आर्तांचें रक्षण न केल्यास सभासदांच्या धर्माचा नाश होतो' असें मनूनें सांगितलें आहे. यास्तव श्रेष्ठ मानवानें सत्याला स्मरून सत्यप्रश्नाचा निर्णय करावा. काम, क्रोध व बल यांचा तिरस्कार करून आर्ताच्या प्रश्नाचें न्याय्य उत्तर द्यावें, अशी नीति आहे.

या महात्म्या विकर्णानें आपल्या समजूतीप्रमाणें द्रौपदीच्या प्रश्नाचें उत्तर दिलें. त्याचप्रमाणें हे नराधिपहो, तुम्हीहि यथामति या गूढ प्रश्नाचा निर्णय करा. जो सभेंत आलेला धर्मदर्शी पुरुष आर्ताच्या प्रश्नाचें उत्तर देत नाहीं तो मिथ्या भाषणामुळें लागणाऱ्या दोषांतील अर्ध्या दोषाला पात्र होतो आणि जो धर्मज्ञ सभासद मिथ्या निर्णय करितो, त्याला असत्य भाषणाचें समग्र फल मिळतें, असा शास्त्रसिद्धान्त आहे.

याविषयीं एक पुरातन इतिहास सांगतात. प्रह्लाद व आंगिरस मुनि यांचा पूर्वी एकदा असाच संवाद झाला. प्रह्लाद या नांवाचा एक प्रसिद्ध दैत्येंद्र असून

विरोचन हा त्याचा पुत्र होय. तो प्रह्लादपुत्र एका कन्येसाठीं आंगिरस सुधन्व्याकडे आला. केशिनी या नांवाची एक कन्या असून तिनें आपल्याला वरावें, असें त्या दोघांनाहि वाटत होतें. पण त्या कन्येनें 'तुम्हां दोघांमध्यें कुल-शीलादिकांनीं श्रेष्ठ कोण आहे ?' असें त्यांस विचारिलें. तेव्हां सुधन्वा व विरोचन हे दोघेहि 'मीच श्रेष्ठ आहें' असें बोलूं लागले. त्यामुळें त्यांचा परस्पर वाद सुरू झाला. तेव्हां त्यांनीं आपसांत प्राणाचा पण लाविला. 'आम्हां उभयतांमध्यें जो कोणी श्रेष्ठ ठरेल तो निकृष्टाच्या प्राणांचा स्वामी होईल. म्हणजे या पणांत हरलेल्या पुरुषानें दुसऱ्याचें यावज्जीव दास्य करावें' असा पण केला व ते दोघेहि प्रह्लादाकडे गेले आणि 'हे दैत्येंद्रा, आम्हां दोघांतील श्रेष्ठ कोण ? हें तूं खरें सांग. मिथ्या बोलूं नको' असें म्हणाले.

तेव्हां सुधन्वा-मुनीकडे अवलोकन करून प्रह्लाद मिथ्या भाषण करावयास भ्याला व कांहींच बोलला नाहीं. तें पाहून क्रुद्ध झालेला आंगिरस सुधन्वा ब्रह्मदंडाप्रमाणें प्रज्वलित होऊन त्यास म्हणाला—"हे प्रह्लादा, तूं पुत्राच्या हितासाठीं मिथ्या भाषण करशील, किंवा कांहींच उत्तर न देतां स्वस्थ बसशील, तर इंद्र आपल्या वज्रानें तुझें मस्तक शतधा विदीर्ण करील."

सुधन्व्याचें हें घोर वचन ऐकून प्रह्लाद शुष्क झालेल्या अश्वत्थपर्णाप्रमाणें मनांत अतिशय व्यथित झाला व तो दैत्य महातेजस्वी कश्यपाकडे या प्रश्नाचा निर्णय विचारण्यासाठीं गेला.

प्रह्लाद म्हणाला—हे भगवन्, तूं देव, असुर व ब्राह्मण यांचा श्रेष्ठ धर्म जाणतोस. यास्तव हे महाभागा, मजवर कोणतें धर्मसंकट ओढवलें आहे, तें तूं ऐक. कोणी धर्मनिर्णयासाठीं प्रश्न करूं लागला असतां, त्याच्या प्रश्नाचें अस्पष्ट उत्तर दिल्यास किंवा मिथ्या निर्णय केल्यास त्याला कोणते परलोक प्राप्त होतात तें मला सांग.

कश्यप म्हणाला—प्रह्लादा, धर्माचा निर्णय जाणत असूनहि जो काम, क्रोध किंवा भय, यांमुळें स्पष्ट निर्णय सांगत नाहीं तो उभयपक्षपाती पुरुष आपल्या भोंवतीं वरुणाचे सहस्र पाश अडकवून घेतो. जो साक्षी खरी साक्ष न देतां खोटी साक्ष देतो, तोहि उभयपक्षपाती पुरुष सहस्र वरुणपाशांस पात्र होतो व एक वर्ष पुरें झालें म्हणजे त्याचा एक पाश तुटतो. याप्रमाणें त्याचे सर्व पाश तुटण्यास एक हजार वर्षें लागतात. सभेमध्यें अधर्मानें धर्माचा बाध होण्याचा

प्रसंग आला असतां, सभासदांनीं अधर्माचें शल्य दूर करून शुद्ध धर्मच प्रकट करावा, अशी नीति आहे. पण जे सभासद सभेंत बसून धर्माधर्मांचा विवेक करीत नाहींत ते स्वतःच अधर्मानें विद्ध होतात. जे निंद्य अधर्मांची निंदा करीत नाहींत, त्यांतील श्रेष्ठाला अर्धा, कर्त्याला चतुर्थांश व इतर सभासदांस चतुर्थांश अधर्मदोष लागतो.

पण ज्या सभेंत निंद्य अधर्मांची स्पष्ट निंदा होते त्या सभेंतील श्रेष्ठ सभासद निर्दोष होतात व तो सर्व अधर्म केवल कर्त्यालाच ग्राशितो. यास्तव हे प्रह्लादा, धर्मनिर्णय करण्याचा प्रसंग आला असतां, तो न करणें किंवा मिथ्या निर्णय करणें अथवा संदिग्ध वचन बोलून वेळ मारून नेणें, या मिथ्याचरणानें धर्म विद्ध होतो. हें ध्यानांत ठेवून धर्मांतील अधर्मशल्य निःपक्षपात बुद्धीनें दूर करावें. गायीचा कान एकदा या बाजूला व एकदा दुसऱ्या बाजूला जसा स्पर्श करितो, त्याप्रमाणें संदिग्ध वचनादिकांच्या योगानें पक्षपात कधींहि करूं नये.

हे प्रह्लादा, आर्त लोक धर्मनिर्णयासाठीं आले असतां, जे अन्यायानें मिथ्या धर्मनिर्णय सांगतात, ते पूर्वींच्या सात व पुढील सात अशा चौदा पूर्वजांच्या इष्टापूर्तधर्मांचा घात करितात. शत्रूंनीं ज्याच्या सर्वस्वाचें हरण केलें आहे ज्याचा पुत्र मारला गेला आहे, ज्या ऋणकोला धनकोनें अतिशय छळिलें आहे, जो स्वार्थापासून भ्रष्ट झाला आहे व राजानें ज्याला ग्राशिलें आहे, अशा पुरुषांना किंवा व्याघ्रानें ज्याचें आक्रमण केलें आहे, अशा मनुष्याला, अथवा जी पतिहीन झाली आहे, जिला पुत्र नाहीं व जिच्या पतीनें दुसरा विवाह केला आहे अशा स्त्रीला व ज्याच्या साक्षीदारांनीं खोट्या साक्षी दिल्या आहेत, अशा लोकांना होणारें दुःख एकसारखेंच आहे, असें श्रेष्ठ देव म्हणतात. हे प्रह्लादा, पूर्वोक्त सर्व दुःखितांचें दुःख असत्य भाषण करणाऱ्या मनुष्याला होतें. एखादें कृत्य समक्ष पाहिल्यानें किंवा सत्यवक्त्या पुरुषाच्या तोंडून तें ऐकल्यानेंहि पुरुष त्याचा साक्षी होऊं शकतो. यास्तव अशा साक्षी पुरुषानें सर्वदा सत्य भाषणच करावें म्हणजे त्याचा धर्म व अर्थ यांची हानि होत नाहीं.

हे सभासदहो, कश्यपाचें हें भाषण ऐकून प्रह्लाद आपल्या विरोचन पुत्राला म्हणाला—“ वत्सा, हा सुधन्वा तुझ्याहून श्रेष्ठ आहे. याचा पिता अंगिरामुनि मजहून श्रेष्ठ आहे व या सुधन्व्याची माताहि तुझ्या मातेहून श्रेष्ठ आहे. यास्तव हे पुत्रा, हा सुधन्वा तुझ्या प्राणांचा स्वामी आहे. ”

प्रह्लादाचा हा न्याय्य निर्णय ऐकून आंगिरस सुधन्वा त्यास म्हणाला—" हे श्रेष्ठा, तूं पुत्रस्नेहाचा त्याग करून धर्मामध्येंच स्थित झाला आहेस. यास्तव मी तुझ्या पुत्राला प्राणदान देतों. हा तुझा पुत्र शतवर्षे जिवंत राहो."

**विदुर**—हे श्रेष्ठ सभ्यहो, हा प्राचीन परम धर्म ऐकून तुम्ही कृष्णेच्या प्रश्नाचा निर्णय करा.

राजा जनमेजया, विदुराची ही सदुक्ति ऐकूनहि ते सर्व नृपाल कांहींच बोलले नाहींत. तेव्हां कर्ण दुःशासनाला म्हणाला—" हे वीरा, तूं या द्रौपदी-दासीला घरांत घेऊन जा." कर्णाचे हे शब्द कानीं पडतांच तो निर्दय दुःशासन लज्जित झालेल्या, थरथर कांपणाऱ्या व पांडवांना हांका मारून आक्रोश करणाऱ्या त्या तपस्विनी द्रौपदीला सभेतून ओढून नेऊं लागला. २. ९. ६८.

---

## अध्याय ६९ वा.

[ १ द्रौपदीचा विलाप. २ भीष्माचें सान्त्वपर भाषण. ]

( १ ) **वैशंपायन**—परिक्षिता, याप्रमाणें त्या सभेंत सर्व श्रेष्ठ वीरांच्या समोर तो नीच दुःशासन ओढूं लागला असतां ती असहाय द्रौपदी म्हणाली—" हा मूढ माझ्याशीं बलात्कारानें अशी दांडगाई करीत असल्यामुळें मी विह्वल झालें व माझें आद्य व श्रेष्ठ कर्तव्य राहून गेलें. या कौरवांच्या सभेंतील सर्व कुरुश्रेष्ठांना मी वंदन करीत आहें. मीं तें आरंभींच केलें नाहीं, यांत माझा कांहीं दोष नाहीं."

राजा, त्या सभेमध्यें तो दुष्ट दुःशासन कृष्णेला पुनः ओढूं लागला असतां तशा अपमानास योग्य नसलेली ती तपस्विनी द्रौपदी दुःखानें भूमीवर पडली व विलाप करूं लागली. ती म्हणाली—"माझ्या स्वयंवराच्या वेळीं त्या मंडपांत जमलेल्या नृपालांनींच कायतें मला पाहिलें होतें. त्यांच्यावांचून अन्य कोणाच्याहि दृष्टीं न पडलेली मी आज या सभेंत अशारीतीनें आलें आहें. माझ्या अंतःपुरांत वायु व आदित्य यांच्याहि दृष्टीं न पडणारी मी आज या सभेंतील जनसमूहांकडून पाहिली जात आहें. माझ्या मंदिरांत वायूनें देखील मला स्पर्श केलेला ज्या पांडवांना सहन होत नसे, तेच माझे पति आज या सभेंत हा दुरात्मा दुःशासन मला सर्वांसमक्ष ओढीत असतांना मुकाट्यानें सहन कसे करीत आहेत.

हाय हाय, क्लेश भोगण्यास सर्वथा असमर्थ असलेली ही आपली स्नुषा व कन्या असें दारुण दुःख भोगीत आहे, हें प्रत्यक्ष पाहणारे हे सर्व कुरुवृद्ध तें सहन करीत आहेत! खरोखर, हे क्लेश सोसण्यास मी असमर्थ आहें. दैवच फिरलें असें मला वाटतें. मी कुलीन व साध्वी स्त्री असतांना या सभेमध्यें दुःखसागरांत अशी बुडत आहें, यापेक्षां आणखी दैन्य तें कोणतें ! आज भूपालांचा धर्म कोठें गेला? पूर्वीं धर्म्यस्त्रियांना सभेंत कधींहि नेत नसत, असें आम्हीं ऐकिलें आहे. परंतु या कौरवांतील तो प्राचीन सनातनधर्म नष्ट झाला आहे, हेंच खरें. त्यावांचून ही पांडवांची भार्या, धृष्टद्युम्नाची भगिनी आणि वासुदेवाची सखी या सभेमध्यें कशी आली असती!

हे कुरुश्रेष्ठहो, मी धर्मराजाची धर्मपत्नी व क्षत्रियकुलोत्पन्न वीरकन्या आहें. यास्तव मी न्यायानें कौरवांची दासी आहें किंवा अदासी आहें, हें मला सांगा. म्हणजे त्याप्रमाणें मी वागेन. हे कौरवहो, कुरूंचें यश हरण करणारा हा क्षुद्रबुद्धि दुःशासन मला क्लेश देत आहे, ते आतां माझ्यानें फार वेळ सहन करवत नाहींत. हे नृपालहो, मी जित आहें कीं अजित आहें, याविषयीं तुम्हांला जें वाटत असेल तें मला स्पष्ट सांगा. हे कुरुवृद्धहो, मी तुमचा निर्णय ऐकण्याची इच्छा करीत आहें. तुमचें उत्तर मिळतांच मी त्याप्रमाणें अवश्य करीन."

( २ ) भीष्म म्हणाला—हे पांचालि, धर्माची गति अति सूक्ष्म आहे, हें मीं तुला पूर्वींच सांगितलें आहे. ज्ञानी महात्म्यांनाहि या लोकीं तो कळत नाहीं. प्रायः लोकामध्यें बलवान् पुरुष ज्याला धर्म समजतो तो अधर्म जरी असला तरी धर्मच मानिला जातो आणि दुर्बलानें सांगितलेला धर्महि अधर्म ठरून त्यावर आघात होतात. याच न्यायानें आज येथें बलवान् असलेले कर्ण-दुर्योधनादिक जो बोलतील, तोच धर्म आहे व इतरांनीं सांगितलेला धर्महि अधर्मच म्हटला जाईल. यास्तव हे कल्याणि, तुझा हा प्रश्न सूक्ष्म, गहन व

१ बलवांश्च यथा धर्मं लोके पश्यति पूरुषः। स धर्मो धर्मवेलायां भवत्यऽभिहतः परः॥ २ मी या सर्वांहून बलवान् आहें व तुझ्या प्रश्नाचा निर्णय आणि या दुष्टांचा निग्रह करण्यासहि समर्थ आहें. तथापि मी या वेळीं द्रौपदीला 'तूं अजित आहेस,' असें जर सांगेन तर ही साध्वी 'अपराधावांचून या दुष्टांनीं आपल्याला पीडा दिली' असें मानून क्रोधानें या कौरवांना जाळून भस्म करील. तेव्हां द्रौपदीच्या

महत्त्वाचा असल्यामुळें मी त्याचा निश्चित विचार करण्यास समर्थ नाहीं. परंतु ज्या अर्थी हे सर्व कौरव लोभ व मोह यांत परायण झाले आहेत, त्या अर्थी खरोखर यांच्या कुलाचा अंत समीप आला आहे, यांत संशय नाहीं.

हे याज्ञसेनि, या सत्कुलांत उत्पन्न झालेल्या पांडवांवर अनेक संकटें आलीं असतांहि ते धर्ममार्गापासून कधींहि च्युत झाले नाहींत आणि अशा त्या पुरुषश्रेष्ठ पांडवांची तूं कुलवधू आहेस. तेव्हां संकटप्रसंगीं तुझें हें वर्तन सर्वथा योग्य आहे. हे द्रौपदि, एवढा अनर्थ ओढवला असतांहि तूं धर्माकडेच दृष्टि ठेविली आहेस, ही तुझी वृत्ति अत्यंत स्तुत्य आहे. हे सर्व द्रोणादिक वृद्ध व धर्मवेत्ते श्रेष्ठजन शून्य चित्तानें जणुकाय गतप्राण झाल्याप्रमाणेंच या सभेंत निश्चल व अधोमुख होऊन बसले आहेत. यास्तव हे पांचालि, युधिष्ठिर या प्रश्नाचें जें उत्तर देईल, तेंच प्रमाण मानावें असें माझें मत आहे. तूं जित आहेस किंवा अजित आहेस, याचा निर्णय करण्यास तो स्वतःच समर्थ आहे. २. ९. ६९.

---

## अध्याय ७० वा.

[ १ दुर्योधनाचें उपहासवचन व भीमसेनाचा संताप. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, त्या सभेमध्यें ती साध्वी पांडवपत्नी दुःखार्त होऊन टिटवीसारखी आक्रोश करीत होती. पण तिचा तो आक्रोश ऐकत असतांहि धृतराष्ट्रपुत्रांच्या भीतीनें तेथील एकहि भूपाल योग्य किंवा अयोग्य

---

अपमानामुळें झालेला दोष अधिक आहे किंवा कुरुकुलाच्या नाशामुळें होणारा दोष अधिक आहे, असा संशय आला असतां धर्मतत्त्व सूक्ष्म असल्यामुळें या दोन दोषांच्या तारतम्याचा निश्चय करणें कठिण आहे. द्रौपदीच्या क्रोधानें कौरवांचा नाश झाल्यानें देवकार्य होईल असेंहि नाहीं. कारण देवांना वध्य असलेले सर्व क्षत्रिय येथें एकत्र जमलेले नाहींत. त्यामुळें हा निर्णय गहनहि आहे. पांडव शस्त्र-रहित आहेत व ते दुसऱ्याचे दास झाले आहेत; त्यामुळें त्यांच्या स्वामींचा म्ह० कौरवांचा नाश केल्यास द्रौपदीलाहि दोष लागेल. कारण आपल्या स्वामीच्या स्वामींचा नाश करणें हें अकार्य आहे. त्यामुळें हा निर्णय अतिशय महत्त्वाचा आहे. म्हणून मी तुला या प्रश्नाचें निश्चित उत्तर देत नाहीं; असा भीष्माचा गूढ आशय आहे.

असें कांहींच बोलला नाहीं. तेव्हां त्या सर्व राजांना व राजपुत्रांना स्वस्थ बसलेलें पाहून धृतराष्ट्रपुत्र दुर्योधन राजकन्या पांचलीला हंसत हंसत असें वचन बोलला.

**दुर्योधन** म्हणाला—हे याज्ञसेनि, तुझ्या या प्रश्नाचा निर्णय उदारबुद्धि भीमसेन, अर्जुन, नकुल व सहदेव या तुझ्या पतींकडेच सोंपीव. तुझ्या मुक्ततेचें वचन त्यांनाच बोलूं दे. किंवा 'हा युधिष्ठिर आमचा स्वामी नव्हे' असें या सर्व श्रेष्ठांमध्यें तुझ्यासाठीं बोलून त्या सर्वांना धर्मराजाचें वचन मिथ्या ठरवूं दे. म्हणजे हे पांचालि, तूं तत्काल दासीभावापासून मुक्त होशील. किंवा धर्मामध्यें स्थित असलेला हा इंद्रतुल्य महात्मा युधिष्ठिरच 'तुजवर त्याचें स्वामित्व आहे कीं नाहीं,' तें स्वतःच सांगूं दे. याच्या वाक्यावरून तूं आपल्या प्रश्नाचा तत्काल निर्णय करूं शकशील. सभेंतील हे सर्व कुरुनंदन तुझ्याच दुःखानें खिन्न झाले आहेत. ते मोठे धीर असूनहि तुझ्या दुर्दैवी पतींकडे लक्ष देऊन यथार्थ भाषण करीत नाहींत.

हे पारिक्षिता, त्या कुरुराज दुर्योधनाच्या या वाक्याची सभासदांनीं उच्च स्वरानें प्रशंसा केली. त्यांच्या भृत्यांनीं परस्पर नेत्रसंकेत केले. दुर्योधनपक्षपाती दुर्जन हाहाकार करूं लागले. कारण 'दुर्योधन अकस्मात् असें बोलून गेला, पण पांडवांनाच याविषयीं प्रमाण मानिल्यानें द्रौपदी दास्यांतून मुक्त होईल व त्यामुळें आमचे हे सर्व प्रयत्न व्यर्थ होतील,' अशी त्यांना भीति पडली. पण दुर्योधनाचें तें न्याय्य वचन ऐकून सभेंतील इतर कौरवांना संतोष झाला. सर्व राजे प्रसन्न झाले. ते धार्मिक कुरुश्रेष्ठाचा सत्कार करूं लागले व आतां धर्मज्ञ युधिष्ठिर काय सांगतो, तें ऐकण्याविषयीं उत्सुक होऊन त्याच्याकडे आपापलीं मुखें वळवून पाहूं लागले. 'युद्धामध्यें अजिंक्य असलेला बीभत्सु, भीमसेन व नकुल-सहदेव आतां यावर काय बरें बोलतील,' अशा आशयानें ते सर्व त्यांच्या मुखाकडेहि मोठ्या कुतूहलानें पाहूं लागले.

सभेंतील तो कोलाहल शांत झाला असतां भीमसेन आपला चंदनचर्चित दिव्य भुज वर उचलून मोठ्यानें म्हणाला—"हा उदारबुद्धि धर्मराज जर आमचा गुरु नसता तर आम्ही कौरवांचा हा अतिक्रम एक क्षणभर तरी सहन केला असता काय? तो आमचा स्वामी आहे म्हणून तर आम्ही हा सर्व अन्याय मुकाट्यानें सहन करीत आहों. हा आमचा स्वामी आहे व इतर पवित्र तप करणाऱ्या प्राण्यांचाहि प्रभु आहे. द्रौपदीचा पण लावण्यापूर्वीं हा आमचा

स्वामी होता. पण द्रौपदीसाठीं मिथ्या भाषण करून तो जर आपल्याला अजित मानीत असेल, तर खुशाल मानो. आम्हांला कौरवांनीं पूर्वीच जिंकलेलें असल्यामुळें आम्हीं मात्र केव्हांहि जितच आहों. कारण तो सर्वदा आमचा स्वामीच आहे. द्रौपदी मात्र दासीभावाला प्राप्त झालेली नाहीं. कारण युधिष्ठिरानें स्वतः पराजित झाल्यावर तिला पणाला लाविलें आहे. मी जर अजित असतों, तर पांचालीच्या या केंसांना स्पर्श करून भूमीवर रहाणारा कोणता मर्त्य जिवंत सुटला असता ! माझे हे दीर्घ, पुष्ट व परिघांसारखे दोन बाहू पहा. यांमध्यें सांपडलेला साक्षात् इंद्रहि जिवंत सुटणार नाहीं. धर्मपाशानें बद्ध झाल्यामुळें मी या संकटाचा प्रतिकार करण्यास समर्थ नाहीं. काय करूं ! धर्मराजाच्या गौरवानें व या माझ्या प्रिय अर्जुनाच्या निग्रहानें मी या वेळीं प्रतिबद्ध झालों आहें. हा माझा स्वामी युधिष्ठिर जर मला आतां नुस्तें ' हुं ' म्हणेल व मला सोडील, तर सिंह क्षुद्र मृगांना जसा पटापट मारितो, त्याप्रमाणें मी या पापी धार्तराष्ट्रांना हाताच्या चापट्या याच खड्गांनीं या सभास्थानीं लोळवीन."

राजा, भीमाचें हें उग्र वचन ऐकून भीष्म, द्रोण व विदुर हे त्यास म्हणाले—" बा भीमसेना, तूं बोलतोस तसें करशील, यांत कांहींच संशय नाहीं. तुझ्या ठिकाणीं हें सर्व संभवतें. पण वत्सा, धर्माकडे दृष्टि देऊन या क्षणीं तूं क्षमा कर. तुझ्या या पराक्रमाला लवकरच अवसर मिळेल." २. ९. ७०.

---

## अध्याय ७१ वा.

[ १ कर्णाचें निंद्य वचन. २ दुर्योधनानें असभ्यपणें द्रौपदीला दाखविलेली ऊरु फोडण्याची भीमाची प्रतिज्ञा. ३ विदुरवचन. ४ उत्पातश्रवणानें धृतराष्ट्रानें वरांच्या योगानें द्रौपदीचें केलेलें सान्त्वन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, भीष्मादिकांचें तें भाषण ऐकून कर्णाला अतिशय क्रोध आला व तो त्यांची निंदा करीत म्हणाला—"भीष्म, क्षत्ता व हा तिसरा कौरवांचा गुरु हे तिघेच या सभेंत धर्माचें उल्लंघन करण्यास समर्थ आहेत. त्यांच्यावांचून दुसरा कोणता पुरुष असें धर्मोल्लंघन करील ? हे कृतघ्न आपल्या स्वामीलाच दुष्टांतील दुष्ट म्हणत आहेत व त्याचाच समूळ उच्छेद व्हावा अशी इच्छा करीत आहेत; पण हें पाप करीत असतांना त्यांना लाज वाटूं नये, हें केवढें आश्चर्य आहे !

हे भद्रे, दास, पुत्र व स्त्री हीं तिघें क्रमानें धनी, पिता व पति जिवंत असेपर्यंत अधन व पराधीन असतात. दासाची भार्या व धन हीं दोन्ही स्वामिरहित असतात. यास्तव त्याचें तें सर्वस्व त्याच्या धन्याला प्राप्त होत असतें, असें धर्मशास्त्र सांगतें. त्यामुळें राजाचा पराभव झाल्यानें त्याची पत्नीहि जित झालीच. अर्थात् 'अजित युधिष्ठिरानें तुला पणाला लाविलें कीं स्वतः पराजित झाल्यावर तुला पणाला लाविलें' हा विचारच संभवत नाहीं. यास्तव तूं आतां मुकाट्यानें दुर्योधनराजाच्या अंतःपुरांत जा व त्याच्या स्त्रियांची पादसंवाहनादि सेवा कर किंवा त्या जें सांगतील तें काम करीत रहा.

हे राजपुत्रि, आतां सर्व धृतराष्ट्रपुत्र तुझे स्वामी आहेत, पांडुपुत्र नव्हेत. हे सुंदरि, पतीच्या जयानें आपलाहि जय झाला, हें जर तुला संमत नसेल, तर तूं आतां पतिरहित आहेस, हें उघड आहे. यास्तव ज्याच्यापासून द्यूतामुळें तुला दास्य प्राप्त होणार नाहीं असा अन्य पति तूं सुखोपभोगासाठीं सत्वर वर. पति असतांना स्त्रियांनीं यथेष्ट आचरण करणें निंद्य आहे. परंतु दास्यामध्यें तें तसें निंद्य नाहीं, हें सुप्रसिद्ध आहे. यास्तव परिमित पतींची भार्या होऊन रहाण्यापेक्षां ज्यामध्यें असंख्य पतींशीं विलास करणें दोषावह नाहीं, तें दासीत्वच तुला असो.

हे कल्याणि, युधिष्ठिरादि पांची भ्राते दास झाले आहेत व हे याज्ञसेनि, तूंहि आमची दासी झाली आहेस. त्यामुळें ते आतां तुझे पति नाहींत. कारण आम्हीं निषेध केल्यास ते तुझा उपभोग घेऊं शकणार नाहींत. ज्यानें सभेमध्यें द्यूतांत पांचाल्य द्रुपदकन्येचा पण लाविला, तो युधिष्ठिर 'खरोखर, आज आपल्या जन्माचें सार्थक झालें, आपण मोठा पराक्रम केला,' असें कां मानणार नाहीं !"

राजा जनमेजया, राधेयाचें हें कर्णकटु निंद्य भाषण ऐकून असहिष्णु भीमसेन मनांत अतिशय क्षुब्ध झाला. तो विषारी सर्पाप्रमाणें दीर्घ व उष्ण निःश्वास सोडूं लागला. पण तो राजाचें अतिक्रमण करण्यास असमर्थ अस-

---

१ त्रय एवाधना लोके भार्या दासस्तथा सुतः । यत्ते समधिगच्छंति यस्यैते तस्य तद्धनम् ॥ असें स्मृतिवचन आहे. अर्थ—भार्या, दास व पुत्र हे तीन या लोकीं अधन आहेत. म्हणजे त्यांना स्वतःचें असें धन नाहीं. त्यांना जें कांहीं मिळतें तें ते ज्याचे असतात त्याचें होतें. म्हणजे त्यांचें धन त्याच्या स्वामीला मिळतें.

त्यामुळें धर्मपाशानें बद्ध झाला. तो नेत्र लाल करून कर्णाला जणुकाय जाळीतच असल्याप्रमाणें म्हणाला—" हे युधिष्ठिरा, मी या सूतपुत्रावर रागावत नाहीं. त्यानें दासाचा खरा धर्मच प्रकट केला आहे. हे नरेंद्रा, तूं जर द्रौपदीचा पण लावून द्यूत खेळला नसतास, तर हे शत्रु या साध्वीला असे अवाच्य शब्द बोलूं शकले असते काय ! "

हे पांडवेया, भीमसेनाचें हें वचन ऐकून राजा दुर्योधन निश्चेष्ट होऊन स्थिर बसलेल्या युधिष्ठिरास म्हणाला—" हे राजा, भीमार्जुन व नकुल-सहदेव तुझ्या आज्ञेंत स्थित आहेत. यास्तव ही कृष्णा अजित आहे, असें जर तुला वाटत असेल, तर तसें स्पष्ट सांग. "

( २ ) भारता, कौंतेयाला असें बोलून ऐश्वर्यमदानें मूढ झालेल्या त्या राजपुत्र दुर्योधनानें आपल्या मांडीवरील वस्त्र दूर केलें व हंसत हंसत पांचालीकडे पाहून कदलीच्या स्तंभाप्रमाणें सर्व लक्षणांनीं युक्त असलेली, हत्तीच्या सोंडेप्रमाणें दिसणारी, वज्रासारखी दृढ असलेली आपली डावी मांडी, कर्णाला प्रोत्साहन देत व भीमाचा अपमान करीत, आपल्याकडे पहात असलेल्या पांचालीला दाखविली. तेव्हां त्या दुष्टाचें तें निंद्य कृत्य पाहून भीमसेनानें आपले विशाल व क्रोधानें लाल झालेले नेत्र वटारून त्या राजसभेंतील सर्व सभासदांना आपली सत्यप्रतिज्ञा ऐकवीत त्यास म्हटलें—" हे नीचा, हीच तुझी मांडी महायुद्धांत मी आपल्या गदेनें जर न फोडीन तर हा वृकोदर आपल्या पितरांसह उत्तम पितृलोकास प्राप्त होणार नाहीं. "

( ३ ) हे राजा, एखाद्या प्रज्वलित झालेल्या वृक्षाच्या ढोलींतून जशा ज्वाला निघाव्या, तशा अतिशय क्रुद्ध होऊन अशी प्रतिज्ञा करणाऱ्या भीमसेनाच्या सर्व इंद्रियद्वारांतून अग्नीच्या ज्वाला निघाल्या. तेव्हां महाबुद्धिमान् विदुर सर्व सभासदांस उद्देशून म्हणाला—" हे प्रतिपकुलोत्पन्न नरेंद्रहो, भीमसेनापासून केवढें मोठें भय उपस्थित झालें आहे, तें पहा. या प्रसंगाचा विचार करा. खरोखर दैवाच्या प्रेरणेनेंच भरतकुलांतील वीर पुरुषांवर हा मोठा अनर्थ ओढवला आहे. हे धृतराष्ट्रपुत्रांनो, तुम्ही या कौरव सभेंत एका साध्वी स्त्रीशीं मर्यादा सोडून विवाद करीत अहां. त्यामुळें या तुमच्या द्यूतानें पणास लावलेल्या द्रव्याच्या मर्यादेचें अतिक्रमण केलें आहे. त्यामुळें तुमचे सर्व योगक्षेम विनाश पावण्याच्या मार्गाला लागले आहेत. कारण, हे दुर्योधनादिक पापमूलक संकेत

करीत आहेत. हे कौरवांनो, धर्माला सत्वर ओळखा. कारण तुमच्या सभेंत धर्माचा नाश झाल्यास ही सभाच अतिशय दूषित होईल.

या युधिष्ठिरानें स्वतः पराभूत होण्यापूर्वी जर द्रौपदीचा पण लाविला असता, तरच तो तिचा पण लावण्यास समर्थ झाला असता. पण त्यानें ज्या अर्थी स्वतःचा पराभव झाल्यावर तिचा पण लाविला आहे, त्या अर्थी ती द्यूतांत कौरवांची दासी झाली नाहीं. युधिष्ठिरानें गांधारराजाचें वचन ऐकून ज्या धनाचा स्वतः स्वामी नसतांहि पण लाविला, तें धन शत्रूनें जरी जिंकिलें असलें, तरी तें स्वप्नांत जिंकलेल्या धनाप्रमाणें आभासरूप आहे. कर्णानें ज्या स्मृतीचा उल्लेख केला तें स्मृतिवचन या प्रसंगीं प्रमाण मानितां येत नाहीं. कारण 'दास्यावस्थेमध्यें असतांना दासाला जें धन मिळेल तें त्याच्या स्वामीचें होतें' असा त्या स्मृतीचा अर्थ आहे. दासभाव प्राप्त होण्याच्या पूर्वीचें धन त्याच्या स्वामीला प्राप्त होत नाहीं. यास्तव हे कौरवहो, या धर्मापासून तुम्ही च्युत होऊं नका."

विदुराचें हें भाषण ऐकून दुर्योधन पुनः म्हणाला—हे याज्ञसेनि, मी या वेळीं भीम, अर्जुन, नकुल व सहदेव या चार पांडवांच्या वचनावर तुझ्या प्रश्नाचा निर्णय सोंपवितों. ते महात्मे 'युधिष्ठिर तुझा पण लावण्यास समर्थ नाहीं' असें बोलूं देत. म्हणजे मी लगेच तुला दासीभावांतून मुक्त करितों.

अर्जुन म्हणाला—महात्मा धर्मराज युधिष्ठिर स्वतः पराभूत होण्यापूर्वी आमचा पण लावण्यास समर्थ होता. पण स्वतःच पराजित झालेला हा दुसऱ्या कोणाचा पण लावूं शकणार! हे कौरवहो, तुम्हीच या गोष्टीचा विचार करा.

( ४ ) जनमेजया, याप्रमाणें अर्जुनाचें भाषण पुरें होत आहे, तोंच राजा धृतराष्ट्राच्या मंदिरांत गृह्याग्नीच्या समीप एक कोल्हा उच्च स्वरानें ओरडला. त्या बरोबर गर्दभहि भेसुर आवाजानें ओरडूं लागले. त्याचप्रमाणें त्या मंदिराच्या सभोंवार गृध्रादि क्रूर पक्षीहि मोठ-मोठ्यानें अशुभ शब्द करूं लागले. तो घोर शब्द तत्त्वज्ञ विदुर, सुबलकन्या गांधारी, भीष्म, द्रोण व विद्वान् कृप, यांनीं ऐकला व ते सर्व उच्च स्वरानें 'स्वति स्वस्ति' असें म्हणाले. त्यानंतर गांधारी व विद्वान् विदुर यांनीं हें घोर दुश्चिह्न आहे, असें जाणून मोठ्या कष्टानें राजा धृतराष्ट्रालाहि तें निवेदन केलें. तेव्हां तो राजा दुर्योधनास म्हणाला—"हे मंद-बुद्धे, तूं आज कुरुश्रेष्ठांच्या सभेमध्यें एका स्त्रीशीं असें असभ्य भाषण व वर्तन करीत आहेस, पण यापासून तुझें हित होणार नाहीं. हे दुरात्म्या, विशेषेंकरून

या धर्मपत्नी द्रौपदीशीं असें निंद्य वर्तन केल्यामुळें तुझा मृत्युच समीप आला आहे, असें समज. "

हे कुरुनंदना, आपल्या दुष्ट पुत्राला असें बोलून आपल्या बांधवांचा नाश न होतां, त्यांचें हितच व्हावें अशी इच्छा करणारा धृतराष्ट्र आपल्या सूक्ष्मबुद्धीनें पूर्ण विचार करून द्रुपदकन्या कृष्णेला सान्त्वपूर्वक म्हणाला—" हे पांचालि, तुला इष्ट असेल तो वर मजपासून मागून घे. तूं महा साध्वी व धर्मपरायण आहेस. त्यामुळें माझ्या सर्व बंधूंमध्यें तूं मला अधिक प्रिय आहेस. "

धृतराष्ट्राचें हें प्रसन्न वचन ऐकून द्रौपदी म्हणाली—हे पूज्य भरतश्रेष्ठा, तूं जर मला वर देत असशील, तर सर्व धर्मांचें अनुवर्तन करणारा श्रीमान् युधिष्ठिर अदास असो. इतर अज्ञ कुमार माझ्या प्रतिविंध्य-पुत्राला ' हा दासपुत्र आहे ' असें न म्हणोत. हा राजपुत्र पूर्वीं असामान्य कुमार असून राजानें त्याचें लालन-पालन केलें आहे. अशा माझ्या कुमाराला दासपुत्रत्व उचित नाहीं. हाच वर मी मागत्यें.

धृतराष्ट्र म्हणाला—हे कल्याणि, तूं जसें बोलत आहेस, तसेंच होवो. हे भद्रे, मी तुला आणखीं एक वर देतों. तोहि तूं आपल्या इच्छेप्रमाणें मागून घे. तूं एकाच वराला योग्य नाहींस, म्हणून माझें मन तुला आणखीं एक वर देण्यास उत्सुक झालें आहे.

द्रौपदी म्हणाली—भीम, अर्जुन, नकुल व सहदेव हे चारी पांडुपुत्र आपापले रथ व शस्त्रें यांसह कौरवांच्या दास्यांतून मुक्त व स्वतंत्र व्हावे, असा वर मी मागत्यें.

धृतराष्ट्र म्हणाला—हे महाभागे, तुझ्या इच्छेप्रमाणें होवो. हे कल्याणि, तूं मजपासून तिसराहि वर मागून घे. या दोन वरांनींच तूं कृतार्थ झाली नाहींस. तूं माझ्या सर्व स्नुषांमध्यें श्रेष्ठ व धर्माचरण करणारी आहेस.

द्रौपदी म्हणाली—हे भगवन् [1]लोभ धर्माच्या नाशाला कारण होतो. यास्तव तिसरा वर मागणें मला उचित नाहीं. हे राजश्रेष्ठा, मी क्षत्रियस्त्री असल्यामुळें आपल्यापासून तिसरा वर मागून घेण्यास योग्य नाहीं. कारण हे राजेंद्रा, वैश्याला एक, क्षत्रियस्त्रीला दोन, राजाला तीन व ब्राह्मणाला शंभर वर मागण्याचा अधिकार आहे. हे माझे पति दासभावानें हीनावस्थेस प्राप्त झाले

१ लोभो धर्मस्य नाशाय ।

होते, पण आतां ते तुझ्या कृपेनें त्या दुरवस्थेंतून पार पडले आहेत. हे राजा, ते आपल्या पुण्य कर्मांनेंच सर्व प्रकारचें श्रेय प्राप्त करून घेतील. २. ९. ७१.

---

## अध्याय ७२ वा.

[ १ कर्णाचें मर्मभेदक वचन. २ भीमाचा भयंकर क्रोध. ३ युधिष्ठिरानें त्याचें केलेलें सान्त्वन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे पारिक्षिता, धृतराष्ट्रानें वरांच्या योगानें द्रौपदीचें सान्त्वन केलें आहे, असें पाहून कर्ण मनांत अतिशय खिन्न झाला. तथापि पांडवांचा उपहास करण्यासाठीं पुनः म्हणाला—"आम्हीं मनुष्यांमध्यें सुस्वरूप म्हणून सर्वांना संमत झालेल्या ज्या स्त्रिया ऐकल्या आहेत, त्यांतील एकाहि स्त्रीचें असलें अद्भुत कर्म ऐकिलें नाहीं. पांडुपुत्र अतिशय क्रुद्ध झाले असतां व धृतराष्ट्रपुत्रहि संतप्त झाले असतां ही कृष्णा पांडुपुत्रांच्या स्वास्थ्याचें कारण झाली. ही पांचाली नौकाहीन व या अगाध विपत्सागरांत बुडत असलेल्या या पांडुपुत्रांना त्यांतून तारून परतीरास नेणारी नौका झाली."

( २ ) जनमेजया, कौरवांच्या सभेमध्यें कर्णाचें 'पांडुपुत्रांची गति त्यांची स्त्री आहे' हें मर्मभेदक वचन ऐकून असहिष्णु भीमसेन मनांत अतिशय खिन्न झाला व तो म्हणाला—"पुरुषामध्यें ज्या अर्थी अपत्य, कर्म व विद्या या लोकप्रकाशक तीन ज्योति आहेत, असें देवलानें म्हटलें आहे त्या अर्थी या तीन ज्योतींपासूनच सर्व स्थावर-जंगम प्रजा उत्पन्न झाल्या आहेत. कर्म व उपासना यांनीं क्रमानें पितृलोक व देवलोक यांची प्राप्ति होते व अपत्याच्या योगानें मनुष्यलोक प्राप्त होतो. हा अशुचि देह गतप्राण झाला असतां व त्याच्या ज्ञातीच्या लोकांनीं त्याला शून्य स्मशानांत नेऊन, जाळून किंवा पुरून टाकिलें असतां या तीन ज्योतिच त्या पुरुषावर उपकार करितात.

पण आमच्या पत्नीला या दुष्टानें स्पर्श केल्यामुळें आमची ती ज्योति नष्ट झाली आहे. हे धनंजया, ज्या दुष्टानें आमच्या समोर व भरसभेंत परस्त्रीला स्पर्श केला, मातृस्थानीं असलेल्या युधिष्ठिरपत्नीला स्पर्श करितांना ज्या नीचाला लाज वाटली नाहीं, तो एकान्तांत परस्त्रीगमन अवश्य करील !

---

१ याविषयीं "सोऽयं लोकः पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणा । कर्मणा पितृलोको विद्यया देवलोकः" बृहदारण्योपनिषद् अ. १ ब्रा. ५ कंडिका १६ अशी श्रुति आहे. पितृलोक म्हणजे स्वर्ग व देवलोक म्हणजे इंद्रादि-ब्रह्मलोकान्त लोक.

त्याचप्रमाणें परपुरुषानें स्पर्श केलेल्या स्त्रीपासून झालेलें अपत्य कसें असेल हें निराळें सांगावयास नकोच. तें संकरापासून झालेलें असल्यामुळें नीच कर्मेच करील, यांत आश्चर्य कोणतें! सूताच्या बीजापासून वीराची उत्पत्ति होणें शक्य नाहीं. यास्तव हा कर्णहि कंसाप्रमाणें असुरांच्या बीजापासून उत्पन्न झाला आहे. त्यावांचून हा असा क्रूरकर्मा निपजला नाहीं."

अर्जुन म्हणाला—हे भारता, उत्तम पुरुष हीन लोकांच्या नीच कर्मांकडे व निंद्य उक्तींकडे लक्ष देत नाहींत. ते त्यांच्या कठोर शब्दांना वृथा उत्तरें देत नाहींत. हे वीरा, जे लोकांमध्यें स्वभावतःच सत्काराला प्राप्त झाले आहेत, ते शत्रूनें केलेल्या अपकाराचा प्रतिकार कसा करावा हें चांगलें जाणतात. असले सत्पुरुष शत्रूनें केलेल्या वैराला आठवीत नाहींत. तर त्यांचें जर कांहीं सुकृत असलें, तर तेवढेंच आठवतात.

अर्जुनाचें हें सान्त्ववचन ऐकून भीमाचें समाधान झालें नाहीं, तो पुनः क्षुब्ध होऊन युधिष्ठिरास म्हणाला—"हे राजेंद्रा, मला केवल अनुज्ञा दे, कीं एका क्षणांत येथें जमलेल्या या शत्रूंना ठार करितों आणि येथून बाहेर पडून यांचे जे पक्षपाती असतील त्यांचाहि नाश करितों. हे भारता, आम्हांला यांच्याशीं वाद-विवाद करीत बसून काय करावयाचें आहे? व वृथा वल्गना करण्यांत तरी काय अर्थ आहे! हे राजा, मला तूं नुसता नेत्रसंकेत कर कीं, मी या सर्वांना आजच्या आज यमलोकीं पाठवितों आणि मग तूं या पृथ्वीचें निष्कंटक राज्य कर."

हे पारिक्षिता, इतकें बोलून वायुपुत्र भीमसेन आपल्या कनिष्ठ भ्रात्यांसह मृगांच्या कळपांत शिरलेल्या सिंहाप्रमाणें आपल्या उग्र दृष्टीनें शत्रूंकडे वारंवार पाहूं लागला. पण पुण्याचरण करणारा पृथापुत्र युधिष्ठिर त्याच्या दुष्प्रेक्ष्य मुखाकडे सौम्य दृष्टीनें पहात त्याचें सान्त्वन करूं लागला. त्यामुळें महाबाहु भीमसेन अतिशय खिन्न झाला. तो वीर्यवान् पांडव संतापानें आंतल्या आंत जळूं लागला. त्यामुळें हे नराधिपा, त्याच्या कर्णादि गोलकांतून धूम व ठिणग्या यांसह अग्नीच्या ज्वाला निघूं लागल्या. हे महीपते जनमेजया, ज्याच्या ललाटावर त्रिशूलासारख्या तीन उग्र आंठ्या स्पष्ट दिसत आहेत व भ्रुकुटी अतिशय

१ स्मरन्ति सुकृतान्येव न वैराणि कृतान्यपि । सन्तः प्रतिविजानन्तो लब्धसंभावनाः स्वयम् ॥

वक्र झाल्या आहेत, असें त्याचें मुख दुष्प्रेक्ष्य झालें. त्या वेळीं तो वीर प्रलय कालच्या कृतान्तासारखा भासला.

परंतु हे पांडवेया, महात्म्या युधिष्ठिरानें त्या बाहुशाली भीमाला आपल्या विजयी बाहूनें धरून ठेविलें. आणि 'हे वत्सा, नको, नको, असें बोलूं नको. या वेळीं तूं स्वस्थ बैस.' असें बोलून क्रोधानें ज्याचे नेत्र जळजळीत निखाऱ्यासारखे लाल भडक झाले आहेत अशा त्या भ्रात्याचें निवारण केलें. त्यानंतर तो महात्मा युधिष्ठिर पूज्य धृतराष्ट्रापाशीं जाऊन हात जोडून उभा राहिला. २. ९. ७२.

---

## अध्याय ७३ वा.

[ १ धृतराष्ट्राचा युधिष्ठिराला सामोपदेश. २ पांडवांचें इंद्रप्रस्थास प्रयाण. ]

(१) **युधिष्ठिर** म्हणाला—राजन्, आम्हीं आतां काय करावें, याची आज्ञा कर. तूं आमचा स्वामी आहेस. यास्तव हे भारता, निरंतर तुझ्या आज्ञेंतच रहाण्याची आमची इच्छा आहे.

**धृतराष्ट्र** म्हणाला—हे अजातशत्रो, तुझें कल्याण असो. तुम्ही निर्विघ्नपणें परत जा. आपलें सर्व धन व परिवार यांसह परत जाऊन आपल्या राज्याचें परिपालन करण्याची मी तुला अनुज्ञा देत आहें. युधिष्ठिरा, मज वृद्धाचें तुला आणखींहि एक सांगणें आहे. मी आतां तुला जें कांहीं सांगत आहें, तें अत्यंत पथ्यकर व परम श्रेयस्कर आहे. यास्तव तूं लक्षपूर्वक ऐक.

हे वत्सा, धर्माची गति किती सूक्ष्म आहे हें तूं जाणतोसच. हे ज्ञानसंपन्न युधिष्ठिरा, तूं वृद्धांची सेवा करीत असल्यामुळें धर्मज्ञ आहेस. जेथें ज्ञान आहे तेथें शांति असते. 'शांति' हेंच ज्ञानाचें फल आहे. यास्तव तूं शांत हो. लाकडासारख्या मऊ पदार्थावरच शस्त्राचा प्रहार केला जातो, पाषाणादि कठिण पदार्थावर केला जात नाहीं. जे उत्तम पुरुष असतात, ते वैर मनांत ठेवीत नाहींत; ते केवल गुणाकडेच लक्ष देतात. दोष पहात नाहींत व कोणाशीं विरोध करीत नाहींत. ते[1] केवल सुकृताचेंच स्मरण ठेवितात. दुसऱ्यांनीं वैर केलें असतांहि तें विसरून जातात. ते इतरांवर उपकार करीत असतात, पण प्रत्युपकाराची केव्हांहि अपेक्षा करीत नाहींत.

---

१ स्मरन्ति सुकृतान्येव न वैराणि कृतान्यपि ।

हे युधिष्ठिरा, अधम पुरुष कलहप्रसंगीं प्रतिपक्षाला कठोर वचन बोलतात. मध्यम पुरुष उत्तरास प्रत्युत्तर देतात आणि उत्तम पुरुष कठोर भाषण कधींच करीत नाहींत. त्या धीरांना कोणी दुर्वचन बोलो किंवा न बोलो, ते मर्मभेदक व दुःखद कठोर शब्द आपल्या पतिपक्ष्यांना कधींच बोलत नाहींत. ते कठोर वचन केव्हांहि उच्चारीत नाहींत. दुसऱ्याच्या मर्मभेदक शब्दानें आपल्याला जसें दुःख होतें, तसेंच आपल्या कठोर वचनानें इतरांसहि होईल असेंच ते मानितात. ते दुसऱ्यांनीं केलेल्या वैराला स्मरत नाहींत. त्यांचें सुकृतच स्मरतात. सज्जन लोक आर्यांच्या मर्यादेचें उल्लंघन केव्हांहि करीत नाहींत, त्यामुळें त्यांचें दर्शन सर्वांना प्रिय असतें.

हे कौंतेया, अशा सज्जनांच्या वृत्तीनेंच आजच्या प्रसंगीं तूं या सभेंत वागलास. वत्सा, तूं दुर्योधनाचें कठोर वचन मनांत ठेवूं नकोस. गुणज्ञ युधिष्ठिरा, तुझी ही माता गांधारी आणि हा मी तुझा वृद्ध व अंध पितृव्य यांच्याकडे तूं पहा!

हे भारता, सुहृदांच्या भेटी होतील व पुत्रांचें बलाबलहि दिसून येईल, याच इच्छेनें मीं या द्यूताची मुद्दामच उपेक्षा केली. हे राजा, ज्यांचा तूं शास्ता आहेस आणि सर्वशास्त्रविशारद व बुद्धिमान् विदुर मंत्री आहे ते कौरव खरोखर अशोच्य आहेत. युधिष्ठिरा, तुझ्या ठिकाणीं धर्म, अर्जुनांत धैर्य, भीमसेनांत पराक्रम व पुरुषश्रेष्ठ नकुल-सहदेवांत उत्तम गुरुशुश्रूषा वास करीत आहे. यास्तव हे अजातशत्रो, तुझें कल्याण असो. तूं सुखानें खांडवप्रस्थांत प्रवेश कर. दुर्योधनादि भ्रात्यांवर तुझें बंधुप्रेम अखंड राहो आणि तुझें मन सर्वदा असेंच धर्मांत स्थित होवो.

(२) राजा जनमेजया, धृतराष्ट्राचा हा उपदेश ऐकून धर्मराज युधिष्ठिर 'ठीक आहे' असें बोलून व त्याचें वचन मान्य करून भ्रात्यांसह स्वनगरीस जावयास निघाला. त्यानंतर ते सर्व पांडव द्रौपदीसह संतुष्ट चित्तानें मेघ गर्जनेसारखा गंभीर ध्वनि करणाऱ्या रथांत बसून आपल्या उत्तम इंद्रप्रस्थ नगरीकडे चालले. २. ९. ७३.

येथें नववें द्यूतपर्व समाप्त झालें.

---

१ संवादे परुषाण्याहुर्युधिष्ठिर नराधमाः । प्रत्याहुर्मध्यमास्त्वेतेऽनुक्ताः परुषमुत्तरम् ॥ न चोक्ता नैव चानुक्तास्त्वहिताः परुषा गिरः । प्रतिजल्पान्ति वै धीराः सदा तूत्तमपूरुषाः ॥

# अनुद्यूतपर्व १०



## अध्याय ७४ वा.

[ दुःशासनानें पांडव ऐश्वर्यासह परत गेल्याचा वृत्तान्त सांगितला असतां दुर्योधनादिकांचें धृतराष्ट्रापाशीं आगमन. २ पुढील अनर्थांचें वर्णन व अनुद्यूताचा संकेत. ३ द्रोणादिकांच्या हितवचनाचा अव्हेर करून धृतराष्ट्राचें पांडवांस आह्वान. ]

( १ ) **जनमेजय—हे मुनिश्रेष्ठा, धृतराष्ट्रानें पांडवांस सर्व संपत्तीसह आपल्या राष्ट्राला परत जाण्याची अनुज्ञा दिलेली ऐकून सर्व धार्तराष्ट्रांना काय वाटलें ?**

**वैशंपायन**—हे राजन्, बुद्धिमान् धृतराष्ट्रानें पूर्वीं, प्रतिज्ञा केल्याप्रमाणें, 'हें सुहृदांचें प्रेमाचें द्यूत आहे' असें कृतीनें सिद्ध करून पांडवांची सर्व संपत्ति त्यांना परत दिली. तथापि पुरुषप्रयत्नाहून बलवत्तर असलेल्या दैवानें कौरवांना सर्व क्षत्रियांच्या क्षयास कारण होणाऱ्या अनुद्यूतांत कसें प्रवृत्त केलें, तेंच वृत्त मी सांगतों, ऐक. धृतराष्ट्राची ती आज्ञा ऐकून दुःखार्त झालेला दुःशासन सत्वर आपल्या भ्रात्यापाशीं गेला व अमात्यांसह बसलेल्या दुर्योधनाला म्हणाला—" हे महारथहो, आम्हीं मोठ्या यत्नानें जो व्यूह रचिला होता, तो सर्व या आमच्या वृद्ध पित्यानें ढांसळून टाकिला. हे वीरांनो, आपण जिंकलेलें सर्व द्रव्य शत्रूंच्या हस्तगत झालें आहे, याचा विचार करा. "

दुःशासनाचें हें वचन ऐकतांच दुर्योधन, कर्ण व सौबल शकुनि या सर्व पांडवांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं एकत्र जमून पुनः संकेत केला आणि ते सर्व अतित्वरेनें त्या विद्वान् धृतराष्ट्रराजाकडे येऊन मधुर वाणीनें त्याच्याशीं बोलूं लागले.

( २ ) **दुर्योधन** म्हणाला—हे राजन्, देवांचा अत्यंत मेधावी पुरोहित जो बृहस्पति त्यानें इंद्राला सांगितलेली नीति तूं ऐकलीच आहेस. युद्धानें किंवा अन्य उपायांनीं आपलें अहित करणाऱ्या शत्रूंचा नाश करावा, असें त्याचें वचन आहे. हे तात, आम्ही पांडवांच्या जिंकलेल्या विविध धनांनीं इतर राजांना वश करून घेऊं व मग त्या पांडुपुत्रांशीं युद्ध करूं. त्यांत आमची काय हानि आहे ! क्रुद्ध झालेले विषारी सर्प प्राण घेण्यास प्रवृत्त झाले असतां

कोणता सुज्ञ मनुष्य त्यांस आपल्या गळ्यांत व पाठीवर वागवील! शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन रथारूढ झालेले व संतापलेले हे पांडव क्रुद्ध झालेल्या सर्पांच्या विषाप्रमाणें आम्हांला निःशेष करून टाकतील.

हे राजा, अंगावर कवच चढविलेला व दोन अक्षय्य भाते धारण केलेला पार्थ गांडीव धनुष्याला वारंवार स्पर्श करीत,उष्ण निःश्वास टाकीत, सर्व बाजूंचें निरीक्षण करीत चालला होता. त्याचप्रमाणें वृकोदर आपली भव्य गदा उगारून व मोठ्या त्वरेनें आपला रथ जोडून येथून निघाला, असें आम्हीं ऐकिलें आहे. नकुलानें आपलें खड्ग व अर्धचंद्राकार ढाल धारण केली होती आणि सहदेव व युधिष्ठिर यांच्या चर्येवरूनच त्यांचें हृद्गत व्यक्त होत होतें. अशा रीतीनें ते सर्व अनेक शस्त्रांनीं युक्त होऊन, रथांत बसून, सैन्य जमविण्यासाठीं निघून गेले. आम्हीं त्यांना सभेमध्यें डंवचलें असल्यामुळें ते आम्हांला केव्हांहि क्षमा करणार नाहींत.

हे राजश्रेष्ठा, आम्हीं द्रौपदीला जे क्लेश दिले आहेत ते त्या पांडुपुत्रांतील कोणी तरी सहन करील काय! यास्तव हे नरश्रेष्ठा, आम्ही आतां वनवासाचा पण लावून पुनः एकवार पांडवांशीं द्यूत खेळतों. याच एका उपायानें आम्ही त्यांना जिंकण्यास समर्थ होऊं. 'पांडुपुत्र किंवा आम्ही यांतील ज्या कोणाचा पराजय होईल त्यांनीं अजिनें परिधान करून, महारण्यांत जाऊन बारा वर्षें वनवास भोगावा आणि तेराव्या वर्षी आपल्या बरोबरीच्या क्षत्रियादिकांतील कोणीहि ओळखणार नाहीं, अशा रीतीनें अज्ञातवासांत एक वर्षभर रहावें. त्या अज्ञातवासांत जर कोणीं ओळखिलें तर पुनः बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास स्वीकारावा.

हे महाराजा, असा एकच पण लावून आम्ही पुनः द्यूताला आरंभ करितों. हे राजन्, पुनः एकदा पांडवांना फांसे हातांत घेऊन द्यूत करूं दे. असेंच करणें आम्हांला सर्वथा उचित आहे. हा शकुनि वशीकरण विद्येसह द्यूतांत प्रवीण आहे. त्यामुळें आमचा जय निश्चित आहे. पुढें या तेरा वर्षांच्या अवधींत आम्ही विपुल मित्र संपादून शत्रूला अजिंक्य असें बलाढ्य सैन्य जमवूं आणि आमचें राज्य दृढमूल करूं म्हणजे मग पांडव तेरा वर्षांचें हें व्रत पार पाडून जरी परत आले तरी आम्ही त्यांना युद्धांत सहज जिंकूं. यास्तव हे परंतपा, आमच्या या योजनेला तूं मान्यता दे.

धृतराष्ट्र म्हणाला—ठीक आहे. असें जर आहे तर पांडव कितीहि दूर गेले असले, तरी त्यांना परत बोलावून आणा आणि पुनः अशा प्रकारचें द्यूत त्यांना करूं दे.

( ३ ) राजा जनमेजया, धृतराष्ट्रानें पुनः द्यूत खेळण्यास अनुमोदन दिलेलें ऐकतांच द्रोण, सोमदत्त, बाल्हिक, कृपाचार्य, विदुर, अश्वत्थामा, युयुत्सु, भूरिश्रवा, भीष्म आणि विकर्ण या सर्वांनीं 'पुनः द्यूत खेळूं नका, आतां स्वस्थ बसा' असें बोलून त्यांचा निषेध केला. परंतु द्यूताची इच्छा न करणाऱ्या त्या सर्व हितचिंतक सज्जन सुहृदांच्या वचनाचा अव्हेर करून पुत्रस्नेहानें अंध झालेल्या धृतराष्ट्रानें पांडवांना परत बोलाविलें. २. १०. ७४.

---

## अध्यय ७५ वा.

[ १ गांधारीचा धृतराष्ट्राला हितोपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**— हे भरतर्षभा, त्यानंतर हा सर्व प्रकार पाहून पुत्रस्नेहानें शोकसंतप्त झालेली धर्मशालिनी गांधारी प्रजेश्वर धृतराष्ट्राला म्हणाली—" हे महाराज, ज्या वेळीं हा दुर्योधन उत्पन्न झाला त्याच वेळीं महामतिमान् विदुरानें काय सांगितलें होतें तें आपणांस आठवतें ना! 'उपजतांच कोल्ह्यासारखा शब्द करणाऱ्या या पुत्राला त्वरित परलोकीं पाठवून दे. हा कुरुकुलाचा नाश करणारा आहे!' असें त्यानें म्हटलें होतें. यास्तव हे कुरुश्रेष्ठा, आपण स्वतःच्या दोषानें या महासागरांत बुडूं नका. हे प्रभो, मूढ व हीनबुद्धि पुरुषांच्या अभिमानानें कुलाच्या घोर क्षयाला कारण होऊं नका. बांधलेला सेतु कोणी मोडील काय ? किंवा शांत झालेला अग्नि कोणी प्रज्वलित करील काय ? त्याचप्रमाणें हे भारता, कौरवांचे सर्व अपराध विसरून शांतीचा आश्रय करणाऱ्या पांडवांना कोणी तरी सुज्ञ अशाप्रकारें पुनः क्रुद्ध करील काय !

अजमीढाच्या कुलांत उत्पन्न झालेल्या व सर्व जाणत असलेल्या आपल्याला मी पुनः आठवण देत्यें. दुर्बुद्धि पुरुषाला त्याच्या कल्याणासाठीं किंवा नाशासाठीं शास्त्र कांहींच सांगत नाहीं. हे राजन्, वृद्धानें बालबुद्धि केव्हांहि होऊं नये. आपल्या पुत्रांनीं आपल्याच आज्ञेंत रहाणें, हितावह आहे. त्यांनीं स्वच्छेनें वागणें केव्हांहि हितावह होणार नाहीं. त्यांनीं मर्यादेचें अतिक्रमण केल्यास ते स्वतः नाश पावतील व आपणांस वियोगदुःख भोगावयास लावितील. यास्तव

माझ्या सांगण्यावरून आपण या कुलकलंकाचा त्याग करावा. माझें हें हितवचन न ऐकतां पुत्रस्नेहानें आपण जर यांना अनुद्यूत करूं द्याल, तर त्याचें 'सर्वकुलाचा नाश' हें फल प्राप्त झालेंच आहे, असें समजा.

पुत्रस्नेहामुळें विदुराच्या उपदेशाप्रमाणें न वागल्याचा हा परिणाम आहे. हे महाराज, आपली बुद्धि शम, धर्म व नीति यांनीं युक्त आहे. ती तशीच स्थिर राहो. आपण या पुत्रांच्या दुष्कृत्यांकडे दुर्लक्ष करूं नका. क्रूरबुद्धि लोकांना प्राप्त झालेली लक्ष्मी सत्वर नाश पावते व शांतवृत्ति पुरुषांना मिळालेलें ऐश्वर्य उत्तरोत्तर वृद्धिंगत होऊन तें पुत्र-पौत्रादिकांस प्राप्त होतें."

जनमेजया, साध्वी गांधारीनें धृतराष्ट्राला असा हितावह उपदेश केला असतांहि तो तिला म्हणाला—"हे गांधारि, कुलाचा नाश होणार असेल तर तो खुशाल होवो. मी त्याचें निवारण करण्यास समर्थ नाहीं. माझ्या पुत्रांची जशी इच्छा आहे, तसेंच होऊं दे. पांडवांना परत येऊं दे व माझे पुत्र त्यांच्याशीं पुनः द्यूत करूं देत." २. १०. ७५.

---

## अध्याय ७६ वा.

[ १ युधिष्ठिराचा द्यूतांत पुनः पराभव. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भरतश्रेष्ठा, इकडे मार्गस्थ झालेले कुंतीपुत्र हस्तिनापुरापासून पुष्कळच दूर गेले होते. तथापि त्यांना 'प्रातिकामि-नांवाच्या सारथ्यानें अर्ध्या मार्गांतच गांठून बुद्धिमान् धृतराष्ट्राच्या आज्ञेनें म्हटलें—"हे राजा युधिष्ठिरा, हातांत फांसे घेऊन सर्व सभा द्यूत खेळण्यास उत्सुक होऊन बसली आहे. शकुनिप्रभृति द्यूतकार तुझी वाट पहात आहेत. यास्तव हे पांडवा, 'तूं परत ये व त्यांच्याशीं द्यूत कर,' असें पित्यानें तुला सांगितलें आहे."

**युधिष्ठिर**—खरोखर, केवळ विधिलिखितामुळेंच प्राणी शुभाशुभ स्थितीला प्राप्त होतात. आम्हीं पुनरपि द्यूत करावें, असेंच जर असेल तर विधिप्राप्त शुभाशुभाची निवृत्ति होणें शक्य नाहीं. भवितव्य कोणालाहि टाळतां येत नाहीं. ज्या अर्थी या वृद्धानें मला पुनः अक्षद्यूत खेळण्यासाठीं आह्वान केलें आहे, त्या अर्थी हें नाश करणारें आहे, असें जाणत असूनहि मी तें नाकारण्यास समर्थ नाहीं. हे प्रातिकामिन्, कोणत्याहि प्राण्याचें सुवर्णशरीर असणें संभवत नाहीं. पण हें जाणत असूनहि श्रीरामचंद्र त्या मायावी सुवर्णमृगावर लुब्ध झाला. यावरून

ज्यांचा विनाशकाल समीप आला आहे, त्यांच्या बुद्धि विपरीत होत असतात, हेंच सिद्ध होतें.

राजा, असें बोलून युधिष्ठिर भ्रात्यांसह परत फिरला आणि तो पांडुपुत्र शकुनीचें कपट जाणत असतांहि पुनः द्यूत खेळण्यास प्रवृत्त झाला. हे भरतश्रेष्ठा, पांडवांनीं त्या सभेंत पुनः प्रवेश केलेला पाहून त्यांच्या सुहृदांचें मन व्यथित झालें. नंतर दैवाधीन झालेले ते पांडव सर्व लोकांच्या विनाशाला कारण होणारें द्यूत पुनः खेळावयास सुखासनावर बसले.

तेव्हां शकुनि म्हणाला—हे भरतश्रेष्ठहो, या वृद्धानें आम्हीं जिंकून घेतलेलें तुमचें सर्व धन तुम्हांला परत दिलें, हें योग्यच झालें. आतां मी एकच महाधनाचा पण लावितों, तो ऐका. या द्यूतांत तुम्हीं जर आमचा पराभव केलात तर आम्ही अजिनें परिधान करून बारा वर्षें महारण्यवास करूं व तेराव्या वर्षीं कोणीहि ज्ञातिजन ओळखणार नाहीं, अशा प्रकारें समग्र एक वर्ष अज्ञातवासांत राहूं. त्या अवधींत आम्हांला जर कोणीं ओळखिलें तर पुनः बारा वर्षें वनवासाला जाऊं.

बरें; आम्हीं जर या द्यूतांत तुम्हांला जिंकलें तर तुम्हींहि याचप्रमाणें बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास स्वीकारावा. अज्ञातवासांत जर तुम्हांला गुप्त रहातां आलें नाहीं तर तुम्हीं पुनः बारा वर्षें वनवासांत काढावीं. या नियमाप्रमाणें तेरावें वर्ष निवृत्त झालें, म्हणजे तुम्ही किंवा आम्ही, जे कोणी पराजित झालेले असूं ते पुनः स्वराज्याला प्राप्त होऊं. हे युधिष्ठिरा, या निश्चयानें तूं पुनः हातांत फांसे घेऊन आमच्याशीं द्यूत खेळ.

राजा, शकुनीचें हें भाषण ऐकून त्या सभेंतील सभासद हात वर करून अत्यंत उद्विग्न चित्तानें एकदम म्हणाले—" हे धृतराष्ट्रा, या द्यूतापासून केवढा अनर्थ होणार आहे, हें या दुर्योधनाला कोणीच कसें सांगत नाहीं ! धिक्कार असो या बांधवांना ! हे धृतराष्ट्रा, हा तुझा पुत्र आपल्या बुद्धीनें पुढील अनर्थ जाणत असो किंवा नसो, या वेळीं त्याला पुढील आपत्तीचें ज्ञान करून देणें, हें तुझें कर्तव्य आहे. "

याप्रमाणें अनेक प्रकारचे जनापवाद ऐकत असतांहि राजा युधिष्ठिर अनुदारपणाच्या दोषापासून निवृत्त होण्यासाठीं व वनवास प्राप्त झाला तरी त्यांत तीर्थयात्रादि धर्माचरण घडेल, अशा विचारानें पुनः द्यूतांत प्रवृत्त झाला. परिणाम

जाणत असतांहि या द्यूतामुळें कौरवांचा विनाश समीपच येत आहे, असें समजणाऱ्या बुद्धिमान् युधिष्ठिरानें पुनः द्यूताला आरंभ केला. तो म्हणाला— "हे शकुने, माझ्यासारखा स्वधर्माचें पालन करणारा राजा कोणीं अह्वान केलें असतां, द्यूत किंवा युद्ध यांपासून निवृत्त कसा वरें होईल, ये; मी तुझ्याबरोबर द्यूत खेळतों."

शकुनि—हे युधिष्ठिरा, धेनु, अश्व, गज, कोश, सुवर्ण, दास-दासी इत्यादि सर्व सोडून केवल वनवासाचा हा एकच पण लावून मी द्यूत खेळत आहें. तुम्हीं किंवा आम्हीं ज्या कोणाचा पराजय होईल, त्यांनीं बारा वर्षे वनाचा आश्रय करून तेराव्या वर्षी स्वजनांना ओळखूं न देतां अज्ञातवासांत रहावें, या निश्चयानें मी द्यूताला आरंभ करितों.

राजा, शकुनीचा हा पण धर्मराजानें मान्य करितांच त्या सौबलानें फांसे टाकून युधिष्ठिराला 'हें पहा मीं जिंकिलें' असें म्हटलें. २. १०. ७६.

---

## अध्याय ७७ वा.

[ १ पांडव व द्रौपदी यांस उद्देशून दुःशासनाचें कठोर भाषण. २ भीमादि चार भ्रात्यांच्या प्रतिज्ञा. ]

( १ ) वैशंपायन—राजा, त्यानंतर द्यूतांत पराजित झालेल्या पांडवांनीं वनवासाची दीक्षा घेऊन अजिनांचीं उत्तरीय वस्त्रें क्रमानें परिधान केलीं. कौरवांनीं ज्यांचें राज्य हरण केलें आहे असे शत्रूंना ताप देणारे पांडव अजिनांनीं युक्त होऊन वनवासाला जावयास निघाले आहेत, असें पाहून दुःशासन म्हणाला—

"या पांडवांचा पराभव होऊन ते परम विपत्तीला प्राप्त झाले आणि आतां महात्म्या दुर्योधनराजाचें एकचक्री राज्य सुरू झालें आहे. आमच्या प्रतिस्पर्ध्यांपेक्षां वयानें ज्येष्ठ व गुणांनीं श्रेष्ठ असलेले आम्ही आज सर्वांत वरिष्ठ झालों आहों. सर्व देव मोठ्या समूहानें सर्व मार्गांनीं आमच्यावर अनुग्रह करण्यास आले आहेत. आम्हीं पांडवांना दीर्घकालपर्यंत अनंत नरकयातनेंत टाकिलें आहे. ते आतां अनेक वर्षेपर्यंत सुखहीन व राज्यभ्रष्ट झाले आहेत.

जे पांडव धनानें मत्त होऊन मयसभेमध्यें आम्हांला हंसले, दुर्योधन जलांत पडला आहे असें पाहून ज्यांना मोठा हर्ष झाला, त्यांना द्यूतांत जिंकून आम्हीं

त्यांचें सर्व धन हरण केल्यामुळें ते आतां वनांत जातील. त्यांना आतां विचित्र जरतारी व तेजस्वी किरीट, कवचें, कटिबंध इत्यादि मूल्यवान् भूषणें व दिव्य वस्त्रें सोडून हरिणाचीं चामडीं नेसूं द्या. कारण त्यांना सौबल शकुनीच्या पणाप्रमाणें अजिनें परिधान करूनच वनांत जाणें भाग आहे. जे ‘ आमच्यासारखे श्रेष्ठ पुरुष त्रिभुवनांत नाहींत ’ असें सर्वदा मानीत होते, तेच हे पांडव अशी विपरीत दशा प्राप्त झाली असतां, आपल्याला पोंचट तिळाप्रमाणें निर्वीर्य समजतील !

अहो, या अशाप्रकारच्या मानी व अति बलाढ्य पांडवांचें हें रुरुमृगाचें चर्म पहा ! तें यज्ञांतील दीक्षित ऋत्विजादिकांप्रमाणें किंवा दीक्षा न घेतलेल्या कैवर्तादिकांप्रमाणें दिसत आहे. सोमकपुत्र यज्ञसेन मोठा बुद्धिमान् आहे, पण त्यानें आपली पांचाली-कन्या या पांडवांना दिली यांत त्यानें कोणतेंच सुकृत जोडलें नाहीं. कारण त्या याज्ञसेनीचे पति—पांडव क्लीब आहेत.

हे याज्ञसेनि, या तुझ्या पतींनीं तुच्छ चर्मे परिधान करून अजिनें पांघरलीं आहेत. ते निर्धन होऊन वनामध्यें वास करणार आहेत. त्यांना आतां कोणत्याच प्रकारची प्रतिष्ठा नाहीं. तेव्हां हे द्रुपदकन्ये, तुला त्यांच्यापासून काय सुख होणार ! यास्तव येथें असलेल्या पुरुषश्रेष्ठांतील कोणाहि एकाला तूं वर. यांतील जो कोणी तुला आवडत असेल, त्याला आपला पति कर. हे सर्व कौरव एकमत, क्षमाशील, दान्त व धनाढ्य आहेत. यांतील कोणाहि एकाला तूं पति वर. हा क्लेशकाल तुला क्लेश न देवो. हे द्रौपदि, जसे पोंचट तिळ, कातड्याचा मृग, किंवा धान्यरहित फोलपट, त्याप्रमाणें हे पांडव आतां निःसत्त्व झाले आहेत. आतां तुला या पतित पांडवांचा आश्रय करून काय लाभ होणार ! तैलरहित तिळांना घाण्यांत घालून किती जरी पिळिलें तरी त्यापासून जसा तेलाचा एक बिंदुहि निघत नाहीं, त्याप्रमाणें या पांडवांची उपासना करण्यांत तुला व्यर्थ श्रम मात्र होतील. ”

( २ ) राजा, धृतराष्ट्राच्या त्या दुष्ट पुत्रानें पांडवांना असे कठोर शब्द ऐकविले. ते ऐकून अत्यंत क्रोधी भीमसेन उच्च स्वरानें त्याची निर्भर्त्सना करून व त्याचें भाषण थांबवून एखादा हिमालयांतील सिंह कोल्ह्याच्या अंगावर जसा

१ यथाफलाः षंढतिला यथा चर्ममया मृगाः । तथैव पांडवाः सर्वे यथा काकयवा अपि ॥

चवताळून धांवतो, त्याप्रमाणें त्या दुरात्म्यापाशीं मोठ्या वेगानें जाऊन आवेशानें म्हणाला—

" अरे क्रूरा, तूं हीन जनाप्रमाणें असंबद्ध प्रलाप करीत आहेस. हे नीचा, या दुष्ट शकुनीच्या हीन विद्येनें उन्मत्त होऊन या राजसभेमध्यें अशी आत्मश्लाघा करीत आहेस. पण तूं लक्षांत ठेंव कीं, ज्याप्रमाणें तूं आपल्या या वाक्शरांनीं आमच्या मर्मांना अतिशय पीडा देत आहेस, त्याचप्रमाणें समरांगणांत तुझीं मर्मस्थानें तोडितेवेळीं मी तुला याचें स्मरण देईन. त्या वेळीं क्रोध व लोभ यांच्या वश होऊन जे तुझें रक्षण करावयास तुझ्या मागोमाग येतील, त्यांनाहि त्यांच्या पुत्र-बांधवांसह मी यमसदनीं पाठवीन."

हे जनमेजया, क्रोधानें असें भाषण करणाऱ्या, पण केवल अजिन याच संपत्तीसह राज्यापासून बहिष्कृत केलेल्या भीमाच्या पुढें जाऊन दुःशासन सर्व कौरवांमध्यें नाचूं लागला. ज्यानें सर्व लज्जा सोडिली आहे, असा तो धार्तराष्ट्र धर्मानें ज्याचा रिपुमर्दनमार्ग अडविला आहे, अशा त्या भीमास 'गौः गौः गौः' असें बोलला.

तथापि ते त्याचे शब्द ऐकून भीमसेन म्हणाला—हे दुर्बुद्धे दुःशासना, तुला याच वेळीं असें निष्ठुर भाषण करणें शक्य आहे. पुढें अशी वेळ येणार नाहीं. पण हे नीचा, केवल कपटानें आमचें धन लुबाडून भर सभेंत अशी आत्मश्लाघा करण्यास तुझ्यावांचून अन्य कोण धजेल! पण ही माझी सत्यप्रतिज्ञा ऐकून ठेव. रणांगणामध्यें तुझें वक्षःस्थल फोडून जर मी तुझें रक्त न पिईन तर हा वृकोदर पार्थ पुण्यवानांच्या लोकाला केव्हांहि जाणार नाहीं. सर्व धनुर्धरांच्या समोर, रणांगणांत धृतराष्ट्राच्या शंभर पुत्रांस मारून मी लवकरच शांत होईन, हें मी तुला सत्य सांगून ठेवतों.

---

१ मधुपर्काच्या वेळीं अतिथीला 'गौः गौः गौः' असें तीन वेळां म्हणून निवेदन केलेल्या गायीचा वध किंवा उत्सर्ग करण्याचा प्रघात आहे. त्या सादृश्यानें अंतकरूप अतिथीला निवेदन केलेल्या या पांडवांना आम्हीं जिवंत सोडिलें आहे. त्यामुळें 'आम्ही आतां मृत्युमुखांतून मुक्त झालों आहोंत' असें मानून ते वेगानें जीव घेऊन पळत आहेत, असा पांडवांचा उपहास सुचविणारा हा शब्द आहे. याचें उत्तर भीमसेन द्रोणपर्वांत दुःशासनवधप्रसंगीं देईल.

हे पांडवेया, मूढबुद्धि राजा दुर्योधन मोठ्या हर्षानें, सिंहाप्रमाणें गमन करणाऱ्या भीमाच्या गतीचें स्वतः अनुकरण करून पांडव सभेंतून निघून जात असतांना त्यांचा असा अमर्याद उपहास करीत त्यांच्या मागून जाऊं लागला. तेव्हां क्रोधी भीमसेन आपली मान किंचित् मागें वळवून त्यास म्हणाला— " दुर्योधना, एवढ्यानेंच कांहीं झालें नाहीं. तूं स्वतःला असा कृतार्थ समजूं नकोस. लवकरच मी तुझ्या बांधवांसह तुला मारून तुझ्या प्राणान्तसमयीं या सर्व गोष्टींची तुला आठवण देईन. हे मूढा, या सर्व उपहासाचें उत्तर मी तुला योग्य समयीं देईन."

राजा, त्या मानी व बलाढ्य वृकोदरानें दुष्ट कौरवांनीं केलेला हा आपला अपमान प्रत्यक्ष पाहूनहि आपल्या क्रोधाचें नियमन केलें व तोहि राजा युधिष्ठिराच्या मागोमाग जाऊं लागला. जातां जातां कौरवांच्या सभेंत त्या सत्यप्रतिज्ञ भीमानें अशी घोर प्रतिज्ञा केली—" मी दुर्योधनाला, धनंजय कर्णाला व सहदेव या नीच अक्षचतुर शकुनीला युद्धामध्यें मारील. या सभेमध्यें मी हें प्रतिज्ञावचन पुनः बोलतों; तें सर्वांनीं लक्षपूर्वक ऐकून ठेवावें. आमचें जर युद्ध झालें तर देव माझें हें वचन सत्य करतील. मी या पापी सुयोधनाला युद्धांत गदेनें मारीन व भूमीवर शयन करणाऱ्या याच्या मस्तकावर पाय देऊन उभा राहीन. कठोर भाषण करण्यांत शूर असलेल्या या दुःशासनाचें रक्त मी सिंहाप्रमाणें प्राशन करीन."

अर्जुन म्हणाला—हे भीमा, सज्जन लोकांचा निश्चय ते आपल्या वाणीनें कोणाला सांगत बसत नाहींत. आजपासून चौदाव्या वर्षीं काय होईल, तें आपण पाहूं.

भीमसेन म्हणाला—दुर्योधन, कर्ण, दुरात्मा शकुनि व हा चवथा दुःशासन यांचें रक्त भूमि प्राशन करील, याहून आणखीं काय होणार !

अर्जुन म्हणाला—हे भीमसेना, तुझ्या आज्ञेनें मी असूया करणाऱ्या, हें दुष्कृत्य प्रत्यक्ष पहाणाऱ्या, वृथा वल्गना व आत्मश्लाघा करणाऱ्या या कर्णाला युद्धांत मारीन. भीमाचें प्रिय करण्याच्या इच्छेनें हा अर्जुन या कुरुसभेंत प्रतिज्ञा करीत आहे, ती सर्वांनीं ऐकून ठेवावी. " कर्ण, त्याचे अनुयायी व बुद्धिमोहानें माझ्या प्रतिपक्षाला मिळून माझ्या समोर उभे रहाणारे इत-

रहि राजे, यांचा समरांगणांत मी आपल्या तीक्ष्ण बाणांनीं वध करीन. आजपासून चौदाव्या वर्षीं दुर्योधनानें आमचें राज्य सत्कारपूर्वक आम्हांला परत न दिल्यास मी आपल्या बाणांनीं या कर्णादि सर्व वीरांस यमसदनीं पाठवीन. हिमालय स्वस्थानापासून ढळेल, सूर्यहि कदाचित् प्रकाशणार नाहीं, चंद्राचें स्वाभाविक शैत्यहि एकवेळ त्याला सोडील, पण माझी ही सत्य प्रतिज्ञा मिथ्या होणार नाहीं. हे वीर क्षत्रियहो, माझें हें सत्यवचन तुम्ही ऐकून ठेवा. अर्जुनाचें हें सत्य भाषण कदापि अन्यथा होणार नाहीं."

राजा जनमेजया, पार्थानें अशी घोर प्रतिज्ञा केली असतां श्रीमान् माद्रीपुत्र सहदेव आपल्या पुष्ट बाहूला स्पर्श करून व क्रोधानें नेत्र लाल करून सर्पाप्रमाणें निःश्वास सोडीत सौबलाच्या वधाविषयीं असें सत्यवचन बोलला—"हे गांधारकुलकलंका शकुने, तूं मूढपणानें ज्यांना फांसे समजत आहेस, ते वस्तुतः फांसे नसून त्यांच्या द्वारा तूं समरांतील माझ्या तीक्ष्ण बाणांनाच आह्वान केलें आहेस, असें समज. भीमानें तुझ्या बांधवांसह तुला उद्देशून जें भाषण केलें आहे तें मी आपल्या कृतीनें अक्षरशः खरें करून दाखवीन. यास्तव तूं आपलीं सर्व कर्तव्यें सत्वर उरकून घे. हे शकुने, तूं क्षत्रधर्माला स्मरून संग्रामांत जर माझ्या समोरउभा रहाशील, तर मी तुला तुझ्या सर्व बांधवांसह यमलोकीं पाठवीन."

राजा, सहदेवाचें हें वचन ऐकून सर्व पुरुषांमध्यें दर्शनीय असलेला नकुलहि त्या सभेंत म्हणाला—" दुर्योधनाचें प्रिय करण्यामध्यें तत्पर असलेल्या धृतराष्ट्राच्या ज्या पुत्रांनीं या द्यूतांत यज्ञसेनाच्या साध्वी कन्येला कर्णकठोर शब्द ऐकविले, त्या दुर्वृत्त, कालप्रेरित व मुमुर्षु धृतराष्ट्र-पुत्रांतील बहुतेकांस मी यमसदनीं पाठवीन. धर्मराजाच्या आज्ञेनें द्रौपदीचें प्रिय करण्यासाठीं लवकरच या पृथ्वीला धार्तराष्ट्रशून्य करीन."

हे परिक्षित्पुत्रा, ज्यांचे बाहु दीर्घ व वर्तुळ आहेत, असे ते पुरुषश्रेष्ठ पांडव याप्रमाणें घोर प्रतिज्ञा करून धृतराष्ट्राजवळ आले. २. १०. ७७.

---

## अध्याय ७८ वा.

[ १ सर्व भारतांचा निरोप घेऊन निघालेल्या युधिष्ठिराला विदुराचा शुभाशीर्वादपूर्वक हितोपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजा, ते पांची भ्राते धृतराष्ट्रराजापाशीं आल्यावर युधिष्ठिर म्हणाला—"हे भरतश्रेष्ठ राजा धृतराष्ट्रा, मी आतां वृद्ध पितामह भीष्म, राजा सोमदत्त, महाराजा बाल्हिक, द्रोणाचार्य, कृपाचार्य, इतर नृपति, त्याचप्रमाणें अश्वत्थामा, विदुर, तू धृतराष्ट्र व सर्व कौरव, युयुत्सु, संजय व इतर सभासद या सर्वांचा निरोप घेऊन वनवासाला जात आहें. मी तुम्हांला पुनः येऊन भेटेन."

राजा, याप्रमाणें युधिष्ठिरानें निरोप घेतला असतां त्या सभेंत लज्जेनें अधोमुख होऊन बसलेले ते सर्व भीष्मादि वृद्ध नरश्रेष्ठ एक शब्दहि बोलले नाहींत. त्यांनीं मनांतून मात्र त्या बुद्धिमान् युधिष्ठिराचें कल्याण चिंतिलें.

पण त्यावेळीं निःस्पृह **विदुर** म्हणाला—"हे धर्मज्ञ पांडुपुत्रहो, तुमची साध्वी माता राजकन्या कुंती तुमच्या बरोबर अरण्यांत जाण्यास समर्थ नाहीं. ती जात्याच सुकुमारी, निरंतर सुखांत वाढलेली व आतां तर वृद्ध झाली आहे. ती माझ्या घरीं मोठ्या सन्मानानें राहील. हे वीरांनों, तुम्ही याला आपली संमति द्या. तुमचें सदैव आरोग्य असो." विदुराचें हें प्रेमळ वचन ऐकून ते सर्वहि भ्राते एकदम म्हणाले—"हे निष्पाप महाभागा, ठीक आहे. तुझें सांगणें आम्हांला मान्य आहे. तूं आमचा पितृव्य असल्यामुळें आम्हांला पितृतुल्यच आहेस. आम्ही तुझ्या आज्ञेंत सदैव तत्पर आहोंत. तुझ्या आज्ञेप्रमाणें आम्ही वागूं. हे विद्वन्, तूं आमचा परम गुरु आहेस. आणखींहि कांहीं आमचें कर्तव्य असलें तर तेंहि अवश्य सांग."

**विदुर** म्हणाला—हे युधिष्ठिरा, मी तुला आणखींहि कांहीं सांगतों, तें लक्षांत ठेव. [१]अधर्मानें जिंकला गेलेला पुरुष पराजयानें केव्हांहि व्यथित होत नाहीं. हे धर्मराजा, तूं धर्म जाणतोस, धनंजय युद्धांत विजयी होणारा आहे, भीमसेन शत्रूंचा वध करणारा आहे, नकुल अर्थसंग्रह करणारा, सहदेव संयमन करणारा व धौम्यमुनि श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता आहे आणि धर्मचारिणी द्रौपदी धर्मार्थकुशल आहे. तुम्ही सर्व परस्परांस प्रिय व प्रियदर्शन आहांत. तुमच्यामध्यें

---

१ नाधर्मेण जितः कश्चिद्व्यथते वै पराजये ॥

कोणीहि भेद उत्पन्न करूं शकणार नाहीं. शिवाय तुम्ही यदृच्छालाभसंतुष्ट आहांत, तेव्हां तुम्ही कोणाला आवडणार नाहीं !

हे कुंतीपुत्रा, हाच तुझा मनःस्वास्थ्य करणारा नियम सर्वप्रकारें कल्याणकारक आहे. इंद्रासारखा बलाढ्य शत्रुहि त्याला सहन करूं शकत नाहीं. पूर्वी हिमालयावर मेरुसावर्णीनें तुला उपदेश केला. वारणावत-नगरींत कृष्णद्वैपायनानें बोध केला. भृगुतुंग-पर्वतावर परशुरामानें, दृषद्वती-नदीच्या तीरावर शंकरानें व अंजनपर्वतावर असित-महर्षीनें तुला धर्मरहस्य कथन केलें आहे. कल्माप-नदीच्या तीरावर रहाणाऱ्या भृगूचें तर तूं शिष्यत्वच स्वीकारिलें होतेंस. देवर्षि नारद वारंवार तुला दर्शन देत असतो आणि हा धौम्यमुनि तर तुझा पुरोहितच आहे. हे महात्म्या, अशा पूज्य महर्षीपासून तुला जें परलोकसंबंधी ज्ञान प्राप्त झालेलें आहे, त्याचा तूं केव्हांहि त्याग करूं नकोस. तुझ्या या धर्मबुद्धीमुळें तूं पुरूरवा ऐलराजालाहि जिंकीत आहेस. तूं आपल्या शक्तीनें राजांना व धर्माचरणानें ऋषींनाहि अजिंक्य आहेस.

हे धर्मज्ञा, तूं इंद्रापासून विजय, यमापासून क्रोधाचें नियमन, कुबेरापासून दातृत्व, वरुणापासून संयमन, जलापासून सर्व भूतांच्या हितासाठीं शारीरादि चेष्टा, सौम्यत्व व जीवनहेतुत्व, भूमीपासून क्षमा, सूर्यमंडलापासून सर्वप्रकारचें तेज, वायूपासून बल आणि पंचभूतांपासून जयादि सर्व संपत्ति प्राप्त करून घे.

हे कौंतेयहो, तुम्हांला आरोग्य प्राप्त होवो. तुमचें कल्याण असो. आतां तुम्ही परत आल्यावर मी तुम्हांला भेटेन. हे युधिष्ठिरा, आपद्धर्म, धनाविपयींचीं संकटें, किंवा इतर सर्व कर्तव्यें ज्या ज्या वेळीं उपस्थित होतील, त्या त्या वेळीं तुला त्यांचें यथावत् ज्ञान होवो. आतां मी तुम्हांला निरोप देतों. तुमचें क्षेम असो. हे पांडुपुत्रांनों, तुम्हीं पूर्वी केव्हांहि पापाचरण केल्याचें कोणालाहि स्मरत नाहीं. यास्तव तुम्ही कृतार्थ होऊन सुरक्षित परत आल्याचें आम्ही निश्चयानें पाहूं.

राजा, विदुराचें हें भाषण ऐकून 'ठीक आहे' असें बोलून तो सत्यप्रतिज्ञ पांडव युधिष्ठिर भीष्म व द्रोण यांना नमस्कार करून निघाला. २. १०. ७८.

---

## अध्याय ७९ वा.

[ १ वनगमनाची अनुज्ञा घेणाऱ्या द्रौपदीस कुंतीचा उपदेश. २ कुंतीचा विलाप. ३ पांडवांचें वनगमन. ४ कौरवस्त्रियादिकांची चिंता. ]

( १ ) **वैशंपायन—हे कुरुश्रेष्ठा, याप्रमाणें तो ज्येष्ठ पांडव भ्रात्यांसह वनांत जावयास निघाला असतां अतिशय शोकाकुल झालेली कृष्णा यशस्विनी कुंतीपाशीं आली. तिनें तिला वंदन केलें व पतींबरोबर वनांत जाण्याविषयीं तिची अनुज्ञा विचारिली. तशाच तेथें ज्या इतर स्त्रिया होत्या, त्यांनाहि त्यांच्या योग्यतेप्रमाणें आलिंगनादि देऊन ती पतींबरोबर वनांत जावयास सिद्ध झाली.**

**राजा जनमेजया, त्यावेळीं पांडवांच्या अंतःपुरांत फार मोठा शोकध्वनि झाला. द्रौपदी वनांत जावयास निघाली आहे असें पाहून कुंती शोकानें अतिशय संतप्त झाली व ती साध्वी तिला सद्गदित स्वरानें व मोठ्या कष्टानें म्हणाली—**

"हे वत्से, तुझ्यावर आज हें महत्संकट ओढवलें आहे. तथापि तूं शोक करूं नको. तूं स्त्रीधर्म जाणतेस. तशीच तूं शील व सदाचार यांनीं युक्त आहेस. हे कल्याणि, अशा प्रसंगीं आपल्या भर्त्यांशीं कसें वागावें हें तुला माहित आहे. मीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. तूं साध्वीस्त्रियांच्या सर्व गुणांनीं संपन्न आहेस. तूं आपल्या दोन्ही कुलांना भूषित केलें आहेस. हे अनघे, तूं ज्यांना आपल्या क्रोधयुक्त दृष्टीनें जाळिलें नाहींस, ते हे सर्व कौरव मोठे भाग्यवान् आहेत, असें मी समजतें.

हे सुव्रते, तूं निर्विघ्नपणें पतींच्या मार्गानें गमन कर. तूं पातिव्रत्य या गुणानें युक्त आहेस, तथापि वात्सल्य या माझ्या मातृगुणानेंहि युक्त हो. तूं आपल्या भर्त्यांवर भक्ति व स्नेह ठेव. साध्वी स्त्रिया अवश्य होणाऱ्या भवितव्यतेविषयीं कोणाला दोष देत नाहींत. त्यांच्यावर कसाहि जरी दुर्धर प्रसंग ओढवला तरी त्या उद्विग्न होत नाहींत. श्रेष्ठधर्मानें जिचें सर्व प्रकारें संरक्षण केलें आहे, अशा तुझें सत्वरच परम कल्याण होईल. याज्ञसेनि, वनांत रहाणाऱ्या माझ्या सहदेवपुत्राकडे तूं नेहमीं लक्ष ठेव. तो महाबुद्धिमान् पांडुपुत्र ही असह्य आपत्ति आल्यामुळें निरुत्साह होणार नाहीं, याविषयीं दक्ष रहा."

राजा, कुंतीचें हें प्रेमळ उपदेशपर भाषण ऐकून देवी द्रौपदीनें 'ठीक आहे' असें म्हटलें. त्या वेळीं तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वहात होत्या. ती रजस्वला असल्यामुळें एकवस्त्रा होती. तिचे केंस मोकळे सुटले होते. अशा स्थितींत

ती साध्वी आक्रोश करीत अंतःपुरांतून बाहेर पडली. तेव्हां पुत्रवत्सल वृद्ध पृथाहि दुःखानें तिच्या मागोमाग बाहेर आली.

( २ ) तों तिला ज्यांचीं आभरणें व सुंदर वस्त्रें काढून घेतलीं आहेत, ज्यांचीं शरीरें रुरुचर्मानें आच्छादिलेलीं आहेत व जे लज्जेनें किंचित् अधोमुख झाले आहेत, असे पांची पुत्र समोर दिसले. त्या वेळीं अति हृष्ट झालेले धृतराष्ट्र-पुत्र त्यांच्या सभोंवार उभे होते व भीष्म, विदुर, द्रोण, यांसारखे सुहृद् त्यांच्या-साठीं शोक करीत होते. आपल्या पुत्रांची ती स्थिति पाहून अतिवत्सल कुंती त्यांच्या जवळ गेली व त्यांतील प्रत्येकाला आलिंगन देऊन दुःखानें विलाप करूं लागली.

कुंती म्हणाली—वत्सांनो, तुम्ही सद्धर्माचें आचरण करणारे, सदाचारसंपन्न, उदारचरित व मर्यादा यांनीं विभूषित, सत्यनिष्ठ, परमभक्त आणि सर्वदा देवतापूजनामध्यें तत्पर असतांना तुमच्यावर हें भयंकर संकट कसें ओढवलें ! काय हा दैवदुर्विलास ! कोणाच्या क्रोधाचें हें फल तुम्हांला भोगावें लागत आहे, असें मी समजूं ?

कदाचित् माझ्याच दुर्दैवाचा हा परिणाम असावा. म्हणूनच श्रेष्ठ गुणांनीं युक्त असूनहि अत्यंत क्लेश भोगणाऱ्या तुम्हांला मीं जन्म दिला. सर्व प्रकारच्या संपत्तीनें हीन झालेले तुम्ही दुर्गम वनांत कसे रहाल ! कारण तुम्ही मानसबल, धैर्य, शरीरसामर्थ्य, उत्साह, पराक्रम व तेज या क्षात्रगुणांनीं जरी परिपुष्ट अहांत तरी बाह्य सामग्रीनें हीन म्हणजे कृश झालां आहां. वत्सांनो, तुमच्या दैवामध्यें वनवासच नियत आहे, हें जर मला पूर्वीं कळलें असतें, तर तुमचा पिता पांडु-राजा परलोकीं गेल्यावर मी शतशृंग-पर्वतावरून हस्तिनापुरास आलेंच नसत्यें.

तप व प्रज्ञा यांनीं युक्त असलेला तुमचा पिता धन्य आहे. कारण तो पुत्रां-विषयींच्या मानसिक पीडेला प्राप्त न होतां त्यानें स्वर्गाला जाण्याचीच इच्छा केली. मी मात्र तुमचे क्लेश पहावयास मागें जिवंत राहिल्यें आहें.

खरोखर, ती माझी सपत्नी माद्रीहि धन्य आहे. तिला अतींद्रिय ज्ञान होतें, असें मला वाटतें. त्यामुळेंच ती धर्मज्ञ कल्याणी परम गतीला प्राप्त झाली. माझ्या त्या सपत्नीनें मला या प्रसंगीं सर्वथा ठकविलें आहे, असें मी समजत्यें. कारण पतीच्या अंतकालीं तीच त्याच्या सुखाचें निमित्त झाली. पतीबरोबर सहगमन करून तिनेंच आपल्या बुद्धीनें मोठें यश मिळविलें व पतिलोकीं गमन

करून तेथेंहि त्याच्या बरोबर सुख भोगीत राहिली आहे. मी मात्र आपल्या जीविताला प्रिय मानून हे क्लेश भोगीत या लोकींच राहिल्यें आहे. खरोखर, मला धिक्कार असो.

हे पुत्रांनो, मी तुम्हांला मोठ्या कष्टानें प्राप्त करून घेतलें आहे. तुम्ही मला माझ्या प्राणाहूनहि अधिक प्रिय अहां. यास्तव मी तुम्हांला सोडणार नाहीं. मीहि तुमच्या मागोमाग वनांत येत्यें. हे कृष्णे, मज अनाथ कुंतीला तूं कां सोडितेस ! हें जीवित विनाशी आहे. तथापि विधात्यानें अनवधानामुळें पांडुराजाप्रमाणें माझ्या जीविताचा अंत निश्चित केला नाहीं, असें मला वाटतें. माझ्या अंताचें त्याला विस्मरण झालें आहे, हेंच खरें. त्यामुळें माझे प्राण या दुःखी शरीराला सोडीत नाहींत.

हे द्वारकावासिन् कृष्णा, हे रामानुजा, कोठें आहेस ! मला व या पुरुषश्रेष्ठांना या दुःखांतून कां सोडवीत नाहींस ! 'जे नर आदि-अंतशून्य असलेल्या तुझें ध्यान करितात, त्यांचें तूं संकटप्रसंगीं रक्षण करितोस' हें विद्वद्वचन आज व्यर्थ कसें झालें ! सद्धर्म, माहात्म्य, यश व वीर्य यांचें अनुवर्तन करणारे हे माझे पांची पुत्र असलें संकट भोगण्यास योग्य नाहींत. हे भगवन्, तूं यांच्यावर दया कर.

नीतिशास्त्रज्ञ भीष्म, द्रोण, कृप इत्यादि आमच्या कुलाचे नाथ जिवंत असतांना माझ्या पुत्रांवर ही आपत्ति कशी आली ! हर हर, हे महाराज पांडो, तूं कोठें आहेस ! शत्रूंनीं द्यूतांत जिंकून तुझ्या सद्वृत्त पुत्रांना तुझ्या हस्तिनापुरांतून वनांत घालविण्याचा संकेत केला व त्याप्रमाणें ते तुझे पुत्र आज अनाथांसारखे कुरुकुलराजधानी सोडून वनांत चालले आहेत, अशा स्थितींत तूं त्यांची उपेक्षा कां करितोस !

सहदेवा, तूं एकटा तरी वनवासापासून निवृत्त हो. अरे बाळा, तूं मला माझ्या जीविताहूनहि अधिक प्रिय आहेस. बा माद्रेया, एखाद्या कुपुत्राप्रमाणें मज वृद्धेचा तूं त्याग करूं नकोस. तुझ्या या भ्रात्यांना जर आपली सत्य प्रतिज्ञा पाळावयाची असेल, तर त्यांनाच वनांत जाऊं दे. माझें रक्षण केल्यास तुला मोठें पुण्य लागेल. तूं येथें राहून हाच श्रेष्ठ धर्म संपादन कर.

( ३ ) हे भारता, याप्रमाणें एखाद्या निर्दय मनुष्याच्याहि अंतःकरणाला पाझर फोडणारा असा विलाप करणाऱ्या कुंतीला प्रणाम करून व तिच्या चर-

णांवर मस्तक ठेवून मनांत अतिशय खिन्न झालेले पांडव मोठ्या कष्टानें वनांत जावयास निघाले. तेव्हां विदुरानें पुत्रवियोगानें अति आर्त झालेल्या कुंतीचें अनेक युक्तियुक्त उपदेश वचनांनीं समाधान करून तिला आपल्या गृहीं नेलें.

राजा, त्या वेळीं महात्मा विदुर स्वतः कुंतीपेक्षांहि अधिक दुःखाकुल झाला होता. तथापि 'हे कुंति, दैवाचें उल्लंघन कोणाच्यानेंहि करवत नाहीं. तुझ्या पुत्रांना आज जरी असे क्लेश भोगावे लागत आहेत तरी त्यांचें धर्माचरण व ईश-भक्ति त्यांना लवकरच त्या क्लेशांतून सोडवील. तूं खिन्न होऊं नको. माझ्या घरीं सुखानें रहा. मी तुझ्या पुत्रांहूनहि तुझें अधिक संरक्षण करीन. त्यांचें तुला स्मरणहि होऊं देणार नाहीं.' इत्यादि सान्त्व वचनें हळुहळू बोलत कुंतीसह तो आपल्या घरीं गेला.

(४) राजा, दुर्योधनादि कौरवांच्या स्त्रियांनींहि हा सर्व प्रकार प्रत्यक्ष पाहिला. द्यूतमंडलामध्यें कृष्णेचें केशाकर्षण व वनगमन हीं घोर कर्मे पाहून त्याहि मोठ्यानें आक्रोश करूं लागल्या. त्यांनीं सर्व कौरवांची अतिशय निंदा केली व आपलीं मुखकमलें करतलावर टेकून 'याचा परिणाम काय होईल? या घोर कृत्यामुळें सर्व कौरवकुल पांडवांच्या क्रोधाग्नींत दग्ध तर होणार नाहीं ना?' असा दीर्घकाल विचार केला.

इकडे, राजा धृतराष्ट्रहि पुत्रांच्या दुर्वर्तनाचाच विचार करीत बसला. त्याचें हृदय अतिशय उद्विग्न झालें, त्याच्या शांतीचा भंग झाला व तो जसें जसें अधिक चिंतन करूं लागला तसें तसें त्याचें चित्त अधिक व्याकुळ होऊं लागलें. तेव्हां शोकानें संतप्त होऊन 'संजया, विदुराला सत्वर घेऊन ये' असें बोलून त्यानें संजयाला विदुराकडे तत्काल पाठविलें. धृतराष्ट्राचा निरोप कळतांच विदुर राजमंदिरांत आला. तेव्हां दुःखानें उद्विग्न झालेला तो कुरुराज त्यास असें विचारूं लागला. २. १०. ७९.

---

## अध्याय ८० वा.

[१ धृतराष्ट्राचा पांडवांच्या वनगमनाविषयीं प्रश्न व विदुराचें उत्तर. २ पांडवांच्या हावभावांचा विदुरोक्त आशय. ३ पौरजनांचा संताप व दुश्चिन्हें. ४ दुर्योधनादिक द्रोणांस शरण गेले असतां त्याचा त्यांस हितोपदेश.]

(१) **वैशंपायन**—हे भारता, त्यानंतर अंबिकासुत राजा धृतराष्ट्रानें समीप आलेल्या त्या दूरदर्शी विदुराला जणुंकाय साशंक झाल्याप्रमाणेंच प्रश्न केला.

तो म्हणाला—हे विदुरा, तो धर्मपुत्र युधिष्ठिर, भीमसेन, सव्यसाची धनंजय, ते दोघे माद्रीपुत्र नकुल-सहदेव, धौम्य महर्षि आणि यशस्विनी द्रौपदी, हीं सर्व कशीं गेलीं? त्यांची चर्या व हावभाव कशाप्रकारचे होते? हें ऐकण्याची माझी इच्छा आहे.'

विदुर म्हणाला—हे राजा, कुंतीपुत्र युधिष्ठिरानें आपलें मुख वस्त्रानें झांकून घेतलें होतें. भीमसेन आपल्या विशाल बाहूंकडे पहात चालला होता. सव्यसाची पार्थ हातांनीं वाळू उडवीत धर्मराजाच्या मागोमाग जात होता. माद्रीसुत सहदेव मुखाला राख फासून निघाला. ज्याचें चित्त विह्वल झालें आहे असा अति दर्शनीय नकुल आपलें सर्व शरीर धूलीनें माखून ज्येष्ठ भ्रात्याला अनुसरला. लावण्यवती कमलनयना कृष्णा दुःशासनानें आकर्षण केल्यामुळें अस्ताव्यस्त होऊन विखुरलेल्या केंसांनीं आपलें मुख आच्छादित करून, रोदन करीत, युधिष्ठिराच्या मागून निघाली आणि धौम्यमुनि हातांत दर्भ घेऊन यमाचीं उग्र सामें गात मार्गानें चालला होता.

धृतराष्ट्र म्हणाला—हे धर्मज्ञा, ते पांडव अशीं विविध रूपें धारण करून कां जात आहेत, तें मला सांग. त्यांत त्यांनीं कोणता आशय व्यक्त केला!

( २ ) विदुर म्हणाला—राजा, तुझ्या पुत्रांनीं राज्य व धन कपटानें जरी हरण केलें, तरी बुद्धिमान् धर्मराजाची मति धर्मापासून ढळली नाहीं. हे भारता, तो दयाळु कुंतीपुत्र तुझ्या पुत्रांवर नेहमीं दयार्द्र दृष्टि ठेवीत असतो, तुझ्या पुत्रांनीं अति निंद्य कपटाचरणानें जरी त्याला राज्यभ्रष्ट केलें, तरी तो महात्मा क्रोधानें आपले नेत्र उघडीत नाहीं. 'मीं आपल्या क्रूर दृष्टीनें या जनसमूहाला जाळूं नये, माझ्या क्रोधयुक्त दृष्टीनें लोकांचा नाश होऊं नये,' म्हणून तो राजा आपलें मुख आच्छादित करून जात आहे.

आतां भीमानें पूर्वोक्त प्रकारें जाण्यांत कोणता आशय व्यक्त केला, तें ऐक. बाहुबलामध्यें माझी बरोबरी करणारा एकहि पुरुष या भूलोकीं नाहीं, हें प्रकट करण्यासाठीं तो बलाढ्य अर्जुनाग्रज आपले विशाल बाहू बाहेर काढून ते लोकांना दाखवीत चालला आहे. बाहुबलरूपी संपत्तीनें दृप्त झालेला तो वीर शत्रूंच्या ठिकाणीं आपल्या बाहुबलानुरूप घोर कर्म करण्याची इच्छा करीत आहे.

हे कुरुनंदना, सव्यसाची अर्जुन 'ज्या वेळीं कौरवांशीं माझें युद्ध होईल त्या वेळीं मी या आपल्या हातांतील वाळूच्या कणांप्रमाणें माझ्या शत्रूंवर अप्रति-



पांडवांच्या वनगमन प्रसंगीं कुंतीचा विलाप. ( पृष्ठ ३९७ )

हत शरवृष्टि करीन,' असें सुचवीत आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या मागून जात आहे. राजा, या वेळीं त्याच्या हातांतील वाळूचे कण जसे कोठेंहि प्रतिबद्ध झाले नाहींत, त्याप्रमाणें तो चौदा वर्षांनंतर आपल्या शत्रूंवर शरवृष्टि करूं लागला असतां त्याचे दिव्य बाण कोठेंहि आसक्त होणार नाहींत.

हे राजा, त्याचप्रमाणें ' मला आज कोणींहि ओळखूं नये ' म्हणून सहदेवहि आपलें मुख भस्माच्छादित करून जात आहे.

धृतराष्ट्रा, 'मीं मार्गामध्यें स्त्रियांच्या चित्ताचें आकर्षण करूं नये,' असें म्हणून नकुल आपल्या सर्वांगाला धूळ फांसून राजाच्या मागोमाग जात आहे.

द्रुपदकन्या द्रौपदी रजस्वला असल्यामुळें एकवस्त्रा असून तिचें तें वस्त्र मलीन झालें आहे. तुझ्या दुःशासन-पुत्रानें तिच्या केशांचें आकर्षण केल्यामुळें तेहि मोकळे सुटले आहेत. अशा स्थितींत ती राज्ञी आक्रोश करीत मनांत म्हणाली—" ज्यांच्यामुळें मजवर हा प्रसंग ओढवला आहे, त्यांच्या स्त्रिया आजपासून चौदाव्या वर्षीं अशाच घोर संकटांत पडतील. ज्यांचे पति, पुत्र, बंधुजन व इतर आप्तेष्ट यांचा पांडवांनीं वध केला आहे, ज्यांचीं अंगें मृतांच्या रक्तानें व रणांगणांतील धूलीनें लिप्त झालीं आहेत, ज्यांचे केंस मोकळे सुटले आहेत अशा त्या कौरवभार्या हस्तिनापुरांत प्रवेश करतील." राजा, त्या साध्वी द्रौपदीनें तुझ्या पुत्रांना हा घोर शापच दिला आहे, असें तूं समज.

हे भारता, पांडवांचा विद्वान् पुरोहित धौम्य हातांतील दर्भांचीं अग्रें नैर्ऋत्य दिशेकडे करून याम्य सामें गात सर्वांच्या पुढें चालला आहे. ' रणांगणांत कौरवांचा नाश झाला असतां कुरूंचे पुरोहित याचप्रमाणें याम्य सामें म्हणत जातील ' असा आशय तो आपल्या गमनानें व्यक्त करीत आहे.

( ३ ) धृतराष्ट्र म्हणाला—हे क्षत्त्या, पांडुपुत्र वनवासाला निघाले असतां नागरिक जन व इतर लोक काय म्हणाले, तें सर्व मला सविस्तर सांग.

विदुर म्हणाला—हे महाराज, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व इतरहि प्रजाजन काय बोलत आहेत, तें मी तुला सांगतों, ऐक. ते सर्व दुःखार्त झालेले नागरिक " हाय हाय, आमचे नाथ असलेले पांडव आम्हांला सोडून आज वनांत जात आहेत. अहो वीरहो, तुम्ही हा अन्याय कसा सहन करीत आहां. पांडवांचें राज्य व संपत्ति, यांच्या लोभानें जे त्यांना वनांत घालवून देत आहेत, त्या मूढांप्रमाणें वर्तन करणाऱ्या या कुरुवृद्धांना धिक्कार असो. पांडुपुत्रांवांचून

आम्ही सर्व अनाथ झालों आहों. या दुर्विनीत व लुब्ध कौरवांवर आमचें प्रेम कसें रहावें!"

राजा, दुःखानें अतिशय आर्त झालेले पौरजन असा वारंवार आक्रोश करीत होते. राजा, मानी कौंतेय अशा चर्या आणि हावभाव यांनीं आपल्या मनांतील निश्चय व्यक्त करीत वनांत निघून गेले.

हे धृतराष्ट्रा, ते नरश्रेष्ठ कुंतीपुत्र हस्तिनापुरांतून वनांत जावयास निघाले असतां, येथें काय काय दुश्चिन्हें झालीं तीं ऐक. आकाश निरभ्र असूनहि विजा चमकूं लागल्या, भूकंप झाले, ग्रहणाचा पर्वकाल नसतांहि राहूनें सूर्यमंडल ग्रासिलें. उल्का नगरीला उलटी प्रदक्षिणा घालून नष्ट झाली. कोल्हे, कावळे इत्यादि कच्चें मांस भक्षण करणारे प्राणी नगरींतील देवालयें, चैत्य, ओटे व तटांचीं उंच शिखरें यांवर बसून भयसूचक शब्द करूं लागले. हे राजा, पांडुपुत्र जेव्हां वनवासाला गेले तेव्हां भरतकुलाचा नाश दर्शविणारीं अशीं दुश्चिन्हें झालीं. या सर्वांला कारण तुझी ही हीन व सदोष राजनीतिच आहे.

( ४ ) राजा जनमेजया, धृतराष्ट्राच्या मंदिरांत बुद्धिमान् विदुराचा राजाशीं असा संवाद चालला असतां कौरवांच्या सभेंत महर्षींच्या समुदायानें परिवेष्टित झालेला देवर्षि नारद पुढें उभा राहून असें उग्र वचन बोलला—"आजपासून चौदाव्या वर्षी या दुर्योधनाच्या अपराधामुळें व भीमार्जुनांच्या सामर्थ्यानें सर्व कौरव नाश पावतील." हे भारता, असें बोलून तो अणिमादि-ऐश्वर्यानें युक्त असलेला सर्वलोकगामी श्रेष्ठ देवर्षि अंतरिक्षांत अंतर्धान पावला.

त्यानंतर दुर्योधन, कर्ण व सौबल शकुनि यांनीं द्रोणाचार्यांचा आश्रय करून त्यास सर्व राज्य अर्पण केलें. त्या वेळीं त्यानें परोत्कर्ष सहन न करणारा दुर्योधन, दुःशासन, कर्ण व इतर सर्व कौरव यांस अनुलक्षून असें भाषण केलें—

"हे कौरवहो, हे पांची पांडव देवांचे अवध्य पुत्र असल्यामुळें त्यांचा वध करण्यास कोणीहि समर्थ नाहीं, असें ब्राह्मणांचें वचन आहे. तथापि जे कोणी शरण येतील त्यांस यथाशक्ति साह्य करणें हें माझें कर्तव्य असल्यामुळें आपल्या राजसमूहासह भक्तीनें शरण आलेल्या या धार्तराष्ट्रांचा त्याग करण्यास मी समर्थ नाहीं. खरोखर दैवच बलवत्तर आहे. द्यूतांत पराजित झालेले पांडुपुत्र धर्मतः वनांत गेले आहेत. ते बारा वर्षें तेथें रहातील. ब्रह्मचर्याचरण करणारे ते क्रोध व द्वेष यांनीं युक्त होऊन तुमचा सूड उगविण्यास जेव्हां येतील, तेव्हां तुम्हांला अतिशय दुःख होईल.

हे राजा, मी मैत्रीसाठीं केलेल्या युद्धामध्यें द्रुपदराजाला त्याच्या समग्र राज्यापासून भ्रष्ट केलें व त्याला अर्धराज्यभाक् केलें. तेव्हां त्या मानी राजानें माझ्या वधासाठीं पुत्र उत्पन्न करण्याच्या इच्छेनें यज्ञ केला. याज व उपयाज या दोन महर्षींच्या तपानें अग्नीपासून त्याला 'धृष्टद्युम्न'-पुत्र प्राप्त झाला. तशीच वेदीच्या मध्यभागांतून ही दिव्य द्रौपदीहि उत्पन्न झाली. धृष्टद्युम्न हा पार्थाचा शालक असून तो पांडवांना अति प्रिय आहे. तोहि द्रुपदपुत्र पांडवांच्या हितामध्यें रत आहे. त्याच्यापासून मला मृत्यूचें भय आहे. अग्नीच्या ज्वालेप्रमाणें ज्याची अंगकांति आहे, असा तो देवानें दिलेला द्रुपदपुत्र सहज कवच व धनुष्यबाण यांनीं युक्त आहे. मी मर्त्य असल्यामुळें मला त्याच्यापासून फार मोठें भय आहे, शत्रुनाशक द्रुपद पांडवांच्या पक्षाला स्वभावतःच प्राप्त झाला आहे.

हे वीरहो, असंख्यात रथी व अतिरथी यांचा अग्रणी जो तरुण अर्जुन त्याच्याशीं जर माझा रणामध्यें समागम झाला, तर या भूलोकीं मला अधिक असह्य दुःख तें कोणतें ? तो महा धनुर्धर पार्थ मला माझ्या प्राणांहूनहि प्रिय आहे. राजा, 'धृष्टद्युम्न हा द्रोणाचा मृत्यु आहे' ही वार्ता सर्व जगभर प्रसिद्ध झालेली आहे. माझ्या वधासाठींच तो वीर उत्पन्न झाला असून त्याचा पराक्रमहि या लोकांत प्रख्यात आहे. यास्तव, हे राजा मी तुला जी हितबुद्धि सांगत आहें, ती ऐक.

पांडवांना वनांत घालविल्यानेंच तुझें परम कल्याण झालें आहे, असें तूं समजूं नको. खरोखर, तुला हा फारच उत्तम काल प्राप्त झाला आहे. यास्तव तुला जें ऐहिक किंवा पारलौकिक कल्याण साधावयाचें असेल तें सत्वर संपादन कर. पांडवांना वनवासासारख्या महद्दुःखांत टाकून तुला जें सुख झाल्यासारखें वाटत आहे तें हेमंतऋतूंतील तालवृक्षाच्या छायेप्रमाणें क्षणिक आहे, असें तूं निश्चयानें जाण आणि मोठमोठे यज्ञ कर, सुखोपभोग घे व विपुल दानें दे. आजपासून चौदाव्या वर्षी तुमचा भयंकर नाश होईल, हें लक्षांत ठेवा."

द्रोणाचें हें वचन ऐकून धृतराष्ट्र 'गुरूनें हें यथार्थ सांगितलें आहे' असें बोलून विदुरास म्हणाला—" हे विदुरा, पांडवांना सत्वर परत घेऊन ये. ते जर न येतील तर निदान शस्त्र, रथ इत्यादि सर्व सुखसाधनांनीं युक्त होऊन तरी ते वनांत जावोत. कारण ते तरी माझेच पुत्र आहेत." २. १०. ८०.

---

## अध्याय ८१ वा.

[ १ संजय व धृतराष्ट्र यांचा चिंतायुक्त संवाद. ]

(१) **वैशंपायन**—हे पारिक्षिता, पांडुपुत्रांचा द्यूतांत पराभव होऊन ते वनांत गेले असतां महाराज धृतराष्ट्राच्या मनांत फार मोठी चिंता उद्भवली. तेव्हां निःश्वास टाकीत चिंतातुर होऊन विचार करीत बसलेल्या त्या जनेश्वराला संजय बोलला—" हे वसुधाधिपा, तूं पांडवांचें राज्य हरण करून त्यांना वनवासाला पाठविलेंस व सर्व पृथ्वीचें राज्य प्राप्त करून घेतलेंस, मग आतां असा शोक कां करितोस ?"

**धृतराष्ट्र** म्हणाला—हे संजया, युद्धविशारद, महारथ व बलाढ्य पांडवांशीं ज्यांनीं वैर संपादन केलें आहे त्यांच्या मनाला समाधान कोठचें !

**संजय** म्हणाला—राजन्, हें महावैर उद्भवण्यास तुझेंच सुकृत कारणीभूत झालें आहे. त्याचें पर्यवसान सर्व राजवंशांचा नाश होण्यांत होईल. बाबारे, भीष्म, द्रोण व विदुर हे निवारण करीत असतांहि तुझ्या मंदबुद्धि निर्लज्ज दुर्योधन-पुत्रानें सूतपुत्र प्रातिकामीला पांडवांची प्रिय भार्या जी धर्मचारिणी द्रौपदी तिला सभेंत आणावयास पाठविलें. हे राजा[१], देव ज्या पुरुषाचा पराभव करूं इच्छितात त्याच्या बुद्धीचा भ्रंश ते अगोदर करितात व त्यामुळें तो पुरुष सर्वच विपरीत पाहूं लागतो. मनुष्याची[२] बुद्धि एकदा कलुषित झाली व त्याचा विनाश होण्याचा प्रसंग आला म्हणजे नीतीप्रमाणें भासणारी अनीति त्याच्या हृदयाला सोडीत नाहीं. त्याचा विनाश करण्यासाठीं अनर्थ अर्थरूपानें व अर्थ अनर्थरूपानें उपस्थित होतात आणि खरोखर ते त्यालाहि आवडतात.

राजन्, काल[३] दंड उचलून कोणाच्याही मस्तकावर प्रहार करीत नाहीं. तर पुरुषाची बुद्धि विपरीत करून त्याला विपरीत अर्थ भासविणें, एवढेंच कालाचें

---

१ यस्मै देवाः प्रयच्छन्ति पुरुषाय पराभवम् । बुद्धिं तस्यापकर्षंति सोवाचीनानि पश्यति ॥ २ बुद्धौ कलुषभूतायां विनाशे समुपस्थिते । अनयो नयसंकाशो हृदयान्नापसर्पति ॥ अनर्थाश्चार्थरूपेण अर्थाश्चानर्थरूपिणः । उत्तिष्ठंति विनाशाय नूनं तच्चास्य रोचते ॥ ३ न कालो दंडमुद्यम्य शिरः कृंतति कस्यचित् । कालस्य बलमेतावद्विपरीतार्थदर्शनम् ॥

बल आहे. तपस्विनी, अयोनिजा, रूपवती व अग्नीच्या कुलामध्यें झालेली जी पांचाली, तिला सभेमध्यें ओढून आणणाऱ्या तुझ्या पुत्रांनीं कालाच्या प्रेरणेनेंच हें घोर, निंद्य व रोमहर्षण कृत्य केलें आहे. कपटद्यूत खेळणाऱ्या तुझ्या हीनबुद्धि पुत्रांवांचून दुसरा कोणता बरें पुरुष त्या सर्वधर्मज्ञ यशस्विनी पांडवपत्नीला हातानें स्पर्श करून सभेमध्यें ओढून आणील !

ती श्रेष्ठ राजकन्या पांचाली स्त्रीधर्मिणी असतांना, तिचें अंग मलीन झालेलें असतांना व ती एकवस्त्रा असतांना तुझ्या पुत्रांनीं तिच्याशीं अतिप्रसंग केला. त्या साध्वीनें सभेमध्यें ज्यांचें धन, राज्य व वस्त्रें यांचा तुझ्या पुत्रांनीं अपहार केला आहे, ज्यांची मुखश्री म्लान झाली आहे, जे सर्व सुखसाधनरहित होऊन दासभावाला प्राप्त झाले आहेत व धर्मपाशांनीं जखडून टाकिल्यामुळें जे पराक्रम करण्यास असमर्थ झाले आहेत, अशा पांडवांस पाहिलें.

हे राजा, तुझा ज्येष्ठ पुत्र दुर्योधन व त्याचा जिवलग मित्र कर्ण यांनीं कुरुसभेमध्यें क्रुद्ध व दुःखी झालेल्या कृष्णेला उद्देशून सर्वथा अनुचित भाषण केलें. त्या पांडुस्नुषेला असे कटुशब्द ऐकविणें हा घोर अन्याय आहे, असें मला वाटतें. राजा, तुझ्या सभेमध्यें घडलेला हा सर्व प्रकार तुला केव्हांहि सुखावह होणार नाहीं.

**धृतराष्ट्र** म्हणाला—हे संजया, त्या साध्वी पांचालीच्या क्रूर दृष्टीनें ही पृथ्वीहि जळून जाईल, असें मला वाटतें. हे साधो, माझ्या पुत्रांतील एखादा पुत्र तरी आतां जिवंत राहील का ? या माझ्या निर्दय पुत्रांनीं जेव्हां धर्मिष्ठ, धर्मपत्नी व रूप-यौवनसंपन्न कृष्णेला सभेंत ओढून आणिलें, तेव्हां कौरवसभेंत विलाप करणाऱ्या तिला पाहून गांधारीसह भरतकुलांतील सर्व स्त्रियांहि हृदयद्रावक आक्रोश करूं लागल्या. सर्व प्रजांसह त्याहि प्रत्यहीं त्या कृत्याबद्दल शोक करीत आहेत.

संजया, द्रौपदीला अंतःपुरांतून ओढून आणल्यामुळें ब्राह्मण क्रुद्ध झाले व त्यामुळें ते सायंकाळीं अग्निहोत्राचें हवनहि करीनातसे झाले आहेत. त्या वेळीं झंझावात सुटला व विजेसारखा कडकडाट झाला. आकाशांतून पटापट उल्का पडल्या. पर्वकाल नसतांनाहि सूर्यग्रहण लागलें. त्यामुळें प्रजा भयभीत झाली. रथशालांमध्यें अग्नीचा भडका उठला. भरतकुलांतील वीरांचा नाश सुचविण्या-

साठीं रथांवरील ध्वज मोडून खालीं पडले. दुर्योधनाच्या अग्नीहोत्राजवळ भालू निर्भयपणें येऊन अशुभ ध्वनि करूं लागल्या व तो ऐकून गर्दभहि दाही दिशांमध्यें कर्णकटु शब्द करूं लागले.

हे संजया, द्रौपदीचा भरसभेंत झालेला अपमान पाहून द्रोणासह भीष्म, कृप, सोमदत्त व उदार बाल्हिक हे सर्व भारतांचे आधारस्तंभ सभेंतून निघून गेले. तेव्हां दीर्घदर्शी विदुरानें योग्य वेळीं प्रेरणा केल्यामुळें मीं 'कृष्णेला इष्ट वर देतों' असें म्हटलें. तेव्हां त्या साध्वीनें 'पांडवांना दास्यांतून मुक्त करा' असा वर मागितला. मींहि त्या माझ्या श्रेष्ठ स्नुषेला तो इष्ट वर देऊन वीर पांडवांना रथ व आयुधें यांसह खांडवप्रस्थास जाण्याची अनुज्ञा दिली.

तेव्हां सर्वधर्मज्ञ व महाप्राज्ञ विदुर म्हणाला—हे भरतवंशजांनो, ज्या अर्थीं पांडूची स्नुषा कृष्णा आज तुमच्या सभेंत आली, त्या अर्थीं तुमच्या कुलाचा आजच अंत झाला आहे, असें समजा. ही जी पांचाल राजाची कन्या पांचाली ती देवांची अनुत्तम श्री आहे. ( आदिपर्व अ. १९७ भा. २ पृ. ७८ ) देवांनींच दिल्यामुळें ती पांडवांना प्राप्त झाली आहे. असहिष्णु पांडव, महाधनुर्धर वृष्णि व महारथ पांचाल त्या कृष्णेच्या क्लेश कदापि सहन करणार नाहींत. सत्यप्रतिज्ञ वासुदेवानें ज्यांचें रक्षण केलें आहे असा कुंतीपुत्र अर्जुन पांचालांसह तुमच्या हस्तिनापुरावर चाल करून येईल. त्या सर्वांच्या मध्यभागीं महाबलाढ्य व महापराक्रमी भीमसेन असून तो यमाच्या दंडाप्रमाणें उग्र असलेली आपली गदा गरगर फिरवीत कौरवांवर धांवेल.

तो महाज्ञानी पुनः म्हणाला—हे भरतहो, बुद्धिमान् पार्थाच्या गांडीव धनुष्याचा टणत्कार ऐकून त्याचे सर्व शत्रु भयभीत होतील. भीमाच्या गदेचा वेग सहन करण्यास पृथ्वींतील एकहि राजा समर्थ नाहीं, याविषयीं माझी पूर्ण खात्री आहे. यास्तव पार्थाशीं तुमचें नित्य सख्य असावें. त्याच्याशीं तुमचा कलह न व्हावा, असेंच मला निःसंशय वाटतें. या कौरवांपेक्षां पांडव अधिक बलवान् आहेत, असेंच माझें निश्चित मत आहे. एवढा मोठा बलाढ्य व महा तेजस्वी जरासंधराजा, पण भीमानें द्वंद्वयुद्धांत त्याला केवल बाहु याच एका शस्त्रानें यमसदनीं पाठविलें. यास्तव हे धृतराष्ट्रा, मी तुला पुनः पुनः सांगतों. तुझें पांडवांशीं सख्यच असो. हे राजा, कौरव व पांडव या दोन्ही पक्षांस जें हितावह असेल, तेंच निःशंकपणें कर. हे महाराजा, असें केल्यानेंच तुझें परम कल्याण होईल.

हे गावल्गणपुत्रा संजया, माझ्या भ्रात्या विदुरानें मला असा धर्मार्थयुक्त उपदेश केला. पण, केवल पुत्रांच्या स्वार्थाची इच्छा करणाऱ्या मीं मूर्खानें त्याकडे लक्षहि दिलें नाहीं. २. १०. ८१.

दहावें अनुद्यूतपर्व समाप्त झालें.

---

येथें दुसरें सभापर्वहि संपलें. यापुढें तिसरें वनपर्व सुरू होईल. त्याचा हा आद्य श्लोक आहे—

जनमेजय उवाच—

एवं द्यूतजिताः पार्थाः कोपिताश्च दुरात्मभिः।
धार्तराष्ट्रैः सहामात्यैर्निकृत्या द्विजसत्तम ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु.



# श्रीमन्महाभारतार्थ

( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर )



## ३ वनपर्व.



## आरण्यकपर्व १.



### अध्याय १ ला.



**नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।**
**देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥**

[ १ युधिष्ठिरानें वनांत जातांना आलेल्या पौरजनांना सान्त्वनपूर्वक परतविणें.]

**( १ ) जनमेजय म्हणाला—हे द्विजवरा, कर्ण व शकुनि या अमात्यांसह दुरात्म्या धृतराष्ट्रपुत्रांनीं पूर्वोक्त प्रकारें पांडवांना कपट द्यूतांत जिंकून व कठोर शब्दांनीं कोपवून दाडवैर उत्पन्न केलें असतां त्या माझ्या प्रपितामहांनीं काय**

---

१. सभापर्वात भगवंताच्या द्रौपदीरक्षणानें भक्तीचें माहात्म्य प्रदर्शित केलें. आतां या पर्वात प्रतिज्ञेचें पालन, सत्समागम, तीर्थाटन, स्वधर्माचरण, इत्यादि उपायांनीं ईश्वरभक्ति लाभते, असें त्या त्या आख्यायिकांच्या द्वारा प्रतिपादन करून दुर्वासाच्या उपाख्यानानें भगवानाचें जगदंतरात्मत्व प्रदर्शित केलें आहे. शेवटीं यमधर्म व युधिष्ठिर यांच्या संवादानें उपायासह भगवत्तत्व संक्षेपानें सांगितलें आहे. त्यांतील या पहिल्या अध्यायांत सत्संगांतील गुण व असत्संगांतील दोष दाखवून त्या पुढील अध्यायांत शौनक व युधिष्ठिर यांच्या संवादानें काम्यधर्मांची निंदा व योगाची प्रशंसा केली आहे.

केलें? ते इंद्रतुल्य तेजस्वी पांडुनंदन ऐश्वर्यभ्रष्ट होऊन एकाएकीं दुःखाला प्राप्त झाले असतां, वनांत कसे राहिले? त्या भयंकर आपत्तींत त्यांना कोण अनुसरले? वनामध्यें बारा वर्षें त्या महात्म्यांचा आहार, विहार, आचार, विचार आणि निवास कशा प्रकारचा होता? सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेल्या, सत्यवादिनी, महा-पतिव्रता राजकन्या द्रौपदीनें वनवासांतील दारुण दुःखाचा काल कसा कंठिला? हे विप्रा, तूं सांगत असलेलें हें त्या पराक्रमी व तेजस्वी धर्मात्म्यांचें चरित्र सविस्तर ऐकण्याची मला अतिशय उत्सुकता वाटत आहे.

वैशंपायन—हे पांडवेया, याप्रमाणें अमात्यांसह त्या दुरात्म्या धृतराष्ट्र-पुत्रांनीं द्यूतांत जिंकून कोपविलेले ते पृथातनय हस्तिनापुरांतून निघाले आणि ते सर्वहि सशस्त्र वीर कृष्णेसह वर्धमानपुराकडील द्वारांतून बाहेर पडून उत्तर दिशेकडे वळले. त्यावेळीं त्यांचे इंद्रसेनादि पंधरा भृत्य स्त्रियांना बरोबर घेऊन शीघ्रगामी रथांतून त्यांच्या बरोबर निघाले. पांडवांना अशा प्रकारें हस्तिना-पुरांतून जातांना पाहून शोकाकुल झालेले प्रजाजन भीष्म, विदुर, द्रोण व कृप यांना दूषण देत आपसांत निर्भयपणें असें बोलूं लागले.

पौरजन म्हणाले—अहो, जेथें शकुनीनें वाढविलेला हा पापी दुर्योधन कर्ण व दुःशासन यांसह राज्य करूं इच्छीत आहे, तेथें आमचें कुल, आम्ही सर्व व आमचीं गृहें असणें योग्य नाहीं. कारण ज्या ठिकाणीं हा सदाचार व सुहृद् यांचा त्याग करणारा, धनलुब्ध, अभिमानी, निर्दय, नीचस्वभावाचा व व गुरुद्वेषी दुर्योधन या कर्णादि दुरात्म्यांच्या साह्यानें राज्य करण्याची इच्छा करीत आहे, तेथें कुल कोठलें व सदाचार कोठला आणि जेथें धर्म व अर्थ नाहीं तेथें सुख तरी कोठलें? जेथें दुर्योधन राज्य करील ती पृथ्वीच नष्ट होईल! यास्तव हे सज्जनहो, हे महात्मे पांडव जेथें जात आहेत तेथेंच आपणहि सर्व जाऊं या. हे पांडुपुत्र दयाळु व धर्मपरायण आहेत. ते कीर्तिमान् असून अकार्या-विषयीं लज्जा बाळगणारे आहेत. यम-नियमादि धर्मांनीं युक्त असलेले ते उदारचरित पृथापुत्र इंद्रियें व शत्रु यांस जिंकणारे आहेत. यास्तव आपण त्यांनाच अनुसरूं या.

राजा जनमेजया, आपसांत असें बोलून ते सर्व नागरिक पांडवांच्या मागो-माग गेले आणि हात जोडून त्या पांची भ्रात्यांना म्हणाले—"वीरहो, तुमचें कल्याण असो. आम्हां दुःखपीडितांना टाकून तुम्ही कोठें चाललां? तुम्ही जेथें

जाणार असाल, तेथें आम्ही सर्व तुमच्या मागोमाग येऊं. शत्रूंनीं तुम्हांला अधर्मानें निर्दयपणें जिंकल्याचें ऐकून आम्ही अतिशय खिन्न झालों आहों, यास्तव आमचा त्याग करून जाणें तुम्हांला योग्य नाहीं.

अहो महाराज, आम्ही आपणांवर प्रीति करणारे आपले भक्त आहों. सदैव अभ्युदय साधून पर हितामध्यें रत असलेले आम्ही आपले सुहृद् आहों. दुराचारी नृपालाच्या राज्यांत राहून आपला नाश करून घेण्याची आमची इच्छा नाहीं. हे पुरुषश्रेष्ठहो, शुभ आणि अशुभ पदार्थांच्या संसर्गानें गुण-दोष कसे उत्पन्न होतात तें सांगतों ऐका—

वस्त्र, जल, तिल व भूमि हीं जशीं सुवासिक पुष्पांच्या सांनिध्यानें सुगंधित होतात व दुर्गंधाच्या संसर्गानें दुर्गंधयुक्त होतात तसेच गुण-दोषहि संसर्गजन्य आहेत. मूढांचा[1] सहवास मोहजाल उत्पन्न करणारा असून प्रत्यहीं घडणारा सज्जनांचा समागम धर्माची उत्पत्ति करणारा आहे. यास्तव शमपरायण, ज्ञानी, वृद्ध, सुस्वभावी व तपोनिष्ठ सज्जनांशींच सहवास ठेवावा. ज्यांची वैदिकी विद्या, मातृ-पितृशुद्धि किंवा पूर्वप्रज्ञा व वेदविहित धर्माचें अनुष्ठान, हीं तिन्ही निर्दोष असतात त्यांचेंच सेवन करावें. त्यांची संगति शास्त्राहूनहि श्रेष्ठ आहे.

आम्ही मुमुक्षु असल्यामुळें अग्निहोत्रादि जरी करीत नाहीं व ज्ञाननिष्ठेचाच स्वीकार केला आहे, तरी पुण्यशील साधूंच्या सहवासांत राहिल्यानें आम्हांला पुण्यच लागेल आणि दुर्योधनासारख्या पापी पुरुषाच्या सहवासानें पाप लागेल. दुर्योधनादिकांसारख्या दुर्जनांच्या दर्शनानें, स्पर्शानें, संभाषणानें व सहवासानें धर्माचरणी मनुष्येंहि धर्मापासून च्युत होतील व त्यांना सिद्धि प्राप्त होणार नाहीं. नीच लोकांच्या सहवासांत बुद्धिभ्रंश होतो. मध्यमांच्या सहवासांत ती मध्यम होते आणि हीन नसलेल्या अपरिचित धार्मिक श्रेष्ठांच्या संगतींत मनुष्य उत्तम बुद्धीनें युक्त होतो.

वेदप्रामाण्यवादी जनांना संमत असलेले आणि धर्म, अर्थ व काम यांची उत्पत्ति करणारे जे गुण लोकांमध्यें प्रसिद्ध आहेत, ते सर्व तुम्हांमध्यें एकत्र स्थित आहेत. ते सर्व सद्गुण धर्मराजामध्यें समस्त आहेत व तुम्हां चौघां भ्रात्यांमध्येंहि व्यस्त म्ह० न्यूनाधिक प्रमाणांत आहेत. यास्तव स्वर्गाहूनहि प्रशस्य-

---

१ मोहजालस्य योनिर्हि मूढैरेव समागमः। अहन्यहनि धर्मस्य योनिः साधुसमागमः॥

तर असलेल्या आत्मसुखाची इच्छा करणारे आम्ही तुमच्याच सहवासांत रहाण्याची इच्छा करीत आहों."

राजा, सत्संगांतील गुण व असत्संगांतील दोष दर्शविणारें हें पौरजनाचें भाषण ऐकून युधिष्ठिर शत्रूलाहि सुख देण्याच्या इच्छेनें प्रजाजनांस परतविण्यासाठीं म्हणाला—" हे नागरिकहो, तुमचा आम्हांवरील अनुकंपायुक्त स्नेह पाहून 'आम्ही धन्य आहोंत' असें मी समजतों. तुम्ही सर्व ब्राह्मणादि प्रजाजन आमच्यामध्यें नसलेल्या गुणांचीहि प्रशंसा करीत अहांत. परंतु मी भ्रात्यांसह तुम्हां सर्वांस जी विनंति करीत आहें, तिचा तुम्ही आमच्यावरील प्रेमासाठीं तरी अनादर करूं नका. आमचा पितामह भीष्म, राजा धृतराष्ट्र, विदुर, आमची जननी कुंती आणि बहुतेक सर्व सुहृद् हस्तिनापुरांतच आहेत. ते सर्व तुम्हांसह शोकसंतापानें विह्वल झाले आहेत. आमच्या हितासाठीं तुम्ही त्यांचें मोठ्या यत्नानें पालन करा.

हे प्रजाजनहो, तुम्ही पुष्कळ दूरवर आलांत, आतां परत फिरा. तुम्हांला माझी शपथ आहे. हे सर्व स्वजन तुम्हांपाशीं माझी ठेवच आहे, असें समजून त्यांच्याविषयीं मनांत प्रेमभाव ठेवा. माझ्या अंतःकरणांत वसत असलेल्या कार्यांपैकीं हें एक श्रेष्ठ कार्य आहे, तेवढें केल्यानें मी संतुष्ट होईन आणि त्यांतच माझा सत्कारहि होईल."

वैशंपायन—राजा, युधिष्ठिरानें अशी प्रार्थना केली असतां ती सर्व प्रजा दुःखार्त स्वरानें 'हा राजन्' असा आक्रोश करीत व पांडुपुत्रांच्या गुणांचें वर्णन करीत, मनोरथ पूर्ण न झाल्यामुळें, अत्यंत व्याकुल होऊन व पांडवांचा निरोप घेऊन परत फिरली.

जनमेजया, 'या पापी धृतराष्ट्रपुत्रांना धिक्कार असो! खरोखर सज्जन धर्मात्म्यांवर अनुग्रह करीत असतात' इत्यादि बोलत पौरजन परत गेले असतां पांडुपुत्र रथारूढ होऊन जाह्नवीतीरावरील प्रमाणाख्य वटवृक्षापाशीं आले. सूर्यास्तसमयीं ते वीर त्या वटवृक्षाजवळ जाऊन पोंचले. त्या दुःखपीडित पांडवांनीं जाह्नवीच्या निर्मल जलाचें आचमन करून ती रात्र तेथेंच काढली. अन्नावांचून केवल जलप्राशन करून त्या रात्रीं ते भ्राते तेथेंच राहिले असतां कांहीं ब्राह्मण आपापल्या भार्यांना बरोबर घेऊन व कांहीं स्नातक आपले ब्रह्मचारी शिष्य व बंधुजन, यांसह स्नेहानें त्यांच्यापाशीं आले आणि अग्नि प्रज्व-

लित करून युधिष्ठिराच्या सभोंवार बसले. त्या वेदवेत्त्या ब्राह्मणांनीं परिवेष्टित झालेला तो राजा त्या वेळीं फार शोभला. तो प्रदोष काल दिवसाचा ताप निवृत्त झाल्यामुळें व संध्यारागादि शोभेमुळें रम्य व राक्षस-पिशाचादिकांच्या संचारामुळें दारुण दिसत होता. यास्तव त्या वेळीं अग्नि प्रज्वलित करून बसलेल्या त्या ब्राह्मणांचें वेदघोषपूर्वक उत्तम संभाषण सुरू झालें. त्या विद्वान् ब्राह्मणांनीं आपल्या मधुर वाणीनें 'वनवासहि श्रेयस्कर आहे' इत्यादि उपपादन करून राजा युधिष्ठिराचें रात्रभर सान्त्वन व रंजन केलें. ३. १. १.

---

## अध्याय २ रा.

[ १ शौनकाचा उपदेश. २ युधिष्ठिर-शौनकसंवाद. ]

(१) **वैशंपायन**—राजा जनमेजया, याप्रमाणें रात्र संपून अरुणोदय झाला असतां अनिंद्य कर्म करणारे पांडव वनांत जावयास निघाले. त्या वेळीं भिक्षेवर निर्वाह करणारे ते सर्व ब्राह्मण त्यांच्यापुढें जाऊन उभे राहिले. तेव्हां युधिष्ठिर त्यांस म्हणाला—"हे विप्रहो, शत्रूनें आमचें सर्वस्व हरण करून घेतलें आहे. राज्य आणि धनादि ऐश्वर्य यांनीं हीन झाल्यामुळें आमची ब्राह्मणतर्पणादिरूप शोभा नष्ट झाली आहे. दुःखित झालेले आम्ही फल, मूल व मांस यांवर उपजीविका करून काल कंठण्यासाठीं वनांत जात आहों. तें घोर वन अनेक दोषांनीं युक्त आहे. तें हिंस्र पशु व सर्पादि क्रूर प्राणी, यांनीं व्याप्त आहे. तेथें तुम्हांला अतिशय क्लेश होतील, असें मला वाटतें. ब्राह्मणांना क्लेश दिले असतां देवतांचाहि नाश होतो. मग माझ्यासारख्या मानवाविषयीं काय सांगावें! यास्तव हे ब्राह्मणश्रेष्ठहो, तुमच्या इच्छेस येईल तेथें तुम्ही परत जा."

**ब्राह्मण म्हणाले**—हे राजन्, तुम्ही जेथें जात असाल, तेथें तुमच्या मागोमाग येण्यास आम्ही उद्युक्त झालों आहों. आम्ही तुझे भक्त आहों, आणि भक्त जरी मूढ असला तरी सज्जन त्याचा त्याग करीत नाहींत, मग आमच्यासारख्या सद्धर्मदर्शी ब्राह्मणांचा त्याग तूं कसा करीत आहेस? हे धर्मराजा, देवताहि भक्तांवर व विशेषतः सदाचारावलंबी ब्राह्मणांवर अनुकंपा करीत असतात.

**युधिष्ठिर म्हणाला**—द्विजहो, माझीहि ब्राह्मणांवर परम भक्ति आहे. परंतु मी सर्वथा सहायहीन झाल्यामुळें मला अतिशय क्लेश होत आहेत. ज्यांनीं

तुम्हांला फल-मूल व मांस आणून दिलें असतें, ते माझे हे भ्राते द्रौपदीची सभेंतील मानखंडना व आमचा राज्यापहार, यांमुळें झालेल्या मनःसंतापानें अतिशय मोहित झाले आहेत. अशा स्थितींत त्या दुःखपीडित भ्रात्यांना क्लेश देणें मला योग्य वाटत नाहीं.

ब्राह्मण म्हणाले—हे महाराज, आमच्या पोषणाची तूं मनांत मुळींच चिंता करूं नको. आम्ही आमचें अन्न स्वतःच मिळवून आणूं व तुझ्या संनिध राहून इष्टचिंतन, जपादि, यांच्या योगानें तुझें अदृष्टद्वारा कल्याण करूं आणि रम्य कथांच्या द्वारा तुझें रंजनहि करीत तुझ्याजवळ राहूं.

युधिष्ठिर म्हणाला—हे विप्रहो, तुमच्या सहवासांत माझ्या चित्ताचें रंजन होईल, यांत मुळींच संशय नाहीं. परंतु तुम्हां सर्वांना स्वतः अन्न मिळवून त्यावर निर्वाह करीत असलेलें मीं कसें बरें पहावें ! माझ्या या हीनावस्थेला धिक्कार असो. अरे, अरे, तुमच्यासारख्या सत्पात्र ब्राह्मणांनीं मजवरील भक्तीमुळें असे क्लेश भोगावे ना ! धिक्कार असो, त्या पापी धार्तराष्ट्रांना !!

वैशंपायन—राजा, असें बोलून तो ज्येष्ठ पांडुपुत्र शोक करीत भूमीवर बसला. तेव्हां ब्राह्मणांचें पोषण करण्यास असमर्थ झाल्यामुळें खिन्न होऊन बसलेल्या त्या युधिष्ठिराचें सान्त्वन करण्यासाठीं अध्यात्मरत म्ह० सांख्ययोगशास्त्रांत निष्णात असलेला विद्वान् शौनक-मुनि असें शोक-मोहनिवर्तक वचन बोलला—

" हे धर्मराजा, मनस्तापादि हजारों शोकस्थानें व इष्टवियोग-अनिष्टसंयोग-मरणादि शेकडों भयस्थानें नित्य मूढांच्या मनांत प्रवेश करितात. पण ज्ञानी पुरुषाच्या मनांत त्यांना थारा मिळत नाहीं. युधिष्ठिरा, यावर तूं कदाचित् असें म्हणशील कीं, मी ब्राह्मणपोषणादि धर्म कार्य करण्यास असमर्थ झाल्यामुळें असा शोक करीत आहें, राज्यापासून च्युत झालों किंवा वनवास प्राप्त झाला म्हणून नव्हे, तर त्याचें उत्तर ऐक—यज्ञ-दानादि प्रवृत्तिरूप धर्म ज्ञानाच्या विरोधी आहे. तुझ्या सारखे बुद्धिमान् लोक पशुवधादि अनेक दोषयुक्त व श्रेयोमार्गाचा नाश करणाऱ्या मोक्षविरोधी कर्मांत आसक्त होत नाहींत. "

---

१ शोकस्थानसहस्राणि भयस्थानशतानि च । दिवसे दिवसे मूढमाविशंति न पण्डितम् ॥

याप्रमाणें कर्मनिष्ठेची निंदा करून ज्ञाननिष्ठेचें ग्रहण करविण्यासाठीं शौनक पुढें म्हणाला—हे राजन्, सर्व अश्रेयाचा नाश करणारी, श्रुति-स्मृतींना संमत असलेली व जिला 'अष्टांग बुद्धि' म्हणतात ती तुझ्या ठिकाणीं स्थित आहे. हे राजा, तुझ्या सारखे ज्ञानी धननाश होऊन अन्न-वस्त्रांचा अभाव झाला असतां, दुःसह शरीरव्याधि प्राप्त झाली असतां, किंवा भार्या, आप्तजन यांवर संकट ओढवलें असतां खिन्न होत नाहींत. ते तितिक्षेनें शारीर दुःखाचा व विवेकानें मानसिक दुःखाचा नाश करण्यास समर्थ असतात.

हे कौंतेया, पूर्वी महात्म्या जनकानें मनःस्थैर्य करणारे श्लोक गाईले आहेत, ते मी तुला सांगतों—"हें जगत् मानस व शारीर या दोन प्रकारच्या दुःखानें पीडित झालें आहे. त्याच्या शांतीचा उपाय मी संक्षेपानें व सविस्तर सांगतों, तो ऐक. व्याधि, अनिष्टप्राप्ति, श्रम आणि इष्ट वस्तूचा वियोग या चार कारणांनीं क्लेश होतात. यास्तव शरीराला व्याधि उत्पन्न होतांच औषधोपचारानें ती दूर करावी. मानसिक आधीचा तत्संबंधी विचार मनांत न आणण्यानें प्रतिकार करावा. मन दुसऱ्या कोणत्या तरी विषयांत गुंतविलें असतां आधि व व्याधि या दोहोंचेंहि विस्मरण होतें, हें प्रसिद्धच आहे. दूरदर्शी विद्वान् नेहमीं द्रव्य-लाभ, स्त्रीसमर्पणादि, प्रिय भाषण, इत्यादि उपायांनीं मानसिक तापाचें प्रश-मन करीत असतात. तप्त लोखंडाचा गोळा जलांत टाकिला असतां, तो जसा कुंभांतील जल तप्त करितो, त्याप्रमाणें मानसदुःखानेंच शरीराला ताप होतो. यास्तव जलानें जसें अग्नीला शांत करावें, तसें ज्ञानानें मानस संतापाचें उप-शमन करावें. कारण मानसदुःख दूर होतांच शारीर क्लेशहि नाहींसे होतात.

हे धर्मात्म्या कुंतीपुत्रा, मानसदुःखाचें मूळ स्नेह आहे. सर्व प्राणिमात्र स्नेहानें इष्ट वस्तूवर आसक्त होतात व दुःख भोगितात. स्नेहापासून दुःखें उत्पन्न होतात. भय, शोक, हर्ष व क्लेश हीं सर्व स्नेहापासूनच प्रवृत्त होतात. विषया-सक्तीपासून संकल्प व प्रीति यांचा उद्भव होतो. हीं दोन्ही जरी अश्रेयसकर

---

१ यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि हीं बुद्धीचीं अष्टांगें होत. श्रुति-स्मृतींनीं दृढ झालेली ही बुद्धि मूल-अज्ञानाचा नाश करिते. २ मनसो दुःखमूलं तु स्नेह इत्युपलभ्यते । स्नेहात्तु सज्जते जन्तुर्दुःख-योगमुपैति च ॥ स्नेहमूलानि दुःखानि स्नेहजानि भयानि च । शोकहर्षौ तथायासः सर्वं स्नेहात्प्रवर्तते ॥

आहेत, तरी त्यांतील संकल्प अधिक बलवान् आहे. वृक्षाच्या ढोलींतील अग्नि जसा त्या वृक्षाचा समूल नाश करितो तसा हा विषयासक्तिरूप दोष धर्म आणि अर्थ या दोहोंचा पूर्णपणें नाश करितो. विषयांचा वियोग झाला असतां त्याचा त्याग करणारा खरा त्यागी नसून विषयांचा संयोग झाला असतांहि जो त्यांत दोषदृष्टि ठेवितो, तोच वस्तुतः त्यागी, तोच विरक्त, निर्वैर व त्यामुळेंच सर्व प्रतिबंधशून्य होय. तस्मात् मित्र व धन यांची प्राप्ति झाली असतां त्यांवर स्नेह ठेवूं नये.

त्याचप्रमाणें भोग्य वस्तु अनित्य व असत्य आहेत, अशा ज्ञानानें लिंग शरीरापासून उत्पन्न झालेल्या स्नेहाचाहि नाश करावा. कमलपत्र जसें जलानें लिप्त होत नाहीं, तसें नित्यानित्यवस्तुविवेकानें युक्त, नित्यवस्तूच्या प्राप्तीसाठीं उद्युक्त, शास्त्रज्ञ व ध्यानानें शुद्धचित्त झालेले पुरुष कोठेंच स्नेहासक्त होत नाहींत.

परंतु हे अजातशत्रो, रम्य वस्तूंच्या दर्शनानें ज्यांचें चित्त प्रसन्न होतें, ते रागाभिभूत पुरुष त्या वस्तूच्या प्राप्तीची इच्छा करूं लागतात. इच्छेच्या अधीन होतांच कामनेपासून त्याविषयींची तृष्णा वाढते आणि ही तृष्णा पापिष्ठा, उद्वेग उत्पन्न करणारी, घोर व पापाचें निमित्त आहे, असें म्हटलें आहे. दुर्बुद्धि मनुष्याला हिचा त्याग करितां येणें कठिण आहे. मनुष्य जरी जरा-मृत्यूनें ग्रस्त झाला तरी ही तृष्णा कधींहि क्षीण होत नाहीं. ती 'अनाद्यंता'—आदि-अंत-शून्य आहे. ती एक प्राणांतिक व्याधिच आहे. जो कोणी या तृष्णेचा त्याग करितो, तोच सुखी होतो. काष्ठांतील अव्यक्त अग्नि जसा काष्ठालाच दग्ध करितो, तशी ही मूलवासनेच्या अनादित्वामुळें आद्यंतशून्य असलेली तृष्णा मनुष्यांच्या अंतःकरणांत राहून त्यांच्या शरीराचा दाह करिते.

हे प्रभो युधिष्ठिरा, तृष्णेप्रमाणेंच लोभहि विनाश करणारा आहे. इंधन जसें स्वतःपासून उत्पन्न झालेल्या अग्नीनेंच नाश पावतें, तसा मनोनिग्रह न करणारा मनुष्य स्वाभाविक लोभामुळें स्वतःचाच नाश करून घेतो. [१]प्रत्येक प्राण्याला मृत्यूची जशी भीति असते, तसें धनिकाला राजा, चोर, जल, अग्नि व स्वजन

---

१ राजतः सलिलादग्नेश्चोरतः स्वजनादपि । भयमर्थवतां नित्यं मृत्योः प्राणभृतामिव ॥

यांपासून भय असतें. [1]ज्याप्रमाणें पक्षी आकाशांत, श्वापदें भूमीवर व मासे जलांत आमिषाचे लचके तोडतात, त्याप्रमाणें धनवानाला प्राणी सर्वत्र पीडतात.

कांहीं मूढबुद्धि लोकांना द्रव्यच अनर्थांत टाकितें. धनवान् ज्योतिष्टोमादि द्रव्यवृद्धि करणारे यज्ञ-याग करण्यांत आसक्त झाला म्हणजे तो मोक्षप्राप्तीच्या आत्यंतिक श्रेयाला मुकतो. तस्मात् अर्थप्राप्तीचीं सर्व साधनें मनाचा मोह वाढविणारीं आहेत.

मनुष्यांना द्रव्याचा व्यय झाला असतां कार्पण्य दोषामुळें खेद होतो, द्रव्य-मदामुळें दुसऱ्याचा पराभव करण्याची इच्छा होते, मीच श्रेष्ठ असा गर्व उत्पन्न होतो, धनाचा नाश होण्याचें भय वाटतें व त्यामुळें मनाला उद्वेग होतो. प्राण्याला हीं सर्व दुःखें द्रव्यामुळें भोगावीं लागतात, हें ज्ञानी लोक जाणतात.

हे पृथापुत्रा, द्रव्याचें संपादन, त्याचें रक्षण व त्याचा व्यय हीं तिन्ही अतिशय कष्टकर आहेत. द्रव्यासाठीं मनुष्यें परस्परांचा वधहि करितात. धनाचा त्याग करणें अतिशय दुःखकर वाटतें. त्याचें रक्षण केलें असतां तें शत्रुच बनतें आणि तें संपादन करणें तर अतिशय कष्टकर आहे. तस्मात् द्रव्यार्जनादि दुःखाचा विचारहि मनांत आणूं नये. [2]मूढ नेहमीं असंतुष्ट असतात, पण ज्ञानी सर्वदा समाधानानें राहतात. [3]तृष्णेचा कधीं नाशच होत नाहीं. संतोष हेंच परम सुख आहे. यास्तव विद्वान् लोक ‘ संतोषच श्रेष्ठ आहे ’ असें मानितात.

राजन्, तारुण्य, रूप, जीवित, रत्नसंचय, ऐश्वर्य, प्रियजनांचा सहवास हें सर्व अनित्य आहे. यास्तव विवेकी पुरुषानें त्यांतील कशाचीच इच्छा करूं नये. सर्व संचयांचा त्याग करावा व त्यांचा त्याग केल्यामुळें होणारे क्लेश सहन करावे. [4]संचय करणारा कोणीहि प्राणी उपद्रवरहित दिसत नाहीं. उलट त्याला अहर्निश कांहीं ना कांहीं तरी उपद्रव होतच असतो. म्हणूनच धार्मिक पुरुष याचनेवांचून म्ह० यदृच्छेनें प्राप्त झालेल्या अर्थांची प्रशंसा करितात. धर्मासाठीं ज्याला वित्ताची इच्छा असते, त्याची निरिच्छताच प्रशस्त होय.

---

१ यथा ह्यामिषमाकाशे पक्षिभिः श्वापदैर्भुवि । भक्ष्यते सलिले मत्स्यैस्तथा सर्वत्र वित्तवान् ॥ २ असन्तोषपरा मूढाः संतोषं यान्ति पण्डिताः ॥ ३ अन्तो नास्ति पिपासायाः संतोषः परमं सुखम् ॥ ४ नहि संचयवान्कश्चिद्दृश्यते निरुपद्रवः ॥

म्ह० धर्माचरण करण्यासाठीं द्रव्यार्जनाचे कष्ट सोसण्यापेक्षां धनसाध्य धर्माची इच्छा सोडून त्याहूनहि श्रेष्ठ असलेल्या शम-दमादिकांचें आचरण करणेंच अधिक श्रेयस्कर होय. कारण अंगाला चिखल लावून नंतर तो धुवीत बसण्यापेक्षां मनुष्यानें त्याला स्पर्शच न करणें उत्तम !" हे युधिष्ठिरा, जनकाच्या या उपदेशाप्रमाणें तूं पूर्वोक्त कोणत्याहि विषयाची स्पृहा करूं नको. तुला केवळ धर्माचीच इच्छा असेल तर तूं धनाची इच्छा सोडून दे.

( २ ) शौनकाचें हें उपदेशवचन ऐकून युधिष्ठिर म्हणाला—हे भगवन्, मी विषयोपभोगासाठीं धनाची इच्छा करीत नाहीं, तर ब्राह्मणांचें भरण-पोषण करण्यासाठीं करीत आहें, लोभानें नव्हे. हे ब्रह्मन्, गृहस्थाश्रमामध्यें रहाणाऱ्या माझ्यासारख्या कुरुकुलोत्पन्न क्षत्रियानें आपल्या अनुयायी ब्राह्मणादिकांचें पालन-पोषण कसें बरें न करावें ! गृहस्थानें स्वतः पाक न करणाऱ्या ब्रह्मचारी, यति इत्यादि आश्रम्यांना अन्न द्यावें. प्रत्यहीं पंचमहा यज्ञांमध्यें देव, पितर, मनुष्य व भूतें यांना त्यांचा भाग द्यावा, असा शास्त्रविधि आहे व सद्गृहस्थ तसें आचरण करीत असलेलेहि दिसतात. सद्गृहस्थांच्या घरीं कोणी आल्यास दुसरें कांहीं नसलें तरी बसण्यासाठीं तृणासन, रहाण्यासाठीं भूमि, पाद्यादि उदक व चवथी सत्य व प्रिय वाणी, या चार गोष्टींची तरी कधीं न्यूनता भासत नाहीं. व्याधीनें आर्त झालेल्या अतिथीला शयन, चालून श्रांत झालेल्या अतिथीला तृणासन, तृषिताला जल व क्षुधिताला भोजन द्यावें. सद्गृहस्थाच्या घरीं कोणी आल्यास त्यानें त्याच्याकडे आदरानें पहावें, त्याच्या भाषणाकडे लक्ष्य द्यावें, त्याच्याशीं मधुर भाषण करावें, स्वस्थानावरून उठून त्याचें स्वागत करावें व त्याला आसन द्यावें, हा सनातन धर्म आहे.

आपल्याकडे एखादा श्रेष्ठ अतिथि आल्यास गृहस्थानें आसनावरून उठून त्याच्या सन्मुख जावें व त्याच्या वर्णाश्रमानुसार त्याचें पूजन करावें. अग्निहोत्र, वृषभ, आपल्या ज्ञातीचे लोक, अतिथि, आप्तजन, पुत्र, स्त्री व भृत्य यांचा यथायोग्य सत्कार न केल्यास त्यांचा असंतोष गृहस्थाला दग्ध करितो. गृहस्थानें स्वतःच्याच उदरभरणासाठीं अन्न शिजवूं नये. श्राद्ध व यज्ञ यांवांचून पशूचा घात करवूं नये. जें अन्न देव, पितर व मनुष्य यांना दिलेलें नाहीं, तें त्यानें स्वतः भक्षण करूं नये. श्वान, चांडाल व वायस यांच्यासाठीं भूमीवर अन्नाचा भाग ठेवावा. यालाच 'वैश्वदेव' म्हणतात. कारण यामध्यें 'सर्व जातीचे प्राणी' याच देवतेला उद्देशून अन्नसमर्पण केलें जातें. हें 'वैश्वदेव'-कर्म प्रातःकालीं

व सायंकालींहि विहित आहे. याच्या योगानें गृहस्थ विघसाशी व नित्य अमृतभोजन करणारा होतो. अतिथिप्रभृति श्रेष्ठांनीं खाऊन राहिलेल्या अन्नाला 'विघस' म्हणतात व देव-पितरादि यज्ञांतून अवशिष्ट राहिलेल्या अन्नाला 'अमृत' म्हणतात. म्हणून प्रत्यहीं पंचमहायज्ञ करणारा गृहस्थ 'विघस' व 'अमृत' भक्षण करणारा होय.

योग्यवेळीं आलेल्या अतिथीचा पूर्वोक्तप्रकारें सत्कार करून त्याची उपासना करणें हा पंचदक्षिण यज्ञच होय. अपरिचित व श्रान्त मार्गस्थ अतिथीला कार्पण्य सोडून संतोषानें अन्नादि अर्पण करणाऱ्या गृहस्थाला फार मोठें पुण्यफल लाधतें. हे विप्रा, गृहस्थाश्रमामध्यें रहाणारा जो पुरुष असें सदाचरण करितो, त्याला परमधर्म प्राप्त होतो, असें मनुप्रभृति धर्मशास्त्रकार सांगतात. याविषयीं आपलें काय मत आहे ?

शौनक—अरे, अरे ! हें जगत् सर्वथा विपरीत आहे. कारण साधु 'निर्लज्ज' या निंदेला प्राप्त होतो व त्यामुळें असाधु संतुष्ट होतो. अति मूढ पुरुष मोह व राग यांनीं व्याप्त होऊन विषयाधीन बनतो आणि स्त्रीसुख व जिह्वा यांच्या तृप्तीसाठीं विपुल पाप जोडितो. दिव्यांगना, दिव्य रूप इत्यादिकांच्या भोगेच्छेनें देवादिकांनीं उपभोग घेऊन अवशिष्ट राहिलेल्या विषयांत लोलुप होतो. विषयांतील दोष जाणत असूनहि पुरुष हरणशील इंद्रियांकडून मूढ बनविला जातो. जसे अशिक्षित अश्व क्षुब्ध होऊन सारथ्याला अनर्थांत पाडितात, त्याप्रमाणें आत्मस्वरूपज्ञानाच्या अभावीं वर्णाश्रमाभिमानानें यज्ञादिकांचें अनुष्ठान करणाऱ्या पुरुषांपुढें त्यांच्या कर्माचें फल, या स्वरूपानें उपस्थित झालेल्या विषयांमध्यें विषयासक्त पुरुषाचीं इंद्रियें त्याला निमग्न करितात.

हे राजा, ज्या वेळीं हें सत्त्वगुणकार्य अंतःकरण दीपप्रभेप्रमाणें नेत्रादिकांच्या द्वारा शब्दादि-विषयांकडे जाऊन व त्याला आच्छादित करणाऱ्या अज्ञानाची निवृत्ति करून त्या विषयाला प्रकाशित करितें, तेव्हां त्या विषयज्ञ पुरुषाचें मन आविर्भूत होतें. म्हणजे हा विषय त्याज्य आहे, ग्राह्य आहे कीं उपेक्ष्य आहे, असा विचार करूं लागतें, त्यामुळें तें पुष्ट होतें आणि पूर्व संस्काराप्रमाणें त्याज्य विषयालाहि ग्राह्य व ग्राह्य वस्तूलाहि त्याज्य मानूं लागतें. पूर्व संस्कार हितावह असल्यास तें त्याज्याला त्याज्य व ग्राह्याला ग्राह्यहि मानितें. हाच मनःप्रादुर्भाव होय. तो झाला असतां ज्या पुरुषाचें मन शब्दादि विषयांचें सेवन

करण्यासाठीं त्या त्या विषयांत आसक्त होतें, त्याची विषयभोगेच्छा अतिशय वाढते. ती इतकी उत्कट असते, कीं त्याला विलंब सहन होत नाहीं. त्यानंतर त्याची त्या विषयांत प्रवृत्ति होते. विषयामध्यें प्रवृत्त झालेल्या पुरुषाला संकल्प-जन्य काम विषयशरांनीं विद्ध करितो आणि शेवटीं एखादा पतंग तेजाच्या लोभानें अग्नींत जसा पडतो, त्याप्रमाणें हा मदनशरांनीं विद्ध झालेला पुरुष लोभाग्नींत पडतो.

हे राजन्, याप्रमाणें विषयलोलुप झालेला मूढ पुरुष यथेष्ट आहार व विहार करूं लागतो आणि शेवटीं गाढ अज्ञानदुःखांत मग्न होतो. पण आपण अशा महादुःखांत निमग्न झालों आहों याचें त्याला भानहि रहात नाहीं. अशा रीतीनें अविद्या, कर्म व तृष्णा यांच्याकडून एखाद्या चक्राप्रमाणें भ्रमण करविला जाणारा पुरुष या संसारांतील भिन्न भिन्न योनींमध्यें पडतो. तो आब्रह्मस्तंबपर्यंत भूतांतील एखाद्या योनीमध्यें जल, भूमि व आकाश या तीन स्थानीं पुनः पुनः उत्पन्न होऊन नाश पावतो. आत्म्याच्या अज्ञानानें त्याचा स्वरूपभूत आनंद आच्छादित होतो. त्यामुळें हा जीव क्षुद्र विषयानंदाच्या प्राप्तीसाठीं कर्म करितो. पण त्या कर्मांचें फल भोगून त्याची तृप्ति होत नाहीं, उलट त्याची तृष्णा उत्तरोत्तर वाढतच जाते.

हे नृपाला, विघसाशन व अमृतभोजन हाच परम धर्म आहे, असें मानणाऱ्या अनात्मज्ञ गृहस्थांच्या कर्मनिष्ठेचें फल मीं तुला सांगितलें. आतां निःश्रेयसकर धर्मामध्यें व तत्फलभूत मोक्षामध्यें आसक्त असलेल्या विवेकी लोकांची गति मी तुला सांगतों, ती ऐक. कारण प्रवृत्तिधर्म श्रेयस्कर आहे त्यामुळें तो प्रशस्य आहे. पण निवृत्तिधर्म प्रशस्यतर आहे.

युधिष्ठिरा, 'पुरुषानें कर्में करीतच शंभर वर्षें जिवंत रहाण्याची इच्छा करावी' (इशोपनिषद् २.) व 'त्यागी पुरुषालाच त्याचें प्रत्यक्स्वरूप ज्ञात होतें' अशा दोन प्रकारच्या श्रुति आहेत. जे अभिमानानें कर्म करितात, ते पूर्वोक्त प्रकारें अंधतमामध्यें प्रवेश करितात व जे शुद्ध संन्यासी असतात ते कृतकृत्य होतात. पण तूं या दोन मार्गांच्या मध्यभागीं आहेस. यास्तव तुझ्यासारख्या मध्यमाधिकाऱ्यानें हे पुढील धर्म निरभिमानानें आचरावे. यज्ञ, अध्ययन, दान, तप, सत्य, क्षमा, दम व अलोभ हा धर्माचा अष्टविधमार्ग स्मृत आहे. त्यांतील पहिला चतुर्वर्ग पुनर्जन्म हें फल देणाऱ्या पितृयाण किंवा

धूमादिमार्गांमध्यें स्थित आहे. यास्तव नित्य-अग्निहोत्र, संध्योपासना इत्यादि आपलें नित्यकार्य अभिमानाचा त्याग करून आचरावें. पूर्वोक्त अष्टविध धर्मांतील सत्य, दम, क्षमा व अलोभ हा उत्तर चतुर्वर्ग देवयान किंवा अर्चिरादि मार्गांमध्यें स्थित आहे. तो अनावृत्ति किंवा ब्रह्मलोकप्राप्ति हें फल देतो. विवेकी लोक सर्वदा याचेंच आचरण करितात.

हे पांडुपुत्रा, संकल्पाचा निरोध म्हणजेच अंतरिंद्रियनिग्रहरूप शम, बाह्येंद्रियनिग्रहरूप दम, सर्वदा व सर्वत्र सर्वप्रकारच्या हिंसेचा त्याग करणें हाच व्रतविशेष, यथाशास्त्र गुरुसेवा, हित, मित व पवित्र आहार, यथाविधि अध्ययन, यथाविधि कर्मांचा त्याग व सम्यक् चित्तनिरोध या अष्टांग मार्गांनें शुद्धचित्त पुरुषानें निवृत्तधर्मांचें आचरण करावें.

संसाराला जिंकण्याची इच्छा करणारे राग-द्वेषशून्य पुरुष अशा प्रकारेंच कर्मानुष्ठान करितात व त्यामुळें त्यांना देवतांचें ऐश्वर्य प्राप्त होतें. रुद्र, साध्य, आदित्य, वसु व अश्विनिकुमार योगैश्वर्यानें युक्त होऊनच या सर्व प्रजांचें धारण करितात. त्याचप्रमाणें हे कौंतेया, तूंहि अढळ शमाचा आश्रय करून तपानें व योगानें उत्तम सिद्धि मिळीव. कारण हे राजा, यज्ञ, युद्ध इत्यादि कर्मरूप साधनप्रधान सिद्धि आणि परलोक व इहलोक यांतील फलप्रधान सिद्धि तुला प्राप्त झालीच आहे. यास्तव तूं आतां ब्राह्मणांच्या पोषणासाठीं देवताध्यान, जप इत्यादि तपानें सिद्धि मिळीव. तपाच्या अनुग्रहानें सिद्ध झालेले पुरुष जें जें इच्छितात, तें तें करूं शकतात. यास्तव तूं तपाचा आश्रय करून आपला मनोरथ पूर्ण करून घे. ३. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १ युधिष्ठिराच्या प्रार्थनेवरून धौम्याचें सूर्याच्या एकशें एक नांवांचें कथन. २ युधिष्ठिराची सूर्यस्तुति. ३ प्रसन्न झालेल्या सूर्याचें पात्रसमर्पण व धौम्य-ऋषीचें पादवंदन. ४ ब्राह्मणांसह पांडवांचें काम्यकवनांत गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, शौनकाचें हें वचन ऐकून युधिष्ठिर आपल्या पुरोहित धौम्यमुनीपाशीं येऊन भ्रात्यांसमक्ष त्याला म्हणाला—" भगवन्, हे सर्व वेदवेत्ते ब्राह्मण वनांत जाणाऱ्या माझ्या मागोमाग येण्यास

निघाले आहेत. परंतु मला त्यांचें पोषण करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें अतिशय दुःख वाटत आहे. मी त्यांचा त्याग करण्यास समर्थ नाहीं व त्यांना दानादि देण्याचीहि मला शक्ति नाहीं. यास्तव या प्रसंगीं मीं काय करावें, तें मला सांग."

हे राजन्, धर्मात्मा कुंतीपुत्र असें बोलला असतां तो धर्मिष्ठांतील श्रेष्ठ धौम्य क्षणभर स्थिर चित्तानें विचार करून युधिष्ठिराला म्हणाला—" हे धर्मराजा, पूर्वीं जेव्हां सर्व प्राणिमात्र उत्पन्न झाले, तेव्हां ते क्षुधेनें अतिशय पीडित झाले. त्या वेळीं सर्वांच्या पितृस्थानीं असलेला सूर्य त्यांच्यावरील अनुकंपेनें उत्तरायणांत गेला व आपल्या किरणांनीं तेथील जल आकर्षण करून दक्षिणायनांत परत आला आणि त्यानें पृथ्वीवर जलाची वृष्टि केली; तेव्हां ओषधिपति चंद्रानें अंतरिक्षांत मेघाकारानें स्थित असलेलें तें जल भूमीवर येतांच त्यापासून विविध वनस्पति उत्पन्न केल्या. याप्रमाणें बीज स्वक्षेत्रांमध्यें अंकुरादिरूपानें परिणत झालें असतां रविच ओषधिरूप होतो. त्या ओषधींपासून प्राण्यांना भक्षणीय असलेलें धान्य उत्पन्न होतें. तें जल व ऊष्मा यांच्या संयोगानें पुनः अंकुरादिक्रमानें धान्याचें कारण होतें. यास्तव अन्नाचें मूळ कारण असलेला सूर्यच अन्न आहे. अन्नानेंच भूतांचें प्राणधारण होतें. यास्तव सूर्य सर्व भूतांचा पिता असून चंद्र सर्व अन्नाचें कारण आहे. त्यांच्या किरणांचा परस्पर संयोग झाल्यामुळें सर्व औषधींची उत्पत्ति होते. तस्मात् हे राजा, तूं सूर्याला शरण जा. कुल व कर्म यांनीं शुद्ध असलेले अनेक महात्मे राजे विपुल तप करून प्रजेचा उद्धार करितात. भीम, कार्त्तवीर्य, वैन्य, नहुष, इत्यादि नृपश्रेष्ठांनीं व्रतपूर्वक ध्याननिष्ठ होऊन आपल्या प्रजेवरील आपत्ति दूर केली. हे धर्मात्म्या, तूंहि कर्मानें अति शुद्ध झालेला आहेस. यास्तव ध्यानानें तप करून या ब्राह्मणांचें पोषण कर.

**जनमेजय**—हे विप्रश्रेष्ठा, कुरुसत्तम युधिष्ठिर-राजानें ब्राह्मणांसाठीं अद्भुतदर्शन सूर्याची प्रार्थना कशी केली तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. तो समग्र वृत्तान्त मला सांग.

**वैशंपायन**—हे पांडवेया, शुचिर्भूत व क्षणभर समाहितचित्त होऊन तूं लक्षपूर्वक ऐक. मी तुला तोच वृत्तान्त सविस्तर सांगतों. हे महामते, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें धौम्यानें महात्म्या पार्थाला सूर्याचीं जीं एकशें आठ नांवें सांगितलीं, तीं ऐक.

धौम्य म्हणाला—हे युधिष्ठिरा, या एकशें आठ नांवांनीं सूर्योपाधिक ब्रह्माची सर्वकर्तृत्व, सर्वज्ञत्व, सर्वात्मत्व इत्यादि धर्मांनीं स्तुति केली जाते तीं नांवें अशीं—तो प्रकाश उत्पन्न करीत असल्यामुळें १ सूर्य, गतिमान् असल्यामुळें २ अर्यमा, सर्वैश्वर्यसंपन्नत्वामुळें ३ भग, विश्वाच्या शिल्पकारत्वामुळें ४ त्वष्टा, पोषक असल्यामुळें ५ पूषा, अर्चनीयत्वामुळें ६ अर्क, जगताची उत्पत्ति करीत असल्यामुळें ७ सविता, वेदमय असल्यामुळें ८ रवि, सहस्र किरणांनीं युक्त असल्यामुळें ९ गभस्तिमान्, अनादित्वामुळें १० अज, मुहूर्तादिकांच्या प्रवर्तकत्वामुळें ११ काल, प्राणहरणकर्ता असल्यामुळें १२ मृत्यु, जगत्कर्ता असल्यामुळें १३ धाता, दीप्ति देणारा असल्यामुळें १४ प्रभाकर, प्रपंचाच्या सर्वात्मत्वामुळें १५ पृथ्वी, १६ आप, १७ तेज, १८ खं–आकाश, १९ वायु, २० मूलकारणत्वामुळें परायण, २१ सोम, २२ बृहस्पति, २३ शुक्र, २४ बुध, २५ मंगळ, २६ इंद्र, २७ विवस्वान्, २८ दीप्तांशु, २९ अग्नि, ३० कृष्ण, ३१ शनि, ३२ ब्रह्मा, ३३ विष्णु, ३४ रुद्र, ३५ स्कंद, ३६ वरुण, ३७ यम, ३८ वैद्युत, ३९ जाठर, ४० ऐंधनाग्नि, ४१ तेजांचा पति–आदित्य, ४२ धर्मप्रधान, ४३ वेदकर्ता, वेदत्रयीरूपत्वामुळें ४४ वेदशरीर, ४५ वेदवाहन, ४६ कृत, ४७ त्रेता, ४८ द्वापर, सर्व मलाचा आश्रयभूत ४९ कलि, ५० कला, ५१ काष्ठा, ५२ मुहूर्त, ५३ क्षमा, ५४ याम, ५५ क्षण, जो अश्वत्थ नांवाचा संसारवृक्ष तोच ५६ संवत्सरकर, (कारण काल या नांवाचा कोणी स्वतंत्र पदार्थ नाहीं. तर कालोपाधिभूत द्रव्यच स्वतःच्या भूत-भविष्यत्वादि व्यवहाराचें निमित्त आहे.) कालप्रवर्तक जो विभावसु तोच ५७ कालचक्र विभावसु, कर्मेंद्रियपंचक, ज्ञानेंद्रियपंचक, अंतःकरणचतुष्टय, प्राणादिपंचक, भूतपंचक, अविद्या, काम व कर्म या नांवांच्या आठ पुरींमध्यें रहातो तो जीवरूप ५८ पुरुष, तोच आद्यंतशून्य ५९ शाश्वत, ज्ञानकर्माधिकारी ६० योगी, कार्यकारणात्मक ६१ व्यक्ताव्यक्त, निरुपाधि ६२ सनातन, ६३ कालाध्यक्ष, ६४ प्रजाध्यक्ष, ६५ विश्वकर्मा, अज्ञानाचा नाश करून मोक्ष देणारा म्हणून ६६ तमोनुद्, ६७ वरुण, ६८ सागर, कर्मफलांचा विभाग करितो म्हणून ६९ अंश, ७० जीमूत, जलाप्रमाणें जीवनाचें कारण असल्यामुळें ७१ जीवन, ७२ अरिहा, ७३ भूताश्रय, ७४ भूतपति, ७५ सर्वलोकनमस्कृत, ७६ स्रष्टा, प्रलयकालीन अग्नि ७७ संवर्तक, सर्वांचें कारण म्हणून ७८ सर्वांचा आदि, ७९

अलोलुप, ८० अनन्त, ८१ कपिल, ८२ भानु, ८३ कामद, ८४ सर्वतोमुख, ८५ जय, ८६ विशाल, ८७ वरद, शरीरांतील त्वगादि सर्व धातूंना रसानें परिपुष्ट करणारा म्हणून ८८ निषेचिता, मनोरूपी ८९ सुपर्ण, अहंकाराख्य ९० भूतादि, ९१ शीघ्रग, ९२ प्राणधारक, ९३ धन्वन्तरि, ९४ धूमकेतु, विष्णुसंज्ञक अदितीचा पुत्र म्हणून ९५ आदिदेव, ९६ द्वादशात्मा, ९७ अरविंदाक्ष, द्यावा-पृथ्वींचा पिता हिरण्यगर्भ, त्याचाहि पिता म्हणून ९८ पिता, माता, पितामह, ब्रह्मलोकाच्या प्राप्तीचें द्वार म्हणून ९९ स्वर्गद्वार, तेंच प्रजाद्वार, म्हणजे क्रमानें इहलोक व परलोक यांची प्राप्ति करून देणारे, क्रममुक्तीचें स्थान असलेली स्वर्गभूमि म्हणून १०० मोक्षद्वार त्रिविष्टप, १०१ देहकर्ता, १०२ प्रशान्तात्मा, १०३ विश्वात्मा, १०४ विश्वतोमुख, १०५ चराचरात्मा, १०६ सूक्ष्मात्मा, सर्व भूतांस अभय देणारांचें हित करणारे म्हणून १०७ मैत्रेय, पतित, व्रात्य इत्यादिकांचाहि त्राता म्हणून १०८ करुणान्वित.

राजा युधिष्ठिरा, याप्रमाणें कीर्तनीय व अमित तेजस्वी सूर्याचीं हीं एकशें आठ नांवें ब्रह्मदेवानें सांगितलीं आहेत. 'देवगण, पितर व यक्ष यांच्याकडून सेवा केला गेलेल्या; असुर, निशाचर व सिद्ध यांनीं वंदन केलेल्या आणि उत्तम सुवर्णासारखी किंवा अग्नीसारखी कांति असलेल्या या भास्कराला मी माझ्या कल्याणासाठीं प्रणिपात करितों,' असें म्हणून जो पुरुष सूर्योदयाच्या वेळीं एकाग्र मनानें या स्तोत्राचें पठण करितो त्याला स्त्री, पुत्र, धन, रत्नसंचय इत्यादिकांचा लाभ होतो. त्या मानवाला पूर्वजन्मींचें स्मरण होऊन संतोष व बुद्धि यांची प्राप्ति होते. जो मनुष्य शुचिर्भूत व समाहितचित्त होऊन प्रसन्न मनानें या देवश्रेष्ठाचें स्तवन करितो, तो शोक हाच ज्यांतील दावाग्नि आहे, अशा संसारसागरांतून मुक्त होतो व त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात.

**वैशंपायन**—पारिक्षिता, धौम्याचें त्या प्रसंगानुरूप असें हें वचन ऐकतांच विशुद्धात्म्या धर्मराजानें आपल्याला विप्रांस अन्नदान करण्याचें सामर्थ्य प्राप्त व्हावें म्हणून एकाग्र चित्तानें दृढव्रत धारण केलें. त्यानें पुष्पोपहारांनीं व बलींनीं रवीचें पूजन करून सूर्याच्या एकशें आठ नांवांच्या जपाचें अनुष्ठान आरंभिलें. तो पांडुपुत्र स्नान करून जलामध्यें पूर्वाभिमुख उभा राहिला. त्या वायुभक्षण करणाऱ्या जितेंद्रिय धर्मात्म्यानें चित्ताचें ऐकाग्र्य संपादन केलें आणि गंगा-

जलाचें आचमन व प्राणायाम करून, शुचिर्भूत होऊन, वाणीचें नियमन करून सूर्याचा स्तोत्रपाठ आरंभिला.

(२) युधिष्ठिर म्हणाला—हे भानो, तूं चक्षुरादिकांच्या प्रवर्तकत्वामुळें जगताचा नेत्र आहेस. सर्व प्राणिमात्राचा आत्मा आहेस. तूं सर्व भूतांची उत्पत्ति, स्थिति व लय यांचें आदिकारण आहेस आणि कर्मवानांचा अंतर्यामी आहेस.

तूं सर्व ज्ञाननिष्ठ व चित्तनिरोध करणारे योगी, यांची गति आहेस. मुमुक्षूंची गति व मुक्तिद्वार आहेस. तूंच हे सर्व लोक धारण केले आहेस व तूंच त्यांना प्रकाशित करितोस. तूंच सर्व लोकांना पवित्र करितोस आणि प्रत्युपकाराच्या अपेक्षेवांचून केवल कृपेनें सर्वांचें पालन करितोस. वेदपारग ब्राह्मण स्वशाखाविहित मंत्रांनीं योग्य कालीं तुझें उपस्थान करितात व ऋषिगण तुझें अर्चन करितात. तुझा दिव्यरथ जात असतां वरार्थी सिद्ध, चारण, गंधर्व, यक्ष, गुह्यक व पन्नग त्याला अनुसरतात. आठ वसु, अकरा रुद्र, बारा आदित्य, प्रजापति व इंद्र हे तेहतीस देव, उपेंद्रासह महेंद्र व विमानांतून फिरणारा विश्वदेवादिकांचा समुदाय, हे सर्व तुझें पूजन करून ज्ञानी होतात. तुझें अर्चन केल्यानेंच मनोरथ पूर्ण होतात.

श्रेष्ठ विद्याधर, गुह्यक, दिव्य व मानुष असे अर्यमा-अग्निष्वात्तादि सात पितृगण दिव्य मंदारमालांनीं तुझी पूजा करून सत्वर जगत्कारणत्वाला प्राप्त होतात. तुझ्या आराधनेनेंच वसु, मरुत, रुद्र, साध्य, मरीचिप व वालखिल्यादि सिद्ध सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठत्वाला प्राप्त झाले आहेत. ब्रह्मलोकासह या अखिल सप्तलोकांत आदित्याहून श्रेष्ठ असें एकहि भूत आहे, असें मला वाटत नाहीं. वीर्यवान् व प्रचंड अशीं अन्यहि भूतें या जगांत आहेत. पण त्यांची दीप्ति किंवा प्रभाव तुझ्यासारखा नाहीं. तुझ्या ठिकाणीं सर्व ज्योति स्थित आहेत व तूं सर्व ज्योतींचा प्रभु आहेस. तुझ्यामध्यें पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश एतद्रूप सत्य, सत्त्व, बुद्धि आणि धर्म, ज्ञान, विराग, ऐश्वर्य इत्यादि सात्त्विकभाव प्रतिष्ठित आहेत.

श्रीविष्णूनें ज्याच्या योगानें देवाच्या शत्रूंचा मद घालविला तें सुदर्शन चक्र विश्वकर्म्यानें तुझ्या तेजापासूनच निर्माण केलें. ग्रीष्म-ऋतूमध्यें तूं आपल्या किरणांनीं सर्व प्राण्यांतील तेज व सर्व औषधींचा रस आकर्षण करितोस आणि वर्षाऋतूंत पुनः त्याचा वर्षाव करितोस. तुझे कांहीं किरण लोकांना संताप देतात, कांहीं मेघरूपानें गर्जना करितात, कांहीं विद्युद्रूपानें चमकतात व कांहीं

किरण पावसाळ्यांत वृष्टि करितात. तुझे किरण शीत व वात यांनीं पीडलेल्या लोकांना जसें सुख देतात तसें अग्नि, प्रावरणें व लोकरीचीं वस्त्रेंहि देत नाहींत. तूं आपल्या किरणांनीं तेरा द्वीपांनीं युक्त असलेल्या या सर्व पृथ्वीला प्रकाशित करितोस. तिन्ही लोकांच्या हितासाठीं तूंच एकटा प्रवृत्त होतोस. तुझा उदय जर न झाला तर हें सर्व जगत् अंधकारानें व्यापून जाईल व विद्वान् लोक धर्मार्थ-कामांमध्यें प्रवृत्त होणार नाहींत. तुझ्या प्रसादानेंच ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आधान, पशुबंध, इष्टि, मंत्र, यज्ञ व तप या क्रियांना प्राप्त होतात.

हे प्रभो, ब्रह्मदेवाचा दिवस सहस्र युगपरिमित सांगितला आहे. (गीता अ. ८ श्लो. १७; म. स्मृ. अ. १ श्लो. ७३.) त्याचा आदि व अंत तूंच आहेस, असें काव्यज्ञांनीं सांगितलें आहे. मनु, मनुपुत्र, सर्व जगत्, उत्तरायण मार्गानें गेलेल्या ब्रह्मोपासकांना ब्रह्मलोकीं नेऊन पोंचविणारा अमानव पुरुष, मन्वन्तरें व सर्व ईश्वर यांचा नियामक तूंच आहेस. संहारकाल प्राप्त झाला असतां, तुझ्या क्रोधापासून उत्पन्न झालेला संवर्तकाग्नि त्रैलोक्याचें भस्म करून अवस्थित होतो.

मेघावरील मेघाला 'ऐरावत' म्हणतात. तो ऐरावत व अशनि यांसह उत्पन्न होणारे नानावर्णांचे महामेघ तुझ्याच किरणांपासून उत्पन्न होऊन प्रलय-कालीं जरायुजादि चतुर्विध भूतांना जलांत बुडवून टाकितात.

तूं स्वतःचें बारा प्रकारचें स्वरूप प्रकट करून 'द्वादश आदित्य' झाला आहेस. तूं आपल्या किरणांनीं एकार्णवभूत सर्व समुद्रजलाचें शोषण करितोस. तुलाच इंद्र म्हणतात. तूंच रुद्र, विष्णु, प्रजापति, अग्नि, मन, सूक्ष्म भूत, प्रभु व शाश्वत ब्रह्म आहेस. तूं सर्व विश्वामध्यें संचार करितोस किंवा त्याचा संहार करितोस, म्हणून तुला 'हंस' म्हणतात. तूं सविता, भानु व अंशुमाली आहेस. वृषाकपि म्हणजे हर किंवा हरि, विवस्वान्, मिहिर, पूषा, मित्र, धर्म, सहस्र-रश्मि, आदित्य, तपन, गवांपति, मार्तंड, अर्क, रवि, सूर्य, दीनांचा शरण्य, दिवाकर व सप्त-अश्ववान् तूंच आहेस. तूं धामकेशी म्हणजे ज्योतिर्मय किरणवान्, सर्व दिशांतून गमन करीत असल्यामुळें आशुगामि, तमाचा नाश करणारा तमोघ्न व तुझ्या रथाला सुवर्णवर्ण अश्व असल्यामुळें हरिताश्व म्हटला जातोस.

जो अहंकाररहित पुरुष षष्ठी अथवा सप्तमी या तिथींना तुझी अनन्यभावानें भक्तिपुरस्सर पूजा करितो त्याला लक्ष्मी नित्य भजते. जे लोक अनन्य चित्तानें

तुझें पूजन करून तुला वंदन करितात त्यांना शारीरव्याधि, मानसव्यथा किंवा कोणतीहि आपत्ति प्राप्त होत नाहीं. तुझे भक्त नीरोगी, निष्पाप व चिरायु होऊन सुखी होतात.

हे अन्नपते, सर्व प्राण्यांचें आतिथ्य करण्याची इच्छा करणाऱ्या मज दीनावर अन्नाचा अनुग्रह कर. मी मोठ्या श्रद्धेनें हें धर्मकार्य करण्याची इच्छा करीत आहें. हे भास्करा, तुझ्या चरणांचा आश्रय करून विद्युत्, अशनि इत्यादिकांना प्रवृत्त करणाऱ्या माठर, अरुण, दंड इत्यादि तुझ्या अनुचरांना मी वंदन करितों. त्याचप्रमाणें क्षमा व मैत्री या दोघी निग्रह व अनुग्रह करणाऱ्या देवतांना आणि गौरी, पद्मा, ब्राह्मी व माहेश्वर्यादि भूतमात्रांनाहि मी नमस्कार करितों. त्या देवी मज शरणागताचें रक्षण करोत.

जनमेजया, युधिष्ठिरानें अशी स्तुति केली असतां लोकांवर उपकार करणाऱ्या भास्करानें त्या पांडवाला मोठ्या प्रेमानें दर्शन दिलें. त्याची देदिप्यमान कांति प्रज्वलित अग्नीप्रमाणें दिसत होती.

( ३ ) आदित्य म्हणाला—हे कुंतीपुत्रा, तुझी सर्व इच्छा पूर्ण होईल. मी तुला बारा वर्षेपर्यंत अन्न देईन. हे राजा, ही ताम्रस्थालि घे. या पात्रांतून द्रौपदी जोंपर्यंत वाढीत असेल तोंपर्यंत तुझ्या पाकशालेंत फळें, मूळें, मांस व इतरहि सिद्ध केलेले लेह्य, चोष्य, भक्ष्य व पेय असे चतुर्विध खाद्य पदार्थ अक्षय होतील. आजपासून चवदावे वर्षी तुला पुनः राज्यप्राप्ति होईल.

जनमेजया, असें बोलून तो भगवान् सूर्य तेथेंच अंतर्धान पावला. हे राजा, जो वरार्थी मनुष्य इंद्रियनिग्रहपूर्वक समाहितचित्त होऊन या स्तोत्राचें पठन करील त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. त्याला दुर्लभ वस्तूचीहि प्राप्ति होईल. कोणीहि पुत्रार्थी स्त्री अथवा पुरुष जर या स्तोत्राचें वारंवार पठन अथवा श्रवण करील, तर त्यांना पुत्र होईल; तीं धनार्थी असल्यास धन व विद्यार्थी असल्यास विद्या प्राप्त होईल. स्त्री व पुरुष या उभयतांनींहि नित्य प्रातःकाळीं व सायंकाळीं या स्तोत्राचें पठन केल्यास त्यांच्यावरील आपत्ति दूर होईल. बद्ध असलेले बंधमुक्त होतील.

याप्रमाणें पूर्वीं ब्रह्मदेवानें हें स्तवन महात्म्या इंद्राला कथन केलें. त्याच्यापासून नारदाला प्राप्त झालें. नंतर तें धौम्यानें मिळविलें व त्याच्यापासून युधिष्ठिराला प्राप्त झालें. त्यामुळें राजा युधिष्ठिराच्या सर्व कामना पूर्ण झाल्या. या

स्तवनानें युद्धांत नित्य जय व विपुल धन प्राप्त होतें. मनुष्य सर्व पापांपासून मुक्त होऊन अंतीं सूर्यलोकाला जातो.

हे भारता, सूर्यानें असा वर दिला असतां धर्मवेत्ता युधिष्ठिर जलांतून बाहेर आला. त्यानें प्रथम धौम्यमुनीच्या चरणांना वंदन केलें, नंतर आपल्या भ्रात्यांना आलिंगन दिलें व द्रौपदीची भेट घेतली. त्यावेळीं त्या साध्वीनें आपल्या प्रभूला वंदन केलें. त्यानंतर पाकशालेमध्यें पांचालीनें चार प्रकारचें अल्प अन्न सिद्ध केलें व त्या स्थालीमध्यें तें अन्न सतत वृद्धि पावत असल्यामुळें तिनें सर्व विप्रांना भोजन दिलें. तेव्हांपासून सर्व ब्राह्मणांचें भोजन झाल्यावर व कनिष्ठ भ्राते जेवल्यावर राहिलेल्या 'विघस'-अन्नाचें राजा युधिष्ठिर सेवन करीत असे आणि सर्वांच्या शेवटीं अवशिष्ट राहिलेलें अन्न पांचाली ग्रहण करीत असे. पांचालीचें भोजन झालें म्हणजे त्या स्थालींतील अन्न संपून जाई.

( ४ ) याप्रमाणें सूर्यतुल्य तेजस्वी युधिष्ठिरानें सूर्यप्रसादानें आपला इष्ट हेतु प्राप्त करून घेतला व त्या प्रभूनें ब्राह्मणांना इष्ट असलेलें अन्न दिलें. सर्व पांडव पुरोहितासह तिथि, नक्षत्र व पर्वकाल यांसमयीं विधि-मंत्रप्रमाणानें यज्ञयागांत प्रवृत्त झाले. नंतर धौम्यानें स्वस्त्ययन केल्यावर त्या ब्राह्मणसमुदायानें परिवेष्टित झालेले पांडुपुत्र काम्यक-वनांत निघून गेले. ३. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १ खिन्न झालेल्या धृतराष्ट्राचा स्वकर्तव्याविषयीं विदुरास प्रश्न. २ विदुराचें समयोचित उत्तर. ३ धृतराष्ट्राची विदुरनिर्भर्त्सना. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, याप्रमाणें पांडवांनीं वनांत प्रवेश केला असतां इकडे सुखासनावर बसलेला अंबिकापुत्र प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्र झाल्या गोष्टीचा विचार करून अतिशय खिन्न झाला. त्याला कांहीं सुचेना. तेव्हां तो

---

१ 'पूर्वोक्त प्रकारें कर्मजन्य सिद्धीच्या अपेक्षेनें योगजन्यसिद्धि जर प्रबल आहे, तर युधिष्ठिराप्रमाणें सर्वच लोक तिचा आश्रय कां करीत नाहींत?' अशी आशंका घेऊन या अध्यायांत 'मूढ लोक प्रत्यक्ष फल देणाऱ्या कर्तव्याविषयीं हितोपदेश करणाराचाहि जर द्वेष करितात, तर पारलौकिक अदृष्ट फल देणाऱ्या कर्तव्याचा उपदेश करणाऱ्या हितोपदेष्टयाचा द्वेष करतील यांत काय आश्चर्य आहे,' हें सुचविलें आहे.

महाबुद्धिमान् धर्मात्म्या विदुराला म्हणाला—" हे विदुरा, तुझी बुद्धि भार्गव-रामासारखी शुद्ध आहे, तूं अति सूक्ष्म तत्त्व जाणतोस, तूं कौरव-पांडवांविषयीं पक्षपातशून्य असल्यामुळें सर्वांना संमत आहेस. यास्तव पांडवांना व माझ्या पुत्रांना जें हितकर असेल तेंच सांग. अशा रीतीनें पांडव द्यूतरूपी संकटांत सांपडून वनवासाला गेले असतां सर्व प्रजाजन आम्हांला कसे अनुकूल होतील आणि ते पांडव आमचें उन्मूलन कसे करणार नाहींत, याचा मला योग्य उपाय सांग. तूं सत्कर्तव्य चांगलें जाणतोस."

(२) विदुर—हे नरेंद्रा, धर्म, अर्थ व काम या तिहींचें व राज्याचेंहि मूळ धर्मच आहे, असें म्हणतात. यास्तव हे राजन्, तूं धर्मांत स्थित होऊन स्वशक्तीनें आपल्या व पांडूच्या पुत्रांचें रक्षण कर. हे राजा, तुझ्या पुत्रांनीं सत्यप्रतिज्ञ कुंतीपुत्राला सभेंत बोलावून त्याचा द्यूतक्रीडेंत पराजय केला, ही त्या पापी शकुनिप्रभृतींनीं युधिष्ठिररूपानें प्रतिष्ठित असलेल्या मूर्तिमंत धर्माचीच वंचना केली आहे. त्या दुरात्म्यांनीं हा जो पांडवांचा मानहानिलक्षण वध केला, त्या दोषाच्या शांतीचा उपाय सांगतों, ऐक.

हे राजा, तूं पांडवांना जें त्यांचें राज्य व धन दिलें होतेंस तें सर्व त्यांना पुनः परत दे. म्हणजे हा तुझा पुत्र या पातकापासून मुक्त होईल आणि लोकांत तुमची सत्कीर्ति होईल. हे नृपश्रेष्ठा, राजानें स्वकीय वित्तावरच संतुष्ट असावें, त्यानें परद्रव्याचा अपहार करूं नये, असा श्रेष्ठ धर्म आहे. यास्तव तूं असें वर्तन केल्यास तुझें यश व धर्म यांचा नाश होणार नाहीं व ज्ञातिभेद उत्पन्न होणार नाहीं.

हे राजन्, पांडवांचा संतोष व शकुनीचा अवमान करणें, हेंच तुझें श्रेष्ठ कर्तव्य आहे. तस्मात् तुला जर तुझ्या पुत्राचें अवशिष्ट राहिलेलें भाग्य नष्ट करावयाचें नसेल, तर त्वरित तूं हा उपाय योज. असें जर न करशील तर कौरवांचा निश्चयानें विनाश होईल.

हे कुरुश्रेष्ठा, क्रुद्ध झालेला भीमसेन आणि अर्जुन युद्धामध्यें शत्रूंना निःशेष करून टाकतील ! ज्यांच्या पक्षामध्यें सर्व लोकांतील श्रेष्ठ गांडीव धनुष्य धारण करणारा कृतास्त्र सव्यसाची आणि महा बलाढ्य भीमसेन यांच्यासारखे अतुल पराक्रमी योद्धे आहेत, त्यांना या लोकीं काय दुष्प्राप्य आहे !

हे राजा, पूर्वीं तुझा हा ज्येष्ठ पुत्र जेव्हां उत्पन्न झाला, तेव्हांच मीं तुला 'हा पुत्र तुझ्या कुलाचें अहित करणारा आहे, याचा तूं त्याग कर' असें

सांगितलें होतें. पण तूं त्या वेळीं माझें हितवचन ऐकून कुलाचें कल्याण केलें नाहींस. आतां पुनः मी तुला तेंच हितवचन सांगत आहें. त्याप्रमाणें तूं जर केलें नाहींस, तर पुढें तुला पश्चात्ताप करावा लागेल.

हे राजन्, तुझे पुत्र तुला पांडवांसह एकमतानें राज्य करण्याची जर संमति देतील तर तुला कांहींच ताप होणार नाहीं, परंतु ते जर अनुकूल न झाले तर भावी सुखासाठीं तूं त्यांचा निग्रह कर. अकल्याणकर दुर्योधनाचा निग्रह करून पांडुपुत्राची कुरुराज्यावर स्थापना कर. अजातशत्रु युधिष्ठिर राग-द्वेषशून्य आहे. त्यालाच धर्मानें पृथ्वीचें शासन करूं दे. असें केलें असतां हे राजन्, सर्व भूपाल वैश्यांप्रमाणें आपल्यापुढें नम्र होऊन रहातील.

दुर्योधन, शकुनि व कर्ण यांना प्रेमानें पांडुपुत्रांचा सत्कार करूं दे. दुःशासनाला द्रौपदी व भीमसेन यांची सभेमध्यें क्षमा मागूं दे आणि हे राजा, तूं सान्त्वनपूर्वक युधिष्ठिराला मोठ्या सन्मानानें राज्यावर स्थापन कर. तूं मला जें विचारिलेंस, त्याचा मला योग्य वाटत असलेला उपाय मीं सांगितला. त्याप्रमाणें वागल्यास हे नृपश्रेष्ठा, तूं कृतकृत्य होशील.

( ३ ) धृतराष्ट्र—हे विदुरा, तूं मला सभेंतहि असेंच म्हटलें होतेंस आणि आज पुनः माझ्याजवळ येऊन तेंच वचन सांगत आहेस. परंतु पांडवांचें हित आणि माझ्या पुत्रांचें अहित करणारें तुझें वचन माझ्या मनाला पटत नाहीं. यावरून तूं पांडवांचा हितकर्ता आहेस, हेंच निश्चित होतें. तूं सर्वदा पांडवांच्या हिताचाच संकेत करीत असतोस; त्यावरून तूं माझा हितकर्ता नाहींस, असें मला स्पष्ट दिसतें. पण हे मूढा, पांडवांच्या हितासाठीं मीं माझ्या पुत्रांचा त्याग कसा बरें करावा! तेहि माझेच पुत्र आहेत, यांत संशय नाहीं. परंतु दुर्योधन माझ्या देहापासून उत्पन्न झाला आहे. ‘परहितासाठीं स्वदेहाचा त्याग कर’ असें समत्व पहाणारा कोणता मनुष्य सांगेल! विदुरा, तूं हें सर्व कुटिल भाषण करीत आहेस, तस्मात् मीं आतां तुला अधिक महत्त्व देत नाहीं. तुझी इच्छा असेल तर येथें रहा किंवा वाटेल तेथें निघून जा. असाध्वी स्त्रीचें कितीहि समाधान केलें तरी ती निघून जाणारच.

हे भारता, असें बोलून धृतराष्ट्र एकदम उठला व अंतर्गृहांत निघून गेला. तेव्हां ‘हें कुल माझें नव्हे’ असें म्हणत विदुरहि जेथें पांडव गेले होते तेथें त्वरेनें जावयास निघाला. ३. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ विदुराचें काम्यकवनांत गमन. २ आगमनाचें निमित्तकथन. ३ त्याचा युधिष्ठिराला हितोपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, वनामध्यें निवास करण्याच्या इच्छेनें पांडव आपल्या अनुयायांसह जाह्नवीच्या तीरावरून कुरुक्षेत्रांत आले. ते सरस्वती, दृषद्वती व यमुना यांच्या जलाचें सेवन करून एका वनांतून दुसऱ्या वनांत रहात रहात सरळ पश्चिम दिशेकडे गेले. त्यानंतर सरस्वतीतीरावरील सपाट, निर्जल व जंगलांनीं व्याप्त असलेलें काम्यकवन त्यांनीं पाहिलें. तें वन मुनिजनांना प्रिय असून अनेक द्विज व मृग यांनीं युक्त होतें. तेथें ते पांडववीर राहिले. त्यांच्या सभोंवार असलेले मुनि त्यांचें सांत्वन करीत असत.

भारता, याप्रमाणें ते पांडुपुत्र त्या वनांत रहात असतां, थोड्याच दिवसांत पांडवांच्या दर्शनाविषयीं सर्वदा उत्सुक असलेला विदुर एका रथानें त्या समृद्ध काम्यकवनांत आला. शीघ्रगामी अश्वांच्या रथांत बसून तो अतित्वरेनें तेथें आला व त्या एकान्त आणि पवित्र वनांत द्रौपदी, भ्राते व ब्राह्मण यांसह बसलेल्या धर्मात्म्या युधिष्ठिराला त्यानें पाहिलें.

राजा, त्या वेळीं सत्यप्रतिज्ञ युधिष्ठिरानें विदुराला अतिशय वेगानें येत असलेलें दुरून पाहिलें व आपल्या भीमसेन भ्रात्याला म्हटलें—"वृकोदरा, हा विदुर आतां आणखी काय सांगावयास येत आहे! हा सौबल शकुनीच्या सांगण्यावरून मला पुनः द्यूतासाठीं बोलाविण्यास तर येत नाहीं ना! कदाचित् त्या क्षुद्रबुद्धि शकुनीला पुनः द्यूत खेळून आमचीं आयुधें जिंकून घ्यावयाचीं असतील! हे भीमसेना, मला कोणींहि द्यूताला आह्वान केलें असतां मी त्यापासून निवृत्त होण्यास समर्थ नाहीं आणि त्यांनीं जर आमच्या गांडीव धनुष्याचाच पण करून त्याचें हरण केलें, तर आम्हांला पुनः राज्यप्राप्ति कशी होणार!"

राजा, असें बोलून तो कौंतेय आपल्या सर्व भ्रात्यांसह उठून उभा राहिला व त्यांनीं विदुराचें स्वागत केलें. तेव्हां तो आजमीढ पांडवांना क्रमानें भेटला व त्यानें त्यांना कुशल प्रश्न केला. त्यानंतर विदुरानें विश्रांति घेतली असतां त्या पुरुषश्रेष्ठांनीं त्याला त्याच्या आगमनाचें कारण विचारिलें. तेव्हां त्यानेंहि अंबिकापुत्र धृतराष्ट्राची मनःस्थिति व त्याचें एकंदर वर्तन त्यांना सविस्तर सांगितलें.

( २ ) विदुर म्हणाला—हे अजातशत्रो युधिष्ठिरा, धृतराष्ट्रानें मला सत्कारानें जवळ बोलावून आपल्या रक्षणाचा हितोपदेश विचारिला. तेव्हां तुम्हां कौरव-पांडवांना व धृतराष्ट्राला हितकर होईल, असें जें मला वाटलें, तेंच मीं त्यास सांगितलें. परंतु त्याला तें रुचलें नाहीं. मलाहि त्याहून अधिक कल्याणकर असा दुसरा उपाय दिसत नाहीं. हे पृथापुत्रा, मीं त्याला परम कल्याणाचा मार्ग सुचविला; पण त्यानें तो ऐकला नाहीं. मरणोन्मुख मनुष्याला जसें पथ्यकर अन्न रुचत नाहीं, त्याप्रमाणें राजा धृतराष्ट्राला माझें सांगणें पटलें नाहीं. हे पांडुनंदना, एखादी दूषित झालेली स्त्री श्रोत्रियाच्या घरांत जरी नेऊन ठेविली, तरी तिला जसें सन्मार्गाला लावितां येत नाहीं, किंवा एखाद्या कुमारीला जसा साठ वर्षांचा वृद्ध पति आवडत नाहीं, त्याप्रमाणें त्या कौरवेश्वराला माझा सदुपदेश निश्चयानें रुचला नाहीं. ज्याप्रमाणें कमलपत्रावर शिंपलेलें जल, त्याचा आश्रय करीत नाहीं, त्याप्रमाणें माझें हितवचन धृतराष्ट्राच्या मनावर ठसलें नाहीं. कौरवांचा नाश निश्चित दिसत असतांहि धृतराष्ट्र त्याच्या निवारणाचा विचार करीत नाहीं.

युधिष्ठिरा, मीं याप्रमाणें हितवचन सांगितलें असतां क्रुद्ध झालेला धृतराष्ट्र मला म्हणाला—"तुझी ज्यांच्यावर श्रद्धा आहे, तेथेंच तूं जा. माझ्या नगराचें किंवा पृथ्वीचें पालन करण्यास यापुढें तुझें साह्य घेण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. यास्तव, हे धर्मराजा, धृतराष्ट्रानें माझा त्याग केल्यामुळें मी तुझ्यापाशीं तुला हितवचन सांगण्यासाठीं आलों आहें. मीं तुला पूर्वी सभेमध्यें जें सांगितलें होतें तें तूं विसरूं नको. मीं तुला पुनः तेंच सांगतों, ऐक—

( ३ ) राजा, शत्रूंनीं तीव्र क्लेश दिले असले तरी त्यांस क्षमा करून अनुकूल कालाची प्रतीक्षा करावी. ज्याप्रमाणें अल्प अग्निहि हळुहळू वाढून प्रचंड होतो, त्याप्रमाणें स्वतःचें सामर्थ्य सावकाश वाढविणारा सर्व पृथ्वीचें राज्य भोगितो. युधिष्ठिरा, ज्यांचें वित्त सामान्य—समायिक आहे, त्यांचे साह्यकर्ते त्यांच्या दुःखाचेहि अंशभाक् होतात. वृथा वल्गना न करितां सत्य व श्रेष्ठ भाषण करावें आणि आपल्या सहायकांबरोबर एकाच प्रकारचें अन्न भक्षण करावें. त्यांच्या समीप आपलाच सत्कार करून घेऊं नये. आपल्या साह्यकर्त्यांचा संग्रह करण्याचा हाच श्रेष्ठ उपाय आहे. यास्तव हे पार्था, तूं त्याचें अवलंबन कर, त्यायोगें तुला विपुल धन व अमित साह्य प्राप्त होऊन, तूं शत्रूंचा नाश करून राज्य मिळविशील.

युधिष्ठिर म्हणाला—हे धर्मात्म्या, तूं जसा मला उत्कृष्ट ज्ञानोपदेश करीत आहेस तसेंच मी वर्तन ठेवीन. देश व काल यांना उचित असा आणखीहि मला सदुपदेश कर, म्हणजे मी त्याप्रमाणें सर्व करीन. ३. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ विदुराच्या गमनानंतर धृतराष्ट्राचा पश्चात्ताप. २ विदुराला परत आणण्यासाठीं संजयप्रेषण. ३ संजयाचें पांडवांकडे गमन. ४ विदुराचें हस्तिनापुरीं प्रत्यागमन व धृतराष्ट्राशीं संभाषण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, विदुर पांडवांच्या आश्रमाकडे निघून गेला असतां महा बुद्धिमान् धृतराष्ट्राला पश्चात्ताप झाला. त्याला महाज्ञानी विदुराचा प्रभाव माहित होता. विदुराच्या सदुपदेशाप्रमाणें वागणारांचा जय होईल, हें तो जाणत असल्यामुळें 'संधि-विग्रहादिनीतिज्ञ विदुर पांडवांच्या पक्षाला मिळल्यास त्यांचा अभ्युदय होईल व विदुराच्या द्वेषानें माझा नाश होईल' अशा चिंतेनें मोहित झाला व तो प्रज्ञाचक्षु कौरवेश्वर उठून सभाद्वारापाशीं आला. मनांतील द्वेषाचा स्नेहरूपानें अभिनय करण्यासाठीं तो सभाद्वारांत सर्व नृपालांसमक्ष विदुराचें स्मरण करीत निश्चेष्ट होऊन पडला.

नंतर तो राजा सावध होऊन भूमीवरून उठला व समीप उभ्या असलेल्या संजयाला म्हणाला—" हे संजया, भ्राता विदुर माझा सुहृद् आहे. तो साक्षात् दुसरा धर्मच आहे. आज त्याच्या स्मरणानें माझें अंतःकरण अतिशय व्यथित होत आहे. यास्तव त्या माझ्या धर्मज्ञ भ्रात्याला सत्वर घेऊन ये. "

( २ ) असें बोलून तो नृपति दीन होऊन विलाप करूं लागला. विदुराच्या स्मरणानें मोहित झालेला तो राजा पश्चात्तापानें संतप्त झाला आणि भ्रातृस्नेहानें संजयाला पुनः असें वचन बोलला—" हे संजया, अगोदर जा आणि मी रागानें घालवून दिलेला तो माझा प्रिय भ्राता जिवंत तरी आहे कीं नाहीं, हें सत्वर पाहून ये. अरे, ज्या माझ्या अतिशय बुद्धिमान् व प्राज्ञ भ्रात्यानें पूर्वी कधींहि माझें यत्किंचित्हि अप्रिय केलेलें नाहीं त्या माझ्या परम ज्ञानी भ्रात्याला मीं अतिशय क्लेश दिले. यास्तव हे ज्ञानी संजया, तूं सत्वर जा व त्याला घेऊन ये. त्या माझ्या भ्रात्यावांचून मी जिवंत रहाणार नाहीं. तो परत न आल्यास मी त्याच्यासाठीं प्राणत्याग करीन.

(३) जनमेजया, राजाचें तें वचन ऐकून संजयानें त्याचें म्हणणें मान्य केलें व 'ठीक आहे' असें बोलून तो काम्यकवनाकडे मोठ्या त्वरेनें निघाला. तो अल्पावकाशांतच जेथें पांडव होते त्या वनास जाऊन पोंचला. तेथें हजारों ब्राह्मण व विदुर यांसह रुरुमृगाचें अजिन परिधान करून बसलेल्या युधिष्ठिराला त्यानें पाहिलें. त्यावेळीं भ्रात्यांनीं ज्याचें रक्षण केलें आहे, असा तो महात्मा देवांनीं रक्षण केलेल्या इंद्राप्रमाणें शोभत होता.

राजा, संजयानें युधिष्ठिरापाशीं जाऊन त्याचा सत्कार केला व भीमार्जुनादि पांडवांनींहि उलट त्याचा यथोचित सन्मान केला. नंतर सुखासनावर बसलेल्या संजयाला राजानें कुशल विचारिलें असतां तो त्यास आपल्या आगमनाचें कारण निवेदन करून असें वचन बोलला.

संजय—हे विदुरा, अंबिकापुत्र राजा धृतराष्ट्र तुझें सारखें स्मरण करीत आहे. यास्तव तूं त्याला सत्वर जाऊन भेट व संजीवन दे. हे श्रेष्ठा, तूं नरश्रेष्ठ कुरुनंदन पांडवांच्या अनुज्ञेनें त्या राजसिंहाच्या आज्ञेप्रमाणें सत्वर त्याच्याकडे परत जावेंस, हेंच तुला उचित आहे.

राजा पारिक्षिता, संजयाचें हें भाषण ऐकून स्वजनांवर प्रेम करणारा बुद्धिमान् विदुर युधिष्ठिराच्या अनुमतीनें पुनः हस्तिनापुरास परत आला. त्याला पहातांच महातेजस्वी धृतराष्ट्र म्हणाला—" हे धर्मज्ञा, आलास, फार चांगलें झालें ! हे निष्पापा, तुला माझें स्मरण झालें हें पाहून मला फार संतोष झाला. अरे बाबा, तुझ्यासाठीं मला रात्रंदिवस निद्रा येत नव्हती. मीं जागून दिवस काढले. जागेपणींहि माझें जीवित मला विचित्र भासूं लागलें. " राजा, इतकें बोलून धृतराष्ट्रानें विदुराला आपल्या जवळ घेऊन त्याच्या मस्तकाचें अवघ्राण केलें आणि 'हे अनघा, मी तुला जें बोललों त्याची क्षमा कर' असें म्हटलें.

तेव्हां विदुर म्हणाला—हे राजन्, मीं तुला केव्हांच क्षमा केली आहे. तूं माझा ज्येष्ठ भ्राता आहेस, म्हणून हा मी तुझ्या दर्शनासाठीं सत्वर आलों. हे पुरुषश्रेष्ठा, धार्मिक बुद्धीचे लोक दीनजनांच्या पक्षाकडेच वळत असतात. ते नेहमीं दीनांचा पक्ष घेतात, यांत मुळींच संशय नाहीं. भारता, पांडूच्या व तुझ्या पुत्रांविषयीं माझ्या मनांत जरी सारखेंच प्रेम वसत आहे तरी पांडव आज दीनावस्थेंत आहेत. म्हणून माझें मन त्यांच्यासाठीं तळमळतें व माझ्या हातून पक्षपात होतो; तुझ्या पुत्रांच्या द्वेषामुळें नाहीं. पांडुपुत्र जसे माझे आहेत तसे तुझेहि आहेत.

जनमेजया, विदुर असें बोलला असतां त्या दोघां भ्रात्यांनीं परस्परांचें सांत्वन केलें व त्यामुळें त्यांना परम संतोष झाला. ३. १. ६.

---

## अध्याय ७ वा.

[ १ विदुर परत आला असतां क्रुद्ध झालेल्या दुर्योधनाचा शकुन्यादिकांशीं संकेत. २ त्यांचें कर्णाच्या प्रोत्साहनानें पांडववधार्थ प्रस्थान. ३ व्यासानें केलेलें त्यांचें निवारण. ]

( १ ) **वैशंपायन**—हे भारता, विदुराला परत बोलावून आणून राजानें त्याचें सान्त्वन केलें, हें ऐकतांच दुर्मति दुर्योधनाला अतिशय संताप आला. त्यानें शकुनि, कर्ण व दुःशासन यांना बोलावून आणिलें आणि राग-द्वेषात्मक अविवेकांत प्रवेश करून तो असें वचन बोलला—" हे वीरहो, धृतराष्ट्राचा तो बुद्धिमान् मंत्री परत आला आहे. तो विद्वान् विदुर पांडवांचा सुहृद् आहे. यास्तव तो क्षत्ता आमच्या शत्रूंचें हित केल्यावांचून रहाणार नाहीं. यास्तव या आपल्या हितशत्रूनें जोंपर्यंत पांडवांना परत आणविण्याचें धृतराष्ट्राच्या मनांत भरवून दिलें नाहीं, तोंपर्यंत माझ्या हिताचा कांहीं तरी उपाय सांगा.

मीं त्या पांडवांना पुनः येथें आलेलें जर का पाहिलें, तर खरोखर अन्नोदक वर्ज्य करून पुनः कृश होईन व प्राणत्याग करीन, किंवा विष प्राशन करीन, शस्त्रानें आत्महत्त्या करीन, गळफांस लावून घेईन किंवा अग्निप्रवेश करीन. परंतु माझ्या शत्रूंचा अभ्युदय पहाण्यास मी समर्थ नाहीं."

**शकुनि**—हे राजा, तूं असे मूर्खासारखे विचार मनांत काय आणीत आहेस ! अरे, ते सर्व पांडव सत्यप्रतिज्ञ आहेत, ते प्रतिज्ञा करून गेले आहेत, तेव्हां ती मोडून ते परत येतील ही गोष्ट संभवत नाहीं. सत्यधर्मा युधिष्ठिर तुझ्या पित्याचें वचन कधींहि मान्य करणार नाहीं. किंवा धृतराष्ट्राची आज्ञा मान्य करून ते जरी नगरांत परत आले तरी आपण त्यांच्याशीं कार्याकार्य-विवेकलक्षण व्यवहार करूं. म्हणजे आपण सर्व बाहेरून मध्यस्थांसारखे राहून राजा धृतराष्ट्राच्या मनाप्रमाणें वागूं आणि धर्मलोपाच्या भीतीनें एकांतांत राहिलेल्या पांडवांच्या प्रतिज्ञापालनांत कोठें दोष आढळतो तो तत्परतेनें पाहूं व त्यांचें छिद्र दिसतांच तें उघडकीस आणून त्यांना पुनः क्लेशांत पाडूं !

दुःशासन—हे महाप्राज्ञ मातुला, तूं म्हणतोस तें खरें आहे. तूं सांगितलेला विचार मला नेहमीं अतिशय आवडतो.

कर्ण—हे दुर्योधना, तुझ्या मनांतील सर्व इच्छा आम्ही पूर्ण करूं. हे राजन्, याविषयीं आमचें सर्वांचेंच ऐकमत्य आहे. कसें तें ऐक—ते धैर्यवान् पांडव प्रतिज्ञेचा काल पूर्ण झाल्यावांचून कदापि परत येणार नाहींत. 'पण कदाचित् ते राज्यमोहानें येतीलहि' असें जर म्हणशील तर, आले तरी हरकत नाहीं. आपण त्यांना द्यूतांत पुनः जिंकूं.

वैशंपायन—राजा, कर्ण असें बोलला असतां दुर्योधन खिन्न झाला. कर्णादिकांनीं पांडवांची यथेच्छ निंदा केली असतांहि 'त्यांचें पुनः आगमन होईल' ही कल्पना त्याला सहन न झाल्यामुळें व कर्ण स्वपराक्रमाला योग्य असें वचन न बोलल्यामुळें तो धृतराष्ट्रपुत्र अप्रसन्नतेनें त्यांच्याकडे पाठ फिरवून बसला.

( २ ) तेव्हां त्याचा आशय ओळखून कर्णानें आपले सुंदर नेत्र वटारिले, तो आवेशानें उभा राहिला व क्रोधानें दुःशासन व शकुनि यांना म्हणाला—"हे नृपालहो, याविषयीं माझें खरें मत सांगतों ऐका. आम्ही सर्व हात जोडून राजा दुर्योधनाची आज्ञा पाळण्यास तत्पर आहोंत तर, धृतराष्ट्रानें जरी प्रतिबंध केला तरी आम्ही याचें प्रिय करण्यास समर्थ नाहीं कीं काय ? आपण सर्व शस्त्रें घेऊन व सज्ज केलेल्या रथावर आरूढ होऊन पांडवांचा वध करण्यासाठीं वनांत जाऊं या. ते सर्व पांडव एकदा अज्ञातगतीला प्राप्त होऊन शांत झाले म्हणजे हा दुर्योधन आणि आम्हीहि निश्चिंत होऊं. जोंपर्यंत ते पांडव खिन्न, शोकमग्न व सहायशून्य आहेत आणि जिंकण्याची इच्छा करूं लागले नाहींत, तोंवरच त्यांना जिंकतां येणें शक्य आहे."

भारता, सूतपुत्र कर्णाचें हें वचन ऐकून त्याचा सर्वांनीं पुनः पुनः सत्कार केला व 'ठीक आहे, फार उत्तम' असें बोलून पांडवांचा वध करण्याच्या निश्चयानें ते सर्व मोठ्या गडबडीनें पृथक् पृथक् रथांतून निघाले.

( ३ ) याप्रमाणें ते कौरव निघाले असतां विशुद्धात्म्या कृष्णद्वैपायन व्यासानें आपल्या दिव्यदृष्टीनें तें जाणलें आणि त्या प्रभूनें सत्वर त्यांच्यापाशीं येऊन त्या सर्वांचा निषेध केला. नंतर लोकांना पूज्य असलेला तो भगवान् महर्षि धृतराष्ट्र जेथें बसला होता तेथें त्वरेनें येऊन त्यास असें म्हणाला. ३. १. ७.

---

## अध्याय ८ वा.

[ १ धृतराष्ट्राला व्यासाचा उपदेश. ]

(१) व्यास—हे महाप्राज्ञ धृतराष्ट्रा, मी तुला आज एक हितवचन सांगतों तें ऐक. त्यांत कौरवांचें व तुम्हां सर्वांचेंच परम कल्याण आहे. हे महाबाहो, दुर्योधनादिकांनीं कपटानें द्यूतांत जिंकल्यामुळें पांडवांना वनांत जावें लागलें, ही गोष्ट मला मुळींच आवडली नाहीं. हे भारता, या तीव्र क्लेशांचें स्मरण करीत राहिलेले ते पांडव तेरा वर्षें पूर्ण होतांच क्रुद्ध होऊन कौरवांवर शस्त्रांचा विषासारखा प्रयोग करतील. हा तुझा मंदबुद्धि पापात्मा पुत्र राज्यलोभानें क्रुद्ध होऊन पांडवांना मारण्याची इच्छा कां करीत आहे ?

हे कुरुश्रेष्ठा, तूं आपल्या या मूढ पुत्राचें निवारण कर. तुझा हा पुत्र शांत होवो. अरे, वनवासांत असलेल्या त्या वीरांचा वध करण्याच्या इच्छेनें हा मूर्ख दुर्योधन चालला आहे. पण असल्या साहसानें तो स्वतःच फुकट प्राणास मुकेल. ज्याप्रमाणें ज्ञानी विदुर, भीष्म, कृप, द्रोण व मी त्याप्रमाणें तूंहि सुज्ञ आहेस. स्वजनांशीं युद्ध करणें अतिशय निंद्य आहे. तें धर्मरहित व अयशस्कर आहे. यास्तव हे महाप्रज्ञावान् राजा, तूं त्यांत प्रवृत्त होऊं नको.

धृतराष्ट्रा, पांडवांविषयीं तुझ्या पुत्रांची जी अविवेकप्रचुर बुद्धि आहे, तिची उपेक्षा केल्यास तुझ्या हातून फार मोठा अन्याय घडेल. किंवा हे राजन्, हा तुझा मंदबुद्धि पुत्र दुर्योधन एकटाच पांडवांबरोबर वनांत जाऊं दे. त्याच्याबरोबर कोणी साह्यकर्ता न देतां त्याला युधिष्ठिराच्या सहवासांत राहूं दे. पांडवांच्या सत्संगतीमुळें त्याचा जर त्यांच्यावर स्नेह जडला तर हे राजा, तूं कृत्यकृत्य होशील.

अथवा हे धर्मज्ञा, हेंहि दुर्घटच आहे. कारण 'मनुष्याचा जन्मस्वभाव मृत्यूनंतरहि पालटत नाहीं, तो जन्मांतरींहि अनुवृत्त होत असतो,' असें श्रुत आहे. हे राजा, भीष्म, द्रोण व विदुर यांचें काय मत आहे, तें विचार. तुझ्या मताशीं तें कितपत जुळतें तें पहा. कारण या प्रसंगीं जें उचित असेल तेंच अगोदर केलें पाहिजे. तें जर वेळींच केलें नाहीं, तर तुमच्या ऐश्वर्याचा नाश होईल. ३. १. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ धृतराष्ट्राचा पुत्रस्नेहामुळें मोह. २ व्यासानें कथन केलेला इंद्र-सुरभि-संवाद. ३ धृतराष्ट्राला पुत्रांना शांत करण्याविषयीं उपदेश. ]

(१) **धृतराष्ट्र**—हे भगवन्, मलाहि द्यूतापासून उत्पन्न झालेली ही आपत्ति रुचली नाहीं. परंतु दैवानेंच मला त्यांत नियुक्त केलें, असें वाटतें. भीष्म, द्रोण, विदुर, यांनाहि तें संमत नव्हतें. फार काय, पण गांधारीलाहि हें मोहानें प्रवृत्त झालेलें द्यूत आवडलें नाहीं. तथापि हे प्रियव्रत, मी हें सर्व जाणत असूनहि पुत्रस्नेहामुळें मूढबुद्धि दुर्योधनाचा त्याग करण्यास समर्थ झालों नाहीं.

**व्यास**—हे नृपते, तूं म्हणतोस तें खरें आहे. [१]पुत्रासारखा मित्र आणि शत्रु दुसरा कोणीहि नाहीं. कारण कुपुत्र शोकाला हेतु होत असल्यामुळें त्याच्यासारखा शत्रु नाहीं आणि सुपुत्रापासून उत्कृष्ट प्रेम प्राप्त होत असल्यामुळें त्याच्यासारखा श्रेष्ठ मित्र नाहीं, ही उक्ति लोकप्रसिद्धच आहे.

(२) हे धर्मज्ञा, रोदन करणाऱ्या सुरभीनें इंद्राला म्हटलें होतें कीं, अन्न-वस्त्रादि ऐश्वर्यानें श्रेष्ठत्व प्राप्त होत नाहीं, तर तें पुत्रामुळेंच प्राप्त होतें, ही गोष्ट श्रुतिसिद्ध आहे. हे नरेंद्रा, याविषयीं इंद्र व सुरभि यांचा जो संवाद झाला त्याचें उत्कृष्ट व श्रेष्ठ आख्यान मी तुला सांगतों, ऐक.

हे राजन्, स्वर्गलोकीं रहाणारी सर्व गोवृषभांची माता, देवधेनु सुरभि एकदा रोदन करीत असलेली पाहून इंद्राला तिची दया आली व तो म्हणाला—“ हे शुभे, तूं अशी रडतेस कां ? सर्व देवांचें क्षेम आहे ना ? सर्व मनुष्यें व नाग कुशल आहेत ना ? कारण अल्प कारणासाठीं तूं कांहीं अश्रु ढाळणार नाहींस !”

**सुरभि**—हे देवेंद्रा, तुझ्यावर कांहीं संकट आल्याचें दिसत नाहीं. परंतु माझ्या पुत्रावरील आपत्ति पाहून मला अतिशय शोक होत आहे. त्यामुळें माझ्या नेत्रांतून हे दुःखाश्रु गळत आहेत. हे इंद्रा, नांगर ओढीत असलेला हा माझा दुर्बल पुत्र पहा. तो अतिशय कृश झाला आहे. तरी त्याचा धनी त्याला तीक्ष्ण आसुडाचे तडाखे मारीत आहे. नांगर ओढून तो अतिशय थकला आहे, त्यामुळें विश्रांतीसाठीं तो खांद्यावर धुरा असतांनाच पुनः पुनः खालीं बसत आहे ! पण हा निर्दय शेतकरी त्याला सोडीत नाहीं. उलट वारंवार मारीत सुटला आहे !

---

१ दृढं विद्मः परं पुत्रं परं पुत्रान्न विद्यते ॥

हे अमरेश्वरा, त्याची ही कष्टप्रद अवस्था पाहून मला त्याची करुणा आली व माझें मन खिन्न झालें. हे शचीपते, त्याच नांगराला जुंपलेला हा दुसरा बैल पहा. तो बलाढ्य व सशक्त असल्यामुळें अधिक भार वहाण्यास समर्थ आहे. पण हा त्याचा जोडीदार अतिशय दुर्बल व कृश आहे. त्याच्या शरीरावरील सर्व शिरा स्पष्ट दिसत आहेत. तरीहि अशा दुर्बलावस्थेंत भार वहात असल्यामुळें त्याला अतिशय क्लेश होत आहेत. ते पाहून हे सुरेंद्रा, मला फार दुःख होतें. पहा, त्याच्यावर वारंवार काठीचा प्रहार होत आहे, पण त्याला भार वहाण्याची शक्ति नाहीं. यास्तव हे वासवा, त्याचे क्लेश पाहून अतिशय दुःखित झालेली मी शोकार्त झालें आहें. दयेनें व्याकुल झाल्यामुळें माझ्या नेत्रांतून हे अश्रु वहात आहेत.

इंद्र—हे शोभने, तुझे हजारों पुत्र अशा प्रकारचे क्लेश भोगीत असतांना या पुत्राला ताडन केलेलें पाहून त्याची एकट्याचीच तुला इतकी दया कां येते?

सुरभि—हे शक्रा, माझ्या सहस्रावधि पुत्रांवर माझें जरी सारखेंच प्रेम आहे, तरी दीनावस्थेंत असलेल्या पुत्राची मला अधिक दया येते.

व्यास—हे धृतराष्ट्रा, सुरभीचें हें यथार्थ वचन ऐकून इंद्र अतिशय विस्मित झाला आणि आपल्या जीविताहूनहि अपत्य अधिक प्रिय आहे, ही गोष्ट त्याला पटली. तेव्हां त्या भगवान् पाकशासनानें एकाएकीं अतिशय जलवृष्टि करून त्या शेतकऱ्याच्या नागरणींत विघ्न आणिलें.

( ३ ) हे राजन्, त्या सुरभीनें सांगितल्याप्रमाणें सर्व पुत्रांवर जरी सारखाच स्नेह असला तरी हीनावस्थेंत असलेल्या पुत्रांवर अधिक कृपा असते. फार कशाला, पण हे प्रिय पुत्रा, माझा आत्मज पांडु जसा मला प्रिय होता तसाच तूंहि प्रिय आहेस आणि महाबुद्धिमान् विदुरावरहि माझी तेवढीच प्रीति आहे. म्हणून मी तुला स्नेहामुळें हें सांगत आहें. तुला दीर्घकालानें एकशें एक पुत्र झाले आणि पांडूला पांचच पुत्र होऊन तेहि अतिशय क्लेशांत आहेत. तथापि ते तुझ्या पुत्रांप्रमाणें कुटिल नसून निष्कपट आहेत. यास्तव या दीन पांडुपुत्रांचा उत्कर्ष कसा होईल व ते चिरायु कसे होतील ही चिंता माझ्या मनाला अतिशय ताप देत आहे. तस्मात् हे कौरवश्रेष्ठा, कौरव जिवंत रहावे, अशी जर तुझी इच्छा असेल तर तुझ्या दुर्योधनपुत्रानें पांडवांशीं सौजन्यानें वागावें व शांत व्हावें. ३. १. ९.

## अध्याय १० वा.

[ १ धृतराष्ट्राला उपदेश करून व्यासांचें गमन. २ मैत्रेयाचें आगमन.
३ त्याचा उपदेश व शाप. ]

( १ ) **वैशंपायन**—भगवान् कृष्णद्वैपायनाचा हा हितोपदेश ऐकून धृतराष्ट्र म्हणाला—"हे महाप्राज्ञ महर्षे, तूं जें सांगत आहेस तें अगदीं खरें आहे. तें मला व या सर्व भूपालांनाहि मान्य आहे. कौरवांच्या अभ्युदयाचा जो मार्ग तूं मला दाखविलास, तोच पूर्वीं विदुरानेंहि मला सांगितला. भीष्म-द्रोणांचेंहि तसेंच मत आहे. यास्तव हे भगवान्, तुला जर कौरवांची दया येत असेल व मी जर तुला अनुग्राह्य वाटत असेन तर माझ्या या दुरात्म्या दुर्योधन-पुत्राला तूं उपदेश कर."

**व्यास**—हे नृपाला, हा पहा भगवान् मैत्रेय-ऋषि येत आहे. तो पांडुपुत्रांचा शोध लावून, त्या पांची भ्रात्यांना भेटून, तुम्हांला भेटण्याच्या इच्छेनें आज येथें प्राप्त झाला आहे. हा तुझ्या दुर्योधन-पुत्राला उपदेश करील. हा महान् ऋषि तुझ्या कुलाच्या व पुत्राच्या संरक्षणाचा यथायोग्य उपाय सांगेल. परंतु हे कुरुनंदना, दुर्योधनानें या महर्षीच्या सांगण्याप्रमाणें निःशंकपणें वागलें पाहिजे. त्यानें त्याच्या उपदेशानुसार जर वर्तन केलें नाहीं, तर तो क्रोधानें तुझ्या पुत्राला शाप देईल !

( २ ) राजा जनमेजया, धृतराष्ट्राला असें बोलून व्यास निघून गेला असतां मैत्रेय-ऋषि तेथें आला. तेव्हां पुत्रांसह त्या कौरवेश्वरानें त्या ऋषीचें पूजन केलें. अर्घ्य-पाद्यादिकांनीं त्याचा सत्कार केला. नंतर कांहीं वेळ स्वस्थ बसून विश्रांति घेतलेल्या त्या श्रेष्ठ मुनीला अंबिकापुत्र धृतराष्ट्र नम्रतेनें म्हणाला—"हे ब्रह्मर्षे, तूं कुरुजांगल देशांतून येत असतांना तुझा प्रवास सुखाचा झाला ना ! ते पांची पांडव भ्राते कुशल आहेत ना ? त्या वीरांची आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें वागण्याची इच्छा आहे ना ? त्यांचा कौरवांवरील भ्रातृस्नेह नष्ट होणार नाहीं ना ?"

**मैत्रेय**—हे कुरुराजा, मी तीर्थयात्रा करीत, फिरत फिरत यदृच्छेनें कुरुजांगल प्रदेशांत गेलों. तेथें काम्यक-वनांत धर्मराजाला पाहिलें. हे राजन्, युधिष्ठिरानें जटा धारण करून कृष्णाजिन परिधान केलें आहे. त्या वेळीं त्या तपोवननिवासी महात्म्याच्या दर्शनासाठीं फार मोठा मुनिगण जमला होता. हे महाराजा, तेथें तुझ्या पुत्रांची द्यूतासारख्या अनर्थांतहि स्वार्थबुद्धि, द्यूतरूपी

अनर्थ व त्यामुळें उपस्थित झालेलें महाभय, हें सर्व मीं ऐकिलें. तेव्हां कौरवांना भेटण्याच्या इच्छेनें मी तुझ्याकडे आलों आहें.

हे प्रभो, तुझ्यावर माझा अतिशय स्नेह आहे, त्यामुळें तूं मला सर्वदा प्रिय आहेस. यास्तव हे राजन्, तूं आणि भीष्म जीवंत असतांना पांडव आणि कौरव यांमध्यें असें वैर उत्पन्न होणें योग्य नव्हे. तुझे पुत्र परस्परांशीं असा कलह कसा करितात! हे राजा, तूं या सर्वांचा आधारस्तंभ असल्यामुळें त्यांचा निग्रह व अनुग्रह करण्यास समर्थ आहेस. असें असून हा घोर अनर्थ कसा उद्भवला? तूं त्याची उपेक्षा कशी करितोस! हे कुरुनंदना, तुझ्या सभेमध्यें लुटारूप्रमाणें जो प्रकार घडला, त्यामुळें तूं तापसांच्या समागमांत शोभत नाहींस.

( ३ ) राजा जनमेजया, धृतराष्ट्राला असें बोलून तो भगवान् मैत्रेय ऋषि असहिष्णु दुर्योधनाकडे वळून मधुर वाणीनें त्याला म्हणाला—" हे वक्त्यांतील श्रेष्ठ दुर्योधना, माझें हें हितवचन ऐक. तुझ्या कल्याणासाठीं मी तें तुला सांगत आहें. हे पुरुषश्रेष्ठा, तूं पांडवांशीं द्रोह करूं नको, त्यांतच तुझें स्वतःचें, पांडवांचें, कौरवांचें आणि सर्व लोकांचें परम हित आहे.

हे धार्तराष्ट्रा, ते सर्वहि नरव्याघ्र पांडुपुत्र पराक्रमी योद्धे आहेत. त्यांना दहा हजार हत्तींचें सामर्थ्य असून ते सर्वहि वज्रासारखे दृढ आहेत. ते पांची भ्राते सत्यव्रत धारण करणारे असून अतिशय मानी आहेत. त्यांनीं हिडिंब, बक इत्यादि देवशत्रु मायावी राक्षसांचा वध केला आहे. हे राजपुत्रा, ते महात्मे पांडव येथून निघून जात असतांना मार्गामध्यें किर्मीरराक्षस भयंकर रूप धारण करून एखाद्या अचल पर्वताप्रमाणें त्यांचा मार्ग अडवून उभा राहिला. तेव्हां बलवानांतील श्रेष्ठ व युद्धप्रिय भीमसेनानें, व्याघ्र जसा क्षुद्र मृगाला मारितो, तसा त्या भयंकर राक्षसाचा वध केला.

हे भरतकुलोत्पन्ना, दिग्विजयप्रसंगीं एकट्या भीमसेनानें दहा हजार हत्तींचें बल असलेल्या महाधनुर्धर जरासंधाचा कसा निःपात केला त्याचें स्मरण कर. हे गांधारेया, साक्षात् भगवान् वासुदेव ज्यांचा आप्तसंबंधी आहे व पृषतराजाचे पुत्र ज्यांचे श्यालक आहेत अशा सहायसंपन्न बलाढ्य वीरांशीं कोणता जरा-मरणवान् पुरुष युद्धांत टिकाव धरील! यास्तव तूं पांडवांशीं सख्य कर. व्यर्थ क्रोधवश होऊं नकोस. माझें एवढें वचन ऐक."

राजा, याप्रमाणें तो मैत्रेय-ऋषि बोलत असतां दुरात्म्या दुर्योधनानें आपली हत्तीच्या सोंडेसारखी पुष्ट मांडी हातानें थोपटली व स्मित करून तो पायानें भूमीवर रेघा काढीत बसला. तो दुर्बुद्धि धृतराष्ट्रपुत्र कांहीं न बोलतां खालीं मान घालून पायानें भूमि उकरीत स्वस्थ बसला आहे व आपल्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत आहे, हें पाहून मैत्रेयाला क्रोध आला आणि कोपाविष्ट झालेला तो मुनिसत्तम मैत्रेय जणुंकाय दैवानेंच प्रेरित झाल्यामुळें शाप देण्यास प्रवृत्त झाला. त्याचे नेत्र क्रोधानें अग्नीसारखे लाल झाले. त्यानें आचमन केलें आणि दुष्टबुद्धि दुर्योधनाला असा शाप दिला—

मैत्रेय—"ज्या अर्थीं तूं माझा अवमान करून माझें भाषण सावधान चित्तानें ऐकूं इच्छीत नाहींस, त्या अर्थीं तुझ्या या दुरभिमानाचें फल तुला लवकरच प्राप्त होईल. तुझ्या या द्रोहामुळें फार मोठें युद्ध प्रवृत्त होईल आणि त्या महा-युद्धांत बलाढ्य भीमसेन गदाप्रहारानें तुझी हीच मांडी फोडील.

हे पांडवेया, मैत्रेय-मुनीचें हें शापवचन ऐकून राजा धृतराष्ट्रानें त्या ब्रह्मर्षीला शांत केलें व त्याला प्रसन्न करून 'या शापवाणीप्रमाणें घडूं नये' अशी त्याची प्रार्थना केली.

तेव्हां मैत्रेय म्हणाला—हे राजन्, तुझा पुत्र जर शांत राहून पांडवांशीं सख्य करील, तर माझा शाप त्याला बाधणार नाहीं, परंतु तो जर याच्या विपरीत वागला तर माझें शापवचन सत्य होईल.

त्यानंतर भीमाच्या बलाची कल्पना नसल्यामुळें त्यानें राक्षसाचा वध केल्याचें ऐकून विस्मित झालेला राजा धृतराष्ट्र मैत्रेयाला म्हणाला—"हे भगवन्, भीमानें महाबलाढ्य किर्मीरराक्षसाचा वध कसा केला, तें ऐकण्याची माझी इच्छा आहे."

मैत्रेय—हे राजा, तुझ्या पुत्राची ऐकण्याची इच्छा नाहीं. यास्तव मी आतां तुला अधिक कांहीं सांगणार नाहीं. हा मी चाललों. मी गेल्यावर हा विदुर तुला सर्व सांगेल.

असें बोलून मैत्रेयमुनि जसा आला, तसा निघून गेला आणि भीमसेनानें बलाढ्य किर्मीराचा वध केला, हें शत्रूचें यश ऐकून उद्विग्न झालेला दुर्योधनहि सभागृहांतून बाहेर पडला. ३. १. १०.

येथें पहिलें आरण्यकपर्व समाप्त झालें.

# किर्मीरवधपर्व २.



## अध्याय ११ वा.

[ १ पांडवांच्या मार्गाचा निरोध करून उभ्या राहिलेल्या किर्मीराचा युधिष्ठिराशीं संवाद. २ भीमाचें किर्मीराशीं युद्ध व राक्षसाचा वध, यांचा वृत्तांत. ]

( १ ) **वैशंपायन—राजा पारिक्षिता, त्यानंतर किर्मीर-राक्षसाच्या वधाचा वृत्तान्त ऐकण्यास उत्सुक झालेल्या धृतराष्ट्रानें विदुराला म्हटलें—" हे क्षत्त्या, त्या राक्षसाचें व भीमाचें युद्ध कसें झालें? किर्मीरवधाचें सविस्तर वृत्त ऐकण्याची माझी फार इच्छा आहे. "**

**विदुर—हे राजन्, अतिमानुष कर्मे करणाऱ्या भीमसेनानें हें राक्षसवधाचें कर्म कसें केलें, तें सांगतों, ऐक. मी काम्यक-वनांत गेलों असतां तेथें कथा सांगणाऱ्या ब्राह्मणांच्या तोंडून मीं हा वृत्तान्त वारंवार ऐकिला आहे.**

हे नृपश्रेष्ठा, द्यूतामध्यें पराभूत झालेले पांडव येथून निघून जात असतां त्यांनीं तीन अहोरात्र सारखा प्रवास केला व ते मध्यरात्रींच्या सुमारास काम्यक-वनापाशीं आले. राजा, त्या वनांत घोर कर्मे करणाऱ्या मनुष्यभक्षक भयंकर राक्षसांचा नित्य संचार होत असल्यामुळें तापस व गोपाल त्या वनाला दुरूनच वर्ज्य करीत असत.

अशा त्या घोर अरण्यामध्यें राक्षसाविषयीं निर्भय असलेल्या पांडुपुत्रांनीं प्रवेश केला. तेव्हां त्यांना पाहून आरक्त नेत्र असलेला तो भयंकर राक्षस हातांत प्रदीप्त उल्का—चूड घेऊन तेथें आला व आपले दोन्ही बाहु पसरून आणि विकराल मुख वांसून ज्या दिशेकडून हे पांडवश्रेष्ठ येत होते, तो मार्ग अडवून उभा राहिला. त्या भयानक राक्षसाच्या आठ दाढा स्पष्ट दिसत होत्या, त्याचे नेत्र प्रदीप्त अग्नीप्रमाणें तांबडे लाल झाले होते आणि मस्तकावरील केंस उभारले होते. त्यामुळें तो भयानक राक्षस सूर्यकिरण, विद्युच्चक्र व बगळे यांनीं युक्त असलेल्या मेघाप्रमाणें भासला.

त्या भीषण निशाचरानें राक्षसी माया निर्माण करून सजल मेघांच्या प्रचंड नादाप्रमाणें गर्जना केली. त्याच्या त्या नादानें सर्व पक्षी भयग्रस्त झाले.

त्या वनांतील सर्व स्थलचर व जलचर भीतीनें आक्रोश करीत दाही दिशा पळून गेले. त्याच्या गर्जनेनें भयभीत झालेले त्या वनांतील सर्व हिंस्त्र पशु पळून जात असतां जणुंकाय तें वनच चालत आहे, असा भास झाला. त्या बलाढ्य राक्षसाच्या ऊरुवेगानें ताम्र पल्लवांनीं युक्त असलेल्या व दूरवर पसरलेल्या लता वृक्षांना जाऊन भिडल्या. त्याच वेळीं सोंसाट्याचा वायु वाहूं लागल्यामुळें आकाश धूळीनें भरून गेलें व नक्षत्रें दिसेनातशीं झालीं.

राजा, पांच विषयांसाठीं इंद्रियें व्याकुळ झालीं असतां जसा अतुल संताप उद्भवतो, त्याप्रमाणें पांच पांडुपुत्रांचा तो अज्ञात महारिपु प्रादुर्भूत झाला व त्या राक्षसानें कृष्णाजिनें पांघरलेल्या पांडवांना दुरून येत असलेलें पाहून मैनाक पर्वताप्रमाणें त्या वनाचें द्वार अडवून धरिलें. पूर्वीं कधींहि न पाहिलेल्या त्या भीषण राक्षसाला पाहून कमलनयना पांचालीनें भयभीत होऊन आपले नेत्र मिटले. त्या वेळीं पांच पर्वतांच्या मधून वाहणाऱ्या नदीप्रमाणें ती कृष्णा पांच पांडवांच्या मध्यें आकुल झाली. तिच्या मस्तकावरील दुःशासनाच्या हातून सुटलेले केंस अस्ताव्यस्त झाले होते व ती अत्यंत शोकाकुल होऊन चालली असतां मूर्छित झाली. तेव्हां पांची इंद्रियें विषयप्रीतीला जशीं धरून ठेवितात, त्याप्रमाणें त्या पांची भ्रात्यांनीं तिला सांवरून धरिलें.

त्यानंतर धौम्यमुनीनें रक्षोघ्न मंत्रांचा यथाविधि उच्चार करून तेथें उत्पन्न झालेल्या राक्षसीमायेचा पांडवांच्या समक्ष नाश केला. तेव्हां आपली माया नष्ट झालेली पाहून त्या बलाढ्य काममूर्ति, क्रूर राक्षसानें क्रोधानें डोळे वटारिले असतां तो मूर्तिमंत कल्पान्तकालासारखा दिसला.

त्या वेळीं महाप्राज्ञ युधिष्ठिरानें त्याला विचारिलें—"हे वीरा निशाचरा, तूं कोण, कोणाचा, आम्हीं तुझें कोणतें कार्य करावें, तें मला सांग." तेव्हां तो राक्षस धर्मराज युधिष्ठिराला म्हणाला—"मी बकाचा भ्राता प्रसिद्ध किर्मीर आहें. या निर्जन काम्यकवनांत मी सुखानें रहातों आणि युद्धांत मनुष्यांना जिंकून त्यांच्यावर उपजीविका करितों. माझे भक्ष्यभूत होऊन माझ्यापाशीं आलेले तुम्ही कोण अहांत? आतां मी तुम्हां सर्वांना युद्धांत जिंकून भक्षण करीन व तृप्त होईन.

हे भरतश्रेष्ठा, त्या दुरात्म्याचें तें वचन ऐकून युधिष्ठिरानें त्याला आपलें नामगोत्रादि सर्व कथन केलें.

युधिष्ठिर म्हणाला—हे राक्षसा, तूं जर पूर्वी कधीं धर्मराजाचें नांव ऐकिलें असशील तर तोच मी पांडव युधिष्ठिर आहें. राज्यभ्रष्ट झालेला मी भीमसेन, अर्जुन इत्यादि या माझ्या भ्रात्यांसह वनांत निवास करण्याच्या निश्चयानें तुझ्या या घोर वनांत आलों आहें.

तेव्हां किर्मीर म्हणाला—माझ्या भाग्यानेंच आज ही मोठ्या आनंदाची गोष्ट घडून आली. माझा फार दिवसांचा मनोरथ पूर्ण होण्याचा काल आज प्राप्त झाला आहे. या भीमसेनाच्या वधासाठीं मी सतत आयुध सज्ज करून सगळ्या पृथ्वीवर हिंडलों; परंतु मला तो कोठेंच आढळला नाहीं. आज हा अनायासेंच येथें आला, हें फार चांगलें झालें. माझ्या भ्रात्याचा वध करणाऱ्या त्या दुष्टाची मी फार दिवसांपासून वाट पहात आहें.

पूर्वी एकचक्रानगरींत या भीमानेंच ब्राह्मणाचा कपटवेष धारण करून माझ्या प्रिय बक-भ्रात्याचा वध केला. त्यानें स्वतःच्या शरीरबलानें हा पराक्रम केला नसून मंत्रबलाच्या आश्रयानें त्या बलवानाचा प्राण घेतला. वनांत फिरणारा हिडिंब माझा प्रिय सखा होता. त्याचाहि वध करून या दुरात्म्यानें त्याच्या भगिनीला हरण केलें. तो हा मूढ मानव आज माझ्या या गहनवनांत, मध्यरात्रीं, आमच्या संचारकालीं, आला आहे. आतां मी माझें फार दिवसाचें वैर साधीन आणि त्याला मारून त्याच्या विपुल रक्तानें बकाचें तर्पण करीन.

राक्षसांच्या मार्गांत कंटकाप्रमाणें असलेल्या या भीमाला गतप्राण करून मी माझ्या भ्रात्याच्या व मित्राच्या ऋणांतून मुक्त होईन. हे युधिष्ठिरा, पूर्वी जो भीम बकाच्या हातून जिवंत सुटला त्याला आज मी तुझ्या समक्ष भक्षण करितों, पहा. पूर्वी अगस्त्यमुनीनें महा असुर वातापीला जसें पचविलें त्याप्रमाणें मी आतां या पुष्ट भीमसेनाचें विपुल मांस भक्षण करून तें पचवीन.

राजा धृतराष्ट्रा, तो राक्षस असें बोलला असतां सत्यप्रतिज्ञ युधिष्ठिरानें क्रोधानें त्याची निर्भर्त्सना करून ' असें होणार नाहीं ' असें म्हटलें. त्या वेळीं बलाढ्य भीमसेनानें मोठ्या त्वरेनें दहा वाव उंच असलेला एक विशाल वृक्ष उपटला व त्याच्या शाखांचीं सर्व पानें खुडून टाकिलीं. इतक्यांत विजयी अर्जुनानेंहि आपलें वज्रतुल्य प्रचंड गांडीव धनुष्य तत्काल सज्ज केलें. परंतु मेघगर्जनेप्रमाणें धनुष्याचा टणत्कार करणाऱ्या त्या पार्थाचें निवारण करून भीमसेन ' थांब थांब ' असें म्हणत त्या राक्षसावर धांवून गेला.

(२) हे कौरवेश्वरा, अर्जुनाचें निवारण करीत असतांना त्या क्रुद्ध झालेल्या बलवान् भीमसेनानें आपली कंबर बांधली, हातांनीं दंड थोपटले, ओंठ चावले आणि वृक्ष हेंच आयुध हातीं घेऊन वेगानें त्याच्यावर चाल केली. हे धृतराष्ट्रा, इंद्र जसा वज्रप्रहार करितो, तसा त्या बलाढ्य वृकोदरानें यमाच्या कालदंडासारख्या त्या वृक्षाचा राक्षसाच्या मस्तकावर वेगानें प्रहार केला. परंतु त्यायोगें तो राक्षस भ्रांत झाला नाहीं. उलट त्यानें आपली प्रज्वलित चूड भीमावर फेंकली. तेव्हां त्या युद्धविशारद भीमसेनानें आपल्या डाव्या पायानें ती चूड राक्षसाच्या अंगावर उडविली.

त्या वेळीं किर्मीर-राक्षसानें एकदम एक वृक्ष उपटून घेतला व तो यमाप्रमाणें क्रुद्ध होऊन भीमाच्या अंगावर धांवून गेला. त्या दोघां बलाढ्य योद्ध्यांच्या वृक्षयुद्धानें त्या वनांतील वृक्षांचा नाश झाला. पूर्वीं वाली व सुग्रीव या दोघां भ्रात्यांच्या तारेसाठीं झालेल्या युद्धाप्रमाणेंच हा घोर संग्राम झाला.

हे महाराज, त्या दोघां बलाढ्य वीरांनीं परपस्परांच्या मस्तकावर वेगानें फेंकलेल्या वृक्षांचे अनेक तुकडे झाले. दोन मत्त गज कमलवन जसें तुडवितात त्याप्रमाणें त्यांनीं त्या वनांतील अनेक वृक्ष तृणाप्रमाणें तुडविले. त्यामुळें त्या महावनांतील वृक्ष वल्कलें पसरल्याप्रमाणें शोभले. याप्रमाणें त्या प्रमुख राक्षसाचें व श्रेष्ठ मानवाचें वृक्षयुद्ध दोन घटका चाललें होतें.

हे भरतश्रेष्ठा, त्यानंतर त्या क्रुद्ध झालेल्या राक्षसानें एक विशाल शिला उचलून ती युद्धाला उभ्या राहिलेल्या भीमावर फेंकिली. परंतु त्यामुळें भीमसेन आपल्या स्थानापासून चलित झाला नाहीं. तेव्हां राहु जसा किरणांचा प्रतिकार करून सूर्याला ग्रासतो, तसा तो राक्षस आपले बाहु पसरून शिलेच्या आघातानें किंचित् स्तब्ध झालेल्या भीमावर धांवून गेला.

त्या वेळीं परस्परांस ओढून आंवळणारे ते दोघे योद्धे मत्त वृषभांसारखे शोभले. दोन दृप्त व्याघ्रांप्रमाणें नखें व तीक्ष्ण दाढा याच आयुधांनीं एकमेकांवर भयंकर प्रहार करणाऱ्या त्या दोघांचें तुमुल युद्ध झालें.

दुर्योधनानें केलेला तिरस्कार, स्वतःचें बाहुबल आणि दुःशासन ओढीत असतांना कृष्णेनें केलेला दृष्टिक्षेप, यांनीं अगोदरच अतिशय क्रुद्ध झालेला वृकोदर आपल्या अलौकिक सामर्थ्यानें वृद्धि पावला आणि एक मदोन्मत्त हत्ती दुसऱ्या हत्तीला जसें धरितो, त्याप्रमाणें त्यानें मोठ्या त्वेषानें आपल्या दोन्ही बाहूंनीं

त्या राक्षसाला धरिलें. तेव्हां त्या पराक्रमी किर्मीरानेंहि त्याला तसेंच धरिलें. पण बलाढ्य भीमानें त्याला दूर उडवून दिलें. त्या दोघां बलाढ्य वीरांच्या भुजघर्षणापासून घोर ध्वनि उत्पन्न झाला.

राजा, जळत असलेल्या फार मोठ्या वेळूचा जसा स्फोट होतो तसाच तो भयंकर शब्द झाला. इतक्यांत चपल वृकोदरानें त्या राक्षसाला मधोमध धरिलें व प्रचंड वायु वृक्षाला जसा हालवितो, त्याप्रमाणें वेगानें त्याला हालविलें. बलाढ्य भीमानें त्या दुर्बलाला बाहुयुद्धांत असें जर्जर केलें असतां, तो नरभक्षक राक्षस यथाशक्ति हालचाल करीत राहिला. पण हा आतां अतिशय थकला आहे, असें पाहून एखाद्या पशूला दोरीनें जसें बांधावें, तसें वृकोदरानें आपल्या दोन्ही भुजांनीं त्याला घट्ट आवळून धरिलें. तेव्हां तो धिप्पाड राक्षस फुटलेल्या दुदुंभीप्रमाणें आक्रोश करूं लागला. तथापि भीमानें यथाशक्ति धडपड करणाऱ्या त्या दुरात्म्याला दीर्घकाल गरगर फिरविलें. आतां हा राक्षस अतिशय थकून देहभान विसरला आहे, असें पाहून त्या पराक्रमी कुंतीपुत्रानें आपल्या एका हातानें त्याचे दोन्ही हात धरून दुसऱ्या हातानें त्याला पशूप्रमाणें बुकलून मारण्यास आरंभ केला. शेवटीं वृकोदरानें त्या दुरात्म्याच्या कटीप्रदेशीं जोरानें गुडघा टेकून व त्याचा कंठ आपल्या दोन्ही हातांनीं दाबून त्याला अतिशय पीडा दिली. तेव्हां त्याचें सर्वांग जर्जर झालें असून नेत्र फिरले आहेत असें पाहून भीमसेनानें त्या राक्षसाधमाला गरगर फिरवून भूमीवर आपटलें व त्याला म्हटलें—"हे पापात्म्या, तूं आतां हिडिंब आणि बक यांच्या अश्रूंचें परिमार्जन यमसदनीं गेल्यावरहि करशील !"

असें बोलून त्या अति क्रुद्ध पुरुषश्रेष्ठानें, ज्याचीं वस्त्राभरणें अस्ताव्यस्त झालीं आहेत व जो मूर्च्छित होऊन हात-पाय झाडीत आहे, अशा त्या राक्षसाला गतप्राण करून सोडिलें. याप्रमाणें भीमाच्या हातून मेघासारखा धिप्पाड असलेला तो राक्षस नाश पावला असतां कृष्णेसह ते विजयी राजपुत्र हृष्ट चित्तानें भीमाच्या अनेक गुणांची प्रशंसा करीत तेथून द्वैत-वनांत रहावयास गेले.

हे कौरवाधिपा, याप्रमाणें धर्मराजाच्या आज्ञेनें भीमसेनानें किर्मीर-राक्षसाला बाहुयुद्धांत मारिलें. त्यानंतर विजयी धर्मज्ञ युधिष्ठिर ते वन निष्कंटक करून द्रौपदीसह तेथें राहूं लागला. त्या पांची भरतश्रेष्ठांनीं द्रौपदीचें समाधान केलें व हर्षानें आणि स्नेहानें वृकोदराची प्रशंसा केली. हे राजन्, याप्रमाणें भीमाच्या

बाहुबलानें तें वन सर्वांना सुखावह झालें व ब्राह्मणादि-गोपालान्त सर्व मानव तेथें सुखानें राहूं लागले.

हे भारता, मीं काम्यकवनांत जात असतां मार्गांत तो दुष्टात्मा भीमाच्या प्रभावानें गतप्राण होऊन अस्ताव्यस्त पडलेला पाहिला. त्या राक्षसाला पाहूनच मी भयभीत झालों. पुढें काम्यक-वनांत गेल्यावर तेथें जमलेल्या ब्राह्मणांच्या तोंडून मीं हें भीमाचें अद्भुत कर्म ऐकिलें.

राजा जनमेजया, विदुराच्या तोंडून किर्मीरवधाचा हा वृत्तान्त ऐकून राजा धृतराष्ट्र चिंतातुर झाला व दुःखानें आर्त होऊन दीर्घ व उष्ण निःश्वास सोडूं लागला. ३. २. ११.

येथें दुसरें किर्मीरवधपर्व समाप्त झालें.

---

# अर्जुनाभिगमनपर्व ३



## अध्याय १२ वा.

[ १ पांडवांच्या दर्शनासाठीं भोजादिकांचें आगमन. २ कौरवांचा वध करण्यास उद्युक्त झालेल्या कृष्णाचें अर्जुनानें स्तुतीनें केलेलें निवारण. ३ कृष्णेचा विलाप. ४ कृष्णादिकांनीं केलेलें तिचें सांत्वन. ]

( १ ) **वैशंपायन म्हणाला**—हे पांडवेया, भोजवीर व अंधकांसह वृष्णिवीर पांडव दुःखानें अतिशय संतप्त होऊन आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें वनांत निघून गेले आहेत, असें ऐकून त्या काम्यकवनांत त्यांना भेटावयास गेले. त्याचप्रमाणें पांचालराजाचे बांधव, धृष्टकेतु, चेदिराज व लोकप्रसिद्ध पराक्रमी केकयदेशाधिपति भ्राते क्रोधसंतप्त होऊन पांडुपुत्रांची भेट घेण्यासाठीं वनांत गेले. त्या सर्वांनीं दुर्योधनाच्या कृत्याची निर्भर्त्सना करून 'आम्हीं तुम्हांला कोणतें साह्य करावें?' असें विचारिलें.

---

१ याप्रमाणें अधर्मरुचि दुर्योधनादिकांना व्यासादि-आप्तांनीं उपदेश केला असतां, मैत्रेयानें शाप दिला असतां व किर्मीरवधामुळें महाभय उपस्थित झालें असतांहि त्यांच्या मनांत धर्मरुचि उत्पन्न झाली नाहीं, हें येथवर सांगितलें. आतां या अध्यायांत धर्मबुद्धि पांडवांवर परमेश्वराचा व इतरांचाहि अनुग्रह कसा होता, तें सांगून त्यांना कृष्णाच्या स्वरूपाचें ज्ञान होतें, असें वर्णन केलें आहे.

ते सर्व क्षत्रियश्रेष्ठ वासुदेवाला पुढें करून धर्मराजाच्या सभोंवार बसले असतां त्या कुरुश्रेष्ठ युधिष्ठिराला अभिवादन करून खिन्न झालेला केशव म्हणाला—" दुर्योधन, कर्ण, शकुनि व चवथा दुःशासन यांचें रक्त भूमि प्राशन करील. समरांगणांत त्या दुरात्म्यांचा वध करून आणि त्यांना साह्य करणाऱ्या सर्व भूपालांना जिंकून आम्ही सर्व धर्मराज युधिष्ठिराला राज्याभिषेक करूं. कारण ' कपटाचरण करणारांचा वध करावा ' असा सनातन धर्म आहे. "

राजा, पांडवांच्या पराभवानें व दुःखानें क्रुद्ध झालेला जनार्दन त्यावेळीं जणुकाय प्रजेला जाळीतच आहे, असा भासला. तेव्हां अर्जुनानें पुरुष, अप्रमेय, सत्य, अमिततेजस्वी, प्रजापतींचाहि पति, विष्णु, लोकनाथ व बुद्धिमान् अशा त्या महात्म्याच्या पूर्व देहांतील कर्मांचें संकीर्तन केलें. ' तपस्व्यांना क्षमाच उचित आहे ' असें प्रदर्शित करण्यासाठीं भगवानाच्या क्रोधाची निवृत्ति व्हावी म्हणून येथें त्याच्या जन्मान्तरांतील तपाचाच उल्लेख करीत अर्जुन म्हणाला—

( २ ) " हे जनार्दना, तूं पूर्वीं दहा सहस्र वर्षें गंधमादन पर्वतावर संचार केलास. त्या वेळीं जेथें संध्याकाळ होईल, तेथेंच गृह समजून रहात होतास. हे कृष्णा, तूं पूर्वीं केवल जलप्राशन करून पुष्करतीर्थावर हजारों वर्षें राहिलास.

---

१ भगवान् आत्मरूपानें सर्व प्राणिशरिरांत शयन करीत असल्यामुळें पुरुष; अहंकारादिकांप्रमाणें तो प्रमाणांचा विषय होत नसल्यामुळें अप्रमेय; त्रिकालाबाधित असल्यामुळें सत्य; देशतः, कालतः व वस्तुतः परिच्छेदशून्य चिन्मात्रत्वामुळें अमित तेजस्वी; सूत्र व विराडात्मा, याचाहि स्वामी असल्यामुळें प्रजापतींचाहि पति; व्यापकत्वामुळें विष्णु; अंतर्यामित्वामुळें लोकनाथ. याप्रमाणें ' तत्त्वमसि ' या महावाक्यांतील ' तत्पदार्थ ' सांगून ' त्वंपदार्थ ' सांगण्यासाठीं त्याला ' बुद्धिमान् ' असें म्हटलें आहे. बुद्धि ही ज्याची उपाधि आहे, असा ' त्वं ' पदार्थ जीव आणि मायोपाधिक ' तत्पदार्थ ' ईश्वर यांच्या वाचक पदांचें येथें सामानाधिकरण्य असल्यामुळें म्ह० 'धीमतः' व 'सत्यकीर्तेः' इत्यादि विशेषणें एका विभक्तींत योजिलीं असल्यामुळें जीवेश्वरांचा अभेद व्यक्त होतो. धीमान् जीव हा ' त्वं'-पदवाच्यार्थ म्ह० ' त्वं'-पदाचा रूढ अर्थ व पुरुषादि-विशेषणांनीं विशिष्ट ईश्वर हा ' तत्पद '-वाच्यार्थ असून त्या दोहोंतील बुद्धि व माया या उपाधि सोडल्या असतां चिन्मात्र-स्वरूप परमात्म्याचें ऐक्य सिद्ध होतें.

विशाल बदरिकाश्रमांत तूं दोन्ही बाहू वर करून वायुभक्षण करीत शंभर वर्षें एका पायावर उभा राहिलास.

हे मधुसूदना, ज्यानें आपल्या अंगावरील उत्तरीय वस्त्रहि टाकिलें आहे आणि ज्याच्या शरीरांतील शिरांचें जाळें अविच्छिन्न दिसत आहे, असा तूं अतिशय कृश होऊन सरस्वतीच्या तीरावरील द्वादशवार्षिक सत्रांत राहिला होतास. पुण्यवानांना प्रिय असलेल्या प्रभासतीर्थाला प्राप्त होऊन तूं तेथें दिव्य सहस्र वर्षें एका पायावर नियमयुक्त होऊन स्थित झालास. तुझें हें सर्व कष्टकर तप लोकप्रवृत्तीसाठींच होतें, असें मला व्यासानें सांगितलें आहे.

हे अच्युता, अन्नमय, प्राणमय इत्यादि पंचकोशात्मक सर्व कार्यरूप क्षेत्राला तूं प्रकाशित करितोस, म्हणूनच तुला 'क्षेत्रज्ञ' म्हणतात. तूं सर्व भूतांचें परम कारण व लयस्थान आहेस. हे ईश्वरा, तूं सर्व तपांचें निधान व सनातन यज्ञ आहेस. अहंकारानें भूमीच्या ठिकाणीं प्रथम उत्पन्न केलेल्या नरकासुराला मारून तूं रत्नकुंडलें आणिलींस व यज्ञिय अश्व सोडिलास. त्यानंतर सर्व लोकांतील श्रेष्ठ व सर्व लोकांना जिंकणाऱ्या तूं एकत्र जमलेल्या सर्व दैत्य-दानवांना मारिलेंस. नंतर, हे प्रभो, तूं शचीपति इंद्राला सर्वेश्वरत्व देऊन आतां मनुष्यामध्यें प्रादुर्भूत झाला आहेस.

हे गोविंदा, तूं भूस्थानीय शुद्ध चिन्मात्र असून नराख्य परमेश्वरानें उत्पन्न केलेलें जें नारसंज्ञक स्थूल, सूक्ष्म व कारणरूप उपाधित्रय तेंच तुझें अयन म्ह० निवासस्थान आहे. त्यामुळें तूंच वृक्ष-अंकुर-बीजस्थानीय विराट्-सूत्रात्मा व अन्तर्यामी, एतद्रूप होऊन हरि झालास म्ह० ज्यामध्यें परिपक्क झालेलीं हजारों बीजें आहेत, असा फलस्थानीय सांबमूर्ति झालास. ब्रह्मा, सोम, सूर्य, धर्म, धाता, यम, अनल, वायु, वैश्रवण, रुद्र, काल, आकाश, पृथ्वी, दिशा इत्यादि सर्व किंचित् पिकलेल्या फलासारखे पदार्थ आणि यांहून भिन्न असलेले, उत्तम भूस्थानिय व निर्विशेष चिन्मात्ररूप ब्रह्मा, विष्णु व महेश्वर तूंच आहेस.

---

१ येथें सृष्टीच्या ठिकाणीं वृक्षाचें रूपक केलें आहे. शुद्ध चिन्मात्र परमात्मा हीच भूमि, उपाधित्रयविशिष्ट नारायण हेंच स्थान, अंतर्यामी, सूत्रात्मा व विराट् हेच क्रमानें बीज, अंकुर व वृक्ष, हरी हींच त्यावरील असंख्य बीजें धारण करणारीं पक्क फळें. ब्रह्मादि हींच किंचित् पक्क फळें व ब्रह्मा-विष्णु-महेश हींच त्या बीजांच्या पुनरुद्भवाची दुसरी भूमि होय.

हे केशवा, चैत्ररथ-वनामध्यें तूं याग केलास. तूं देवश्रेष्ठ व अति तेजस्वी असूनहि सर्वोत्कृष्ट परमात्म्याची आराधना केलीस. हे जनार्दना, त्यांतील एकेका यज्ञामध्यें तूं हजारों सुवर्णांची[1] पूर्ण दक्षिणा दिलीस.

हे यादवनंदना, तूं अदितीच्या पुत्रत्वाला प्राप्त होऊन इंद्राचा कनिष्ठ भ्राता 'विष्णु' या नांवानें प्रसिद्ध झालास. हे परंतपा, तूं त्या वेळीं बटुरूप धारण करून आपल्या तीन पावलांनीं क्रमानें भूलोक, भूवर्लोक व सुवर्लोक या त्रैलोक्यास स्वतेजानें व्यापिलेंस. तूं सर्व आकाशाला व्यापून सूर्याच्या देहरथांत बसलास आणि हे भूतात्म्या, आपल्या तेजानें आदित्य-देहाभिमानी भास्कराख्य जीवाला प्रकाशित केलेंस.

हे विभो, तूं आपल्या भिन्न भिन्न अवतारांमध्यें शेकडों अधर्मरुचि असुरांना मारिलेंस. मुरु-दैत्याचे पाश तोडिलेस. सुंद व नरक यांना मारिलेंस व प्राग्ज्योतिष-नगराचा मार्ग पुनः सुखावह केलास. जारुथी-नगरीमध्यें तूं आहुति, क्राथ, शिशुपाल, जरासंध, शैब्य व शतधन्वा यांना जिंकून सूर्यासारख्या तेजस्वी व मेघाप्रमाणें घोष करणाऱ्या रथांत रुक्मिणीला बसवून तिचें हरण केलेंस. त्यामुळें ती भोज्या तुझी महिषी झाली.

तूं क्रोधानें इंद्रद्युम्न, कसेरुमान् यवन, सौभपति शाल्व यांस मारून शाल्वाच्या सौभ-नगराचा विध्वंस केलास. याप्रमाणें तूं युद्धांत शत्रूंना मारिलेंस. तूं आणखीं कोणाकोणाला मारिलेंस तेंहि सांगतों, ऐक. इरावतीमध्यें कार्तवीर्याप्रमाणें प्रबल असलेल्या भोजाचा युद्धांत वध केलास. हे जनार्दना, सर्व उपभोगांनीं संपन्न व ऋषींना प्रिय असलेल्या द्वारकानगरीला आत्मसात् करून म्ह० ती आपलीशी करून घेऊन शेवटीं तूं तिलाहि समुद्रांत बुडविणार आहेस.

हे मधुसूदना, तुझ्या ठिकाणीं क्रोध, मात्सर्य, अनृत व निर्दयत्वहि जर नाहीं, तर अनृजुत्व तरी कोठून असणार! हे अच्युता, हृदयपुंडरीकाख्य आध्यात्मिक गुहेमध्यें व ब्राह्म देवालयादिकांत स्थित होऊन स्वतेजानें प्रकाशमान होणाऱ्या तुझ्या समीप येऊन सर्व ऋषि अभयाची याचना करितात.

---

१ प्राचीनकाळीं 'सुवर्ण' या नांवाचें होनासारखें एक नाणें होतें.

हे मधुसूदना, युगान्तसमयीं तूं सर्व भूतांचा आपल्यामध्यें उपसंहार करून व सर्व जगत् आत्मसात् करून स्वरूपानेंच स्थित होतास. त्यानंतर युगाच्या आरंभीं तुझ्या नाभिकमलापासून चराचरगुरु ब्रह्मा उत्पन्न झाला. हें सर्व जगत् ही त्याचीच कृति असून तो चतुर्मुख देव तुझी आज्ञा शिरसा मान्य करितो.

हे वार्ष्णेया, मधु व कैटभ हे दोन घोर दानव त्या चतुर्मुखाला मारावयास उद्युक्त झाले. तेव्हां त्यांचा तो व्यतिक्रम पाहून क्रुद्ध झालेल्या तुज हरीच्या ललाटापासून शूलपाणि, त्रिलोचन शंभु उत्पन्न झाला. ते दोघे देवेश्वर तुझ्या शरीरापासून उत्पन्न झाले व ते तुझ्याच आज्ञेंत स्थित आहेत, असें मला नारदानें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें हे नारायणा, पूर्वीं तूं चैत्ररथ-वनांत विपुल दक्षिणायुक्त क्रतूंनीं महासत्र केलेंस. तूं आपल्या बालपणींच बलरामासह पूतनावधादि जीं अलौकिक कर्में केलीं आहेस, तशीं पूर्वीं कोणीं केलीं नाहींत व यापुढेंहि कोणी करणार नाहीं. फार काय, पण तूं कैलासभवनामध्येंहि ब्राह्मणांसह वास्तव्य केलें आहेस."

राजा जनमेजया, महात्म्या कृष्णाच्या प्रभावाचें असें वर्णन करून अर्जुन मुकाट्यानें बसला असतां जनार्दन त्यास म्हणाला—"हे पार्था, तूं माझाच आहेस व मीहि तुझा आहें व जे माझे आहेत तेहि तुझेच आहेत. जो तुझ्याशीं द्वेष करितो तो माझाच द्वेष करितो व जो तुला अनुकूल असतो तो मलाहि अनुकूल आहे. कारण जीव हें ब्रह्माचेंच स्वरूप आहे व ब्रह्म हें जीवाचें शुद्ध स्वरूप आहे. मज ब्रह्माच्या ठिकाणीं सर्वेश्वरत्वादि जे औपाधिक धर्म आहेत, ते सर्व तुज जीवाचेहि आहेत. यास्तव जो तुज जीवाचा द्वेष करितो, तो मज ब्रह्माचाहि द्वेष करितो. जो जीवाच्या निरुपाधिक स्वरूपाला प्राप्त होतो, तो ब्रह्मरूपच होतो. यास्तव सर्व भूतांतील द्रोहबुद्धि टाकून भगवद्भाव ठेवावा.

हे शत्रुनाशका अर्जुना, तूं अजिंक्य नर असून मी नारायण हरि आहें. आपण दोघे नर-नारायण ऋषि असून सांप्रत कांहीं कारणानें या लोकास प्राप्त झालों आहों. हे पार्था, दोन जीवलग मित्रहि परस्परांस 'तूं माझा आत्मा आहेस' असें म्हणतात. पण तो त्यांचा अभेद औपचारिक असतो. कारण त्यांचा भेद प्रत्यक्ष अनुभवास येतो. पण आम्हां नर-नारायणांचा भेद तसा औपचारिक नाहीं. तर हे पार्था, तूं मजहून पृथक् नाहींस व मी तुजहून पृथक् नाहीं. आम्हां उभयतांचें स्वरूप केवल चिद्रूप आहे. त्यामुळें हे भरतश्रेष्ठा

मोठमोठ्या पंडितांनीं पदार्थ व वाक्यार्थ यांचा कितीहि ऊहापोह केला म्ह० देहभेदामुळें आत्मभेद आहे किंवा आत्माच स्वरूपतः भिन्न आहे, इत्यादि विकल्पपूर्वक कितीहि जरी तर्क केले, तरी आम्हां उभयतांतील भेद कधींहि कोणाच्या प्रतीतीला येणें शक्य नाहीं. मुक्तात्मा जीव व ईश यांचा घटाकाश व मठाकाश यांप्रमाणें स्वरूपतः भेद नाहीं.

( ३ ) हे पांडवेया, महात्म्या केशवानें धनंजयाला असें सांगितलें असतां व तो वीर राजसमूह अतिशय क्षुब्ध झाला असतां धृष्टद्युम्न-प्रभृति वीर-भ्रात्यांनीं परिवेष्टित झालेली साध्वी पांचाली आपल्या भ्रात्यांसह आसनावर बसलेल्या पुंडरीकाक्षापाशीं आली व क्रुद्ध होऊन आपल्या संरक्षणाची इच्छा करणारी ती भामिनी शरण्य हरीला असें वचन [1]बोलली—

“ हे कृष्णा, पूर्वीं सृष्टीच्या उत्पत्तिकालीं ‘ सदेव सोम्य इदमग्र आसीत् ’ (छां. भा. अ. ६. २. १ पृ. ४१५) इत्यादि श्रुति तुला एक म्हणतात. सर्व प्रजेची उत्पत्ति केल्यानंतर त्याच तुला ‘ सर्वस्य वशी सर्वस्य ईशानः’ (बृ. भा. ४. ४. १२. पृ. ३३२.) इत्यादि श्रुति ‘प्रजापति’ म्हणतात. पण तुझें तें ईश्वरत्वहि राजाप्रमाणें नाहीं. तर वस्त्राच्या तंतूंप्रमाणें उपादानत्वानें आहे. याच आशयानें असित देवलानें तुला सर्व लोकांचा स्रष्टा म्हटलें आहे. ‘ अंतःप्रविष्टः शास्ता जनानाम्० ’ अशी श्रुति असल्यामुळें तूं विष्णु म्हणजे सर्व शरीरांत प्रवेश करणारा अंतर्यामी आहेस. हे मधुसूदना, तूं दुर्धर्ष, यज्ञ-याग करणारा व ज्याला उद्देशून याग करावयाचा तो यष्टव्य देव आहेस, असें जामदग्न्यानें मला सांगितलें आहे.

हे पुरुषोत्तमा, ऋषि तुला क्षमा व सत्य म्हणतात. सत्यापासून तूं यज्ञ-रूपानें उत्पन्न झालास, असें कश्यपानें मला सांगितलें आहे. हे ईश्वरा, तूं साध्य व देव यांचाहि ईश्वर आहेस. तूं भूत व वर्तमान आकाशादि भूत-भौतिकांचा स्रष्टा आहेस, सर्व भूतांचा नियंता आहेस, असें नारदानें मला सांगितलें आहे. हे नरश्रेष्ठा, एखादा शिशु बाहुल्यांशीं जसा खेळतो, त्याप्रमाणें तूं ब्रह्मदेव, शंकर व इंद्रादि देवसमूह यांच्याशीं वारंवार क्रीडा करितोस.

---

१ पूर्वोक्त तत्त्वाचा साक्षात्कार होण्यासाठीं ध्यान, स्तवन, सेवा, इत्यादि उपायांनीं कृष्णालाच शरण जावें, असें या द्रौपदीवाक्यानें येथें सुचविलें आहे.

हे प्रभो, तुझ्या मस्तकानें द्यूलोकाला व्यापिलें आहे. पृथ्वी हेच तुझे दोन पाय आहेत. हे लोक तुझें जठर आहे. यास्तव तूं विश्वरूप सनातन पुरुष आहेस. विद्या म्हणजे वेदाध्ययनरूप ब्रह्मचारि-धर्म, तप म्हणजे वेदविहित कर्माद्यनुष्ठानरूप गृहस्थधर्म आणि कृच्छ्र-चांद्रायणादि वानप्रस्थ धर्म यांनीं तप्त व शुद्धचित्त झालेले व त्यामुळेंच आत्मदर्शनानें तृप्त झालेले जे यति, त्यांचा तूं अतिशय सत्यस्वभाव आहेस. स्वप्न, इंद्रजाल इत्यादि प्रातिभासिक वस्तु हें सत्य, व्यवहार हें सत्यतर व ब्रह्म सत्यतम आहे. यास्तव पूर्वोक्त ऋषींची सत्यतम प्राप्य वस्तु तूंच आहेस.

अच्युता, युद्धांतून परत न फिरणाऱ्या व सर्व धर्मांनीं युक्त असलेल्या राजर्षींचीहि तूंच गति आहेस. तुला दीनांची दया येत असल्यामुळें तूं पापिष्ठांचाहि उद्धार करितोस. तूंच सर्वांचा नियंता, व्यापक व शरीरेंद्रियाकारानें परिणत झालेल्या बुद्ध्यादि भूतांना आत्मत्वानें मानणारा भूतात्मा जीव आहेस. तूंच शुभाशुभादि सर्व कर्मे करितोस. इंद्रादि लोकपाल, भूरादि लोक, अश्विन्यादि नक्षत्रें, पूर्वादि दशदिशा, आकाश, चंद्र-सूर्य इत्यादि सर्व तुझ्या ठिकाणीं प्रतिष्ठित आहे. त्यामुळें लोकपालादि पदांची प्राप्ति करून देणारा तूंच आहेस. सर्वसाधारण जीवांचा संसार व दिव्यदृष्टीनें युक्त असलेल्या सात्त्विकांची मुक्ति हें सर्व लोककार्य तुझ्या ठिकाणींच प्रतिष्ठित आहे.

हे मधुसूदना, याप्रमाणें स्वर्ग व अपवर्ग यांची इच्छा करणाऱ्या श्रेष्ठांनीं तुझाच आश्रय करावा, हें जसें मीं ऋषींच्या तोंडून ऐकलें आहे, तसेंच ऐहिक दृष्ट फलासाठींहि तुलाच शरण जावें, असें त्यांनीं मला सांगून ठेविलें आहे. यास्तव हे भगवन्, मी प्रेमानें तुला आपलें दुःख सांगतें.

कृष्णा, तूं दिव्य व मानुष सर्व भूतांचा ईश आहेस. हे विभो, मी पांडुपुत्रांची भार्या, तुझी सखी आणि धृष्टद्युम्नाची साक्षात् भगिनी असतांना माझ्या सारखीला वैऱ्यांनीं सभेंत ओढून न्यावें, हें तुम्हांला कसें सहन होतें! हे वासुदेवा, त्या वेळीं मी स्त्रीधर्मिणी असून माझें सर्वांग मलिन झालें होतें. माझ्या अंगावर एकच वस्त्र होतें व माझें शरीर भीतीनें थरथर

१ द्रौपदीनें कृष्णाच्या मनांत करुणा उत्पन्न करण्यासाठीं त्याला आपलें दुःख निवेदन केलें व त्याच प्रसंगानें वैराग्य उत्पन्न व्हावें म्हणून मोठ्या प्रभावशाली संसारी जीवांची दुर्गतिहि वर्णिली आहे.

कांपत होतें. अशा स्थितींत अतिशय दुःखित झालेल्या मला त्या नराधमानें कौरवसभेंत ओढून नेलें.

त्या राजसभेमध्यें अतिशय मलिन स्थितींत असलेल्या मला पाहून पापी धृतराष्ट्रपुत्र हंसले आणि हे मुकुंदा, पांडुपुत्र, पंचाल व वृष्णि जिवंत असतांना ते दुर्जन दासीभावानें माझा अभिलाष करूं लागले. हे देवकीनंदना, खरोखर मी भीष्माची व धृतराष्ट्राची धर्मानें स्नुषा असतांना मला त्या दुष्टांनीं बलात्कारानें दासी बनविलें. पण याबद्दल मी त्यांना दोष न देतां युद्धामध्यें श्रेष्ठ असलेल्या या महाबलाढ्य पांडवांनाच दोष देतें. कारण ते आपल्या यशस्वी धर्मपत्नीला शत्रु पीडा देत असतांना खुशाल स्वस्थ पहात बसले !

हे जनार्दना, ज्या माझ्या दोघां वीर पतींनीं क्षुद्र कौरव मला पीडा देत असतांना तें सहन केलें, त्या बलाढ्य भीमसेनाच्या बलाला व धनंजयाच्या गांडीव धनुष्याला धिक्कार असो ! दुर्बल असलेले पतिहि आपल्या भार्येचें रक्षण करितात. स्वभार्येचें रक्षण करणें हा श्रेष्ठांनीं सदा आचरिलेला सनातन धर्ममार्ग आहे. भार्येचें रक्षण केलें असतां प्रजेचें संरक्षण होतें व प्रजेचें रक्षण झालें असतां पतीचा आत्माच सुरक्षित होतो. कारण पत्नीच्या ठिकाणीं पतीचा आत्माच उत्पन्न होतो, म्हणून तिला 'जाया' म्हणतात. त्याचप्रमाणें 'हा माझा भर्ता माझ्या उदरांत कसा बरें उत्पन्न होईल,' या इच्छेनें भार्येनेंहि पतीचें रक्षण करावें, अशी धर्ममर्यादा आहे.

हे वार्ष्णेया, हे पांची वीर शरण आलेल्याचा कधींहि त्याग करीत नाहींत, असा त्यांचा लौकिक आहे. पण 'शरण आलेल्या मज धर्मपत्नीचें यांनीं रक्षण केलें नाहीं,' हें मी तुला त्यांच्या समक्ष सांगतें. या माझ्या पांच पतींपासून मला महापराक्रमी पांच कुमार झाले आहेत; निदान त्यांच्यासाठीं तरी या वीरांनीं माझें रक्षण करावयास पाहिजे होतें !

हे गोविंदा, युधिष्ठिरादिकांपासून क्रमानें झालेले माझे प्रतिविंध्यादि पांची पुत्र सत्यपराक्रमी आहेत. हे मुरारे, तुझ्या प्रद्युम्नाप्रमाणेंच हे महारथ,

१ शाश्वतोऽयं धर्मपथः सद्भिराचरितः सदा । यद्भार्यां परिरक्षन्ति भर्तारोऽल्पबला अपि ॥ भार्यायां रक्ष्यमाणायां प्रजा भवति रक्षिता । प्रजायां रक्ष्यमाणायामात्मा भवति रक्षिता ॥ आत्मा हि जायते तस्यां तस्माज्जाया भवत्युत । भर्ता च भार्यया रक्ष्यः कथं जायान्ममोदरे ॥

धनुर्विद्येंत श्रेष्ठ व युद्धांत शत्रूला अजिंक्य आहेत. ते या दुर्बल धार्तराष्ट्रांचा अपराध कसा सहन करितात! त्या दुरात्म्यांनीं अन्यायानें आमच्या राज्याचा अपहार केला. सर्वांना दास केलें आणि एकवस्त्रा व स्त्रीधर्मिणी असलेल्या मला सभेंत ओढून नेलें.

हे मधुसूदना, स्वतः तूं, भीमसेन किंवा धनुर्धर सव्यसाची या तिघांवांचून श्रेष्ठ गांडीवधनुष्य अन्य कोणाला सज्यहि करितां येणार नाहीं! असे तुम्ही अलौकिक पराक्रमी वीर असूनहि ज्या अर्थीं तो दुरात्मा दुर्योधन क्षणभरहि जिवंत राहूं शकतो, त्या अर्थीं धिक्कार असो भीमसेनाच्या सामर्थ्याला व पार्थाच्या पुरुषार्थाला!

हे यदुनंदना, या दुष्ट कौरवांनीं बालपणापासूनच या पार्थांना क्लेश दिले आहेत. पूर्वीं त्यांनीं या साधु पांडुपुत्रांना मातेसह राष्ट्रांतून दूर घालवून दिलें. हे भ्राते आपल्या कुमारावस्थेंत व्रतस्थ होऊन अध्ययन करीत असतां पापी दुर्योधनानें ताजें, उग्र, दर्शनानेंच अंगावर रोमांच उभे करणारें कालकूट विष भीमाच्या भोजनांत घातलें. पण हे जनार्दना, या भीमसेनाचें आयुष्य अवशिष्ट असल्यामुळें त्याला कांहीं विकार न करितां तें विष अन्नासह जिरून गेलें!!

गंगातीरावरील प्रमाणाख्य-वटवृक्षाखालीं स्वस्थ निजलेल्या वृकोदराला बांधून त्या दुष्टानें गंगाप्रवाहांत टाकिलें व तो स्वतः आपल्या नगरीला निघून गेला. पण हा महाबलाढ्य कौंतेय जेव्हां जागा झाला, तेव्हां तो स्वबंधन तोडून गंगाजलांतून बाहेर आला. त्यानें याला सर्वांगभर कृष्णसर्पांकडून दंश करविले, पण हा शत्रुनाशक वीर नाश पावला नाहीं. उलट जागें होतांच त्यानें त्या सर्व सर्पांना मारून टाकिलें व दुर्योधनाच्या प्रिय सारथ्याला नुस्ती एक थप्पड देऊनच ठार केलें.

वारणावतांतील लाक्षागृहांत आर्या कुंतीसह शयन करीत असलेल्या या अल्पवयस्क वीरांना त्यानें जाळण्याचाहि प्रयत्न केला! हे वार्ष्णेय कृष्णा, असलें घोर कृत्य दुर्योधनावांचून दुसरा कोण करूं शकेल! त्या वेळीं माझी पूज्य सासू भयभीत होऊन रडूं लागली व आपल्या प्रिय पुत्रांस म्हणाली—"हाय, हाय! पुत्रांनो, माझा घात झाला. मी मोठ्या प्राणसंकटांत पडलें आहें. हा भडक-

१ या प्रसंगाचें सविस्तर वर्णन पूर्वी आदिपर्व अ. १४६-४८. पृ. ४२३-४८ वर आलें आहे. यास्तव येथें तें संक्षेपानें घेतलें आहे.

केला अग्नि शांत होऊन आम्ही सुखी कसे होणार ! देवा, मी आतां या माझ्या पुत्रांसह नाश पावणार ! आतां काय करूं ! ''

पण वायूप्रमाणें वेगवान् असलेल्या या भीमसेनानें विलाप करणाऱ्या आपल्या जननीला व भ्रात्यांनाहि धीर देऊन 'मी आतां गरुडाप्रमाणें तुम्हां सर्वांना घेऊन या अग्नींतून बाहेर पडतों, तुम्ही भिऊं नका,' असें म्हटलें व त्याप्रमाणें त्या सर्वांना उचलून अग्नीमुखांतून वांचविलें.

त्यानंतर हे सर्व यशस्वी पांडव रातोरात मोठ्या त्वरेनें हिडिंबवनाजवळील महारण्यांत गेले. तेथें अतिशय श्रांत व दुःखी झालेल्या या पांची वीरांनीं मातेसह भूमीवरच शयन केलें. इतक्यांत हिडिंबा-राक्षसीनें यांना पाहिलें. त्यांतील भीमसेनावर ती आसक्त झाली व त्याचे पाय आपल्या मांडीवर घेऊन दाबूं लागली. आपल्या मृदु हस्तांनीं ती त्याची शुश्रूषा करूं लागली असतां भीमसेन जागा झाला व 'हे अनिंदिते, तूं कोण आहेस व तुझी काय इच्छा आहे ?' असें तिला विचारूं लागला.

तेव्हां ती कामरूपिणी राक्षसी त्याला म्हणाली—'वीरांनो, तुम्ही आतां येथून सत्वर निघून जा. कारण हा माझा भ्राता तुम्हांला मारण्यासाठीं येत आहे. यास्तव विलंब लावूं नका.'

राक्षसीचें हें वचन ऐकून भीमसेनानें मोठ्या अभिमानानें तिला म्हटलें— मी तुझ्या भ्रात्याला भीत नाहीं, त्याला येथें येऊं दे. मी त्याला एका क्षणांत मारून टाकीन.

त्यांचें हें संभाषण ऐकून तो भयंकर हिडिंब राक्षसाधम गर्जना करीत म्हणाला—हे हिडिंबे, तूं कोणाशीं बोलत आहेस ? त्याला इकडे घेऊन ये, उशीर लावूं नको. आपण दोघें मिळून त्याला भक्षण करूं.

[१]त्यानंतर या बलाढ्य वृकोदराचें त्या राक्षसाशीं इंद्र-वृत्रासुरासारखें तुमुल युद्ध झालें. त्यांत या वीरानें राक्षसाचा वध करून, भ्राते व माता यांसह तेथून प्रयाण केलें. हिडिंबाहि त्यांच्या बरोबरच निघाली. हीच घटोत्कचमाता होय.

तेथून मातेसह हे सर्व भ्राते एकचक्रानगरींत जावयास निघाले. त्यांच्या बरोबर अनेक ब्राह्मणांचा परिवार होता. मार्गामध्यें हितचिंतक व्यासानें दर्शन

---

१ हा सविस्तर वृत्तान्त आदिपर्व अ. १५२-५३ पृ. ४३५-४१ वर आला आहे. म्हणून त्याची येथें पुनरुक्ति केली नाहीं.

देऊन त्यांस एकचक्रानगरींत रहाण्याचा उपदेश केला. त्याप्रमाणें ते तीक्ष्ण व्रत धारण करून एका ब्राह्मणाच्या घरीं राहिले.

तेथेंहि या बलवानांतील श्रेष्ठ वृकोदरानें हिडिंबतुल्य नरभक्षक महाबलाढ्य 'बक'-नामक राक्षसाचा वध केला आणि तो सर्व भ्रात्यांसह द्रुपदनगरींत आला. तेथें कांहीं दिवस राहिल्यानंतर, हे कृष्णा, तूं जसें पूर्वीं भीष्मककन्या रुक्मिणीला जिंकून मिळविलेंस तसें या पार्थानें मला स्वपराक्रमानें जिंकून घेतलें. त्या स्वयंवरप्रसंगीं शत्रूंना दुष्कर असें महत्कर्म करून तो विजयी झाला.

हे हृषीकेशा, अशा या प्रभावशाली वीरांची मी धर्मपत्नी आज अनेक प्रकारच्या क्लेशांनीं पीडल्यामुळें अतिशय दुःखित होऊन आर्या कुंतीला सोडून पूज्य धौम्य-मुनींच्या आधारानेंच राहिलें आहें.

हे द्वारकाधीशा, हे माझे पति सिंहासारखे पराक्रमी व शत्रूपेक्षां अधिक वीर्यवान् असूनहि दुर्बल व हीन शत्रूंनीं दिलेले क्लेश सहन करून माझी उपेक्षा कशी करितात ! या पापी कौरवांच्या निंद्य कर्मामुळें मी अशा प्रकारचीं दुःखें सहन करीत दीर्घकाल संतप्त होत आहें. हे कंसारे, सुप्रसिद्ध कुलांत यज्ञवेदीपासून दिव्य विधीनें माझा जन्म झाला. मी महात्म्या पांडुनृपतीची स्नुषा असून पराक्रमी पांडवांची प्रिय पत्नी आहें. असें असतां या पांची पांडु-पुत्रांच्या समक्ष मज श्रेष्ठ पतिव्रतेचे केंस धरून त्या नीचानें ओढावे ना !

असें बोलून व आपलें मुख कमलपत्राप्रमाणें शोभणाऱ्या आपल्या दोन्ही मृदु हातांनीं झांकून ती कठोर भाषण करणारी पांचाली ढळढळां रडूं लागली. तिचें वक्षःस्थल व उत्तरीय वस्त्र अश्रूंनीं भिजून गेलें. तथापि अतिशय क्रुद्ध झालेली ती साध्वी आपले नेत्र पुशीत व वारंवार दीर्घ निःश्वास सोडीत सद्गदित कंठानें म्हणाली—" जे क्षुद्र शत्रूंनीं पीडलेल्या माझी जणुकाय शांत चित्तानें उपेक्षा करितात, ते माझे पति नाहींत, पुत्र नाहींत, बांधव नाहींत, भ्राते नाहींत, पिता नाहीं व हे मधुसूदना, तूंहि नाहींस. कर्ण मला भरसभेंत दुर्वचनें बोलून हंसला. तें माझें दुःख कांहीं केल्या शांत होत नाहीं. हे केशवा, चार कारणांनीं मी तुला नित्य रक्षणीय आहें. १ ही द्रौपदी तुझ्या पितृष्वस्रीयांची—आतेभावांची भार्या आहे. २ यज्ञवेदींतून उत्पन्न झाली आहे. ३ तुझी भक्ता आहे व ४ तूं दुष्टांचा निग्रह करण्यास समर्थ आहेस. यास्तव हे वासुदेवा, संबंध, गौरव, सख्य व प्रभुत्व या कारणांनीं तूं माझें रक्षण कर."

(४) हे अभिमन्युपौत्रा, त्या महापतिव्रतेचें हें हृदयद्रावक भाषण ऐकून त्या वीरसमूहामध्यें वासुदेव तिचें सान्त्वन करीत म्हणाला—" हे प्रिय भगिनि, तूं ज्यांच्यावर क्रुद्ध झाली आहेस, त्यांच्या स्त्रिया 'आपले पति या अर्जुनाच्या शरांनीं छिन्न-भिन्न व रक्तस्नात होऊन पृथ्वीतलावर मरून पडले आहेत,' असें पाहून अशाच विलाप करतील. हे भामिनि, तूं शोक करूं नको. पांडवांच्या सामर्थ्याला शोभेल, असेंच कार्य मी घडवून आणीन. हे पांचालि, मी तुला सत्यप्रतिज्ञा करून सांगतों कीं, तूं राजांची राणी होशील. एक वेळ आकाश कोसळून पडेल, हिमालय-पर्वताचें चूर्ण होईल, या भूतधात्री पृथ्वीचीं शकलें होतील, हा महासागर सुकून जाईल, पण माझें हें प्रतिज्ञावचन कदापि मिथ्या होणार नाहीं."

कृष्णाचें हें प्रतिवचन ऐकून द्रौपदीनें आपली भेदक दृष्टि अर्जुनाकडे वळविली. तेव्हां कृष्णेचा विलाप व कृष्णाचें प्रत्युत्तर ऐकून क्षुब्ध झालेला अर्जुन याज्ञसेनीला म्हणाला—" हे कल्याणि, तूं असा शोक करूं नको. मधुसूदन जें बोलत आहे, तें तसेंच घडून येईल, यांत संशय नाहीं. हे भामिनि, त्याचें वचन अन्यथा कधींहि होणार नाहीं."

**धृष्टद्युम्न** म्हणाला—हे प्रिय भगिनि, मी द्रोणाला मारीन, शिखंडी पितामह भीष्माचा नाश करील, भीमसेन दुर्योधनाला यमलोकीं पाठवील व हा धनंजय कर्णाचा वध करील. बलराम व कृष्ण यांच्या आश्रयानें आम्ही इंद्रालाहि युद्धांत अजेय आहोंत. मग या धार्तराष्ट्रांची काय कथा!

हे वीरा परिक्षित्पुत्रा, धृष्टद्युम्न असें बोलला असतां इतर सर्व वीर वासुदेवाच्या समीप येऊन बसले. तेव्हां महाबाहु केशव युधिष्ठिराला असें म्हणाला. ३. ३. १२.

---

## अध्याय १२ वा.

[ १ 'द्यूतकालीं मी द्वारकेंत नसल्यामुळें तुम्हांवर हा प्रसंग आला' असें कृष्णाचें युधिष्ठिराला कथन. ]

(१) **श्रीकृष्ण**—हे पृथ्वीपते युधिष्ठिरा, पूर्वीं तुमच्या द्यूतप्रसंगीं मी जर द्वारकेंत असतों, तर तुमच्यावर हें संकट ओढवलें नसतें. कौरवांनीं जरी मला बोलाविलें नसतें, तरीहि मी द्यूतसमयीं आलों असतों आणि द्यूतांतील

अनेक दोष प्रदर्शित करून अंबिकापुत्र धृतराष्ट्र व दुर्योधन यांचें निवारण केलें असतें.

हे धर्मराजा, मीं भीष्म, द्रोण, कृप, बाल्हिक व धृतराष्ट्र, यांस बोलावून आणून धृतराष्ट्रास 'तुझ्या पुत्रांचें हें द्यूत पुरे झालें' असें सांगितलें असतें. युधिष्ठिरा, तुझ्यासाठीं मीं त्या द्यूतांतील अनेक दोष व्यक्त करून दाखविले असते. शत्रूंनीं तुझ्यावर ज्या आपत्ति आणिल्या आहेत, ते सर्व या दुष्ट द्यूताचेच परिणाम आहेत.

पूर्वीं वीरसेनाचा पुत्र नलराजा या द्यूतामुळेंच राज्यापासून भ्रष्ट झाला आणि या द्यूतानेंच त्याचा अकल्पिक नाश केला. त्याचप्रमाणें द्यूतक्रीडेमध्यें आसक्त झालेला पुरुष खेळांत हरला व त्याचा पराभव होत असला तरी जयाच्या आशेनें तो पुनः पुनः पण लावून खेळत रहातो. राजा, द्यूतांतील हे सर्व दोष मीं त्या कौरवेश्वराला कथन केले असते. स्त्रिया, द्यूत, मृगया आणि मद्यपान अशीं हीं विषयासक्तीपासून उद्भवलेलीं चार दुःखें विद्वानांनीं वर्णिलीं आहेत. त्यांच्या योगानें पुरुषाचें सर्व ऐश्वर्य नष्ट होतें. शास्त्रवेत्ते या सर्वांसच अनर्थकारक मानितात, परंतु 'त्यांतहि विशेषतः द्यूत अतिशय निंद्य आहे,' असें तज्ज्ञ म्हणतात. द्यूतानें एकाच दिवसांत राज्यभ्रंश, द्रव्यहरण व धर्म-अर्थ-काम या पुरुषार्थांची हानि होते आणि निश्चित विपत्ति प्राप्त होते. त्यांत जरी द्रव्यलाभ झाला तरी त्याचा उपभोग घेण्यापूर्वींच तें धन नाश पावतें व त्यापासून केवल कठोर वचनांची निष्पत्ति होते.

युधिष्ठिरा, अशाप्रकारच्या व दुसऱ्याहि कटुवचनांनीं मीं अंबिकासुत धृतराष्ट्राला द्यूतापासून निवृत्त केलें असतें आणि त्यानें जर माझें म्हणणें मान्य केलें असतें, तर त्यापासून कुरुकुलाचें हितच झालें असतें. हे धर्मज्ञा, पण त्या कौरव-

---

१ मागल्या अध्यायांत साधनांसह ब्रह्मविद्येचें निरूपण केलें. आतां या अध्यायांत भगवत्स्मरणच त्याच्या सांनिध्याचें निमित्त आहे आणि त्याचें सांनिध्यच सर्व आपत्तींचें निवारण करतें, असें निराळ्या प्रकारें वर्णिलें आहे. 'मी जर द्वारकेंत असतों०' या भगवद्वचनाचा आध्यात्मिक अर्थ असा—नवद्वारांनीं युक्त असलेल्या तुमच्या शरीरनगरींत रहाणाऱ्या माझें तुम्हीं जर चिंतन केलें असतें, तर तुमच्यावर हें संकट ओढवलें नसतें. संकटकालीं माझें स्मरण करणाऱ्या द्रौपदीच्या पुढें सभेमध्यें वस्त्रांच्या राशी पाडून तिचे क्लेश जसे मीं दूर केले, त्याप्रमाणें द्यूतप्रसंगीं तुम्हीं माझें स्मरण केलें असतें तर तुमचा जयच झाला असता.

श्रेष्ठानें माझें मधुर व हितकर वचन जर ऐकलें नसतें, तर मीं त्याचा बलानें निग्रह केला असता आणि त्याचे सुहृद् म्हणविणाऱ्या हितशत्रु सभासदांनीं जर अन्यायानें त्याचाच पक्ष घेतला असता तर त्या सर्व द्यूतकारांचाहि मीं वध केला असता.

हे पांडुनंदना, त्या वेळीं मी आनर्तदेशांतून दूर गेलों होतों, स्वदेशीं नव्हतों. त्यामुळें तुमच्यावर हें द्यूताचें संकट ओढवलें. मी तेथून द्वारकेल जों परत येत आहें, तों सात्यकीकडून तुमच्यावरील आपत्तीचा हा सर्व सविस्तर वृत्तान्त मला कळला. तो ऐकतांच हे धर्मराजा, मी अत्यंत उद्विग्न होऊन सत्वर तुमच्या भेटीसाठीं निघून आलों. पण मी तुला आज भ्रात्यांसह दुःखमग्न झालेला पहात आहें. अरे अरे! हे वीरांनों, तुम्ही सर्वच या केवढ्या संकटांत पडलां अहां!! ३. ३. १३.

---

## अध्याय १४ वा.

[ १ श्रीकृष्णानें वर्णिलेला शाल्ववधाच्या संक्षिप्त वृत्तान्त. ]

( १ ) **युधिष्ठिर म्हणाला—हे वृष्णिनंदना, त्या द्यूतसमयीं तुझें द्वारकेंत असांनिध्य कसें झालें? त्या वेळीं तूं कोठें गेला होतास व त्या प्रवासांत कोणतें कर्म केलेंस!**

---

१ या पुढें सौभाचा वध संक्षेपानें व विस्तारानें वर्णिला आहे. त्याचें तात्पर्य असें—संसारसागरांतील द्वारकाख्य स्थूल-सूक्ष्म देहद्वयरूप क्षेत्रांतील भगवानाच्या असांनिध्यरूप विस्मरणामुळें मनोरथरूप सौभनगरांत आरूढ होऊन शाल्वाख्य महामोह आला. त्यानें शोकास्त्रानें त्या द्वारका-क्षेत्राला व्याकुल करून सोडिलें. प्रद्युम्नादिरूप यज्ञादिधर्म त्यांचें निवारण करण्यास समर्थ झाले नाहींत. म्हणून चित्तरूपी द्वारकेंत येऊन मज चिदात्म्याचा तिरस्कार करणाऱ्या शाल्व-महामोहाला मीं ब्रह्मविद्या-अस्त्रानें मारिलें व त्याच्या मनोरथरूप सौभनगराचा विध्वंस केला. बृहदारण्यक-उपनिषदांत 'द्वया ह प्रजापत्याः०' (बृ. भा. अ. ब्रा. ३ पृ. ८१) या ब्राह्मणांत शमादि चित्तवृत्ति हे देव व कामादिक हे असुर मानून त्यांच्या युद्धरूपकानें आध्यात्मिक अर्थ वर्णिला आहे. तसेंच येथेंहि समजावें. कारण महाभारत ही स्मृति श्रुत्यनुसारिणी आहे.

श्रीकृष्ण—हे भरतश्रेष्ठा युधिष्ठिरा, मी त्या वेळीं शाल्वाच्या सौभ-नगरीला त्याचा वध करण्यासाठीं गेलों होतों. त्याचें कारण सांगतों, ऐक—हे धर्मराजा, तूं राजसूय यज्ञाच्या प्रसंगीं माझी जी अग्रपूजा केलीस, ती त्या दुरात्म्या शिशुपालाला सहन न होऊन तो अतिशय क्रुद्ध झाला. तेव्हां त्या महातेजस्वी व पराक्रमी दमघोषात्मजाचा मीं वध केला. त्या यशस्वी वीराला मीं परलोकीं पाठविल्याचें ऐकून शाल्व अतिशय संतप्त झाला आणि हे भारता, मी तुझ्या समीप येऊन राहिल्यामुळें माझ्यावांचून शून्य झालेल्या द्वारकानगरीवर तो चालून गेला.

याप्रमाणें तो इच्छेस येईल तेथें जाणाऱ्या, कांचनादि-धातूंनीं बनविलेल्या शोभिवंत सौभ-नगरींत बसून एखाद्या क्रूराप्रमाणें तेथें आला असतां वृष्णिश्रेष्ठ कुमारांनीं त्याचें निवारण केलें. तेव्हां त्या दुर्मतीनें त्यांतील पुष्कळ अल्पवयी वृष्णिकुमारांचा वध करून नगरींतील उद्यानांचाहि विध्वंस केला.

नंतर तो दुरात्मा म्हणाला—तो वसुदेवाचा पुत्र मंदबुद्धि वासुदेव कोठें गेला ? मी त्या वृष्णिकुलाधमाचा दर्प युद्धामध्यें उतरवीन. हे आनर्त-देशांतील प्रजाजनहो, मला खरें सांगा. तो जेथें गेला असेल, तेथें मी जाईन आणि त्या कंस-केशिनिषूदनाला यमलोकीं पाठवीन. मी आपल्या आयुधांना स्मरून सांगतों कीं, त्याचा वध केल्यावांचून मी परत येणार नाहीं. कोठें आहे तो ? कोठें आहे तो ? असें वारंवार बोलत माझ्याशीं युद्धाची आकांक्षा करणारा तो सौभाधिपति इतस्ततः धावूं लागला.

आज त्या विश्वासघातकी, पापकर्मैं करणाऱ्या क्षुद्र जनार्दनाला गतप्राण करून मी शिशुपालवधाचा सूड उगवीन. ज्या या पाप्यानें माझ्या शिशुपाल-भ्रात्याचा शिरश्छेद केला, त्याचा मी आज वध करीन. तो माझा बाल भ्राता राजा असूनहि या दुष्ट वासुदेवानें त्याला संग्रामांत मारिलें नाहीं, तर तो वीर सावध नसतांना त्याच्यावर प्रहार केला. यास्तव त्या कपटी कृष्णाला आज मी परलोक दाखवीन.

हे कुरुनंदना युधिष्ठिरा, याप्रमाणें वल्गना करून माझी निंदा करीत तो दुष्टात्मा आपल्या कामगामी सौभनगरींतून अंतरिक्षांत निघून गेला. त्यानंतर द्वारकेस परत गेल्यावर त्या मार्तिकावतक-देशांत रहाणाऱ्या दुर्बुद्धि राजाच्या दुर्वल्गना मीं ऐकल्या. त्या ऐकून हे राजा, मी क्रोधसंतप्त झालों व मनांत

त्याच्या वधाचा निश्चय केला. त्या दुराचारी सौभाचा तो पराकाष्ठेचा गर्व त्यानें केलेला आनर्तदेशाचा विध्वंस व माझी निंदा, हें सर्व ऐकून मीं त्याचा नाश करण्याचें मनांत आणिलें.

त्यानंतर हे पृथिवीपते, मी शाल्ववधासाठीं निघालों. त्याचा पुष्कळ शोध केल्यावर समुद्रांतील एका द्वीपांत मला तो आढळला. तेव्हां माझा श्रेष्ठ पांचजन्य शंख वाजवून मीं त्याला युद्धाचें आह्वान केलें व युद्धाला उभा राहिलों. त्या वेळीं दोन घटकांपर्यंत माझें दानवांशीं तुमुल युद्ध झालें व माझ्या हातीं सांपडलेल्या त्या सर्वांचा मी संहार केला.

हे महाबाहो, या कारणास्तव मी त्या द्यूतप्रसंगीं तेथें आलों नाहीं. तेथून परत आल्यावर हस्तिनापुरांतील अन्यायाच्या द्यूताची वार्ता ऐकतांच मी दुःख भोगीत असलेल्या तुम्हां सर्वांना भेटण्यासाठीं सत्वर येथें आलों आहें. ३.३.१४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ शाल्ववधाचा सविस्तर वृत्तान्त सांगण्याविषयीं युधिष्ठिराची प्रेरणा.
२ वृष्णिवीरांचें शाल्वाशीं झालेल्या युद्धाचें वर्णन. ]

( १ ) **वैशंपायन**—हे राजा जनमेजया, धर्म व काम हे दोन्ही पुरुषार्थ अर्थाच्या अधीन आहेत, पण राजाला स्वराज्यरक्षण व परराज्याचा नाश यांच्या योगानें अर्थ प्राप्ति होते. यास्तव शाल्ववधाच्या प्रसंगानें स्वराज्यरक्षण व परराज्यध्वंस हेच उपाय सविस्तर ऐकण्याच्या इच्छेनें युधिष्ठिर म्हणाला—" हे महाबाहो वासुदेवा, तूं मला सौभवधाचा वृत्तान्त सविस्तर सांग. तूं असले अद्भुत वृत्तान्त सांगूं लागलास म्हणजे माझी तृप्ति कधींच होत नाहीं. "

( २ ) **वासुदेव**—हे राजा, ठीक आहे; तुझी इच्छा असल्यास मी तुला तो वृत्तान्त सविस्तर सांगतों, ऐक—हे वीरा, मीं श्रुतश्रवेच्या शिशुपालपुत्राचा तुझ्या यज्ञांत वध केल्याचें ऐकून शाल्व द्वारकेवर चालून आला व त्या दुरात्म्यानें माझ्या प्रिय नगरीला आपल्या सेनेकडून वेढा देवविला. फार काय पण, आकाशांतून संचार करणाऱ्या आपल्या त्या सौभनगराचीहि आपलें रक्षण व शत्रूचा नाश होईल अशी योजना करून व त्या नगराला आकाशांत स्थापून

त्यांत तो अधिष्ठित झाला आणि त्या राजानें द्वारकेंतील यादववीरांशीं युद्ध आरंभिलें. त्या प्रसंगीं सर्व दिशांतून अविच्छिन्न शस्त्रास्त्रवृष्टि सुरू झाली.

युधिष्ठिरा, त्या वेळीं द्वारकेंत सर्वत्र पताका उभारल्या, तिच्या सर्व बहिर्द्वारांचें उत्तम प्रकारें संरक्षण केलें व आंतील चतुरंग सैन्य सज्ज झालें. बुरुजावरील तोफा शत्रु सैन्यावर रोखिल्या. भुयारें खणणारे लोक व इतर शिल्पी ठिकठिकाणीं उभे केले. राजमार्गाच्या दोन्ही बाजूंस भाल्यांच्या आकाराचे कठडे उभारले. नगरींतील उंच गृहांचें संरक्षण होईल अशी योजना केली. जागजागीं मोर्चे बांधिले. शत्रूंच्या तोफांचा मारा चुकविणाऱ्या प्रज्वलित उल्का तयार केल्या. शत्रूंवर फेकण्यासाठीं काष्ठें व पाषाणादि यंत्रबद्ध केलीं. बंदुका, बाण, भाते, शक्ति इत्यादि सर्व आयुधें सज्ज केलीं. इतर युद्धोपयोगी वस्तुहि सिद्ध केल्या.

हे धर्मराजा, द्वारकेंत ही सर्व युद्धसामग्री सर्वदाच तयार असते. तथापि हा आकस्मिक युद्धप्रसंग आल्यामुळें वृष्णिवीरांनीं त्या माझ्या नगरीला शास्त्रोक्त विधीनें सुरक्षित केलें. शत्रूचें निवारण करण्यास समर्थ असलेल्या गद, सांब, उद्धव इत्यादि वृष्णिवीरांनीं मध्य गुल्मांत अनेक रथांवर आरूढ होऊन द्वारकानगरीचें रक्षण करण्याची प्रतिज्ञा केली. ते सर्वहि वीर प्रसिद्ध कुलांमध्यें उत्पन्न झालेले असून संग्रामांतील त्यांचा पराक्रम सर्वांच्या प्रत्ययास आलेला होता.

पताकायुक्त घोडेस्वारांनीं त्या सर्व सैन्याला विशेष शोभा आणिली. दीर्घदर्शी उग्रसेन, उद्धव इत्यादि वीरांनीं आपलें सैन्य व योद्धे यांच्या हातून प्रमाद होऊं नये म्हणून सर्व नगरभर "हें युद्धाचें अरिष्ट टळेपर्यंत द्वारकानगरींतील कोणीहि मद्यपान करूं नये" असा सर्वत्र घोष करविला. कारण प्रमत्त झालेल्या आनर्तांवर हा दुष्ट शाल्वराजा प्रहार करील, हें त्यांस माहित होतें. याप्रमाणें स्वसंरक्षणाची योजना करून सर्व वृष्णि व अंधक शाल्वाशीं समर करण्यास तयार होऊन उभे राहिले.

युधिष्ठिरा, नगरींतील द्रव्यसंचयाचें रक्षण करण्यासाठीं त्यांनीं आनर्तदेशांतील सर्व नट-नर्तकांना नगरीबाहेर घालवून दिलें. सर्व सेतु मोडून टाकिले. नौकांच्या जाण्या-येण्यास प्रतिबंध केला. खंदक, विहिरी व कूप शूलांनीं व्यापून टाकिले. नगरीच्या सभोंवार एक कोसपर्यंत सुरुंग लावून ठेविले व तेथील सर्व भूमि उंच-सखल करून ठेविली.

हे धर्मात्म्या, द्वारकेचा दुर्ग निसर्गतःच दुर्गम असल्यामुळें तो स्वभावतःच सुरक्षित आहे आणि हे निष्पापा, तो मूळचाच आयुधांनीं युक्त आहे. त्यामुळें सर्व आयुधांनीं संपन्न व अग्न्यादिकांपासून सुरक्षित असलेली ती नगरी त्या वेळीं इंद्रभुवनाप्रमाणें शोभत होती.

हे राजन्, तेथें सौभाधिपति येऊन ठेपला असतां राजचिह्नांकित मुद्रेवांचून कोणालाहि त्या नगरींत प्रवेश किंवा नगरींतून बहिर्गमन करतां येत नसे. त्या वेळीं सर्व राजमार्गांवर अश्व-गजयुक्त प्रचंड सैन्य सज्ज करून ठेविलें होतें. तेथील सर्व सैन्याला वेळच्या वेळीं भरपूर वेतन व भोजन मिळत असे. कोणाहि सैनिकाला रौप्य व सुवर्ण यांहून हीन वेतन दिलें जात नसे. ( म्ह० सर्वांचा पगार रुपये व मोहरा यांनीं मोजतां येण्याइतका विपुल होता. क्षुद्र पगारावर माणसें नेमलीं नव्हतीं. ) कोणाचेंहि वेतन थकलेलें नव्हतें. योग्यता नसलेल्या, तात्पुरती निवड केलेल्या किंवा पूर्वी ज्यांनीं शौर्य गाजविलेलें नाहीं, अशा सैनिकांची त्या सैन्यांत भरती केलेली नव्हती. याप्रमाणें हे भारता, त्या वेळीं राजा उग्रसेन अतिशय दाक्षिण्यानें व दक्षतेनें द्वारकानगरीचें संरक्षण करीत होता. ३. ३. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ शाल्वसैन्य पाहून वृष्णींचें युद्धार्थ निर्गमन. २ शाल्वाचे सचिवादि व वासुदेवपुत्र सांब, चारुदेष्ण, यांचें युद्ध. शाल्वसचिवादिकांचा वध. ३ शाल्वाचें पुनरागमन ]

( १ ) **वासुदेव**—हे युधिष्ठिरा, याप्रमाणें द्वारकानगरीच्या संरक्षणासाठीं सर्वप्रकारें दक्षता ठेविली असतां, शाल्वराजानें नगरीच्या समीपच आपल्या प्रचंड सेनेचा तळ दिला.

त्याचें तें सैन्य असंख्य गज व योद्धे यांनीं युक्त होतें. शाल्वराजाची ती चतुरंग सेना विपुल जलाशयांनीं युक्त व उंच-सखल नसलेल्या विस्तीर्ण प्रदेशांत तळ देऊन राहिली. त्या सेनेनें श्मशानें, देवालयें, वारुळें, चैत्य वृक्ष व विषम भूमि वर्ज्य करून इतर सर्व प्रदेश व्यापिला.

हे धर्मराजा, त्या शाल्वानें सैन्याचा विभाग करून द्वारकानगरींत धान्यादि पोंचविण्याचे मार्ग अडवून टाकिले व त्याच्या शिबिरांत भेद काढण्यासाठीं कोणी गुप्तरीतीनें येऊं नये म्हणून हेरांचे मार्गहि बंद केले. शाल्वाचें सैन्य सर्व

आयुधें, रथ, गज, अश्व, पायदळ व ध्वज यांनीं युक्त होतें. योद्धे शस्त्रविशारद, तुष्ट, पुष्ट व वीरलक्षणसंपन्न होते. अशा प्रकारें विचित्र ध्वज, रथ व धनुष्यें यांनीं युक्त असलेलें तें शाल्व सैन्य गरुडाप्रमाणें वेगानें द्वारकेवर चाल करून आलें.

हे नरश्रेष्ठा, याप्रमाणें शत्रुसैन्य नगरासमीप येत असलेलें पहातांच वृष्णि-कुमार द्वारकेंतून बाहेर पडून त्यांच्याशीं युद्ध करूं लागले. आपल्या नगरीवर शाल्वसैन्याचें अशा प्रकारें चाल करून येणें, सहन न झाल्यामुळें चारुदेष्ण, सांब व महारथ प्रद्युम्न विचित्र कवचें, भूषणें व ध्वज यांनीं युक्त होऊन रथा-रूढ झाले आणि शाल्वावर धांवून गेले.

हृष्ट झालेल्या सांबानें धनुष्य घेऊन शाल्वाच्या क्षेमवृद्धि सेनापतीबरोबर युद्ध केलें. त्या वेळीं हे भरतश्रेष्ठा, इंद्र जशी पर्जन्यवृष्टि करितो, तशी प्रताप-शाली जांबवतीपुत्रानें त्याच्यावर शरवृष्टि केली. परंतु त्या क्षेमवृद्धि सेनापतीनें हिमालयाप्रमाणें अचल राहून त्याच्या बाणांचा तुमुल वर्षाव सहन केला.

त्यानंतर त्या सेनापतीनें मायायुक्त विस्तीर्ण शरजालाचा सांबावर वर्षाव केला. तेव्हां सांबानें त्या मायामय जालाचें मायेनेंच विदारण करून त्याच्यावर हजारों बाणांची वृष्टि केली. तेव्हां तो सांबानें विद्ध केलेला व त्याच्या बाणानें पीडित झालेला क्षेमवृद्धि सेनापति शीघ्रगमन करणाऱ्या वेगवान् अश्वांच्या साह्यानें रणांगणांतून पळून गेला.

याप्रमाणें शाल्वाचा तो क्रूर सेनापति पळून गेला असतां 'वेगवान्-'नांवाचा बलाढ्य दैत्य माझ्या पुत्रावर धांवून आला. तेव्हां तो दैत्य येऊन भिडला असतां वृष्णिकुलोत्पन्न वीर सांब त्याच्या वेगाचें निवारण करून उभा राहिला व त्यानें आपली वेगवती गदा गरगर फिरवून ती अतिशय वेगानें त्याच्या अंगा-वर फेंकली. त्या प्रचंड गदेच्या प्रहारानें तो दैत्य, ज्याचीं मूळें जीर्ण झालीं आहेत असा वृक्ष हत्तीच्या पादाघातानें जसा पडावा, तसा भूमीवर गतप्राण होऊन पडला.

अशाप्रकारें त्या माझ्या वीरपुत्रानें आपल्या गदेच्या प्रहारानें त्या महा असु-राचा वध करून त्याच्या प्रचंड सेनेंत प्रवेश केला व घोर युद्ध आरंभिलें. तेव्हां 'विविंध्य'-नांवाचा दानव चारुदेष्णाशीं येऊन भिडला. तो महारथ असून महा धनुष्य धारण करणारा होता. पूर्वीं जसें इंद्र व वृत्र यांचें युद्ध झालें, तसें

त्या वेळीं चारुदेष्ण व विविंध्य या दोघांचें तुमुल युद्ध झालें. ते दोघेहि महा बलाढ्य सिंहासारखे क्रुद्ध झालेले रपाक्रमी योद्धे मोठ्यानें सिंहनाद करून परस्परांवर बाणांचे आघात करूं लागले.

हे राजन्, त्या प्रसंगीं त्या रुक्मिणीतनयानें अग्नि व सूर्य यांच्यासारखे तेजस्वी शत्रुनाशक बाण महा अस्त्रानें अभिमंत्रवून धनुष्याला जोडिले आणि त्या माझ्या महारथ पुत्रानें ते त्या दैत्यावर सोडिले. तेव्हां तो गतप्राण होऊन रथांतून खालीं पडला. याप्रमाणें विविंध्याचा वध व सर्व सैन्यांचा क्षोभ झालेला पाहून शाल्व-राजा आपल्या कामगामी सौभ-नगरांत बसून पुनः आला व त्यानें द्वार-केंतील सर्व सैन्याला व्याकुल करून सोडिलें.

हे नृपश्रेष्ठा, अशा प्रकारें सौभ-नगरींतून शाल्व पुनः आलेला पाहून प्रद्यु-म्नानें त्या सर्व आनर्तसेनेला धीर दिला व तो म्हणाला—" हे वीरहो, तुम्ही सर्व स्वस्थ रहा व मी या सौभाचें राजासह समरांत निवारण करून त्याच्याशीं कसें युद्ध करितों, तें पहा. हे यादवहो, आज माझ्या हातांतील धनुष्यापासून सुटलेल्या भुजंगासारख्या बाणांनीं या सौभपतीची सेना सत्वर नाश पावेल. यास्तव धीर धरा. भीऊं नका. माझ्याशीं येऊन भिडलेल्या या सौभपतीचा आज विनाश होईल."

हे पांडुनंदना, प्रद्युम्न असें बोलला असतां तें सर्व सैन्य मोठ्या उत्साहानें युद्ध करूं लागलें. ३. ३. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १ शाल्व-प्रद्युम्नयुद्धांत शाल्वाच्या बाणानें प्रद्युम्नाला आलेली मूर्च्छा. ]

( १ ) वासुदेव—हे भरतश्रेष्ठ युधिष्ठिरा, तो रुक्मिणीनंदन प्रद्युम्न असें बोलून वेगवान् अश्वांनीं युक्त असलेल्या सुवर्णमय रथावर आरूढ झाला. त्यानें अंतकाप्रमाणें मुख पसरलेला मकरध्वज उभारला आणि तो अतिशय वेगानें शत्रूवर चालून गेला. तेव्हां त्याच्या रथाचे महाबलवान् अश्व जणुकाय आका-शांत उड्डाणच करीत आहेत असें भासलें. त्या माझ्या शूर पुत्रानें शत्रूला तिर-स्कृत करीत आपल्या श्रेष्ठ धनुष्याचा टणत्कार केला आणि भाते, खड्ग व गोधांगुलित्राण धारण करून आपलें विद्युल्लतेप्रमाणें चमकणारें धनुष्य या हातां-तून त्या हातांत फिरवीत सौभांतील सर्व दैत्यांना भयभीत केलें. तो धनुर्धर

धनुष्य आकर्ण ओढून इतक्या त्वरेनें शरसंधान करीत होता कीं, समरांगणांत तो शर जोडितो केव्हां व सोडितो केव्हां, यांतील अंतर शत्रूंना दिसेनासें झालें.

तो कुमार रणांगणांत गेला असतां त्याच्या मुखावर कसलाहि विकार दिसला नाहीं. त्याचीं गात्रें कंपित झालीं नाहींत. लोकांनीं त्याचा सिंहनाद ऐकला व त्याचा अद्भुत पराक्रम पाहिला. त्याच्या श्रेष्ठ रथावरील मत्स्यांना भक्षण करणारा व मुख पसरलेला सुवर्ण दंडस्थ मकराकार श्रेष्ठ ध्वज शोभत होता. त्याला पाहून शाल्वसैन्य व्यथित झालें.

त्यानंतर शत्रूंचा संहार करणारा प्रद्युम्न बाण ओढून युद्धाची इच्छा करणाऱ्या शाल्वावर धांवून गेला. पण त्या रणभूमींत प्रद्युम्न वीर धांवून आला हें क्रुद्ध झालेल्या शाल्वाला सहन झालें नाहीं. तो अतिशय संतापला व आपल्या कामगामी सौभ-नगरींतून खालीं उतरला आणि शत्रूंचें नगर जिंकणारा तो शाल्व प्रद्युम्नाशीं युद्ध करूं लागला. तेव्हां त्या दोघां वीरांचें तें तुमुल युद्ध लोकांना इंद्र व बलि यांच्या युद्धासारखें दिसलें.

हे धर्मराजा, शाल्वाचा मायावी रथ सुवर्णमय असून तो ध्वज व पताका यांनीं युक्त होता. त्या रथाचा कणा अतिशय दृढ होता. त्यांत भाते ठेविलेले होते. अशा त्या अलौकिक रथावर आरूढ होऊन तो महाबलाढ्य शाल्व प्रद्युम्नावर शरवृष्टि करूं लागला. तेव्हां प्रद्युम्नानेंहि आपल्या हस्तचापल्यानें शाल्वाला जणुकाय मोहितच करून सोडिलें.

याप्रमाणें समरांगणांत शरांचा प्रहार झाला असतां तो असहिष्णु सौभराजाला सहन झाला नाहीं. त्यानें माझ्या पुत्रावर अग्नितुल्य मर्मभेदक बाण सोडिला. परंतु माझ्या महाबलाढ्य पुत्रानें त्याचा छेद केला. तेव्हां त्या शाल्वानें माझ्या पुत्रावर दुसरे प्रदीप्त बाण सोडिले, पण त्या बाणांनीं विद्ध झालेल्या माझ्या पुत्रानें शाल्वावर एकच मर्मभेदक बाण सोडिला. त्या बाणानें शाल्वाच्या हृदयाला विद्ध केलें. त्यामुळें तो मूर्छित होऊन पडला.

तो शाल्व-वीर निश्चेष्ट होऊन पडलेला पहातांच सर्व दानवश्रेष्ठ पृथ्वीला विदारण करीत धावूं लागले व शाल्वसैन्यांत हाहाकार उडाला. इतक्यांत तो शाल्वराजा देहभानावर येऊन एकदम उठला व त्या महाबलवानानें रणांगणांत स्थित असलेल्या प्रद्युम्नावर बाण सोडून त्याच्या कंठप्रदेशीं वेध केला आणि याप्रमाणें रुक्मिणी-नंदनाला विद्ध करून शाल्वानें मोठ्यानें सिंहनाद केला. त्या नादानें सर्व

पृथ्वी दुमदुमून गेली. युधिष्ठिरा, माझ्या मोहित झालेल्या पुत्रावर त्या शाल्वानें मोठ्या त्वरेनें आणखीं बाण सोडिले. तेव्हां त्या असंख्य बाणांच्या प्रहारानें मूर्च्छित झालेला माझा पुत्र प्रद्युम्न निश्चेष्ट होऊन पडला. ३. ३. १७.

---

## अध्याय १८ वा.

[ १ सावध झालेल्या प्रद्युम्नाचा सारथ्याशीं संवाद. ]

( १ ) **वासुदेव**—हे युधिष्ठिरा, शाल्वाच्या बाणांनीं तो बलवानांतील श्रेष्ठ प्रद्युम्न पीडित झाला असतां सैन्यांतील सर्व वृष्णिवीर निरुत्साह होऊन अतिशय व्यथित झाले. सर्व अंधक व वृष्णिसैन्य हाहाकार करूं लागलें. प्रद्युम्न मोहित झालेला पाहून शत्रूला अतिशय संतोष झाला.

हे कौंतेया, इकडे त्या वीर प्रद्युम्नाला प्रबल मूर्छा आलेली पहातांच युद्धनीतिविशारद सारथ्यानें वेगवान् अश्वांना प्रेरणा करून मोठ्या त्वरेनें रथ रणांगणांतून परत फिरविला. परंतु त्या दारुकपुत्रानें रथ थोड्या अंतरावर नेला नाहीं तोंच हा रथिश्रेष्ठ प्रद्युम्न सावध झाला व धनुष्य धारण करून म्हणाला—

" हे सौते, तूं हें काय आरंभिलें आहेस ? आज रणांगणांतून पराङ्मुख कां होत आहेस ? युद्धाला पाठ देणें हा वृष्णिवीरांचा धर्म नव्हे. या महायुद्धांत शाल्वाला पाहून तुला मोह तर पडला नाहींना ? किंवा हें युद्ध पाहून तूं भयभीत तर नाहीं झालास ! काय असेल तें मला यथार्थ सांग. "

**सूत**—हे जनार्दनपुत्रा, मीं मोहित झालों नाहीं किंवा भ्यालोंहि नाहीं. परंतु हे केशवकुमारा, हा शाल्व तुझ्याहून अति प्रबल आहे, असें मला वाटतें. हा पापी महा बलवान् आहे. यास्तव मी हळुहळू तुझा रथ मागें नेत आहें. शिवाय, हे आयुष्मन्, रणामध्यें शूर रथी मूर्छित झाला असतां सारथ्यानें त्याचें रक्षण करावें असा धर्म आहे. तस्मात् तुझें नित्य रक्षण करणें, हें माझें कर्तव्य आहे. तसेंच तूंहि माझें संरक्षण करावेंस. 'रथ्याचें सारथ्यानें सर्वदा रक्षण करावें,' या युद्धनीतीला अनुसरून मी समरांगणांतून परत फिरलों. हे शूरा, या युद्धांत तूं एकटा आहेस आणि दानव असंख्य आहेत. यास्तव हें समयुद्ध नव्हे, असें समजून मीं तुझा रथ रणांगणांतून बाहेर नेत आहें.

पांडुनंदना, सूत असें बोलला असतां ज्याच्या रथध्वजावर मकर आहे, असा तो कुमार सारथ्याला म्हणाला— " हे दारुके, अगोदर रथ परत फिरीव

आणि पुनः केव्हांहि असें करूं नको. मी जिवंत असेपर्यंत रणांतून कधींहि परत फिरणार नाहीं. अरे, जो युद्ध सोडून पळतो, जो पडलेल्या योद्ध्यावर प्रहार करितो, शरण येऊन आश्रय मागणाराला मारितो, स्त्रिया, बाल व वृद्ध यांचा वध करितो आणि त्याचप्रमाणें जो विरथ, पळणाऱ्या, शस्त्रें व आयुधें भग्न झालेल्या सैनिकांचा प्राण घेतो, तो वृष्णिकुलोत्पन्नच नव्हे. हे सौते, तूं धर्मज्ञ आहेस, सूतकर्मांत प्रवीण आहेस, तुला वृष्णिकुलांतील युद्धनीति विदित आहे व सैन्याच्या अग्रभागीं राहून वृष्णिवीर कोणतें कर्म करीत असतात तें सर्व तुला अवगत आहे. यास्तव पुनः केव्हांहि युद्धांतून असें पलायन करूं नको.

हे सूता, मी शत्रूंचे प्रहार पाठीवर घेत, भ्रांत होऊन रणांगणांतून पलायन केलें असतां गदाग्रज दुर्धर्ष माधव मला काय म्हणेल ! केशवाचा ज्येष्ठ भ्राता व नील वस्त्रें धारण करणारा जो मदोन्मत्त बलराम त्याची गांठ पडली असतां तो महाबाहु मला काय बोलेल ! नरसिंह महाधनुर्धर सात्यकि, समितिंजय सांब, दुर्धर्ष चारुदेष्ण, तसेच गद, सारण व पराक्रमी अक्रूर हे सर्व मला काय म्हणतील !

हे सारथे, मी सर्वदा शांत, शूर व कुलाभिमानी आहें, अशी माझी प्रसिद्धि आहे. तेव्हां मी भीतीनें रणांतून पराङ्मुख झालों, असें ऐकून वृष्णिवीरांच्या स्त्रिया एकत्र जमल्या असतां माझ्याविषयीं काय बरें उद्गार काढतील ! 'अहो, या प्रद्युम्नानें युद्धांतून भीतीनें पलायन केलें !' असें म्हणून त्या माझा धिक्कार करतील ! ! मला कोणी धन्यवाद देणार नाहीं आणि हे सौते, मला किंवा माझ्या सारख्या कोणाहि योद्ध्याला धिक्कारयुक्त वाणीनें केलेला उपहास मृत्यू-पेक्षांहि तीव्रतर वाटतो. तस्मात् हे दारुके, तूं पुनः केव्हांहि युद्धापासून परा-ङ्मुख होऊं नकोस.

मधुसूदन हरि माझ्यावर भार टाकून भरतश्रेष्ठ धर्मराजाच्या यज्ञासाठीं गेला आहे. तेव्हां मीं आज युद्धाला पाठ दिल्यास त्याला तें सहन होणार नाहीं. हे सूतपुत्रा, 'शाल्वाचें मी निवारण करीन, तूं स्वस्थ रहा' असें म्हणून मीं युद्धाला निघालेल्या वीर कृतवर्म्याला मागें परतविलें. तेव्हां माझ्या बोलण्या-वर विश्वास ठेवून तो हृदिकपुत्र निवृत्त झाला. तो महारथ मला भेटला असतां मी त्याला आतां काय सांगूं !

त्याचप्रमाणें दुराधर्ष, शंख-चक्र-गदा धारण करणारा, कमलपत्राक्ष श्रीकृष्ण, सात्यकि, बलदेव आणि माझ्याशीं सतत स्पर्धा करणारे इतर अंधक व वृष्णि-वीर यांना मी काय सांगूं! हे सौते, 'हा समरभूमींतून युद्ध सोडून पळाला, याच्या पाठीवर शत्रूनें शरवृष्टि केली' असा अपवाद मी कसा सहन करूं? मी विवश झालों असतां तूं मला असा रणक्षेत्रांतून दूर नेऊं लागल्यास मी जिवंतहि राहणार नाहीं. यास्तव हे दारुकनंदना, हा रथ सत्वर रणभूमीकडे वळीव आणि कसलेंहि संकट ओढवलें तरी पुनः असें करूं नको.

हे सारथे, पाठीवर शत्रूंचा प्रहार होत असतां भीतीनें रणांतून पळ काढून जिवंत रहाणें मला कदापि मानास्पद वाटणार नाहीं. हे सूता, हीन पुरुषा-प्रमाणें मी रणांगणांतून कधीं तरी भीतीनें पळाल्याचें तुला आठवतें का? हे दारुके, तूं संग्रामांतून निघून आलास हें योग्य केलें नाहींस. आतां युद्धाची इच्छा करणाऱ्या मला सत्वर रणांगणांत घेऊन चल. ३. ३. १८.

---

## अध्याय १९ वा.

[ १ प्रद्युम्नाचें रणभूमींत निवर्तन. २ शाल्वाशीं युद्ध. ३ शाल्वाची मूर्च्छा. ४ देवांचा संदेश व विद्ध झालेल्या शाल्वाचें सौभनगरींतून गमन. ]

( १ ) **वासुदेव**—हे युधिष्ठिरा, बलवानांतील श्रेष्ठ प्रद्युम्नाचें हें भाषण ऐकून सारथि त्याला मधुर व प्रेमळ वाणीनें म्हणाला—"हे रुक्मिणीतनया, संग्रमाकडे अश्व नेण्यास मी भीत नाहीं. वृष्णिवीरांचें युद्धकौशल्य मला चांगलें विदित आहे. त्याविषयीं कांहींच संशय नाहीं. परंतु हे आयुष्मन्, सार-थ्यानें नेहमीं शरानें पीडित झालेल्या रथ्याचें रक्षण करावें असा उपदेश स्मृत आहे आणि तूं शाल्वाच्या बाणानें अतिशय व्यथित होऊन मूर्छित झाला होतास. म्हणून मीं तुला रणांगणांतून दूर नेलें. तो तूं सात्वतश्रेष्ठ यदृच्छेनें सावध झाला आहेस. आतां हे केशवनंदना, माझें अश्वविद्येंतील कौशल्य पहा. मीं दारु-काचा पुत्र आहें व सारथ्य कर्माचें योग्य शिक्षण संपादिलें आहे. शाल्वाच्या प्रचंड सैन्यांत आतां मी निर्भयपणें कसा प्रवेश करितों, तें पहा."

हे कौंतेया, असें बोलून त्या सूतानें रज्जु ओढून अश्वांना प्रेरणा केली व वायुवेगानें रथ चालविला. त्यानें डाव्या व उजव्या बाजूंनीं प्रदक्षिणा घालीत

विचित्र मंडलें घेत अश्वांना प्रतोदानें प्रेरणा करून अति त्वरेनें चालविलें. तेव्हां ते आकाशांतूनच संचार करीत आहेत कीं काय असें भासलें.

हे भरतश्रेष्ठा, त्या दारुकाचें हें हस्तचापल्य जाणून ते तेजस्वी अश्व जणुकाय भूमीला पायांचा स्पर्श होऊं न देतांच पळत सुटले. त्यानें प्रयासावांचूनच शाल्वसैन्याला उजवी घातली. खरोखर हें मोठें अद्भुत कर्म घडलें.

( २ ) त्या वेळीं हे धर्मराजा, प्रद्युम्नानें उजवी घातलेली सहन न होऊन त्या सौभराजानें माझ्या पुत्राच्या सारथ्याला तीन तीक्ष्ण बाणांनीं व्यथित केलें. परंतु त्या दारुकपुत्रानें त्याच्या शरांना तिरस्कृत करून पुनः त्याच्या उजव्या बाजूनें रथ नेला. तेव्हां त्या शाल्वानें माझ्या कुमारावर अनेक प्रकारचे असंख्य बाण सोडिले. पण त्या रौक्मिणेयानें स्मित करून आपलें हस्तलाघव दाखवीत त्या सर्व बाणांचा तीक्ष्ण शरांनीं छेद केला.

प्रद्युम्नानें आपले सर्व बाण तोडून टाकिलेले पाहून त्या सौभाधिपतीनें दारुण आसुरी माया पसरून शर सोडिले. परंतु त्या दैत्यानें महाबलाढ्य अस्त्र योजिलें आहे, हें जाणून प्रद्युम्नानें तत्काल ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून तीक्ष्ण बाण सोडिले. त्यांनीं त्या महा अस्त्राचा मध्येंच विच्छेद करून शाल्वाचें मस्तक, हृदय व मुख विद्ध केलें, तेव्हां तो नृपति मूर्छित होऊन पडला.

( ३ ) याप्रमाणें बाणांनीं पीडित होऊन तो क्षुद्र शाल्वराजा मोहित होऊन पडला असतां रुक्मिणीनंदनानें शत्रूचा नाश करणारा दुसरा एक तीव्र बाण धनुष्याला जोडिला. तेव्हां सर्व दाशार्हांना पूज्य असलेला, सर्पाप्रमाणें विषारी व अग्नीप्रमाणें प्रखर असलेला तो बाण प्रद्युम्न धनुष्याला जोडीत आहे असें पाहून अंतरिक्षांत हाहाकार उडाला.

( ४ ) त्यानंतर सर्व देवगण, इंद्र व कुबेर यांनीं मनोवेगानें जाणाऱ्या नारद आणि वायु यांना प्रद्युम्नाकडे पाठविलें. तेव्हां ते दोघे रौक्मिणेयाकडे आले व त्यांनीं देवांचा निरोप त्याला सांगितला. ते म्हणाले—" हे वीरा, तूं शाल्वाचा वध करूं नको. तुझा हा बाण काढून घे. हा शाल्व रणामध्यें तुला अवध्य आहे. पण या तुझ्या बाणाला अवध्य असा कोणताहि पुरुष नाहीं. यास्तव आपला बाण परत घे. हे महाबाहो, ब्रह्मदेवानें या शाल्वाचा मृत्यु देवकीनंदन श्रीकृष्णाच्या हातून नियत केलेला आहे. तो त्याचा संकल्प मिथ्या न होवो."

तें ऐकून संतुष्ट झालेल्या प्रद्युम्नानें आपला श्रेष्ठ बाण धनुष्यावरून काढून पुनः भात्यांत ठेवून दिला. त्यानंतर प्रद्युम्नाच्या शरांनीं व्यथित झालेला शाल्व देहभानावर येऊन आपल्या सैन्यासह त्वरेनें निघाला आणि वृष्णींनीं जर्जर केलेला तो क्रूर दुर्मति द्वारका सोडून आपल्या सौभनगरींत बसून अंतरिक्षांत निघून गेला. ३. ३. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ श्रीकृष्णाचें द्वारकेंत प्रत्यागमन. २ त्याला शाल्ववृत्त कथन. ३ कृष्णाचें प्रतिज्ञापूर्वक शाल्वावर चालून जाणें. ४ घोर युद्ध. ]

( १ ) **वासुदेव**—युधिष्ठिरा, याप्रमाणें शाल्व द्वारकेंतून परत फिरला. इतक्यांत तुझा राजसूय यज्ञहि समाप्त झाला व मी आनर्त-देशास परत गेलों. तेव्हां मला द्वारकानगरी उत्साहशून्य दिसली. तेथें स्वाध्याय व वषट्कारादि यज्ञकर्में होत नसल्यामुळें ती रम्य नगरी एखाद्या अलंकारविरहित असलेल्या रूपवती स्त्रीप्रमाणें भासली. द्वारकेंतील उपवनें उध्वस्त झाल्यामुळें ओळखूं येत नव्हतीं. तें पाहून माझ्या मनांत शंका उत्पन्न झाली व मीं कृतवर्म्याला म्हटलें " हे नरश्रेष्ठा, वृष्णिकुलांतील स्त्री-पुरुष अतिशय अस्वस्थ कां बरें दिसत आहेत ? याचें कारण काय, तें मला तत्त्वतः सांग."

( २ ) मीं असें विचारिलें असतां कृतवर्म्यानें मला शाल्वानें द्वारकेला वेढा दिल्यापासून तो तेथून निघून जाईपर्यंतचा सर्व सविस्तर वृत्तान्त सांगितला. तें साद्यंत वृत्त ऐकून मीं शाल्वाचा नाश करण्याचा निश्चय केला व सर्व नगरवासी जन, राजा उग्रसेन, वसुदेव आणि सर्व वृष्णिश्रेष्ठ वीर यांस आश्वासनानें आनंदित करीत म्हटलें—

" हे यादवश्रेष्ठहो, या द्वारकानगरींत तुम्ही सर्वदा अतिशय सावधपणानें रहा. मी शाल्वराजाचा समूळ नाश करावयास निघालों आहें. माझें सांगणें लक्षपूर्वक ऐका. त्या दुरात्म्या शाल्वाचा वध केल्यावांचून मी द्वारकेला परत येणार नाहीं. शाल्वासह सौभनगरीचा नाश करूनच मी तुमच्या दृष्टीं पडेन. यास्तव तुम्ही शत्रूला भयसूचक असलेला आणि नीच, मध्यम व तार अशा तीन स्वरांनीं युक्त असलेला हा युद्धदुंदुभि तीन वेळां वाजवा.

हे भरतश्रेष्ठा, मीं असा धीर दिला असतां ते सर्व वीर संतुष्ट होऊन 'तूं सत्वर जाऊन शत्रूचा संहार कर' असें बोलले आणि हृष्टचित्त झालेल्या यादवांनीं आशीर्वचनानें माझें अभिनंदन केलें.

( ३ ) नंतर विप्रश्रेष्ठांनीं स्वस्तिवाचन करून मला आशीर्वाद दिले असतां मीं त्यांना शिरसा वंदन केलें आणि शैब्य व सुग्रीव या उत्तम अश्वांनीं युक्त असलेल्या रथावर आरूढ होऊन माझा श्रेष्ठ पांचजन्य शंख वाजविला. त्याच्या नादानें दशदिशा दुमदुमून गेल्या. त्या वेळीं माझ्याबरोबर जी प्रचंड चतुरंग सेना होती, ती सर्व निवडक व विजयी होती. शूरत्वाविषयीं अतिशय प्रसिद्ध असलेले काश्य व वैदेह-देशांतील योद्धे माझ्या सैन्यांत होते. याप्रमाणें विपुल सेनेसह मी अनेक देश, पर्वत, अरण्यें, नद्या व सरोवरें यांचें उल्लंघन करून मार्तिक-देशाच्या समीप येऊन पोंचलों.

हे धर्मराजा, तेथें गेल्यावर शाल्व सौभनगरींत बसून सागराच्या समीप जात आहे, असें मीं ऐकिलें. तेव्हां मी त्याचा पाठलाग करीत निघालों. मीं प्रचंड लाटांनीं युक्त असलेल्या समुद्राच्या समीप जाऊन पोंचतांच तो सौभस्थ शाल्वराज सागराच्या मध्यवर्ती प्रदेशांत गुप्तपणें जाऊन राहिला. त्या दुरात्म्यानें मला दुरूनच अवलोकन करून हंसत हंसत पुनः पुनः युद्धार्थ आह्वान केलें.

( ४ ) युधिष्ठिरा, त्या वेळीं मीं माझ्या शार्ङ्गधनुष्यास अनेक मर्मच्छेदक बाण जोडून त्या दुष्टावर सोडिले. परंतु ते तीक्ष्ण शर त्याच्या सौभनगरींत जाऊन पोचले नाहींत. तें पाहून मला अतिशय क्रोध आला.

त्या पापी दैत्यानेंहि माझ्यावर हजारों दुर्धर्ष बाणांची वृष्टि केली आणि माझे सैनिक, सारथि व अश्व या सर्वांना शरवृष्टीनें आच्छादून टाकिलें. परंतु त्याच्या बाणाकडे दुर्लक्ष करून आम्ही युद्ध करूं लागलों. शाल्वाच्या पदातींनीं माझ्यावर नतपर्व बाणांचा वर्षाव केला. त्या असुरांनीं असंख्य मर्मभेदक शरांनीं माझे अश्व, रथ व दारुक यांस झांकून टाकिलें. त्यामुळें माझे सैनिक, रथ, अश्व व सारथि मला दिसेनातसे झाले. तेव्हां मींहि आपल्या धनुष्याला असंख्य बाण जोडिले व ते दिव्य अस्त्रमंत्रांनीं अभिमंत्रवून शत्रूंवर सोडिले.

हे भारता, माझ्या सैन्याला त्या सौभनगरींत प्रवेश करितां येणें शक्य नव्हतें. कारण ती नगरी भूमीपासून एक कोस अंतरावर असून जणुकाय आकाशाला भिडल्याप्रमाणेंच भासत होती. पण तेथें जमलेल्या सर्व प्रेक्षकांनीं,

रंगभूमीवर असल्याप्रमाणेंच, टाळ्या वाजवून व उच्चस्वरानें सिंहनाद करून मला आनंदित केलें.

माझ्या हातांतून सुटलेले शर शलभाप्रमाणें दानवांच्या अंगांत शिरले. त्या वेळीं माझ्या तीक्ष्ण बाणांनीं विद्ध झालेले दानव खालीं महासागरांत पडत असतां सौभनगरींत मोठा हाहाकार झाला. त्या दानवांचे भुज व स्कंध तुटल्या-मुळें ते कबंधांप्रमाणें विरूप दिसणारे दानव खालीं पडते वेळीं भयंकर आक्रोश करूं लागले आणि ते समुद्रांत पडले असतां जलचरांनीं त्यांना भक्षण केलें. तें पाहून मी गायीचें दुग्ध, कुंद, पुष्प, इंदु, कमलाचा देंठ किंवा रौप्य यांप्रमाणें शुभ्र असलेला देवदत्त-शंख जोरानें वाजविला.

पण दानव सागरांत पडत आहेत असें पाहून त्या दुरात्म्या शाल्वानें माझ्याशीं घोर मायायुद्ध आरंभिलें. हे वीरा, कार्तिकेय, इंद्र, वरुण व यम यांच्या आयुधां-सारख्या गदा, मुसळें, प्रास, शूल, शक्ति, परशु, खड्ग, वज्र, पाश व दंड, यांचा मजवर सतत वर्षाव चालविला. तेव्हां मीं मायेनेंच त्याच्या त्या मायावी आयुधांचा नाश केला.

याप्रमाणें मीं त्याच्या मायेचा नाश केला असतां तो असुर पर्वतांच्या शिख-रांनीं युद्ध करूं लागला. त्या वेळीं तेथें क्षणांत अंधकार तर क्षणांत प्रकाश, एकदा मेघाच्छादित दुर्दिन तर एकदा सुदिन, कोठें शीत तर कोठें उष्ण भासूं लागलें. अग्नीचीं किटाळें व शस्त्रें यांचा वर्षाव होऊं लागला. याप्रमाणें तो शत्रु माया पसरून माझ्याशीं युद्ध करूं लागला असतां मी त्याची ती सर्व माया ओळखून मायेनेंच त्या सर्वांचा नाश केला.

मीं योग्य समयीं आपल्या बाणांनीं त्याच्या मायेचें निवारण केलें असतां आकाश शेकडों सूर्य, चंद्र आणि असंख्य तारका, यांनीं युक्त झालें. त्यामुळें दिवस, रात्र किंवा दिशा ओळखूं येईनातशा झाल्या. तेव्हां मोहित झालेल्या मीं 'प्रज्ञा'-अस्त्राचा प्रयोग केला, त्याबरोबर वायु जसा कापसाला उडवितो त्याप्रमाणें माझ्या अस्त्रानें शाल्वाच्या मायामय अस्त्राला उडवून दिलें. त्या वेळीं पुनः प्रकाश झाला व माझें त्या दैत्याशीं अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध सुरू झालें. ३. ३. २७.

## अध्याय २१ वा.

[ १ शाल्वाचें अंतरिक्षांत आगमन व त्याच्याशीं युद्ध. २ वसुदेवाचा मायावी वध पाहून श्रीकृष्णाची मूर्च्छा. ३ मायेचें निवारण करून पुनः शाल्वाशीं युद्ध. ]

( १ ) **वासुदेव**—हे युधिष्ठिरा, त्यानंतर तो महारिपु शाल्वराज माझ्याशीं युद्ध करण्यासाठीं पुनः अंतरिक्षांत आला. जयाची इच्छा करणाऱ्या त्या मूढ शाल्वानें माझ्यावर तोफा, महागदा, दीप्त शूल, मुसळें आणि तरवारी यांचा रागानें वर्षाव केला. तेव्हां मींहि वेगवान् शरांनीं त्या शस्त्रांचा आकाशांतच सत्वर छेद करून त्यांचे दोन दोन, तीन तीन तुकडे करून टाकिले. तें पाहून अंतरिक्षांत फार मोठी गर्जना झाली. ती ऐकून क्रुद्ध झालेल्या शाल्वानें हजारों नतपर्व शरांचा वर्षाव करून माझा सारथि, अश्व व रथ यांना झांकून टाकिलें.

तेव्हां शाल्वाच्या बाणांनीं पीडित झालेला माझा सारथि विह्वल होत्साता मला म्हणाला—" हे प्रभो, माझें सर्व अंग विद्ध झालें आहे, माझ्यानें उभेंहि रहावत नाहीं. परंतु उभें रहावयाचेंच, म्हणून मी उभा आहें ! "

सारथ्याचें हें करुणवचन ऐकून मीं त्याच्याकडे पाहिलें. तेव्हां तो मस्तकापासून पायांपर्यंत शरांनीं विद्ध झालेला मला दिसला. त्याच्या सर्व शरीरावर शरानें विद्ध न झालेली अशी केंसभरहि जागा दिसत नव्हती. बाणांनीं केलेल्या क्षतांतून रक्ताच्या धारा वहात होत्या, त्यामुळें तो सारथि पर्जन्य वृष्टीनंतर गेरूनें युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें भासला. पण रणामध्यें शाल्वाच्या बाणांनीं व्यथित झालेल्या व हातांत रज्जु धरलेल्या त्या सारथ्याकडे पाहून मीं त्याला धीर दिला.

( २ ) हे युधिष्ठिरा, इतक्यांत कोणी एक द्वारकावासी मनुष्य मजकडे आला. तो उग्रसेनाचा सेवक असल्याप्रमाणें दिसत होता. त्यानें एखाद्या सुहृदाप्रमाणें मला रथांत बसविलें व तो खिन्न होऊन सद्गदित कंठानें माझ्याशीं बोलूं लागला.

हे कौंतेया, तो मला काय म्हणाला तें ऐक—तो म्हणाला—"हे केशवा, ये, तुला द्वारकाधिपति वीर उग्रसेनानें निरोप सांगितला आहे. त्या तुझ्या पित्याच्या मित्रानें तुला कळविण्यास सांगितलें आहे कीं, तूं येथें युद्धांत मग्न झाला आहेस, परंतु शाल्वानें द्वारकेवर चाल करून शूरपुत्र वसुदेवाचा वध केला आहे. यास्तव हे जनार्दना, तूं युद्ध पुरें कर व परत येऊन द्वारकेचें रक्षण कर. हेंच तुझें आतां महत्त्वाचें कर्तव्य आहे."

राजा, त्याचें हें वचन ऐकून मी अतिशय खिन्न झालों. मला काय करावें तें सुचेना. युद्ध सोडून जावें कीं शाल्वाचा वध केल्यावांचून येथून हालूं नये, यांतील कशाचाच मला निश्चय करवेना. हे राजेंद्रा, तें अप्रिय वृत्त ऐकून मीं सात्यकि, बलराम व महारथ प्रद्युम्न यांची मनांत अतिशय निंदा केली. कारण हे कुरुनंदना, माझ्या पित्याचें व द्वारकेचें संरक्षण करण्याचें कार्य मीं त्यांच्यावर सोंपवून सौभाचा निःपात करण्यास निघालों होतों. तेव्हां पराक्रमी बलराम, सात्यकि, चारुदेष्ण, सांब इत्यादि वीर जिवंत असतील का ! ते जिवंत असतांना साक्षात् इंद्रालाहि शूरसुताचा वध करितां येणें शक्य नाहीं. परंतु ज्या अर्थी वसुदेवाचा वध झाला आहे, त्या अर्थीं बलरामादि वीरहि गतप्राण झाले असावेत, हें स्पष्टच दिसत आहे. असें मला निश्चित वाटलें आणि मी या सर्व विनाशाचा पुनः पुनः विचार करीत अतिशय विह्वल होऊन शाल्वाशीं युद्ध करूं लागलों.

इतक्यांत हे पांडुनंदना, सौभनगरांतून माझा पिता वसुदेव खालीं पडत असलेला मला दिसला. तें पाहून मी मोहित झालों. त्या वेळीं पुण्य क्षीण झाल्यामुळें स्वर्गांतून भूतलावर पडणाऱ्या ययातीप्रमाणें तो माझा पिता भासला. त्याचा किरीट छिन्न झाला होता. वस्त्र मलीन झालें होतें. केंस अस्ताव्यस्त दिसत होते. त्यामुळें पुण्य क्षीण झालेला ग्रह खालीं पडतांना जसा दिसतो तसाच तो मला भासला. तें पाहून माझें श्रेष्ठ शार्ङ्ग धनुष्य माझ्या हातांतून गळून पडलें व मी शोकविह्वल होऊन भ्रांत चित्तानें रथांत बसलों.

( ३ ) याप्रमाणें रथाच्या मध्यभागीं मला निश्चेष्ट बसलेलें पाहून, मी गतप्राण झालों आहें, असें समजून माझ्या सैन्यांत मोठा हाहाकार उडाला. इकडे माझा पिता हात-पाय पसरून खालीं पडत असतां तो मला एखाद्या खालीं पडणाऱ्या पक्ष्यासारखा भासला. वसुदेव खालीं पडत असतां ते दानव हातांत शूल व पट्टे घेऊन त्याच्यावर प्रहार करूं लागले. तें पाहून माझ्या मनाचा थरकांप झाला.

त्यानंतर क्षणभरानें मी देहभानावर आलों व पहातों तों तेथें तें सौभनगर, शाल्व किंवा माझा वृद्ध पिता यांतील कोणीहि दिसेना. तेव्हां ही सर्व माया होती, असें निश्चित जाणून मीं शत्रूंवर असंख्य शरांचा पुनः वर्षाव केला. ३. ३. २१.